मराठवाड्यांतील

# अर्वाचीन मराठी वाङ्मय

पद्यविभाग [सन १८२८ ते सन १९२८].

ग्रंथकार


**चिंतामण नीलकंठ जोशी,** M. A. S. T. C.

मराठीचे माजी, प्राध्यापक, उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद-
व मुंबई, मद्रास, नागपूर, अलाहाबाद आणि उस्मानिया या
विद्यापीठांतील मराठीचे


किंमत ३ रु.

मराठवाड्यांतील

# अर्वाचीन मराठी वाङ्मय.

## पद्य विभाग.

(सन १८३८ ते सन १९३८).

ग्रंथकार

चिंतामण नीळकंठ जोशी, एम्.ए., एस. टी. सी.,

मराठीचे माजी प्राध्यापक, उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद–दक्षिण. व मुंबई, मद्रास, नागपूर, अलाहाबाद आणि उस्मानिया ह्या विद्यापीठांतील व दिल्ली सिव्हिल सर्व्हिसमधील मराठीचे परीक्षक.

जुलई १९३९ ]　　　　[ किंमत. ३ रु.

दक्षिण हैद्राबाद येथील

## उस्मानिया विद्यापीठास

सप्रेम समर्पण.

प्राध्यापक पदवीचा प्रथम जिथें लाभला मळा मान ॥
त्या विद्यापीठातें वाक्‌सुमनें अर्पितों जरी मा न ॥

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.



मराठिचें मूळ मराठवाडा ॥ गर्जे जयाचा जगिं हो ! पवाडा ॥
तेथील हें वाङ्मयवृत्त ताजें ॥ स्वकीय घ्या मानुनि गोड खाजें ॥

प्रस्तुत ग्रंथाचा संकल्प केल्यापासून त्याचा पहिला विभाग प्रकाशित होईतों दोन वर्षांहून अधिक काल गेला खरा. पण संकल्प आणि सिद्धि ह्यांमध्यें किती तरी अडचणी उत्पन्न होत असतात, हें कोणास नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. परंतु ह्यापैकीं वर्ष दीड वर्ष ग्रंथ व सामुग्री मिळविण्यांतच निघून गेलें. आणि ग्रंथ तयार झाल्यापासूनही तो छापण्याच्या विवंचनेंत सात आठ महिने गेले. मध्यंतरीं ग्रंथ केव्हा तयार होणार ह्याबद्दल पुष्कळांकडून पृच्छा केली जात होती. परंतु ह्या अडचणींमुळें, त्यांच्या अपेक्षेप्रमाणें तो लौकर त्यांच्या हातीं आम्हास देतां आला नाहीं ह्याबद्दल दिलगिरी वाटते.

ह्या विषयावरील हाच प्रथम ग्रंथ असल्यामुळें ह्याचें प्रयोजन निराळ्या रीतीनें सांगण्याचें कारण नाहीं. वेळोवेळीं प्रसिद्ध होऊन गेलेल्या ग्रंथांवरील विवेचनें वर्तमानपत्रांतून व मासिकांतून येऊन गेलीं आहेत व अजून येत आहेत हें खरें, तरी पण तें लिखाण तात्कालिक व क्षणजीवी असल्यामुळें त्यास स्वतंत्र ग्रंथाचें महत्त्व नसतें. शिवाय त्यांतील समालोचन तुटक असल्यामुळें त्यावरून वाङ्मयाची कल्पना साकल्यानें होत नाहीं. प्रो. माटेकृत 'महाराष्ट्र सांवत्सरिका'तील (स. १९३५) माहिती अगदीं त्रोटक, अपुरी व क्वचित् चुकीचीही दिलेली आढळते. वि. पां. नेने ह्यांच्या ६०० पानांच्या 'अर्वाचीन मराठी साहित्यां'त मनाठकर वगैरे चार पांच कवींचा नामनिर्देश, व दिवाकर कृष्ण ह्या लघुकथालेखकाविषयीं थोडेशी चर्चा, ह्याहून अधिक कांहीं सांपडत नाहीं. तेव्हां खास मराठवाड्यांतील वाङ्मयाचा इतिहास देणारा एक विस्तृत ग्रंथ असणें अवश्यच ठरतें. अशा

तऱ्हेचे प्रादेशिक ग्रंथ लिहिण्याचा प्रघात इतरत्र रूढ असल्यामुळें त्या दृष्टीनेंही ह्या ग्रंथास नांवें ठेवण्यास जागा आहे असें वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर स. १९३१ मधल्या इकडील म. सा. संमेलनांत अशा तऱ्हेचा ग्रंथ निझाम सरकारनें मुद्दाम लिहवावा असा एक ठरावही झालेला आहे.

ह्या ग्रंथांत स. १८३८ ते १९३८ पर्यंतच्या शंभर वर्षांत मराठवाड्यांत झालेल्या ग्रंथकाराचा व त्याचे ग्रंथांचा विचार केला आहे. हंसराज, रामकृष्ण, बापू सोमयाजी, आणि विश्वनाथ वगैरे बऱ्याच कवींविषयीं रा. वि. अं. कानोले ह्यांनीं बरीच सविस्तर माहिती प्रसिद्ध केली असल्यामुळें व ते ह्या शतकाच्या पूर्वीचे असल्यामुळें त्याचा समावेश ह्यात केला नाहीं. त्यानंतर जे ग्रंथकार उपलब्ध झाले त्यातील सदानंद उर्फ नाना महाराज उमरीकर ह्यांचा जन्म सन १८३८ आहे, तेव्हा त्या सालापासून चालू वर्षापर्यंत एक पूर्ण शतक होत असल्यामुळें वरील काळ घेतला आहे. त्यासंबंधीं दुसरें वैशिष्ट्य नाहीं.

ह्यांत ग्रंथकाराचें चरित्र, त्याच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध ग्रंथांचा निर्देश, उपलब्ध ग्रंथाचें सविस्तर विवेचन व नमुन्यादाखल कांहीं उतारे अशी मांडणी केली आहे. चरित्रविषयक माहिती प्रत्यक्ष ग्रंथकार अथवा त्याचे आप्त, ह्याचेकडून प्रयत्नपूर्वक मिळविली असल्यामुळें ती अगदीं विश्वसनीय आहे. ग्रंथ व ग्रंथकार ह्याची माहिती मिळविण्याचे शक्य तेवढे प्रयत्न केले आहेत तरी पुष्कळसे चुकून राहिले असल्याचाही संभव आहे. परंतु त्यास नाइलाज आहे. कांहींना अनेकवार विनंति केली असताही त्यांनीं आपल्या विषयीं माहिती देण्याचें नाकारलें, त्यामुळें त्याच्या चरित्राची उणीव राहिली आहे. परंतु ह्या गोष्टीस इलाज नाहीं.

मराठवाडा मागासलेला. त्यांत मराठीचें ना अध्ययन ना अध्यापन; त्यांत कवि कोठले व काव्य कसलें? आणि त्याचा इतिहास तो काय! असे आक्षेप घेणारे तिकडेच नव्हे तर इकडेही निघतील. नव्हे आहेतही. परंतु हा पूर्वग्रह टाकून जर ह्या ग्रंथाचें अवलोकन त्यांनीं शांतचित्तानें केलें तर त्यांस इकडील वाङ्मयाचीं अनेक वैशिष्ट्यें पाहून आनंद व समाधान झाल्या-शिवाय राहणार नाहीं. निदान हें वाङ्मय अगदीं टाकाऊ वा उपेक्षणीय

नाहीं अशी त्यांची खात्री होईल असें वाटतें. शिवाय आपण पूर्वी कोठें होतों, आज कोठें आलों व अजून किती उरलें, ह्याची कल्पना चालू पिढीस झाल्यास भावी उन्नतीस ती साधकच होईल. दुसरें असें कीं मराठवाडा हा बृहन्महाराष्ट्राचा एक मोठा विभाग असल्यामुळें त्यांतील वाङ्मयाचें अध्ययन झाल्याशिवाय मराठी वाङ्मयाचें समग्र अध्ययन झालें असें कधींही म्हणतां येणार नाहीं. आणि उस्मानिया विद्यापीठांत तर ह्याचें अध्ययन आस्थापूर्वक व आत्मीयतेनें होणें अत्यंत इष्टच आहे. तेव्हां हे हेतु अल्पांशानें जरी सफल झाले तरी प्रस्तुत लेखकास आपल्या श्रमांचें चीज झालें असें वाटेल.

हा ग्रंथ सर्वांगपरिपूर्ण नाहीं; त्यांत कांहीं उणीवा आहेत, ह्याची जाणीव लेखकास आहे. ग्रंथकारांचीं छायाचित्रें देऊन व आणखी उपयुक्त परिशिष्टें जोडून व छपाई-बांधणी अधिक आकर्षक करून तो सर्वांगसुंदर करतां आला असता, पण ह्या सर्वांस पैसा पाहिजे. तेव्हां हा प्रयत्न वाचकांस पसंत पडून त्यांजकडून उदार आश्रय मिळाल्यास ह्या सर्व उणीवा द्वितीयावृत्तींत भरून काढण्याचें आश्वासन आम्ही त्यांस देतों. तूर्त प्रथम प्रयत्न म्हणून स्नेहार्द्र दृष्टीनें त्यानीं त्याचा स्वीकार करावा अशी त्यास सविनय प्रार्थना आहे.

आतां शेवटलें गोड काम म्हणजे आभारप्रदर्शनाचें. प्रथमतः ज्या ज्या ग्रंथकारांनीं आपापले ग्रंथ आनंदानें ताबडतोब मजकडे पाठविले व दीर्घकालपर्यंत राहूं दिले त्याचे आभार मानणें अवश्य आहे; कारण पुष्कळसे ग्रंथ दुर्मिळ असून विकत मिळत नसल्यामुळें त्यांच्या ह्या कृपेशिवाय ग्रंथ लिहिणेंच अशक्य झालें असतें. परंतु हें काम केवळ पत्रव्यवहारानें होण्यासारखे नव्हतें. तेव्हा गावोगांवीं जाऊन ग्रंथ व ग्रंथकार हुडकून आणि त्याची चरित्रविषयक माहिती लिहून काढून, ती ज्या माझ्या अनेक प्रिय शिष्यांनीं मला आणून दिली, त्यांचें कौतुक करावें तेव्हढें थोडेंच आहे. ह्या गुरुदक्षिणेनें मी आपणास धन्य समजतों. त्या सर्वांचा व्यक्तिशः नामानिर्देश करणें जरी अशक्य असलें तरी माझे प्रियशिष्य आणि सहकारी-प्रो. नांदापूरकर, रा. जाफराबादकर, देशपांडे, हरिहरराव, नांदेडकर व जवळकर वगैरेंचा उल्लेख करणें अवश्य वाटतें.

त्याचप्रमाणें साहित्यिक प्रकाशक श्री. य. गो. जोशी यांनीं प्रकाशनकार्य स्वीकारल्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहें.

तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोललों पुरें उणें ।
तें तुम्हीं माउलीपणें । उपसाहिजो जी ॥
आणि तुम्हां संताचिये सभे । जें उणिवेंसीं ठाकें उभें ।
तें पूर्ण नोहे तैं लोभें । तुम्हांसीच कोपे ॥ ज्ञाने. अ. १८.

इति शम् ।

ग्रंथकर्ता.



# अनुक्रमणिका.



# शुद्धिपत्र.

मुद्राराक्षसाच्या लीला तर विश्रुतच आहेत. मुद्रणाचें स्थलांतर झाल्यामुळें तर त्यानें अगदीं विक्रमच केला आहे. तेव्हां काना, मात्रा, वेलांटी व अनुस्वार यांचे बाबतींत न्यूनाधिक्य, विपर्यय व लोप इत्यादि त्यानें केलेले अनर्थ कोठवर दर्शवावे ? म्हणून केवळ अर्थबोधास अवश्य तेवढ्यांचाच खालीं उल्लेख करून शेषं संदर्भेण योजयेत् अशी वाचकांस प्रार्थना करीत आहें.

| पान | प्या.ओ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | २।३ | पूर्ण अशु. | अशुद्धतापूर्ण |
| २६ | २।१० | एकवार | एकावर |
| ४८ | २।१ | प्रातप० | प्रताप० |
| ५१ | २५ | चरचर | चराचर. |
| ५२ | ३।९ | येते | येतो |
| ६२ | २।१० | भौत्तिक | भौतिक |
| ९६ | १।७ | कुंभाच्या | कुंभकाच्या |
| ९७ | १।७ | त्याच्या | हीं त्याच्या |
| ,, | १।८ | आढळते | आढळतात. |
| ९९ | २।३ | महान्. इ. | स नृपतिः सामंत० |
| १११ | २।३ | बुखंडें | बुर्खेडें |
| १३५ | १।१० | स्वरादे. | स्वरोदयांत |
| १७२ | १।६ | गुणैगो. | गुणैर्गौरवं |
| १९२ | ३।११ | मतांस | मृतांस |
| २०३ | १।४ | व्युत्प०भा. | व्यु.भ्यासौ |
| ,, | २।२५ | अनुग्रास | अनुप्रास |
| २२४ | ५।६ | ती | ता. |
| २३१ | ५ | खडेकर | सडेकर |
| २३७ | १।६ | प्रकाशमा० | प्रकाशनानें |
| २४९ | ४।२ | विसरती | विसरसी |
| २५० | १।१२ | मंजुजा० | मंजु शिंजितानें |
| २६८ | १।१५ | नति | नमी. |
| २७० | ३ | १८९८ | १८९८–१९३९ |
| २७३ | ७ | आहे | गळणें |
| २७७ | ४।३ | दिसतो | दिसते |
| २९७ | टीपेत | आरूढ | अरूढ |
| ३०० | ३।७ | रम्मा | रम्या |
| ३१७ | २।३ | तिसऱ्यांत | दुसऱ्यांत |
| ३२९ | २।१५ | वेवुनी | ठेवुनी |
| ३३० | २८ | निरोगी | वियोगी |
| ३४४ | ३।५ | ०दैर | दैरबुत्खाना |
| ३६६ | ३।१० | देवकन्या | ०कन्या |
| ३६७ | २।१५ | स्वस्थ्य | स्वास्थ्य |
| ३६८ | ४।१ | लल्यण | लक्ष्मण |
| ३७४ | ५।२ | घरीं | घरां |
| ३८१ | २।६ | पडिती | पंडिती |
| ३८२ | ३।१४ | सात्तिक | सात्त्विक |

ग्रंथकर्ता.

# प्रो. चिंतामण नीळकंठ जोशी यांचीं

## इतर पुस्तकें.

**मराठी**

१ गद्यपद्यावली.

२ अनुवादविचार.

३ मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि.

४ निरंजनमाधव कवीवर टीकात्मक निबंध.

**संस्कृत**

५ म्याट्रिकचे सोडवलेले संस्कृत पेपर्स.

६ बालकांड रामायण (नोटस् व भाषांतरासह).

७ उत्तररामचरित (इंग्रजी भाषांतर) P. V. Kane's Ed.

८ महाभारतप्रवेशिका (इंग्रजी भाषांतर).

**मराठवाड्यांतील अर्वाचीन मराठी वाङ्मय.**

गद्यविभाग — छापत आहे.

———

मराठवाड्यांतील

# अर्वाचीन मराठी वाङ्मय

पद्यविभाग [ सन १८३८ ते सन १९३८ ].

# प्रकरण १ लें

## श्रीसदानंद महाराज ऊर्फ बाबा महाराज उमरीकर

## (इ. स. १८३८–१९२४)

अलीकडील थोर पुरुषांत बाबामहाराज उमरीकर हे अलौकिक संत कवि होऊन गेले. ज्ञानेश्वरापासून तों थेट दासगणूपर्यंत अवलोकन केलें असतां मराठवाडा ही संत कवींची जन्मभूच आहे, असें म्हणावेंसें वाटतें. याची कुलपरंपराही मोठी थोर आहे. " उद्धव चिद्घन झाले पूर्वी संत । तयाचे वशात जन्म ज्याचा ॥. उद्धव चिद्घनाची एक शाखा अंबेजोगाई येथें गेली. कृष्णाजीपंत–विसाजीपंत–गदाधरपंत–बाळकृष्ण असे पुरुष त्या शाखेंत झाले. यापैकीं शेवटचे जे बाळकृष्ण संत तेच मठ संस्थापक होत. ते आनंद संप्रदायी शुकानंदाचे शिष्य होते. गुरूनें त्यास " देशिकानंद " असें दीक्षानाव दिलें होतें. महाराजा चंदुलाल यानीं वसमतच्या शुकानंदमठास " धनज गावची " जहागिरी दिली. बाळकृष्ण महाराजानीं शके १७९४ मध्यें कार्तिक शु० ॥ ११ शीस उमरी येथें देह ठेविला. हेच सदानंदाचे आजे व मोक्ष गुरु होत.

सदानंदाचे पित्याचें नाव विश्वनाथ होतें. त्याचा जन्म शके १७६० त झाला. जन्मत:च त्याचेवर नागानें फणा धरली होती, म्हणून त्यास शेष म्हणत असत. लहानपणापासूनच त्याची तीव्र बुद्धि दिसूं लागली. हठयोग, राजयोग, प्राणायाम इत्यादि शास्त्रांत त्यानें प्रावीण्य मिळविलें होतें. पण बालवयातच त्याची वृत्ति विरक्त व परमार्थप्रवण आहे, असें त्याचे आजोबांचे निदर्शनास आलें होतें, तरी त्यांच्या आज्ञेवरून तो गृहस्थाश्रमी झाला. त्याचें एकंदर वर्तन पाहून पुढें हाच आपली गादी चालविण्यास योग्य आहे अशी खूणगांठ त्यानीं बांधली होती. त्याप्रमाणें त्यानीं त्यास दीक्षा देऊन पूर्णाभिषेक केला व " सदानंद " असें दीक्षानाम ठेविलें. उपदेश ग्रहणानंतर तो आपला अनुभव सांगतो कीं:—

> शेष म्हणे मज कृपा जेव्हां झाली । तया वेळीं गेली भेदभ्रांती ॥
> चराचर सर्व हरपलें दृष्टि । ऐसी कृपादृष्टि पूर्ण होय ॥

हा अनुभव स्वसंवेद्य आहे. तेथें तर्क अप्रतिष्ठ आहे. त्यास एकदम सिद्धावस्था प्राप्त झाली. ।। आतां विदेही तो झाला । लोक वेडा म्हणे त्याला ।।. तो नित्य विरक्त व उदास असे. वर्तन अगदीं साधें व बोलणें अगदीं अभिमानरहित असे. बहुधा तो सहज स्थितींत राही. औरंगाबादचे पंढरीनाथ तुकाराम क्षीरसागर व भीमराव देशमुख हे त्याचे आवडते शिष्य होते. उमरीचा कोमटी समाजही त्यास गुरुस्थानीं मानीत असे. त्याचे चिरंजीव अमृतराव महाराज विद्यमान पीठाधिपति आहेत. संन्यास घेतल्यानंतर दोन दिवसानीं म्हणजे कार्तिक व० ।।३।। शुक्रवारीं शके १८४६ त त्यानीं इहलोक सोडला. उमरीचे मुसलमानही त्यास फार मानीत असत.

सदानंद विदेह स्थितीतून सामान्य स्थितीत येई तेव्हां त्यास कवित्व-स्फूर्ति होत असे. व त्यावेळीं तो कवितांचीं पानेंच्या पानें सुवाच्य अक्षरानें लिहून काढी. त्याच्या स्फुट कवितेचीं ५०।६० बाडें भरलेली आहेत. काव्य-स्फूर्तिविषयीं त्यानें पुढील उद्गार काढले आहेत. । गुरु देशिकाची कृपा पूर्ण झाली । वाणी जे स्फुरली गुण गाया ।।. याची सर्व कविता अजमासें ३५ हजार पर्यंत असावी असें वाटतें. पण सर्व रचना अध्यात्मिक विषयावर आहे. तो म्हणतो:—

बहु ग्रंथ केले अध्यात्मिक ज्ञान । जेणें समाधान मन होती ।।

आणि अशा जीवन् मुक्तापासून लौकिक काव्याची अपेक्षा तरी कोण करील ? याच्या ग्रंथापैकीं " सुंदरविलास दीपिका " व " देशिक लीलामृत " हे ग्रंथ प्रसिद्ध* झाले आहेत. पैकीं पहिला, हिंदी " सुंदरविलास " ग्रंथाचा मराठी अनुवाद आहे. कवीनें असें ग्रंथातच स्पष्ट सांगितले आहे:—

सुंदरदास महाज्ञानी । अनुभव गाइला प्रीतिकरूनी ।
तो सुरस वाटला मनीं । सकळ संताच्या ।। १–२ ।।
भाषा हिंदुस्तानी कठीण । न कळे सर्वांसी अर्थज्ञान ।
यासाटीं महाराष्ट्रवाणी करून । अर्थ कळवितो ओवीबद्ध ।।१–३।।

व दुसरा ग्रंथ सद्गुरु बाळकृष्ण महाराज यांच्या चरित्रावर आहे.

* प्रकाश:—श्री. अमृतबाबा महाराज उमरीकर शके १८५८. प्रस्तावना व चरित्र:—दे. ल. महाजन व अ. वि. कोनाले. मुद्रक:—बा. गो. पारगांवकर, औरंगाबाद. किं रु. १.

( १ ) " सुंदरविलास " हा ग्रंथ सुंदरदासानें हिंदींत लिहिला आहे. पद्यरूपानें मराठींत अवतरलेला हा पहिलाच हिंदी ग्रंथ होय. तुळशीदासाचें रामायण व निश्चलदासाचा विचारसागर ह्यांचीं रूपांतरें मराठींत आहेत, पण तीं गद्यांत आहेत. म्हणून पद्य हा ह्या ग्रंथाचा एक विशेष आहे. अलीकडे हिंदी वाङ्मय मराठी वाचकापुढें बरेंच येऊ लागलें आहे. एकीकडे रा. गिजरे[1] हे भाषाभगिनींच्या संसाराचा परिचय करून देत आहेत तर दुसरीकडे श्री. तिवारी[2] " भारत भारती " सारख्या श्रेष्ठ व राष्ट्रीय हिंदी काव्याचा आस्वाद मराठी वाचकास पद्यानें चाखवीत आहेत. मराठी लेखकाची व कवींची दृष्टि हिंदी वाङ्मयाकडे वळविण्याचें पुष्कळसें श्रेय भारतीय साहित्य परिषदेकडेच जातें हें निर्विवाद आहे. म्हणूनच सुमारें ४० वर्षांपूर्वी ज्यानें सुंदरविलासदीपिकेसारख्या सुंदर ग्रंथाची भर मराठी वाङ्मयात घातली व मराठीचें ग्रंथभांडार वाढविण्याचा एक नवीन मार्ग खुला केला ह्याबद्दल तो कवि किती तरी प्रशंसेस पात्र आहे. परंतु ह्या ग्रंथाकडे वळण्यापूर्वी हा सुंदरदास कोण व त्याच्या मूळ ग्रंथाचें महत्त्व काय, हें सांगणें अवश्य वाटते. सुंदरदास हा एक प्रसिद्ध संत हिंदी कवि होऊन गेला. त्याच्या विचारावर दादूपंथाच्या मताची छाप पडलेली स्पष्टपणें दिसते. दादूचा उल्लेख त्यानें अनेक स्थळीं मोठ्या आदरानें केला आहे. मूळ ग्रंथांत पहिलें नमन त्यासच करून 'दादूकृपेनें ज्ञान पावलों' असें कृतज्ञतापूर्वक त्यानें म्हटलें आहे. ह्या दादूपंथाचें वर्णन ज्ञानकोशात[3] पाहावयास मिळतें. सामान्यतः म्हणावयाचें म्हणजे त्या तत्त्वज्ञानाचें मायाविशिष्ट द्वैतातून मायातीत अद्वैत सिद्धांतात पर्यवसान झालें आहे. हा ग्रंथ स्वानुभावाचा आहे. ज्ञानविलास, ज्ञानसमुद्र वगैरे ग्रंथही त्यानें हिंदींत लिहिले आहेत.

सुंदरविलासाच्या मराठी अनुवादाचे ३४ अध्याय असून त्याची एकंदर ओवीसंख्या २०६६ आहे. पहिला अध्याय नमनाचा असून त्यात वर सांगितल्याप्रमाणें प्रथमतः मूळाप्रमाणें सुंदरदासानें दादूस केलेलें नमन आलें आहे व नंतर सदानंदानें आपले आजोबा व मोक्षगुरु जे बाळकृष्ण महाराज ऊर्फ देशिकेंद्र शुकानंद यास नमन केलें आहे. जुन्या वळणाची कविता म्हटली कीं तिचा विषय परमार्थ हा ठरलेलाच व त्याची मांडणीहि

१ ज्योत्स्नाः--जुलई १९३७. २ विहंगमः--जून १९३७. ३ ज्ञानकोशः--वि. १३.

ठरलेलीच असावयाची. त्याचप्रमाणें ह्या ग्रंथाचीही स्थिति आहे व त्याचा रोख अद्वैत तत्त्वज्ञानाकडे आहे. बद्ध, मुमुक्षु व मुक्त असे ह्या ग्रथाचे विषयवार तीन विभाग करितां येतील व पहिल्या विभागात सामान्यतः १ ते १२ अध्याय दुसऱ्यात १३ ते २४ व तिसऱ्यात २५ ते ३४ अशी त्याची वांटणी होईल. मनुष्याला मी बद्ध आहें, मुक्त होणे हें माझे ध्येय आहे, ह्या गोष्टीची जाणीव झाल्याशिवाय तो मुमुक्षु बनणार नाहीं. पण ही जाणीव होणेंच कठीण असतें. ती व्हावी म्हणूनच उपदेशचिंतामणीच्या मात्रेचे वळसे देऊन त्यास जागृति आणण्याचा प्रयत्न ह्या भागात केला आहे. संसार म्हणजे संतत वाहणारा जन्ममरणाचा प्रवाह. त्यांत मनुष्यप्राणी अडकण्याचें कारण त्याची इंद्रियाधीनता. तेव्हा प्रथमतः इंद्रियनिग्रह पाहिजे. ह्याकरिता चित्तवृत्ति निरोधात्मक साधा राजयोग किंवा शरीर शोषणात्मक कष्टप्रद असा हटयोग ह्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. हटयोगानें कदाचित् कालवचना करणें साध्य होईल पण अखेर ८४ लक्ष योनींचा फेरा फिरावाच लागेल. म्हणून हरिभजन हाच एक सोपा उपाय आहे. पण देह क्षणभंगुर आणि अज्ञान प्राणी तर बाल्य, तारुण्य, व वृद्धाप्य ह्या अवस्थात्रयींत " अशनं मे वसनं मे " असा मे मे करीत गुंग असतो व काळही त्याला संसारात " बोलवी, गुंगवी, डोलवी, नाचवी, " असा खेळवीत असतो; आणि असा झुलवता झुलवता त्यास एकदम केव्हाच लांबवतो. तेव्हां ह्या काळाचें भय नाहींसें झालें पाहिजे. तें ज्ञानानें होतें व ज्ञान गुरुविना नाहीं म्हणून गुरूसच शरण जावें. हें खरें. पण वाटेत वाटचोर फार. त्यांत तृष्णा तर मोठी डाकीण. " । आग लागता अधिक जळते । तैशी तृष्णा वाढतां पुरे न म्हणे ॥ " अशी ती मोठी ग्वादाड. पण ती किती झालें तरी वाटचोर; म्हणून ती एक वेळ पुरवली; पण पोटाचा पाठचोर जी पाठ पुरवतो त्यातून सुटका नाहीं. देवानें मनुष्यास सुंदर अवयवांनीं युक्त शरीर दिलें हें सर्व टीक झालें. पण खरेंच त्यानें त्याला पोट कशाला बरें दिलें ? तें कांहीं केल्या भरतच नाहीं. त्याच्या पायींच पराधीनता ! त्याच्या साठींच पाप ! आणि ह्या पापानेंच इहामुत्र शृंखला ! ह्यावर ग्रंथकार उत्तरतो बाबा ! " विश्वंभर सर्वांचे भुकेची चिंता वाहातो ॥ पण । असल्य पाहिजे विश्वास । व्हावें सद्गुरूचें दास । अनन्यभावें भजावें ॥. म्हणजे सर्व कांहीं

होईल. तू भलतीच काळजी कां करीत बसतोस ! करता येण्यासारखें आहे तें तर कर. शरीर पाहिलें तर किती अमंगळ ! किती तरी दुःखाचें मूळ ! पण त्याचा केवढा गर्व ! तो टाक. नारी म्हणजे नर्ककुंड. तिजवर जो लुब्ध त्यास स्वार्तानें नरकवास. मग तेवढी स्त्रीवासना सोड. । दुष्ट संगति स्वप्नींही नको । दुष्टाचे दोष ॥ पातातळीं जळ परी भ्रष्ट । दुजिया विजऊ धावती ॥ पण हे दोष टाळण्यास मन आवर. कारण तें अनावर आहे, हट्टी आहे. संतांशिवाय तें सर्वांना नाचवितें. पण आत्मज्ञानविचारानें मात्र क्षणात वश होतें. त्याचें मनपण मोडतें. तें ब्रह्मरूप बनतें. पण सद्गुरु पाहिजे. यज्ञ, याग, तीर्थ, व्रतें असे अनेक मार्ग मोक्षाला आहेत, असें सांगतात, पण तें व्यर्थ आहे. कानफाटे, भस्मधारी, सन्यासी, धूम्रपीर्थी, ऊर्ध्वबाहू, ऊर्ध्वपाद, असे अनेक प्रकारचे लोक मोक्षमार्गांत आढळतात. पण । काय करावें अज्ञानी असे पचु पचु मरती. ॥ म्हणून या अनेक ढोंगापासून अलिप्त रहा. गुरुकृपा ही मुख्य आहे. ती कशी मिळेल यासाठीं झट. पण सद्गुरु ओळखणें कठीण आहे. कारण ब्रह्मवाचाळ, आत्मस्तुतिपाठक, पुष्कळ असतात. ना कर्म ना ब्रह्म. ते दोहोंकडे भ्रष्ट होतात. खरे व मुलाम्याचे अलंकार, हंस व बगळा, कोकिळ व कावळा, स्फटिक व भिंगत यांतील सद्-वस्तु शोधून काढणें जसें कठीण, तसेंच सद्गुरु शोधणें कठिण आहे. शुद्ध विवेकानें चांगल्यावाईटाचा निवाडा करावा. आणि हळू हळू सगुणाकडून निर्गुणाकडे जावें. पण सदानंद सांगतो कीं सगुण निर्गुण एकच. मात्र निर्गुणात क्लेश तेवढे अधिक असतात. म्हणून पतिव्रतायोगानें, व अनन्य भक्तियोगानें सद्गुरुस भजावें:—सद्गुरुची सगुण व्यक्ति । अनन्यभावें भजावें ॥१६।१३॥ तरीच जन्माचें सार्थक होईल. सर्व इंद्रियांस ईश्वरभक्तीकडे लावावें. ज्ञान-युक्त भक्ति पाहिजे. गुरु विपरीत लक्षणेनें बोलत असतात. तें नीट लक्ष लावून समजून घ्यावें. देहात्मभाव ठेऊं नये. आपण ब्रह्मरूप असून भ्रमानें आपणास देह मानतो. देहसंकटें आपणासच मानतो. पण ज्ञान झालें म्हणजे आपण स्वतःच ब्रह्म होतो. मग ॥ करीं असता कंकण । कशास पाहिजे दर्पण । न सांपडे स्वरूप जाण । सद्गुरु कृपेवीण ॥ २१ अ. ॥ श्रवण, मनन, निदिध्यास, व साक्षात्कार अशा विचारागाच्या पायऱ्या आहेत. उपाधिभिन्नत्वानें आत्मा नानारूपत्वानें दिसतो, पण तो मूळ एकच

आहे. बुद्धीनें वारंवार ब्रह्मविचार करावा मग बुद्धिच उरत नाहीं. तीच ब्रह्ममय होते. पण ह्याला सद्गुरूच साधन होय. नंतर २३ व्यात सांख्य ज्ञानाची माहिती दिली आहे. त्यानंतर अ. २४ मध्ये जगाचें मिथ्यात्व सिद्ध केलें आहे. तुर्यावस्थेत परमात्म्याशीं समरस झाल्यावर मिथ्या माया दिसत नाहीं. पण अशा प्रत्येक गोष्टीस गुरुभजन हें एकच साधन आहे. ब्रह्मविलास एक अखंडरस आहे. भेद. बुद्धि करते. शिव-शक्ति: पुरुष-प्रकृति: पति पत्नी; ईश्वर ईश्वराणी(रा–री): नारायण नारायणी; अर्धनारीनटेश्वर वगैरे अनेक पदांत द्विवचन दिसते खरे पण ते भासमान आहे. । एक बीज दोन दळें तसी वस्तु एकरस अखंड । उभय प्रकारें विलसे आपणच होऊन ॥ असे अद्वैताचें रहस्य सांगितलें आहे. जीवाचे रागद्वेष, पूर्वकर्म, व अज्ञान वगैरे कारणामुळे जग भासते. पण आत्मा आनंदमय जन्ममरणरहित आहे. पण अशा ज्ञानासाठीं गुरुभक्ति पाहिजे. अ. २८ मध्ये षड्रिपूस मारण्यांतच खरें वीरत्व आहे असें सांगितलें आहे. ते अंगी बाणले म्हणजे साधुसंगतीनें साधुस्थिति प्राप्त होते. ज्ञानावांचून मोक्ष नाहीं. गुरुवांचून ज्ञान नाहीं; व भक्तिशिवाय गुरु मिळत नाहीं अशी सांगितलेली सूत्रमालिका (अ. २९) खरोखर चिंतनीय आहे. नंतर (३०) ज्ञान्याचीं लक्षणे सांगितलीं आहेत. तो सदैव स्वानंदांत निमग्न असतो. कर्म–उपासना–ज्ञान या तिन्ही गोष्टी तो लोकसंग्रहार्थ करतो. एवंच ॥ ज्ञानि ज्ञानि ज्ञानीं जाणे । इतर तयासी नेणे ॥ तो सर्व करून अकर्ता असतो व तो ॥ देह पडतांच कैवल्य पावे ॥ असें ज्ञान्याबद्दल सांगितलें आहे. पण मुख्य "गुरुसेवा" हें पालुपद प्रत्येक अध्यायाअंतीं आहेच. अ. ३१ मध्ये पुनः निःसंशय ज्ञान्याचें अंग वर्णिलें आहे. त्याचा देहासंबंधी सर्व संशय गेलेला असतो. तो कोठें कसा का पडेना. मग दक्षिणायन असो की उत्तरायण असो. त्याचें त्यास कांहीं वाटत नाहीं. असा संशयातीत ज्ञानीच म्हणजे जीवन्मुक्त होय. त्याच्या । प्रीतीचा प्रकार काय सांगावा । नाहीं जातपात कुळगावा ॥ तो "सर्वं खल्विदं ब्रह्म" अशी स्थिति अनुभवितो. ती सांगता येत नाहीं. मुक्यानें गुळाची गोडी कशी सांगावी? शेवटल्या कळसाध्यायांत कवि म्हणतो:—

पाहूनी मूळ ग्रथासी । टीका केली मराठी सरशी ।
अर्थ अनुभव घेतां मानसी । निजानंद प्राप्त होय ॥३४-४१॥

चौतीस अंग व्रज भाषा । तयाची केली टीका सदृशा ॥
महाराष्ट्रवाणी देशभाषा । प्राकृत बहु सोपी ॥ ३४६६ ॥

कवि म्हणतो:—समता कसावसा ग्रंथाचा गोपवारा मी दिला नाहीं, तर सुलक्षण रचना करून त्याचें रहस्य प्रगट केलें आहे. तामसी माणसास ससारीं येणेंजाणें पडणार पण श्रद्धावतास । सकळ अविद्या होय दुरी । कैवल्य फळ पावते ॥ असे त्यानें आश्वासन दिलें आहे.

वर दिलेल्या सारांशावरून ह्या ग्रंथात नवीन असें काहींच नाहीं, हें सहज दिसून येण्यासारखें आहे. इतर शेकडों अद्वैतमत प्रतिपादक ग्रंथात जसें परमार्थविवेचन आढळतें तसेंच ह्यात आहे. एका हिंदी ग्रंथाचा सुबोध व सुसगत अनुवाद करून त्या वाङ्मयाकडे मराठी वाचकांची दृष्टि कवानें वळविली ह्यातच कायतें त्याचें महत्त्व आहे. बाकी काव्यरसाच्या दृष्टीनें अगर भाषासौंदर्याच्या दृष्टीनें त्यात विशेष आकर्षक असें काहीं नाहीं. एके ठिकाणीं ( अ. २४-२७ ) कवितेसबधानें तो म्हणतो:—तुक छद अर्थभग । नाही रस अनरग । ऐसी न करावी कविता अग । उरो स्वस्थ वसावें ॥ ह्यावरून त्यास चांगल्या कवितेचें लक्षण अवगत होतें, असे त्यास वाटतें. पण तुलसीच शांतिकथा सागत तिला शृगाराच्या साथा पद ठेवावयास लावणाऱ्या ज्ञानदेवाची रसोत्कटता ह्या ग्रंथात आढळत नाहीं, किंवा तुकोबाच्या भक्तिरसाचे पूरही दिसत नाहींत. तरी पण विषयाच्या मांडणीचा भाषा अगदी साधी, सोपी व अकृत्रिम झाल्यामुळें वेदातासारखा गहन विषय समजण्यास अगदीं सुलभ झाला आहे. हातच्या काकणास आरसा कशास, अशा सर्वसाधारण म्हणींनीं किंवा " अज्ञानी असे पचुपचु सरी " असे प्रांतविशिष्ट सांप्रदाय व क्वचित् येणारे अर्थपूर्ण दृष्टांत यानीं ग्रंथाच्या सहज सुबोधतेस चटकदारपणाही आला आहे. विजरेमाजी, जगरूप, लहरा ( री ); अशीं व्याकरणदुष्ट रूपें क्वचित् आढळतात. त्याचप्रमाणें " ण " बद्दल " न " रकाराठिकाणीं " ऋ " " श " बद्दल " स " योजण्याची त्याची रीति दिसते. उ. श्रवन ( ण ); आनिख ( णि; ) पहा नारी ( णा ). अद्रिष्ट ( द ); वृत ( व्रत ); प्रजन्य ( पर्ज. ); श्रुति ( श्रु ) चूंच ( चोंच ). सित ( शी ); हीं रूपें अनभ्यस्तास थोडेशीं कर्णकटु वाटतात खरीं, परतु प्रांतीय व जातीय भेदामुळें अशीं रूपें इकडे सर्वत्रच

आढळत असल्यामुळें त्यांकडे काणा डोळा करणेंच उचित आहे. रिजक ( आहार ), कैद, असे उर्दू शब्दही क्वचित आढळतात, पण ते फार नाहींत. हें प्रकरण बरेंच लांबलें आहे. तें आणखी उताऱ्यांनीं लांबवणें बरें नाहीं. तरी पण ते मुळींच न देणेंही उचित नाहीं. कारण, त्याच्या अभावीं वाचकांस ग्रंथाची थोडीबहुत प्रत्यक्ष कल्पना येण्यास काहींच साधन राहात नाहीं. म्हणून थोडे पुढें दिले आहेत:—

उपदेशलक्षण. अ. २ रा.

गुरु म्हणती तू चतूर। प्रवीण होसी अतितर। परि जनरूपी सत्वर। पिंजरेमाजी आडकशी॥ २॥ शहाणा होवोनी मूढता। अंगीकारीशी तत्वतां। बुडशी भ्रमोनी आतां। जगरूपी पापामध्यें॥ ३॥.................. गोविंदाचे गावुनी गुण। दूर करी प्रपंच अज्ञान। आपणा आपण करी बंधन। शुकनळिकान्याया॥ ५॥...................................... मन पिशाश्चाप्रति। कैद करावे निश्चिती। स्वरूपाकार करोनि वृत्ति। बाहेर हिंडू देऊं नये॥ ८॥......तुजसी ज्यानें निर्मिलें। त्याचें स्मरण विसरलें। याची लाज मनी धरी भलें। सत्य सत्य बोलतु॥ ११॥.

तृष्णा अ. ५ वा.

आज उद्या परवा तेरवां। आयुष्य घटत जाय जेव्हा। तृष्णा दिन दिन वाढे तेव्हां। नित्य नूतन जी॥ ३॥......॥ देह झाला असे जीर्ण। तृष्णा होत जाय नूतन। किती समजाविता जन। न माने कदापि॥ १८॥ तिन्ही लोकाचा आहार केला। सातही समुद्र ग्रासिला। परि नाहीं शांती तिला। आणिक मागतसे॥ १९॥ पाय लांबवी पाताळीं। शीर गेलें नभो मंडळीं। हस्त पसरी दिशा सगळी। ऐशी झाली विस्तीर्ण॥ २२॥ पोट न भरे मेरु सागरीं। तिन्ही लोक मुखाभीतरी। नेत्र कर्ण चोहोंकडे फेरी। ऐसा दीर्घ देह तुझा॥ २३॥ तूं हत्यारिणी पापिणी। तूं कादिनी कपटिनी। तू नको राग मानू मनीं। महा दुष्ट स्वभाव तुझा॥ २५॥ तू आहेस तोंवरी बंधन। तूं मरता मोक्ष मिळे जाण। फार काय तुज बोलून। वाणीसी कष्टवावें॥ २६॥

ज्ञानी. अ. ३०

जयाचे हृदयामाझारीं। ज्ञान वसे निर्धारीं। तयाचें लक्षण बाहेरी। प्रगट दिसे॥ २ पाहतां बोलतां निजतां। उठतां बसता चालतां। जे कांहीं

भक्षिता । येती उद्गार तयाचे ॥ ३ ॥ लोकां सहज येती गंध । ते पदार्थ ओळखिती विबुध । निश्चय करिती सिद्ध । घ्राणेंद्रियानें ॥ ४ ॥ पेरिती बीज शेतीं । त्याचे अंकुर बाहेर निघती । जे ज्ञानी जन भ्रमती । त्याचा स्वभाव लोपेना ॥ ५ ॥ अभ्रकाचे मंदिरात । दीप ठेविता निश्चित । बाहेर प्रकाश दिसत । सकळजना ॥ ६ ॥ कस्तुरी ठेवितां आच्छादुनी । पुरा सुवास समजती सुज्ञानी । बहु चतुर असती जनीं । भविष्य वार्ता सर्व सांगे ॥ ७ ॥ बोलती चालती । भ्रमती उठती । खाती पिती हुगती । श्वासोच्छवासा करितसे ॥ ८ ॥ बाहेर करितीं व्यवहार सर्व । अंतरीं जाणे स्वप्नवत भाव । पाताळीं लावूनी तीर तंव । पुन्हा सोडी आकाशा ॥ ९ ॥ देहक्रिया पाहती जन । परी न कळे अंतरींचें ज्ञान । ऐसें ज्ञानियांचें लक्षण । विरळे जाणती ॥ १० ॥

शेवटीं विपरीत ज्ञानाचें स्पष्टीकरण दिलें आहे त्याचा थोडा नमुना:— श्रवणानें पहातो=अंत:करणानें स्वरूप जाणतो. गुदानें भक्षितो=वासनारहित सुख दु:ख भोगतो. मुंगी गिळी गजासी=बुद्धी वासनारूप मनोवृत्तीस गिळते. सिंहास भक्षी शेळी=अहंकारास बुद्धी खाते. उंदीर खातो सर्पांशी=शुद्धमन चित्तमळास. कन्येनें मातेस भक्षिलें=विद्येनें अविद्या. देवापासून देऊळ झालें=आत्म्यापासून देह. सून सासूला समज देते=अद्वैतश्रुति–बुद्धी इ. हें सर्व प्रकरण मोठें विस्मयकारक आहे. आस्वाद मुळातच नीट कळेल. प्रथमसमासीचा काळ शके १८१८ दुर्मुख नामसंवत्सर ज्येष्ठ शु. १२ असा दिला आहे.

( २ ) देशिक लीलामृत:– सदानंदाचे आजे व गुरु श्री. बाळकृष्ण महाराज यांचें चरित्र या ग्रंथात सदानंदानें सांगितलें आहे. त्यास काव्यस्फूर्ति गुरूपासूनच झाली असल्याचें मागें आलेंच आहे. ह्याचे १४ अध्याय असून एकूण ओवीसंख्या १८३९ आहे. मंगलाचरण व गदाधरपंतांचें आख्यान; बाळकृष्णजन्म, बाललीला व विवाह; विद्याग्रहण, विषप्राशन व संजीवन; पैठणचें वतनदारीचें काम; व्यापार धनप्राप्ति व चोरी; मुकुंदराजविचारांत अनुष्ठान व साक्षात्कार; शुकानंदउपदेशग्रहण; ज्ञानकथन; हठयोगकथन; तीर्थाटन; चंदुलालभेट व जहागीरीची प्राप्ति; देशिकानंद गुणवर्णन, संन्यास व समाधि, असे विषय अनुक्रमे त्यात आले आहेत. हा ग्रंथ त्यानें नांदेडांत उमरी नामक पवित्र ग्रामीं रचला. ग्रंथाच्या नामकरणा-

विषयीं कवि म्हणतोः—॥ ग्रंथाचें नाम अघटित ॥ ठेविलें देशिक लीलामृत ॥ भवरोगीयासी अमृत ॥ जाणावे सत्य पै ॥ १४।१७१॥ शके १७९६ मध्यें भावनाम संवत्सरी अधिक आषाढ शु०॥ १० मीस बुधवारीं माध्यान्ह काळीं ग्रंथ पुरा केल्याचेंही त्यानें लिहिले आहे. (१४।१७३) आणि । इतिश्री देशिक लीलामृत । पुराण नाहीं कोणतें संमत । नूतन कथा सज्जन परिसोत । चतुर्दशोध्याय गोड हा ॥ १८३ ॥ असें म्हणून ग्रंथ समाप्त केला आहे. "शके १८१९ हेमलंबनाम संवत्सर मार्गशीर्ष शु०॥ १ गुरू-वासरे तदिने लिखितं इ." असा पोथीचा लेखन काल दिलेला आहे.

बाळकृष्ण महाराजाचें दीक्षानाम 'देशिकानंद' असें असल्यामुळें चरित्रास 'देशिक लीलामृत' म्हटले आहे. ह्याच्या संबंधींची अवश्य ती माहिती ह्या प्रकरणाच्या प्रारंभींच दिली आहे. प्रत्येक अध्यायातील शिव-स्तवनरूप मंगलाचरणें, व सद्गुरुस्तवनें अत्यंत वाचनीय झाली आहेत. दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायातील चरित्रनायकाचा जन्म, त्याचें नामकरण व विवाह ह्यांचीं वर्णनें फार सुंदर झालीं आहेत. जन्मकाळीच बाळकृष्णाचें जातक तयार केले गेलें. त्यांत त्याच्या आयुष्याचें सर्व भविष्य वर्तविलें होतें. पण त्या ज्योतिषाचें नाव जरी दिलें नसलें तरी तें जातक स्वतः सदा-घरानेंच केलें असावें. कारण तो सिद्धान्तज्योतिषी होता, व त्यास वंश-परंपरा चार आणे योमियाची सनद नबाब साहेबाकडून मिळाली होती. पुढें त्याच्या बाललीलांत निरनिराळ्या खेळाचें वर्णन फार आकर्षक आलें आहे. त्यातले बरेचसे खेळ आज प्रचारांतून गेले आहेत. आठवें वर्ष सरतें तोंच त्याचें लग्न झालें. लग्न जुळविण्याचें काम त्यावेळीं फार सोपें होतें, असें दिसतें. मुलीच्या बापानेंच छत्तीस गुण जमल्याचें सांगितले; व मी गरीब आहे 'माझे नग्न कोहळें आपण सुनवून घ्या' अशी मुलाच्या बापास विनंती केली आणि लग्न जमले. पण ह्या गरीबानें सीमान्तपूजनास उडवि-लेलें दारूकाम पाहून आश्चर्य वाटतें. शोभेच्या दारूत जाई, जुई मोगरे मालती ह्यांचे मंडप, हरिण, घारी, व्याघ्र ह्याच्या प्रतिमा व नक्षत्रमाळा पाहून आपणांसही आज आचंबा वाटतो. मेजवानीतलीं पक्वान्नें, शाकभाज्या व

प्रकाशकः—श्री. अमृतराव बाबामहाराज उमरीकर. प्रस्ताव—श्री. वि. अ. कोनाले. मुद्रक—श्री. बा. गो. पारगांवकर, औरंगाबाद-मुद्रणालय. किं. १ रु.

व चटण्या कोशिंबिरींची दीर्घ यादी पाहून एखाद्या श्रीमंतासही ह्या गरीब व्याहयाचा हेवा वाटेल! पायघड्या, रासनहाणीं, गुलालाचें उधळण, रंगाच्या पिचकाऱ्या, मुनमुख, साडे व धेंडेनाचवणें वगैरे आजकाल स्मृतिशेष झालेले बरेचसे प्रकार येथें सुरसतेनें वर्णिलेले पाहून वाचकास घटकाभर आपण वऱ्हाड मंडळींतलेच एक आहों असें वाटतें. तिसऱ्यात बाळकृष्ण विषप्राशनानें बेशुद्ध झाला, त्यावेळीं त्याच्या पितराच्या शोकाचें पौराणिक पद्धतीनें केलेलें वर्णन अतिशय दीर्घ व कंटाळवाणें झालें आहे. येथील शोक-वर्णन कृत्रिम व पंडिती थाटाचें दिसते. पाचव्यात बाळकृष्ण अभ्यास मुकुंदराज गुफेंत अनुष्ठानार्थ गेल्याचें सांगितलें आहे. ॥ चरणीं वाहती जयंती । बाणगंगेसी मिळती । बुटीनाथा खालती । संगमासी स्नान केलें ॥ ५१२२ ॥ ह्या वर्णनावरून ' विवेक सिंधूत ' ॥ वैनगंगेचिया तीरीं ॥ मनोहर अंबा नगरी ॥ वगैरे वर्णन भावे यांच्या मंडाऱ्याजवळील अभोरें प्रमाणें ( पा. २५ ) अंब्यासही लागू पडते आणि मुकुंदराजाचा संबंध प्रत्यक्ष या स्थळाशीं असावा अशी जी समजूत आहे तीस पुष्टि मिळते. निदान प्रस्तुत ग्रंथकारानें ह्याच समजुतीनें येथील सर्व वर्णन केलें आहे. पहा:–महाअरण्य कठीण । तेथें दरी एक कोरून । विवेकसिंधु नामा-भिधान । ग्रंथरचना केली असे ॥ ५१२८ । अठरा दिवस पर्यंत । जय-पाळासी बोध समस्त । करूनी रचिला साग्र ग्रंथ अष्टादशाध्याई ॥५१२९॥ आठ ते आकरा अध्यायांतील ज्ञानोपदेश व हटयोग वर्णन हीं जिज्ञासूंस बहुमोल वाटतील. चवदाव्यांतील गुरुगुणवर्णनही मोठे चांगलें झालें आहे. ह्या ग्रंथाची फलश्रुति नेहमींच्या परिपाठाप्रमाणें खूप वर्णिली आहे.

ग्रंथाची भाषा अगदीं साधी व सोपी आहे. निरनिराळ्या वर्णनांत मात्र किंचित काव्यछटा दिसून येते. इतरत्र सर्व ओव्या गद्यवजाच वाटतात. मूळ ग्रंथाची, नकलकाराची व छपाईची अशी त्रिविध पूर्ण अशुद्धता, प्रभावानें येथें दिसून येत असल्यामुळें वाचकास पराकाष्ठेची विरसता उत्पन्न होते. व्याकरण–भाषा–दोष पूर्वीप्रमाणेंच आढळतात. पण उर्दू शब्दांचें मिश्रण कमी प्रमाणांत आहे असें दिसतें.

शेवटीं कवि म्हणतो: हा गुरुप्रासादिक ग्रंथ । झाला असे महासमर्थ । त्याचा जाणोनि परम अर्थ । अनुभव घेईजे ॥ १४।१५१ ॥

तेव्हां भाविकांनीं हा अनुभव एकदां घ्यावा.

# प्रकरण २ रें

## श्रीमत् स्वामी सदानंद–( स. १८४२ ते १९३१ )

ह्यांचें पूर्वाश्रमींचें नांव सदाशिव जयराम वैद्य असें होतें. हे माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण. परभणी जिल्ह्यांतील मानवत हें ह्यांचें मूळचें राहण्याचें ठिकाण. बालपणींच ह्यांचीं मातापितरें निवर्तलीं. ते आपल्या वयाच्या १८ व्या वर्षी पिंगळीस आले. ऋग्वेद व यजुर्वेद ह्यांचें त्यांनीं उत्तम अध्ययन केलें होतें. कांहीं दिवस नोकरी केल्यावर ते व्यापारांत शिरले व त्यांनीं त्यांत पुष्कळ पैसा मिळविला, आणि त्याचा विनियोग त्यांनीं पिंगळीस गोकुळनाथाचें देऊळ बांधण्यात, वेदशाळा स्थापन करण्यांत व गोरगरिबास साह्य करण्यांत केला. स. १९२९ मध्यें त्यांचें कुटुंब वारलें व त्यानी चतुर्थाश्रम स्वीकारला. ह्यानंतरचा दोन वर्षांचा काल त्यानीं ग्रंथरचना व धर्मपर प्रवचनें ह्यांत घालविला. सन १९३१ मध्यें त्यांनीं आपली इहलोकची यात्रा संपविली. त्यांची समाधि गोदातटीं देऊळगावीं आहे. त्यांचे दोन चिरंजीव विनायकराव आणि रामकृष्णपंत हे विद्यमान असून त्याचेकडूनच ही माहिती मिळाली आहे. सहजामृत, ईशोपनिषदावर मराठी टीका, गीताटीका ( २५०० ओव्या ), हे पद्यात आणि " सापत्न मातुल गोत्र निर्णय " हा गद्यांत, असे ४ ग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत. पैकीं गीताटीका मुद्रित असून बाकीचे अमुद्रित आहेत.

**सहजामृतः**—सहजामृताच्या पहिल्या अध्यायांत १०१ ओव्या आहेत. त्यांवरून कवीसंबंधीं माहिती मिळते, ती अशीः–कवीचें गोत्र कौशिक असून भीमा व जयमराम हीं त्याचीं मातापितरें होतीं. आणि शंकर व तुळजापुरची भवानी हीं त्याचीं कुलदैवतें होतीं. साधुसंतांचीं चरित्रें गाऊन त्याचा महिमा वाढवावा ह्या हेतूनें कवीनें हा ग्रंथ रचिला आहे. ह्या ग्रंथाचा आरंभ त्यानें आषाढ शुद्ध एकादशीस केला ( शक दिलेला नाहीं. ) व त्याचे अध्यायही ११ च कल्पिले आहेत. पहिल्या अध्यायांत चिन्मयानंदस्वामींचें चरित्र व त्यांचा उपदेश हा भाग आला आहे. लहानपणापासूनच सर्वांभूतीं परमेश्वर ही भावना त्याचे ठिकाणीं बिंबली होती. ब्रह्मचर्याश्रम व गृहस्थाश्रम उत्तम

प्रकारें करून त्यांनीं चतुर्थाश्रम घेतला व अनेक मुमूक्षूंस उपदेश करून सन्मार्गी लाविलें. निरासक्तीनें संसार करून परमार्थही साधता येतो, हें त्यांच्या उपदेशाचें सार आहे. साधनसंपत्ति साधून सत्संगति व हरिभजन ह्यांचा अवलंब करण्यास त्यांनीं येथें सागितलें आहे. । जिवशिव ऐक्याचें ज्ञान । मनोलय कसा करावा पूर्ण । हें षष्ठाध्यायीं होईल निरूपण । ज्ञान सहजानंद वदतील ॥१.९०॥ असा निर्वाळा ग्रंथकारानें दिला आहे, व दुसऱ्या अध्याया-पासून चिन्मयानंदानंतर झालेल्या तीन शिष्यांचें वर्णन करण्याचें आश्वासन दिलें आहे. दुसऱ्यात सहजानंद निरूपण आलें आहे." इतिश्री सहजामृत-कोदंड ॥ यासी भक्तिशर लाविले प्रचंड ॥ अज्ञान पातकाचे केले खंड ॥ प्रथमोध्याय अखंड । गोड हा ॥ १०१ ॥ असें म्हणून हा अध्याय संपविला आहे. यातील भाषा शुद्ध, सुबोध व ओघवती आहे. इतर १० अध्याय सांपडल्यास परमार्थी लोकास तो एक मोठा लाभ होईल.

गीताटीका-ग्रंथ परिचयः-

प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं खालील ओवी थोडयाफार फरकानें आढळून येते. स्वस्ति श्री जयरामात्मज कृत । भगवत्कृपें टीका विरचित । भगवद्-गीतार्थ करूनी प्राकृत । नमिला श्रीभगवत येवेळीं ॥-समाप्ति लेख खालील-प्रमाणें आहे:-शके अठराशें चोवीस । मकरार्क मार्गशीर्ष कृष्णपक्ष त्रयो-दशीस । टीका ही पूर्णत्वास पावली ॥ १८-१५२ अमरद क्षेत्राचे दक्षिणेशीं । गोदावरीच्या उत्तरेशीं एक योजन निश्चयेशीं । पिंगलानगरीं संपविले ॥ १८-१५३. स्वस्ति श्री जयरामात्मजकृत । भगवत्कृपें टीका विरचित ॥ श्रीमद्गीतार्थ करूनि प्राकृत । सद्भावें श्रीभगवंत पूजियला ॥ १८।१५४.

एकूण ओंव्या २५३३ असून हस्तलिखित पृष्ठें १२६ आहेत. ग्रंथकारानें ग्रंथरचनेचा उद्देश पुढीलप्रमाणें दिला आहे:-वैदिक मार्गाचें व्हावें रक्षण । जगाचें व्हावें परम कल्याण । यदर्थी उपदेश करी श्रीनारायण । वर्णाश्रमा रक्षाया ॥६॥ ही भरतभूमि मोक्षाचें द्वार । येथेंच देव जन्म इच्छिती अमर । याच भूमींत आचार विचार । वेदांचा अवतार येथेंची ॥ ७ ॥ प्रपंच करितां साधावी मुक्ति । ही गीतेंत निवेदिली युक्ति आणि पावे मल ऐश्वर्यशक्ति । लभ्य हरिभक्ति निरंतर ॥ १० ॥

## उतारे

अशोच्यानन्वशोचत्‌०–अध्याय २ । बारे जननाशीं मृत्यु यथार्थ । मृताशीं जन्म न चुके पार्थ रंक किंवा महासमर्थ । त्याचा हर्ष–शोक व्यर्थ । जाण पा ॥२-४७. तेव्हा ईश्वरेच्छेकरून । जें जें येईल कांहीं घडुन । तें तें अंगिकारावें अर्जुन । हें सज्ञानाचें लक्षण जाणिजे ॥२-६२. केव्हां अती लीन । केंव्हां कठोर करावें मन । केव्हा धर्मशास्त्राचें ग्रहण । केव्हा वेदाताचें प्रमाण मानावें ॥२-७४. अष्टमस्थानीं गुरु येतां । विवाह वर्जिला तत्त्वता परि उपवर झालिया दुहिता । वर्जावी बाधा ग्रहाची ॥३ ७८. यदृच्छयोपपन्नम्‌० (३२)–ज्या कुळांत पावलें जनन । त्यानें स्वधर्माचें करावें रक्षण त्यात त्याचें परम कल्याण । अंतीं मोक्ष जाग निश्चयेसी ॥ २-१३५. स्वशरीर आणि स्वधन । बलांत कोणी करील हरण । त्याशीं करावे शासन । त्याचें दूषण नाहीं कादाही ॥ १३७. बा, रे प्राप्त प्रसंगाशीं अनुकूल । रहावें हें कर्म अतिनिर्मल विचार न करावा सखोल । पहावी काळवेळ प्रसंगाची ॥२-१७३. तस्कर गृहामाजीं प्रवेशत । तेथे काय उपयोगी मौन व्रत व्याधीनें व्याकुल झालें चित्त ।तेथें राज्य इच्छित भुवनींचे ॥२-१७४.

सारांश,

सज्ञान आणि विचारवंतांनीं । प्रवर्तावे स्वधर्मरक्षणीं
तेथें तो निर्दोष होवोनी । परब्रह्म सदनीं पावतसे ॥ २.२९८

या अध्यायावर ग्रंथकारानें विशेष जोर दिला आहे. आणि जागोजाग स्वधर्माचें महत्त्व ( ११८, २२७-३७. ) स्वधर्मरक्षण इत्यादिकांवर जास्त सांगितलें आहे. स्वामींच्या मतांचा, प्रवाही भाषेचा, व्यावहारिक ज्ञान आणि समाजविषयक कळकळीचा हा अध्याय पूर्ण निदर्शक आहे. किंबहुना हा सर्वोत्कृष्ट झाला आहे असें म्हणण्यास काहींच प्रत्यवाय नाहीं.

## सापत्न मातुलगोत्र निर्णय.

हें पुस्तक ग्रंथकारानें "सार्वजनीकाचे" उपयोगास्तव रचलें आहे. प्रस्तावनेंत परकीय विद्येनें व ससर्गानें ब्राह्मण्य कसें नष्ट होत चाललें आहे, ब्राह्मणांच्या आचारविचारांत, राहाणींत, व खाण्यापिण्यात कशी धर्मभ्रष्टता बोकाळली आहे ह्याबद्दल खेदव्यक्त करून तो म्हणतो–" ईश्वरानें श्रृष्टयादौ

वर्णविभाग करून ज्याच्या त्या वर्णाला धर्म निवेदन केला. त्या आज्ञेनुरूप सर्वांनीं वर्तावें. जर त्याची कोणी आज्ञा भंग करतील तर त्याजवर ईश्वर आज्ञाभंगाचे "चार्ज" कायम होऊन तो ईश्वरशिक्षेस पात्र होईल.";म्हणून निदान पुढील तीन गोष्टी तरी त्यांनीं संभाळाव्या असें मोठ्या कळकळीनें त्यानें सर्वांस सांगितलें आहे. त्या गोष्टी अशा:-( १ ) उपनयन ( २ ) विवाहांत गोत्राचें ऐक्य न व्हावें व ( ३ ) ब्राह्मण नांव तरी कांहीं दिवस राहावें. नाहींतर वर्णलोप होण्याचा प्रसंग कसा येईल हें, एक गोत्र माहिती नसणाऱ्या कोमटी ब्राह्मणाच्या व मामलेदाराच्या विनोदी संवादानें दाखविलें आहे. नंतर माध्यंदिन शाखेत विवाहात मातुलगोत्र विचाराची धरसोड सोयीप्रमाणें सध्यां चालू असल्यामुळें प्रस्तुत निबंध लिहिण्याचें प्रयोजन उपस्थित झालें आहे असें तो म्हणतो. दुसरें असें कीं शके १८२६ मध्यें वे. शा. काशीनाथशास्त्री लेले वाईकर ह्याच्या धर्मपुस्तकांत वे. शा. त्र्यंबकशास्त्री यांनीं ( मातृगोत्रं माध्यंदिनीयानामपुत्रायाश्चेति इ० ) सत्याशाढ सूत्रावरून ह्या विषयाची चर्चा सुरू केली. त्यावर अनेक विद्वानांनीं शास्त्राधारें आपापलीं मतें प्रगट केलीं. परंतु निर्णय न लागल्यामुळें एक मोठी सभा झाली. तींत अनेक ठिकाणचे विद्वान आले होते. श्रीमत् परमहंस तीर्थानंदस्वामी (परभणीकर) ह्याचे आधिपत्याखालीं तीन दिवस चर्चा झाली. चर्चेंतील पूर्वपक्ष उत्तरपक्षांचे मंडनखंडनाचें वर्णन ग्रंथकारानें मोठ्या चटकदार पद्धतीनें दिलें असल्यामुळें तें मोठें वाचनीय झालें आहे. निर्णय-सिंधु, प्रवरमंजरी, व धर्माब्धिसार ह्या ग्रंथाच्या आधारें सभेनें असा निर्णय दिला कीं:-" सापत्नमातुलगोत्र विवाहात पाहूं नये." पण कित्येकांस हें मत पटलें नाहीं. ग्रंथकारालाही तें न पटल्यामुळें त्यानें प्रवरदीपिकेवरून स्वबु-द्धीनें सापत्न मातुल गोत्राची व्यवस्था बसविली आहे ती अशी:- सर्वासांचैव भार्याणामेकाचेत् पुत्रिणी भवेत् । सर्वास्ताः तेन पुत्रेण पुत्रिण्यो मनुरब्रवीत ॥ असें मनुवचन आहे. व त्यावर कात्यायन महामुनि म्हणतात कीं- ॥ गोत्रं मातुरपुत्राया वर्जयेत्प्रवरान्नतु ! सपुत्रायास्तुनो गोत्र प्रवराश्च न चिंतयेत् ॥ ह्या वचनाची संगति अशी कीं सापत्न माता जर अपुत्रा असेल तर त्या पुत्रानें तिचें गोत्र विवाहात वर्ज्य करावें; म्हणजे मनुवचनानें ती पुत्रवती होईल व तिला सद्गति मिळेल. पण ती जर सपुत्रा असेल तर तिचें गोत्र

किंवा प्रवर कांहींच पाहूं नये. कारण तिचा स्वत:चा पुत्र तिचें गोत्र विवाहांत वर्ज्य करीलच व तिला सद्गतीची अडचण पडणार नाहीं. पण जेथें तिहींहून अधिक अपुत्रा सापत्न माता असतील तेथें मात्र अनवस्था प्रसंग येईल; म्हणून फक्त स्वमातेचेंच गोत्र वर्ज्य करून विवाह करावा, असें कात्यायनानें " पद्यामृत तरगिणी " ग्रंथात म्हटलें आहे. " एकस्य बहुधा माता चिंतनीयं न मातृके । केवलं मातुल गोत्रं वर्ज्यं कात्यायनोऽब्रवीत्।। परंतु प्रवरासह सापत्न मातेचे गोत्र वर्ज्य करण्याचा प्रचार कसा पडला असावा अशी पृच्छा करून ह्या प्रश्नाचा विचार विद्वानांनीं पुनः करून कोणता तरी एक मार्ग रूढ करावा, अशी त्यांस विनंती करून त्यानें आपला ३२ पानी निबंध संपविला आहे. पोथीचें अक्षर सुंदर, वळणदार व सुवाच्य आहे. भाषा व लेखन हीं मात्र अशुद्ध वाटतात. उ.अचारविचार;अरोग्य; अबालवृद्ध आश्चिर्यकारक; अशीं अशुद्धरूपें; उडविनें, करनें, व प्रार्थणा, दर्शणं ह्यासारखी "न" "ण" ची अदलाबदल. इंद्रिय पाटव्यता, स्वधर्म पतित्व इ. भाववाचकनामें; लेहून; असल; येयील, होयील; त्याना परविद्येचा अभ्यास करवितात; धर्मास शरण होतील, या तीन गोष्टी जीवभ्य रक्षण कराव्या; असें जर कल्पिताल तर त्या पुत्रवती होत्याल; अशीं प्रादेशिक क्रियापदाचीं रूपें, वाक्यप्रयोग व वाक्प्रचार आढळतात. हे सर्व प्रकार इकडील बोलींत रूढ असल्यामुळें क्षम्य मानले पाहिजेत. एकंदरींत भाषेचें जुनें वळण व शास्त्रीय विषयाची सुबोध व ठसकेदार मांडणी ह्यामुळें हा निबंध मोठा चित्ताकर्षक झाला आहे. पण हल्लीं जिथें मोठमोठे विद्वान विवाहांतील प्रस्तुत गोत्रबंधन तर्कशुद्ध नसल्यामुळें, मंगळाच्या खुळाबरोबर हें खूळ सुद्धां अजीबात काढून टाकावें असें प्रतिपादन करीत आहेत तेथें " सापत्न मातुलगोत्रनिर्णयास " विषयदृष्ट्या कोण पुसतो! पण घटकाभर करमणूक तर खरी !

---

टीप–हें ( गद्यांत न देतां ) एकच लहानसें प्रकरण असल्यामुळें येथेंच दिलें आहे.

# प्रकरण ३ रें

## श्रीमत् सद्गुरु ब्रह्मानंदाश्रम स्वामी.

## (स. १८४३ ते १९१६).

यांचें पूर्वाश्रमींचें नांव नागोराव. ह्याचे वडील गोविंद भट साठे हे रत्नागिरी जिल्ह्यांतील टोळवाडीचे मूळचे राहणारे होते. पुढें जमखिंडी संस्थानांत कांहीं इनाम मिळाल्यामुळें ते तिकडेच जाऊन राहिले. पुढें चमत्कारपूर्ण संत चरित्रें लिहिणाऱ्या नागोरावाच्या जन्मकथेशींही चमत्काराचा संबंध असावा हा एक विलक्षण योगायोग म्हटला पाहिजे. ह्यांच्या मातोश्री गंगाबाई ह्याचीं लागोपाठ आठ मुलें गेलीं. नवव्या खेपेस एका पांथस्थ ब्राह्मणाच्या सांगण्यावरून तिनें औदुंबरास एक लक्ष प्रदक्षिणा घातल्या. स्वप्नात दृष्टांत झाला व नागाचें दर्शन घडलें. नंतर पूर्ण दिवस भरल्यावर गंगाबाई शके १७६५ मध्यें माघ शु. ॥५ मीस जमखिंडी येथें प्रसूत झाल्या. दृष्टांताप्रमाणें मुलाच्या पाठीवर केस होते. नागोबाच्या कृपेनें हा मुलगा जगला वाचला म्हणून त्याचें नाव 'नागोराव' असें ठेविलें. नेहमीं प्रमाणें सामान्य शिक्षण झाल्यावर नागोरावांनी कापडाचें दुकान, चुन्याचें कंत्राट, पोष्ट क्लार्क व शाळा मास्तर वगैरे व्यवसाय प्रथमतः केले. पण त्यांत नीट जम जमत नाहींसें पाहून त्यानीं शके १७८७ त बिदर येथें वकिली सुरु केली. ह्या धंद्यांत त्यास चांगल्यापैकीं यश आलें. परंतु पुढें उपरति झाल्यामुळें तो सोडून देऊन (शके १८२४) त्यानीं वानप्रस्थाश्रम स्वीकारला. सहा वर्षे ह्या आश्रमांत राहून त्यानीं शके १८३० मध्यें वैशाख शु. १० मीस संन्यासाश्रम घेतला. तेव्हा वरील नाव त्यानीं धारण केलें. पूर्वाश्रमींचे त्यांचे गुरु प्रल्हादबोवा होते; व चतुर्थाश्रमातील गुरु श्री. प. प. अच्युतानंद-स्वामी होते. पुढें कांहीं दिवस ता. शिरसि जि. करीमनगर येथे गांवापासून २ मैलांवर एका मठींत ते राहात असत. तेथे अनेक जातीचे लोक

टीपः—ही चरित्रविषयक माहिती त्यांचे चिरंजीव महादेवराव साठे ह्यांनीं दिली आहे.

दर्शनास जात. त्यांच्या दर्शनानें पुष्कळांच्या व्याधि जात असत असें म्हणतात. ह्यानीं शके १८३८ फा. व. ९ मीस भोजनानंतर पत्रें लिहून तीं पोष्टात टाकवून अखेरचें आसन घालून हातांत जपमाळ घेऊन देह ठेविला. ह्याची मुख्य समाधि दोमकोंडा संस्थानात असून दुसरी शिरसि येथें आहे. ह्यांनीं वानप्रस्थाश्रमांत पुढील ग्रंथ लिहिले:– -( १ ) ज्ञानचक्षू. अ. १४ ओव्या २००८. हा ग्रंथ शके १८२७ त ज्येष्ठ व. ॥ आरंभून मार्गशीर्षांत शु. ॥ ८ मीस पूर्ण केला. ( २ ) देहवर्ण प्रकाश, अध्याय ११ ओंव्या २१४४. आरभ शके १८२७ माघ व. ॥ १४, समाप्त शके १८२८ मार्गशीर्ष शु. ८ मी. ( ३ ) लघुभक्तविजय. अ. ३४ ओ. ५८९२ ( ४ ) सुबोध प्रकरण ह्यापैकीं फक्त 'लघुभक्तविजयच' मुद्रित असून उपलब्ध आहे. त्याचें विवेचन पुढें दिलें आहे. या ग्रथाच्या ३४ व्या म्हणजे कलशाध्यायांत कवीनें गुरुप्राय असलेल्या सदाशिवराव रहिमतपूरकर बोवा यांचें चरित्र दिलें आहे व तदनुषगानें आत्मचरित्राचाही थोडासा भाग त्यांत वर्णिला आहे. ग्रंथकार सांगतो माझी मृत पत्नी स्वप्नात येऊन मला पीडा देई. ती पीडा बोवानीं दूर केली; परंतु तारुण्याच्या भरात मी वचनभंग करून परदारगमन केले. बोवानीं पुष्कळ उपरोधिक दंडण केलें. पण माझें व्यसन सुटलें नाहीं. त्यामुळें मला पुढें मेहविकार झाला. बोवानीं सालंमिश्री पाक दिला व दूधभात पथ्य सांगितलें. मला आरोग्य मिळालें. । असें कित्येक समर्यीं । मला साहाय्यता देई । तें लिहितां न येई । विस्तार होईल ॥ ३४. १११ ॥ त्यांचे उपकार अनंत आहेत. त्यांचे उतराई होणें अशक्य आहे. माझे वडील जामात अंताजीपंत जोशी यांस म्हैसा तालुक्यात नादेड जिल्ह्यात नगदी दप्तरची नौकरी होती. मी त्यांस रु. १५०० ला जामीन राहिलों होतों. तेथें २१ हजार रुपयांची अफरातफर झाली. त्यांत जामात होते. ते फरारी झाले. त्यांनीं बायकोस मणिमंगळसूत्राशिवाय कांहीं ठेविलें नाहीं. जामिनकी मला भरावी लागली. कर्ज झालें. बोवांकडून वकिली सोडून परमार्थाकडे लागण्याची प्रेरणा झाली. त्याच्याच कृपेनें काशिनाथ छत्रे सरकसवाले यांचेकडून चीन देशांतून दोन हजार रुपये आले. कर्जाचें निवारण केलें, घरवाडी कुटुंबास चरितार्थासाठीं ठेवून मी वकिली सोडली. व बुवांच्या प्रेरणेप्रमाणें अध्यात्मग्रंथाचें पठण व मनःसंयमन चालू केलें, योगाचें स्फुरण

होऊं लागलें. एकाग्रता मोडूं नये म्हणून ग्रंथ लेखन सुरू केलें. विषयांचा विसर पडला. आणि ब्रह्मविचार मनात ठसला. ज्ञानचक्षु ग्रंथ मी प्रथम लिहिला. त्यात अ.१३ ओवी. २८० मध्यें मी अगोदरच माझ्या देहांताचें भविष्य लिहून ठेवलें ' व तें पुढें खरें ही झालें.

त्याचप्रमाणें पहिल्या अध्यायांतही कांहीं आत्मचरित्राच्या गोष्टींचा उल्लेख कवीनें केलेला आढळतो. त्याची कुलस्वामिनी करवीरवासिनी महालक्ष्मी होती. तिला आणि ग्रामदेव जाखा ह्याला ग्रंथारभीं त्यानें नमन केले आहे. त्याचें गोत्र वसिष्ठ असल्यामुळें त्यासही त्यानें वंदन केलें आहे. कवीचे जनक गोविंदराव ह्यानीं गायत्री मंत्र दिला व लालनपालन करून विद्यादान दिलें आणि पुढें प्रल्हाद बोवानीं मोक्षविद्या दिली म्हणून ह्या दोन्ही गुरूंसही त्यानें अभिवादिलें आहे. तसेंच आपल्या जननीस,गंगाबाईस व सदाशिवरावमहाराज यांसही त्यानें नमस्कार केला आहे. असो.

ह्या सर्व हकीकतीवरून ग्रंथकाराचे ठिकाणीं प्रांजळता, सत्यप्रियता, परमार्थाची आवड व कृतज्ञता वगैरे गुण किती ठळकपणें वसत होते ह्याची साक्ष पटते; आणि सद्गुरुवाचून दुसरं भवतारू नाहीं हेंही सिद्ध होतें. आता त्याच्या लघुभक्त विजयाकडे वळू.

## लघुभक्त विजय

वाग्विलास ईश्वरी । वसो मम वैखरीवरी ।
भक्तवर्णन परोपरी । करवो जन्मवरी । हा हेतू ॥ अ. २१.४

या ग्रंथांत महिपतीसारख्या जुन्या संतचरित्रकाराचा व आधुनिक संतचरित्रकार दासगणुसारख्याचा कवीनें उल्लेख केलेला आढळत नाहीं. तरी पण त्याच्याचप्रमाणें त्यानें हीं चरित्रे गाईलीं आहेत. कर्मज्ञान व भक्तिभजन यांची चांगली ओळख पटावी म्हणून मी हा ग्रंथ लिहीत आहे. तरी पण माझे परम मित्र व गुरुप्राय असलेले सदाशिवराव यांचें साहाय्य, शंकरलिंग संताचा आशीर्वाद व माझी मनोमय स्फूर्ति अशा कारणत्रयीनेंच हा ग्रंथ जन्मास आला आहे. असें कवीनें प्रारंभीं सांगितलें आहे. शके १८२८ च्या आश्विनांत बौद्धजयंतीचे दिवशीं ग्रंथास प्रारंभ होऊन त्याची समाप्ति शके १८३० त कार्तिक शु॥ एकादशीस संध्याकाळीं झाली. आरंभीचे २९ अध्याय कवीनें स्वतः लिहिले, परंतु पुढें शरीर रोगग्रस्त [illegible]

३१ व ३२ अध्याय त्याचा शिष्य बाबू यानें टिपणांवरून लिहिले. पुढें शरीरस्वास्थ प्राप्त झाल्यामुळें ३३ व ३४ हे अध्याय पुन: कवीनेंच पुरे करून ग्रंथ संपविला. एकंदरींत आपल्या हातून अंगीकृत कार्य पार पडलेलें पाहून ग्रंथकारानें ईश्वरी कृपाप्रसादाबद्दल कृतज्ञता प्रगट केली आहे. हें ठीकच आहे. त्याचप्रमाणें तो म्हणतो मी काव्य इनामासाठीं अथवा किर्तीसाठीं लिहित नसून केवळ सत्समागम व्हावा, मायिक दृश्य रचनेवरून मन उडून ब्रह्मसंलग्न व्हावें ह्याच हेतूनें तें करीत आहें. ॥ मज नसे विद्वत्कला। वेदांत व्याकर्ण सुकुशला। भक्तिभाव संतलीला। लिहिणार भोळा नागेश। २०-१८६ ॥ मी वेडें वांकडे बोलेन। भक्तभजन करीन। धि:कारितील विद्वान। तरी न सोडी सिद्ध कथा ॥२१-१४९॥ वेदात व्याकर्ण पढावें। तरीच कवित्व होय बरवें ॥......१५० ॥ धनिक निलक्ष ब्राह्मण। बोलावून दिलें भोजन। धनहीन म्हणून। दिले धान्य कण पक्षांसी १५१ ॥ तसेंच माझें कवित्व। प्रेमें ऐका भगवंत। न गातों त्रिपणे निमित्त। व्हावें एकाग्र चित्त म्हणूनी ॥ १५२ ॥ कोणी निंदिल्या निंदा। आम्ही हरिभक्त गाऊं सदा। न प्रवर्तूं अभिमानें वादा। गाऊं गोविंदा ग्रंथरूपें ॥ १५३ ॥ म्हणाल काय अपराध। तरी अशुद्ध प्रासछंद। सहजीं जो अर्थ भेद। तो करा शुद्ध कृपेनें ॥अ. २५-२० ॥ अशा रीतीनें ग्रंथात जागोजाग विनय प्रकट करून कवीनें दोषांबद्दल क्षमायाचन केलें आहे.

या ग्रंथाचे एकंदर ३४ अध्याय असून ओंवीसंख्या ५८९२ आहे. यांत २२ ब्राह्मणांचीं व ९ ब्राह्मणेतरांचीं मिळून ३१ संतांचीं चरित्रें आलीं आहेत. ब्राह्मणेतरात ३ जंगम आणि वाणी, कोष्टी, माळी, रजपूत, धनगर व कायस्त एकएक असे नऊ संत वर्णिले आहेत. ब्राह्मणांतही एक सारस्वत व एक कनोजा ब्राह्मण आहे. ह्यावरून कवीचें चित्त जातीकडे नसून साधुत्वाकडे व सद्गुणांकडे आहे हें उघड दिसतें.

ह्या संतमंडळांत अंबादास, माधवाचार्य व सिद्धमुनी ह्यांसारखे योगिश्रेष्ठ; मल्लाप्पा धनगर, अंतवार व रामाचार्य, यांच्यासारखे जीवन्मुक्त; अच्युतानंद व खंडोबा ह्यासारखे सगुणनिर्गुणोपासक, तर शिवरामभट भिक्षुकासारखे कर्मठ; हनुमंत खंदारकरांसारखे दत्तोपासक व शिवरामभट्टासारखे गाणपत्य तर अंबा जोगाईच्या अप्पाशकुन्यांसारखे शाक्त; सखारामबोवां-

सारखे ब्रह्मचारी, तर नरसाप्पा नाईकांसारखे अन्नसंतर्पण करणारे संसारी, व गोविंदराज बिदरकरासारखे दानशूर अशा संताचा समावेश केल्यामुळें संतचरित्रासारख्या एकागी विषयासहि वैचित्र्य व वैविध्य आलें आहे. ह्यांतील मुख्य वर्णनें म्हणजे चमत्कारांचीं. त्यांशिवाय संतपदवीच प्राप्त होत नसल्यामुळें तीं वर्णनें येणें आवश्यकच आहे. श्रीकृष्ण ज्याप्रमाणें श्रुतदेव व बहुलाश्व याजकडे एकाच वेळीं भोजनास गेले त्याचप्रमाणें शिवराम भट्टही दोन ब्राह्मणांकडे गेले. त्यानें रेतीचे दळिये लाडू बनवून जवळील लोकास खावयास दिले; माधवाचार्यानें गावातील महामारीभय निवारण केलें; कर्बसप्पानें कोणाची पिशाच्चबाधा दूर केली—त्याचप्रमाणें निपुत्रिकास पुत्रलाभ होणें गर्भातील सल वाढीस लावणें; दुसऱ्याचे कुष्ठादिरोग स्वत: घेणें; मद्यमांसाचीं फुलें करणें, अटकेंतून सुटका करणें; रुग्णास आरोग्य देणें; चोरास साव बनवणे वगैरे चमत्कार सामान्यतः यात वर्णिले आहेत. पण ह्यातील विशेष हा कीं पुष्कळशा चमत्कारांची कारणमीमांसा करून ते परिचितसिद्धि प्राकाम्यसिद्धि, अपराजितासिद्धि, वगैरे जे अष्टसिद्धींचे प्रकार आहेत त्यांच्या सामर्थ्यानें करिता येतात असें प्रतिपादिले आहे. साप्रत आपल्याकडे व पश्चिमेकडे लोकाचें लक्ष योगाभ्यासाकडे लागू लागत असल्यामुळें योगात कांहींतरी विलक्षण सामर्थ्य असल्याचें विचक्षण लोकासहि पटू लागलें आहे. 'हीं चरित्रें लिहितांना कवीनें चरित्रविषक माहिती मोठ्या आस्थेनें मिळविली आहे.' अंबादासासंबंधींच्या माहितीचें टिपण कृष्णशिरूर, बाबा पागे व विठ्ठलराव सागवी ह्याजकडून मिळाले. ( अ. ७ पा. ९९ ); व तो कर्बसापाच्या आशीर्वादानें पुढें गुमास्ता पाटील झाला. त्यानेंच स्वतः हें वृत्त सागितलें. ही कल्पित कादंबरी नव्हे, हा इतिहास आहे. (पा.२५५। १८ अ. ) नर्सी मेहत्याचे असेच साक्षात्कार भक्तिविजयात वर्णिले आहेत. अशा प्रत्यक्ष व प्राचीन पुराव्यानें जागोजाग आपल्या विधानांस ग्रंथकारानें पुष्टि दिली आहे. तरी पण चमत्कारावर सर्वांचाच भरवसा बसावा किंवा बसेल असें नाहीं. सागण्याचा मुद्दा एवढाच कीं या संत चरित्रांच्या मांडणींत चोकसपणा व उदात्तता हीं प्रतीत होत असल्यामुळें ती केवळ अंधश्रद्धामूलक आहेत असें विधान सहसा करवणार नाहीं.

हा समग्र ग्रंथ वाचून मनावर होणाऱ्या परिणामाविषयीं जर विचार केला तर असें वाटतें कीं आपण अगदीं एकनाथ तुकारामाच्या जुन्या संतमय वातावरणात वावरत आहों; आणि बाह्य जगाची ह्या ३।४ शतकांत झालेल्या सर्वांगीण प्रगतीची जणू आपणाला काहीच जाणीव होत नाहीं. तरी पण तें वातावरण एकंदरींत सत्प्रवृत्ति, सदाचार, सद्धर्म, व नीति यांचें पोषक आहे. संसार करीत असता त्यांत येणाऱ्या त्रिविध आपत्ति प्राप्त झाल्या असता मनुष्य ईश्वर अथवा संत याम शरण जाऊन त्याची सेवा करून त्यांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करीत असताना दिसतो. त्याचप्रमाणें जाती जातींच्या उच्चनीचतेपासून उत्पन्न होणारा जात्यभिमान, वर्णद्वेष, किंवा धर्मद्वेष ह्यास ह्या ग्रथात बिलकूल थारा नाहीं. एवढेंच नव्हे तर त्यांतील शिकवण समता, विश्वबंधुत्व, व परधर्म–सहिष्णुता या भावनाची अभिवृद्धि करणारी आहे. माध्व, शाक्त व गाणपत्य इत्यादि भिन्नपथीयांत ह्या संतानीं एकयच घडवून आणलेलें दिसतें.' उदाहरणार्थ–बेदरचे नरसण्णानाईक–मध्वानुयायी होते तरी ते अतिथिसंतर्पण, पथ व जाति यांचा विचार न करता करीत होते असें आढळतें( अ. ९ )जहागिरदार नारायणराव चिंचोळीकर देशमुख हेही माध्व होते. तरी यानीं भास्करासारख्या शाक्तसंतास १५ बिघे जमीन दिली इतकी त्याची त्यावर श्रद्धा बसली होती. बिदरच्या सिद्धेश्वर दीक्षित ब्राह्मणानें उस्मानाबादकर इरप्पा वाणी या साधूचा उपदेश घेतला. ( अ. २२ ) ज्याप्रमाणें हिंदूतील निरनिराळ्या जातींत परस्परांबद्दल प्रेमभाव व आदर ह्या संतानीं निर्माण केला त्याचप्रमाणें हिंदूमुसलमानामध्येंही केला. ही खरोखरी फार मोटी कामगिरी त्यानीं केली आहे असें म्हटलें पाहिजे. ह्याची साक्ष पुढील उदाहरणावरून पटण्यासारखी आहे. मीर अब्दुःसलामखा हे उद्गीरचे तहशीलदार होते. ह्यांनीं शंकरलिंगास संतुष्ट करून वरदान मागितलें. त्यामुळें पुढें तेच मुखद्दरजंग सुभेदार झाले. जेव्हा शंकरलिंग शके १८०७ मध्यें समाधिस्थ झाले त्यावेळीं त्याची समाधि मठांत बाधावी कीं बाहेर बाधावी ह्यासंबंधीं हिंदु मुसलमानांत वाद उत्पन्न झाला. तेव्हा सुभेदारसाहेब आपले मदद्गार लुत्भेहसन साहेब ह्यांसह तेथें गेले व दोघांची समजूत घालून त्यानीं समाधि मठात आपल्या समक्ष बांधविली असून तेथें उत्सव होत असतो.

बक्र प्रभू कर्कनळीकर वाणी ह्याचें साधुत्व पाहून एक यवन अंमलदार त्यांशीं मोठ्या प्रेमादरानें वागू लागला. ( अ. ४ )

रघुनाथ साधूस बिदर जवळील लालवाडींत मारोतीच्या देवालयासाठीं ग्रंथकाराच्या विनंतीवरून मपाय फकीर या यवन जहागिरदारानीं आपल्या खाणींतून कांहींएक कर न घेता १५००० दगड फुकट दिले. देऊळ बांधून पुरें झाल्यावर बोवा तेथें राहू लागले व त्यांच्या गोपाळदास वगैरे मुख्य शिष्यात कमालदास या नावाचा यवन शिष्यही होता ( अ. २८ ). एकदा तर खुद्द निजाम साहेबास कोणत्याही उपचारानें बरें वाटेना, तेव्हां त्यांनीं राजा चंदूलाल याचे मार्फत सत बक्रप्रभूस भेटीस बोलाविलें. त्यावेळीं निझाम साहेबांनीं त्याचा मोठा आदरसत्कार केला. कारण त्याचे हस्तस्पर्शानें व दर्शनानें त्यास आरोग्य प्राप्त झालें. निजामसाहेब सतुष्ट होऊन त्यास जहागिर देऊ लागले तेव्हां बक्र प्रभूनें उत्तर दिलें, " मी आहे कैलासवासी। जहागिर नको आम्हासी ॥ ५–३७ ॥ तुमची जहागीर अनित्य क्षणभगूर। ऐकून ये गहिवर । दरबार जनासी ॥ ५-३८ ॥ सत कर्बसप्पा हुमनाबादेत हुडगी गावात राहात. त्यानीं इस्मायील मन्यारी म्हणून एक यवन होता त्यास ६० रु. हुडी दिली ती खरी ठरून त्यास पैसे मिळाले. तेव्हांपासून तो व त्याचे भाईबद त्या साधूशीं व इतर हिंदूंशीं मोठ्या प्रेमादरानें वागू लागले. ( अ. १८ पा. २५४ ) ह्यावरून हिंदु मुसलमानात ऐक्य घडवून आणण्याचें महत्कार्य संतानीं कसें केलें आहे, हें सहज समजेल.

ह्या ग्रंथात क्वचित तत्कालीन सामाजिक, धार्मिक, व राजकीय परिस्थितीचे उल्लेख पुढीलप्रमाणें आढळतात.( १ ) बालविवाहः—रामचंद्र याचा १० व्या वर्षी प्रथमविवाह झाला. १६ व्या वर्षी तो विधुर होऊन त्यानें पहिल्या पत्नीच्या बहिणीशींच दुसरें लग्न केल्याचें ग्रंथकारानें सागितलें आहे (अ. २४). (२) ब्राह्मण मुळचे उत्तम खरे परंतु अनाचारानें हीन झाले आहेत. व हीनाचे श्रेष्ठ वर्ण झाले आहेत. (अ. २) भिक्षूकही आचारहीन झाले आहेत. दक्षिणेच्या लोभानें ते दोन दोन ठिकाणीं जेवतात व विधियुक्त कर्म आचरीत नाहींत. कोणी द्वादशीस बारा ब्राह्मण न बोलावतां एकट्या जामातासच भोजनास बोलावून बारा ब्राह्मणाच्या भोजनाचें पुण्य साधूं पाहतात. वेठीची चाल त्यावेळीं प्रचारांत असल्याचें पुढील उदाहरणांवरून दिसून येतें. बक्रप्रभूंना

एकदां वेठीस धरून त्यांना ओझें वाहावयास लावलें होतें ( अ. ४ ) त्याच प्रमाणें हुजुरी रामचंद्ररावासाठीं खंडूचे घोडे वेठीस धरले होते ( अ. २७ ). शिवरामपंत रेगोडेकर ग्रामाधिकारी असून अत्यंत रागीट होते. स्वामिकार्यार्थ त्यांनीं कुळावर जबर शेतसारा चढविला. वसूल होईना म्हणून रयतेवर ते जुलूम करू लागले. एका कुणब्यास अधिक सारा देता येईना. तेव्हा त्याचे डोक्यावर मोठी शिळा ठेऊन वसूल पुरा देईतों ती न काढण्याचा हुकूम त्यांनीं दिला. घरीं गेल्यावर परसांत त्या रयतेच्या बायकोचा व लहान मुलाचा हृदयद्रावक संवाद त्यांच्या कानावर आला. तो ऐकून त्यास एकदम पश्चात्ताप झाला म्हणून त्यानीं ताबडतोब रयतांस सारामाफ केला. व दफ्तर नायबांच्या स्वाधीन करून ते परमार्थ मार्गास लागले. ह्यात परमेश्वरी चमत्कार जरी कदाचित् ध्वनित असला तरी त्यापेक्षा दुःखदर्शनानें मानव्यताबुध्दिच जागृत होऊन उपरति झाल्याचें दृग्गोचर होतें. अशा प्रकारचे चमत्कार, जर त्यास चमत्कारच म्हणावयाचें असेल तर, समाजहितास व राजाप्रजेच्या प्रेमवृद्धीस उपकारकच मानिले पाहिजेत.

/ ह्या ग्रंथकाराचा एक अगदीं ठळक विशेष म्हटला म्हणजे बाह्यतः आक्षेपार्ह दिसणाऱ्या गोष्टींविषयीं आपणच शंका उपस्थित करून तिचें समाधान आपणच करावयाचें, व तसें करिताना नुसत्या बुद्धिवादावर भिस्त न ठेवतां अनेक शास्त्राधार देऊन त्याचें समर्थन करावयाचें. ह्यामुळें ह्या ग्रंथास कांहींशी पांडित्याची व बहुश्रुततेची जोड मिळाली आहे. आणि त्यावरून ग्रंथकाराचें वाचन फार सूक्ष्म, व बिनचूक झालें असल्याची व त्याची योग्य उपस्थिति असल्याची ओळख पटते. अशा शंकासमाधानांचें विवरण ग्रंथभर पसरलेलें असल्यामुळें वाचकात अंधश्रद्धा न उद्भवता त्याचा चौकसपणा वाढावा अशी योजना कवीनें केली आहे. ) मासल्यासाठीं पुढें एकदोन उदाहरणें दिलीं आहेत:—

(१) संतचरित्रास शंकरय्याख्यानानेंच आरंभ झाला असल्यामुळें ग्रंथकार सांगतो:—वर्णहीन शंकरअय्याचें आख्यान प्रथमच कां लिहिलें अशी शंका श्रोत्यांस येईल तर तिचें उत्तर असें कीं—ब्राह्मण उत्तमवर्ण खरे पण ते ब्रह्मज्ञानास पारखे झाले आहेत. ते कुबुद्धि व आचारहीन झालेले पाहून त्यांचें वर्णन करण्यास मन घेत नाहीं. परंतु जे भक्तिज्ञानयोगयुक्त आहेत, जे

समदृष्टि असून दया क्षमा शांति ह्या गुणाचें माहेरघर आहेत, असे जरी हीन जाति असले तरी ते पूजाई आहेत. पहा भागवतांत एकादशस्कंधात चतुर्दशाध्यायांत भगवंतानें उद्धवास असेंच सांगितलें आहे. त्याचप्रमाणें गीतेच्या सातव्या अध्यायात १७ व्या श्लोकांत "ब्रह्ममय जग असे। अन्वय रूपी सत्यासे। त्याजविना ठाव नसे। कोण पुसे वर्णाश्रमा॥" २-१६॥ श्रीमद्भागवत नवम स्कंधात दुसऱ्या अध्यायात शुकानें परिक्षितीला "वर्ण जातीस न भुलावें। भक्तिज्ञानाचारा पहावें।" व त्यांतील उत्तमास वर्णावें असें सांगितलें आहे. ह्या सिद्धांतानुसार शंकरलिंग भक्तोत्तम होता. त्यावर हरीचें प्रेम होतें. तो सगुणब्रह्मच असल्यामुळे त्याचेपासूनच सत चरित्रास आरंभ केला आहे. ह्यात अनुचित असे काहींच नाहीं, असें कवि सांगतो. (२) जीवन्मुक्त भास्करसोत, वक्रप्रभूच्या दर्शनास जात असतां वाटेंत भुकेनें व्याकूळ झाले व त्यानीं कावम्माजवळ अन्न मागितलें. ह्या ठिकाणीं अशी शंका कीं जर भास्कर समर्थ होते तर त्यांस क्षुधाशमन करता का येऊ नये? स्वतःचें क्षुधानिवारण जर त्याना याचनेशिवाय करवत नाहीं तर ते भवभयाचें निवारण काय करणार? ह्यावर समाधान असें कीं देह हा धर्माचें साधन आहे. तो रक्षणें अवश्य आहे. आणि तद्रक्षणास अन्न पाहिजेच. कारण त्यायोगें आत्मानुसंधानांत चित्तविक्षेप होत नाहीं. माझें हें म्हणणें सत्य कीं मिथ्या हें जाणावयाचें असेल तर पंचदशींतील तृप्तिदीप श्लोक १२५ वा पहा.

त्याचप्रमाणें योग वेदांतांतील तत्वें प्रतिपादीत असताना पांतजलयोग-सूत्रें, गीता, पंचदशी, महाभारत, अपरोक्षानुभूति, लघुयोगवासिष्ठ वगैरे सन्मान्य ग्रंथांचे जागोजाग आधार दिलेले आढळतात. (अ. ७।८ पहा). ग्रंथकारास योगाची उत्तम माहिती होती असें त्यासबधीं अनेक उल्लेखांवरून दिसतें. दुसऱ्या अध्यायात अगर्भ, सगर्भ प्राणायामाचे सविस्तर वर्णन देऊन ग्रंथकार म्हणतो हें मनःकल्पित नाहीं। बिंदोपनिषद् व पातंजलिमत ह्या ग्रथाधारें मी तें सांगत आहें. पुढें अ. ७।८।१०।१२।१४ व १८ या अध्यायात पुनः पुनः अष्टांग योगाचें वर्णन दिले असल्यामुळें पुनरुक्तिदोष झाला आहे. वेदांत प्रतिपादनही वरील ग्रथाधारेंच केलें असल्यामुळें त्यांत येथें सांगण्यांसारखें नवीन असें काहीं दिसून येत नाहीं. 'अविद्या, आवरण, विक्षेप, पंचकोश, अष्टपाश, कोशपंचक, इत्यादि विषयांचें विवेचन नेहमीं-

प्रमाणें साधार झाले आहे. प्रसंगोपात्त आलेल्या पुढील विषयांचें प्रतिपादनही उद्बोधक झालें आहे. ॥ मनाचा मल घालवी । संशय अहंकार नुरवी । इंद्रियनिग्रहानुभवी । ती म्हणावी स्नानसंध्या ॥ ६–२९ ॥ प्रवृत्तींत दिसे वेडा । तो निवृत्तींत चोखडा ॥ ८–१० ॥ प्रवृत्तींत शहाणा । तो निवृत्तींत उणा । अज्ञानें जन्म मरणा । नर्क यातना भोगितो ॥ ४–११ ॥ विषय चटक न गेली । भ्रान्ती तृष्णा न शमली । त्यास हवनें न कळलीं । व्यर्थ होळी पेटवीत ॥ ६–५९

येथवर ग्रंथाच्या मांडणीचें व त्यातील विषयाचें दिग्दर्शन केलें. त्यावरून परमार्थ मार्गीयास तो चांगला मार्गदर्शक असून साधूसंताच्या चरित्रवर्णनानें त्यांस स्फूर्तिदायकही वाटेल. तापत्रयानें तापलेल्या प्रापंचिकास तो क्षणभर विरंगुळा देईल व त्यांस वारवार रिझवील यांत संशय नाहीं. पण काव्य दृष्टीनें विचार करतां तो बराच हिणकस ठरेल. खरें बोलावयाचें तर समग्र ग्रंथात काव्यपूर्ण अशीं स्थळें शोधूनही सापडणें कठीण. वास्तविक प्रस्तुत ग्रंथ गद्यांतच लिहावयास पाहिजे होता. पण तसें न केल्यामुळे पद्यरूपांत धावतें गबाळ गद्य अवतरलें आहे. ह्या बाबतींत यथार्थदीपिकेशीं ह्याचें साम्य दाखविण्यासारखें आहे खरें, परंतु वामनाचे प्रकांड पांडित्य, त्याची जाडी विद्वत्ता व एकवार एक उपमादृष्टात देण्याची त्याची सुंदर हातोटी, त्याचें तर्कशुद्ध प्रतिपादन, ह्या गुणाचें अस्पष्ट दर्शनसुद्धा प्रस्तुत ग्रंथात होत नाहीं. जुना महिपती किंवा नवा दासगणू ह्यांच्या संतचरित्रात दिसून येणारें सूक्ष्म निरीक्षण, कल्पनावैचित्र्य, भावनोद्रेक किंवा रसपरिपोष ह्याचा मागमूसही ह्या ग्रंथांत दिसून येत नाहीं. शब्दशुद्धि, व्याकरणशुद्धि व भाषाशुद्धि ह्याकडे मुळांतच अत्यंत दुर्लक्ष झाल्यामुळें, व त्यातच "मुद्राराक्षमाच्या" अकुंठित विलासाची भर पडल्यामुळें ग्रंथास मोठेंच वैगुण्य आलें आहे. ग्रंथकाराचे सर्व व्यवहार ऊठबस ऊर्दूतच होत असल्यामुळें ते शब्द क्वचित येणें अपरिहार्य आहे खरें. तरी त्याला कांहीं मर्यादा आहे. ती मर्यादा दासगणूनें बरीच पाळल्याचें दिसतें. पण ह्या ग्रंथकारानें तिचें अनेक स्थळीं अतिक्रमण केलें आहे. खजेनदारी, जबानीमजकूर मुषंद व्हावें, (गुरु) पेषीचे मुनषी, महसब, फलप्राप्तीबाद (नतर); जबान जारीकरा योमियेस (रोजी भत्ता सुरू करा.) अशा प्रकारें शब्द, शब्दसमूह व वाक्यें

वारंवार आल्यानें वाचकाचा विरस होतो. ममाग्रहें, तदोत्तर, ग्रह (गृह); उचिष्ट; तपश्चिर्या; अशीं व्याकरणदुष्ट पदें पाहून त्या विरसतेंत अधिकच भर पडते. परंतु ग्रंथभर आणि शेवटीं। माझे वेडे वाकडे बोल। अर्पिले श्रोत्यास सकळ। गोड करून घेतील। पावतील संतोषातें ॥ ३४.१७१ ॥ बालकाचे मातापिता। अपराध न आणिती चित्ता। तशी ग्रंथात अशुद्धता। दिसे ती शुद्धता करतील ॥१७२॥ असे विनयमधुर उद्गार वाचून कोणाचें मन मृदु होणार नाहीं? पण वर सांगितल्याप्रमाणें ह्या ग्रंथाचें महत्त्व सामाजिकदृष्ट्या इतके थोर आहे कीं असे दोष त्यात सहज लुप्त होऊन जातात. उतारा:—

## ग्रंथमहिमा.

झाले उत्तरार्ध ग्रंथाचे। भवार्णव तारक साचें। किती वर्णु महत्त्व त्याचें। क्लिष्ट कलुशाचे हारक ॥ ३४-२२८ ॥ हें चौतीस खणी दामोदर। ज्यात असे दामोदर। दर्शनमात्रे चराचर। ज्यानकीवर भासवी। २२९ ॥ कीं हे चौतीस मुक्त। ओविले प्रेमयुक्त। मिरविती संतभक्त। झळकत कठाभरणीं ॥ २३० ॥ मुक्तगुणी का झाले बद्ध। हा उपजे सहज निषेध। परि विचारें महाशुद्ध। ते मुक्तचि ॥ २३१ ॥ परेच्छा वसे गुणी। भासती ते सन्मणी। नेणती अहंता जनीं। पृथकत्व दर्शक जे ॥ २३२ ॥ कीं हे चौतीस वैद्यराज। भवरुग्ण निरसना बोज ॥ नामामृत पिवे सहज। आरोग्य सहज दाविती ॥ २३३ ॥ कीं हे चौतीस प्रमोदधी। स्वयंपूर्ण दयाद्रधी। परहितावतरले सुधी। तृषित सधि पाहात ॥ २३४ ॥ तशांस देत ज्ञानजीवन। सुसाधनें करिती पावन। मग सर्व खलु स्मरून। आनंदघन राहती। या चौतीसात्म-पाकळ्या। उमटल्या स्वानंदकळ्या। विलसती न श्वेत न निळया। रंगल्या निजरूपीं ॥ २३६ ॥ कीं हे द्विधा होत षोडश। झाले बत्तीस चंद्रांश। प्रकृति पुरुष चौतीस। स्वप्रभेस दाविती ॥ २३७ ॥ कीं हें चौतीस प्रभस्व-मित्र। प्रकटले सत्त्वार्शी पवित्र। अज्ञानतम हरूनी पात्र। करविती आत्म-दर्शना ॥ २३८ ॥ कीं हे चौतीस चिंतामणी। स्वेच्छ निपजले कल्याणी। सद्भक्तां इच्छित देउनी। कौतुकें अवनी रहाटती ॥ २३९ ॥ कीं हे चौतीस मोक्षसोपान। जीवाक्रमणी सुलभ पूर्ण। जो या सत्पथीं करी नमन। साम्राज्य सदन तो पावे ॥ ३४—२४० ॥

---

# प्रकरण ४ थें

## श्री. विष्णुदास कवि माहुरकर ( स. १८४४–१९१७ )

" हा विष्णुकवीचा छंद गुणीजन गातो "

जीवनवृत्त:—मराठवाड्याच्या पुण्यभूमींत संत कवींची परंपरा अखंड चालू ठेवणाऱ्या संत कवींपैकीं संत विष्णुदास माहूरकर हे अग्रगण्य होत. कवीचे पूर्वज फार पुरातन काळीं कसबें धांदरफळ ता. संगमनेर जि. अहमदनगर येथें रहात असत. हे काश्यप गोत्री शुक्ल यजुः शाखीय वाजसनेयी होते. पूर्वजांपैकीं एकानें प्रापञ्चिक आपत्तीमुळें हा गाव सोडला व साताऱ्यास जाऊन तेथें वसती केली. तरी त्यांनीं धांदरफळे हें नांव चालू ठेविलें. यांच्या वंशावळींत[1] चिंतामणि–शिवराम–रावजी–कृष्णा (विष्णुकवि) अशी परंपरा दिली आहे. हे सर्व पुरुष ईश्वरभक्त होते. त्यांस राजाश्रय होता. परंतु स. १८४८ मध्यें सातारचें राज्य खालसा झाल्यावर तो सुटला. रावजीस सौ. गंगाबाईचे उदरीं शके १७६६ मध्यें एक मुलगा झाला. त्याचें नाव कृष्णा असें ठेविलें होतें. हाच पुढें विष्णुदास या नावानें प्रसिद्ध झाला. बालपणापासूनच त्याच्या धार्मिक प्रवृत्ति दिसूं लागल्या. नित्य ब्रह्मकर्म व प्राणायाम याचा अभ्यास त्यानें केला होता. त्याच्या वैराग्यवृत्तीस पायबंद घालण्याकरिता त्याच्या १२ व्या वर्षीच त्याच्या पायांत लग्नाची बेडी वडिलांनीं अडकविली. वधूचें वय ९ वर्षांचें होतें. लग्नानंतरही त्याचें मन प्रपंचाकडे लागेना. नित्य गुरुचरित्रवाचन, संतसंग, परमार्थ–चिंतन वगैरे गोष्टींचीच त्यास अधिकाधिक गोडी वाटूं लागली, व परमात्म्याच्या सगुणदर्शनाचा ध्यास त्याला लागला. त्याची पत्नी राधाबाई मोठी पतिव्रता होती.|| रंगपटावरि स्त्रीपुरुषांची फुटली रे जोडी | आता काय खेळण्याची गोडी || ह्या आत्मचरित्रपर पोवाड्यांत स्वत: तिचे गुण त्यानें गाइले आहेत. तिला तीर्थ-

---

शारदाश्रममाला पु. १ लें. संपादकः–य. खु. देशपांडे. व द बा. महाजन बी. ए. स. १९२८ किं. रु. २. प्रस्तावकः–अ. सि. साठे, चरित्रकार-नरहरशास्त्री जोशी खरशकिर. मुद्रक–ब. ग. खापर्डे. अमरावती. १ चरित्र पा. १०.

यात्रेस जाण्याचा विचार त्यानें कळविला. चार दिवस " वनाचें वैभव भोगावें । व । आपल्या सेवेंत वागावें " असा निश्चय तिनें कळविला. पण तो मान्य झाला नाहीं. ती " जागत बसली, नाहिं लाविला, नेत्राला नेत्र । सोडिली झोंप सत्त रात्र " । पण कर्मगतीनें आठवे दिवशीं तिला झोंप लागली. ती संधि साधून सर्वांचा परित्याग करून १८ व्या वर्षी कृष्णा तीर्थयात्रेस निघाला. पहिल्यानें विरूपाक्ष येथें श्रीमच्छंकराचार्यांच्या मठांत एक वर्ष राहून पुढें त्यानें मल्लिकार्जुनाचें दर्शन घेतलें. तेथें दृष्टांत झाल्यावरून तो मातापुर अथवा माहूर येथें गेला. तेथें जपादि अनुष्ठान करून तो मधुकर वृत्तीवर निर्वाह करीत असे. कांहीं कालानें त्यास सगुण दर्शन झालें. ह्याचा उल्लेख क्वचित पुढीलप्रमाणें आढळतो. प्रसन्न मुख जगदंबा अंबा प्रसन्न झाली हो । अजरामर वर द्याया प्रगटुनि पुढें उभी राहिली हो. ( च. पा. ५९ ). । झाला वर्षाच्यावर महिना । तरि अजुनि सय कां हो येइना ।। अशी कृतार्थता झाल्यावर त्यास घरची आठवण झाली. परंतु तेथील पाटील श्रीमंत रेणुराव देशमुख याच्या लोभास्तव तेथेंच कायमचें वास्तव्य त्यानें केलें. इकडे पत्नी राधाबाई व मातापितरें १६ वर्षेंपर्यंत दु:खांत दिवस कंठीत होतीं. शके १८०० मध्यें तो माहुरास सुखरूप असल्याची बातमी ऐकून त्या सर्वांस आनंद झाला. व राधाबाई तिकडे जाऊन देशमुखांच्या वाड्यांत पुन: प्रपंचसुख अनुभवू लागली. परंतु सातार्‍यास परत न गेल्यामुळें मातापितरांस मात्र पुत्रमुख पुन: दिसलें नाहीं. मातोश्रीच्या निधनवार्तेनें त्यास फार खेद झाला व ह्या पापाच्या-क्षालनार्थ जगन्माता रेणुकामाईचीच प्रेमपुरस्सर सेवा त्यानीं सुरू केली. इकडे पाटील बोवांच्याकडे पत्नीस फार कष्ट करावे लागत म्हणून त्यांनीं स्वतंत्र प्रपंच थाटला. राधाबाईच्या सौजन्यामुळें " दैवें कंटकवनीं लाभली कल्प–द्रुमवल्ली " बोवांचा संसार आनंदमय झाला होता. पण संसार हा क्षणभंगुर. राधाबाईनें शके १८१४ ज्येष्ठ शु.।। २ रोजीं इहलोक सोडला. विष्णुबोवांसारख्या विरक्तासही विरहाग्नीची ज्वाला जाणवली. । वाटे सुख-सिंधुच्या बुडाली अधें मधें होडी ।। आतां काय खेळण्याची गोडी ।। २८ ।। कामिनि वाचुनि काय करावें उजाड सदनासीं । निघूनी जावें अरण्यासी... ...टाकुनी व्हावें संन्यासी ।। २९ ।। प्रपंच भुवनांगणीं सुशोभित द्राक्षाची

वेली। मंडपीं होती पालवली। प्रारब्धानें मुळासकट ती उपटुनिया नेली। जगांतुनि नाहींशी झाली॥ संसाराची सर्व उभारी येथुनिया सरली। सुखाची सरिता ओसरली॥ इ. ॥ ३०॥. ह्या नितांत करुण उद्गाराच्या रूपानें बोवांच्या वैराग्यशिलेखालीं हृदयात गढ दडलेला प्रेममय निर्झर उफाळून बाहेर पडला आहे. तो जितका काव्यमय व मधुर तितकाच हृदयद्रावक आहे. या प्रसंगानंतर बोवानीं खरोखरच समागाचें सत्पात्रीं दान केलें. आणि येथें त्यांचें प्रापंचिक चरित्र संपलें. पुढें त्यांनीं कवित्वावर बराच भर दिला आणि विपुल कविता केली. शके १८२३ माघ शु.॥ १० ला उमरखेड येथील नित्यानंदसरस्वति स्वामी महाराज याचे करवीं त्यानीं चतुर्थाश्रम स्वीकारला, व श्री पुरुषोत्तमानंद सरस्वती असें नाम ग्रहण केलें. ते भक्ति-मार्गाचा उपदेश करीत माहुरच्या पचक्रोशींत हिंडत असत. अखेर पौष शु.॥ ८ शके १८३९ रविवारीं स्वामीजींनीं जड देहाचा त्याग केला.

## विष्णुदासाची कविता, प्रथम खंड.

सुगंध पुष्पासहित पसरला वेल जाईचा। पोवाडा राधाबाईचा॥

विष्णू कवि.

विष्णुदास माहुरास जात असता वाटेंत त्यास गोदातीरीं असलेले बासर क्षेत्र लागलें. तेथें श्रीसरस्वती देवीचे मंदिरातच ते उतरले. तेथें त्यास दृष्टांत झाला, व सरस्वतीनें "मी तुझ्याबरोबर मातापुरास येतें व जिव्हाग्रीं वास करितें" असें सांगितलें. ह्या प्रसादानें ते शीघ्रकवि बनले व सहज स्फूर्तीनें मुखांतून निघालेलीं अक्षरें प्रबंधरूप होऊं लागलीं. माहुरास त्यांनीं नाटकें रचिलीं व कांहीं मंडळीकडून त्याचे प्रयोगही करविले. पण ह्यांपैकीं एकही प्रसिद्ध झालेलें नाहीं. ह्याचा उल्लेख त्यांनीं आपल्या प्रसिद्ध पोवा-ड्यांत केला आहे:—तदनंतर मातापुरीं केला बहुनाटक छंद॥ जोडिली कविता कटिबंध॥ प्रसिद्ध श्री चिन्मयानंद उमरखेडकर याचे शिष्यवर रावसाहेब शेवाळकर याच्या सांगण्यावरून त्यानीं आपल्या कवित्वाचा ओघ जगन्माता रेणुका इच्या स्तवनाकडे वळवला. ह्यामुळें त्यांची बहुतेक सर्व कविता परमार्थपर झाली आहे. कांहीं लौकिक काव्यही त्यांनीं रचिलें आहे. पण त्याचा रोंख शेवटीं परमार्थाकडेच नेण्याचा आहे. चित्रकलेंत व

गायनांतही ते निपुण होते. शारदाश्रम मालेतर्फे प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या कवितासंग्रहात १६८ कविता दिल्या असून पुरवणी भागात आणखी काही घातल्या आहेत. संग्रहाचीं एकंदर १७५ पानें झालीं आहेत. ह्या कवितांचे संग्राहकानें ११ भाग केले आहेत. पण त्याचे दोनच मुख्य भाग पडतात. पारमार्थिक व ऐहिक. कवितांचा सगळा भरणा पहिल्या विभागातच आहे. याचे पुनः अनेक पोटविभाग करितां येतील. त्यापैकीं एकांत भाग १ ते ३,७ ते ९ व ११ अशा सात भागाचा समावेश करता येईल. यात नमनें, देव-देवतास्तुति, जन्म, पाळणे, व आरत्या याचा भरणा आहे. ही रेणुका, तुळजा, अनसूया, गुरु, आदिनाथ, गंगा, मारुती, विठ्ठल, श्रीहरी, नरहरी, दत्त, गणपति, शंकर, चंद्र, सूर्य, जमदग्नी, अत्री, वगैरेस उद्देशून रचलीं आहेत. या अनेकास एक रूपत्वानें कवीनें स्तविलें आहे. या भागातलीं रेणुकेचीं पदें त्यांतील वत्सल रसानें फारच मधुर झालीं आहेत. एखादा लाडका लहान मुलगा एखाद्या वस्तूचा अगर गोष्टीचा हट्ट घेऊन बसतो व ती मिळण्यासाठीं, मातेच्या दृढ प्रेमावर भिस्त ठेवून जसा क्षणात गोड बोलून साखर पेरतो, काकुळतीस येतो, युक्तिवाद करतो, रडतो, लोळतो, शरण जातो, असाह्यता दाखवतो, काही वेळेस नाहींसे पाहिले की, टोचून बोलतो, वर्म काढतो, वर्मळीवर येतो, पदर ओढतो व बोचकारतोही. पण पुनः लगेच हळूच हसण्यावारी तें नेऊन " आई अबोला सोड बोल मशीं गोड " असें म्हणून तिलाही हसवतो व आपलें इष्ट कार्य साधतो आणि मग आनंदानें आईची थोरवी गात, उड्या मारीत प्राप्त वस्तूकडे मोठ्या अभिमानानें पहात खेळण्यास निघून जातो. असे नितांत कोमल कठोर पण सर्वथैव मधुर बालभाव कवीनें रेणुकेच्या पदात प्रगट केले आहेत. ते पाहून त्यांचें प्रेममय जीवन व बलवत्तर निष्ठा हीं व्यक्त होतात. याचा थोडासा मासला देणें अपरिहार्य वाटतें ( पद्य.६ ) । तुला होईल आई नजर । तुझे सगुणरूप सुंदर । तू चतुर गुणगंभीर ।। अशी स्तुति केली नाहीं तोंच । मी अनाथ दिन लेंकरू । नको माझि उपेक्षा करू । नको उगि मजवर गुरगुरूं । तूं बाप माउली गुरु ।। असें किंचित तुटकपणाचें व लगेच सलगीचें भाषण येतें. पुनः लगेच । आपुलिया हातें कापावी ही मान । जगांत अपमान करूं नको । श्वानापरी ठेवी आपल्या संग्रहीं । परी

परगृहीं धाडूं नको ॥ असे निर्वाणीचे कठोर पण अनन्यगतिकत्वाचे बोल येतात तोंच पुनः । आई तव दर्शनासि योग्य मी न का ? । रेणुके तं दीनांची नससि माय कां ॥ (पद्य १३) अशा काकुळत्या केलेल्या आढळतात तर । अझुनि कांन भेट देसि लपसि बाई का । काय म्हणावें अवतार कृत्य संपलें ( पद्य १६ )॥ असे लडिवाळ युक्तिवाद व संशय घेतले आहेत. हळू हळू पुढें धिटाईनें कवि म्हणतो-। तुझें रूप डोळे भरून पहाण्याची केवढी मला आस होती! परंतु तुला कांहीं दिनाची दया आली नाहीं. कशी येणार ? निबर तरि तुझें काळिज केवढें धन्य धन्य अग बया बया। गोड वाटतो तुझा तुला परि स्वभाव नाहीं हा भला भला ।। असे कठोर वाक्प्रहार केले आहेत. तर लगेच ( पद्य १८ ) शिर झालें पांढरें फटक, लागली चटक, अधिक विषयाची। कशि होइल भेट तुझ्या पायाची ॥ असें स्वतःचें अपात्रत्व कबूल करून ॥ मी अनाथ दीन केवळ, माझि कळवळ, येउं दे काहीं । पाव लवलाहीं ॥ अशी आपली पूर्ण असाह्यता व्यक्त केली आहे. पण ह्यानें कांहीं वळत नाहीं असें पाहताच ॥ भला भार्गवराम प्रतापी । गळा आपुल्या जननीचा कापी । परि तैशाची केलीस माफी । माझे अन्याय लाविसी मापीं ॥ पद्य २२ ॥ असें वर्म काढुनी तिला शर्मा-याला लावलें आहे. पुढें तर वर्दळीवर येऊन ॥ माझ्या एवढ्या हाका ऐकू येत नाहींत तर काय ॥ कानांत चमलीं कीं मळ मातिचीं ढेंकळें ॥ पद्य २६॥ तसेंच ॥ ( पद्य-३० ) अग आई विश्वंभरे ( साभिप्राय ) । दगा देणें नाहीं बरें । लोभ लावूनि आगळा। मग कापूं नये गळा। जेवुं घालुनी उपाशी । मग देऊं नये फाशीं ॥ असा उघड उघड विश्वासघाताचा आरोप केला आहे. तर (पद्य ३३ ) पुढेंच आई जगदंबा श्रीमंत कृपाघन मोठी। किती वर्णावी गंभीर गुणाची कोटी॥ अशी तिची मुक्त कठानें स्तुति गाइली आहे. आणि शेवटीं ॥ ( पद्य ३४ ) किति धरशिल तरि अबोला ग । ... धरू नको ओढ । अबोला सोड । बोल मसि गोड । असे गोड गोड बोलून लहान मुलासारखी हळूच आईच्या पदराखालीं त्यानें दडी मारली आहे. दुसऱ्या पोटविभागांत कृष्णलीला व आख्यानपर पदें समाविष्ट करतां येतील. कृष्णलीलांत गाऱ्हाणें मोठें ठसकेबाज तसेंच स्त्रीस्वभावद्योतक झालें आहे. एक गोपी मोठ्या फणकाऱ्यानें म्हणते:—

तुझा मूल लाडका तुला ।.........। याचा एकहि नसे गुण सुधा। नाही तिळभर भिड-मर्यादा । रस्त्यात हाटकतो सदा ॥...। आम्ही गरती नारी भितों कीं अबला । १ । बाई तुझ्या मुलाला दोन्ही हात जोडून नमस्कार असो. यानें सर्व गवळणी बिघडविल्या आहेत. सूना सामुला गुरकावतात, आमच्या कुळाला हा बुडविणार ! याच्या भीतीनें गोकुळ टाकून जावेंसें वाटूं लागलें आहे. इ. इ. पुढील मुरलीचे पद मोठे गोड झालें आहे. वृंदावनि यमुनातीरी फार मधुर मुरली वाजूं लागताच गोपींच्या मनांत धुंद भरली. त्या निर्लज्जित होऊन, विगलित पल्लवानें व भरजरी पितांबरासह, कंचुकी घरीं विसरून धावत वनात शिरल्या. मग तद्दास ॥ पाहुनि हरिनें तनु कवटाळुनि, हृदयीं दृढ धरली धरली॥ त्याच्या पुढचीं रासक्रीडेचीं पदें पाहून तर सात्विक शृंगाररसाचे एकाहून एक मधुर असे हृदच कवीनें निर्माण केले आहेत की काय असे वाटते. प्रारंभींचें शरद्ऋतूचें वर्णन कसें रम्य झाले आहे तेः–एकदा शरद्ऋतु काळीं ।वाजवि मुरली वनमाळी ॥ध्रु॥ रात्र प्रफुल्लित चंद्र प्रभे । अधिकच वृंदावन शोभे । डोलति फणसाजिर आंबे । केळिनारळी डाळिंबे । बदाम नारिंगे निंबे ।संत्रे चकोत्रे, करवंदे। नाना वृक्षाच्या जाळी। वाजवि मुरली वनमाळी ॥ अशावेळीं मुरलीचा ध्वनि ऐकून नितंबिनी गोपी चित्तीं चमकल्या; त्यांस निद्रा येईना, सुखशयनीं चैन पडेना, म्हणून वृंदावनीं आल्या. पहिली सुंदर चिमणी तर दुसरी चंपककळी अशा एकीहुन एक सुस्वरूप यमुनेच्या पाळीं आल्या, व रासक्रीडा सुरू झाली. टिपरीवर टिपरी पडूं लागली, पिचकाऱ्या उडूं लागल्या इतक्यांत ॥ शोभे चंद्रावळ जवळी। कंचुकि आंगामधि पिवळी। हरिणाक्षीची तनु कवळी । चुंबन देउनिया कवळी ॥ अशा रंगात असता कृष्ण आम्हास वश झाला असें समजून त्या एकमेकींकडे गर्वानें पाहूं लागल्या. हें कृष्णाच्या लक्षात येताच तो एकदम गुप्त झाला. तें पाहून गोपी बहुत कष्टी झाल्या. 'काय लिहिलेंस अदृष्टी'! म्हणून परमेष्टीला दुष्टा मेल्या अशा शिव्या देऊं लागल्या. वेड्यासारख्या लता वृक्षांस 'कुठे आमुचा हरि गेला,' असें विचारूं लागल्या. कोणा सवतिच्या घरिं बसला कीं काय म्हणून आपसातच भांडूं लागल्या. अशा स्थितींत ॥ धांवति गोपि आडवाटें । मोडति चरणामधिं काटे । अडविति चोरी कोराटे । दैव जहालें उफराटें ।

अशा स्थितींत रतिमदनाचा धिःकार करून त्या रडूं लागल्या. कृष्णा! मधुसूदना एकदा निजवदना दाखव. पुरे झालें तुझें छळणें, आम्हीं तुला शरण आलों. आमच्यावर असा कां रुसलास? असें नानापरि आळविताच त्याच्या गर्वाच्या गरसा जिरल्यासें पाहून श्रीकृष्ण एकदम पुन: प्रगटला व ।। पुनरपि आला बहुसरसा । रासक्रीडेचा रंग रसा ।। नतर त्यानें प्रत्येकीची निरनिराळी आवड पुरविली व सूर्योदयीं सर्व गोपी घरोघरीं गेल्या नि रासक्रीडा सपली. ह्या पदाची चाल पण कशी टिपरीच्या ठेक्यावर उड्या मारीत नाचत जात आहे! त्यामुळें नाद व अर्थ याचा मिलाफ अत्यंत रुचकर व रसपोषक झाला आहे. राधाकृष्णाचीं पुढलीं पदेंही मोठीं मनोरजक आहेत. एकांत कवीनें राधेची कानउघाडणी केली आहे. तिच्या विदेहावस्थेत चाललेल्या बाह्यक्रिया तिच्या आतरस्थ प्रेमाच्या चुगल्या करून तिला कशा हास्यास्पद करीत आहेत हें मोठें मार्मिकपणें तिला सागितलें आहे. ह्या उपदेशानें जणुं भानावर आलेली राधा मोठा दृढनिश्चय करून कृष्णास सागतेः—।। तरि माझी आजपासून । गडी तोड, तोड रे । कृष्णा माझा छंद साग । आता सोड मोड रे ।। गावामधें हाचि धंदा । घरोघरी करिती निंदा । झाली झाली पुरे मर्यादा। काडी मोड मोड रे ।। कृष्णा । बहुतांनीं केला अट्टा । लावावया अब्रुस बट्टा । बरी नाहीं अधिक थट्टा । थोडी गोड गोड रे ।। कृष्णा० ।। इतकें सांगत असताच पुनः म्हणत्ये कीं–आठवण असों द्यावी । मनोमनीं भेट द्यावी ।। ४ ।। एकीकडे जननिंदा व दुसरीकडे अतस्थ प्रेमाची ओढ ह्या दोन परस्पर विरुद्ध भावात राधेची उडालेली तारबळ पाहून मोठ्या विरक्ताचेही कपोलावर मधुर हास्याची खळगी पडल्याशिवाय राहाणार नाहीं. ह्या पदाचीही चाल व शब्दरचना अशी गोड गोड झाली आहे कीं तें एकसारखें घोळीत बसावेसें वाटतें. पुढील दोन पदांत यमुना डोहात कृष्ण बुडाल्याचें व अक्रुरागमनाचें ऐकून गोपीनीं जो शोक केला त्याचे वर्णनांत विशेष आकर्षक असें कांहीं नाहीं. त्याचप्रमाणें पुढील भागातील शबरी, अत्र्याश्रम, व बकासुरवध यांचीं वर्णनेंही अगदीं सामान्य आहेत. मात्र शेवटचें शिवभिल्लणीचें पद त्यातील नाटयसंवादामुळें मोठें चटकदार झालें आहे.

पुढील पोटविभागांत एक मोठा कटाव, व सुमारें १३।१४ पदें येतात. या भागास भक्तिज्ञान वैराग्यपर असें म्हटलें आहे. एकांत मनुष्य प्राणी

जन्मल्यापासून संसाराला जुंपलेला एक बैल कसा आहे, व तो अखेर रडत नागवा कसा जातो हें सांगितलें आहे. दुसऱ्यात ॥ या जगात मुद्दल पैसा ॥ शरीरामधें मुळ जिव जैसा ॥ या अभिनव उपमेनें पैशाचें महत्त्व वर्णिलें आहे. पुढें संसाराटवीचें रूपक मोठें चांगलें साधलें आहे. इतर पदांतून संसाराची असारता, जीविताची क्षणभगुरता व हरिभजनाची तारकता निरनिराळ्या रूपकानीं सांगितली आहे. ९१ व ९३ पदें हीं लाक्षणिक असून ९२ वावें पद षड्चक्रावर आहे. एकदरींत ह्यात विशेष नाविन्य नाहीं. प्रपंच परमार्थाचें असें तात्विक विवेचन संत वाङ्मयात कोठेंही आढळण्यासारखें आहे. कटाव मात्र प्रासानुप्रासानीं, समर्पक शब्दयोजनेनें व वास्तव वर्णनानें किती चित्ताकर्षक व अतिमनोहर झाला आहे, हें शेवटीं दिलेल्या उताऱ्यावरून सहज दिसून येईल.

आता दुसरा मुख्य विभाग जो लौकिक कवितांचा त्याजकडे वळू. ह्यांत आत्मकथनपर पोवाडा प्रथम येतो व नंतर लावण्या येतात. ह्याचा उल्लेख मागें आलाच आहे. ह्यातील आर्य गृहिणीचें शब्दचित्र व पतिपत्नींचें पवित्र प्रेम इतक्या नाजूक व हळुवार कुंचल्यानें रंगविलें आहे कीं त्यापुढें समतेचा बडिजाव दर्शविणारें कोणतेंही आधुनिक चित्र फिक्कंच पडावें! त्यांतल्या त्यांत स्त्रीपुरुषाच्या स्वाभाविक आकर्षणाबद्दल परमार्थपरायण व वैराग्यशील पतीच्या तोंडून निघालेल्या प्रांजळ उद्गारानीं तर तें विशेषच रम्योदार झालें आहे. ह्या पोवाड्यातील शब्दयोजनाही फार अर्थवती व रसानुकूल अशी आहे. कवि म्हणतो. माझी पत्नी दारिद्र्यांतही पार्वतीसारखी समाधानी, गृहकार्यांत दक्ष; कधीं शिळी भाकर भाजी तर कधिं साजुक सोजी असली तरी सदा राजी असणारी, पतिसेवारत, अशी होती. किती आनंदांत ते दिवस आमचे जात होते. पण काळगतीचा फासा कठीण आहे. मला तीर्थ–प्रवास करण्याची लहर आली व लगेच पत्नीला प्रयाणाची सूचना दिली. पण स्वतःचा भावी विरह तो कसा वर्णितो पहा:–तुजवांचुनि जळहीनमिनापरि केवळ तळमळतो। वल्लभे जिव व्याकुळ होतो॥ पण हा बेत ऐकून नेहमीं मेणाहून मऊ असणारी अबोल राधा ' झाली उलटी खड्गाची धारा' [1] आणि उत्तरली:–टाकुनि द्यावी आपुलि बायको दुसऱ्याचे दारां। नव्हे हा सूज्ञांचा

1 राधाः–( उलट ) धारा.

धारा ॥ सीतेप्रमाणें समागमें जाण्याचा तिनें हट्ट धरला. सात रात्री सारखी जागत बसली. पण दुर्दैवानें आठवे दिवशीं डोळा लागताच, नळानें दमयंतीचा त्याग केला तसा तो तिचा त्याग करून पळाला. पण "अन्यायाविण मी साध्वीची मनमोडी केली" असें त्याचें मन त्याला खातच होतें. पुढें तीर्थयात्रा वर्णन तपःसाधन व नतर रेणुरावाकडे राहिल्याची माहिती आली आहे. त्या प्रसंगींचा "अडकला कासव हडयात" हा अभिनव-दृष्टांत चमत्कृतिजनक नाहीं असें कोण म्हणेल? मागे टाकून दिलेल्या पत्नीचे विरहदुःख त्याच्याच शब्दात द्यावेसे वाटतें:-

टाकुनि गेला पती सतीला त्या निजल्या जागीं।
झाली दचकुन ती जागी
अकस्मात दुर विखार शभर विचवाचे नागी
टोचल्या वाटति सर्वांगीं।
दुःखाग्निमधे करपलि गात्रे जशिं सगळीं वांगीं
विपत्तिस जाहली विभागी।
रडे पडे आक्रोशे ओरडे ओरडे शिर फोडी
आता काय खेळण्याची गोडी ॥ १५ ॥

मुक्तेश्वरकृत दमयतीशोकवर्णनाची थोडेशी तरी आठवण येथें वाचकास झाल्याशिवाय राहाणार नाहीं. भाजलेल्या वांग्याचा दृष्टान्त किती सूचक आहे. १६ वर्षांच्या घोर कष्टानंतर पतिपत्नींची गाठ झाली तेव्हा त्याच्या आनंदास पारावार उरला नाहीं. पुढें जेव्हा स्वतंत्र संसार थाटला तेव्हाच्या सुखाचें वर्णन कवि करतो:-

तप्त अंगावर सदा पाझरे चंद्रामृत किरण
पावले स्वस्थांतःकरण ॥

हें वाचून-आश्च्योतन नु हरिचन्दनपल्लवानां। निष्पीडितेंदुकरकंदलजोनुसेकः।
आतप्तजीवितपुनः परितर्पणोऽयं। संजीवनौषधिरसो नु हृदिप्रसिक्तः।
असें म्हणणाऱ्या भवभूतीच्या रामाची आठवण होत नाहीं काय? अशा सांसारिक सुखाचा पूर्ण अनुभव घेत असता अकस्मात पत्नी निधन

---

उ. रा. ३-११

पावली. त्यावेळच्या शोकाचें वर्णन पूर्वीच येऊन गेलें असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें करण्याचें कारण नाहीं. हा ३२ कडव्यांचा व २५६ ओळींचा प्रदीर्घ पोवाडा आजकालच्या कोणत्याही प्रेमकाव्यांत उच्चस्थान पटकावील असें आम्हास वाटतें.

आता लावण्याकडे वळू. दीपवाळी व शिमगा ह्या दोन मुख्य सणावर दोन, नायिकेच्या ९, नायकाच्या १५ व उभयतांच्या ५ अशा सर्व मिळून ३१ लावण्या होतात. रंगेल रामजोशी व शृंगारिक लावण्या यांचें महाचर्य जसें सुसंगत वाटतें तितकेंच वैराग्यशाली विष्णुबोवासंबंधीं तें विसंगत वाटतें. पण श्रीधर म्हणतो त्याप्रमाणें:—जे का विषयपरजन। न करिती लीलाश्रवण। त्यास शृंगार दावून। वेधी मन आपणाकडे॥ विष्णुबोवानींही लावण्या करून खालच्या वर्गातील अज्ञ जनास सन्मार्गास लावलें. कांहीं नायकिणींनींही त्याजकडून लावण्या करून नेल्या होत्या व त्या बैठकींत गायल्या जात असत. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरानाही त्याची ‘निरभ्रशुभ्र नक्षत्रतुल्य ही ललना कोणाची’ ही प्रसिद्ध लावणी फार आवडली होती. मागें कांहीं लावण्या अमेरिकेंत पाठविल्या होत्या त्यांत ह्या लावणीला स्थान मिळालें होतें. कांहीं लावण्यांत उत्तान शृंगार जरी असला तरी बऱ्याच लावण्या द्वयर्थी आहेत, त्या अखेरीस सन्मार्गप्रवर्तक झाल्या शिवाय राहणार नाहींत.

दिपवाळीच्या लावणींत दिव्यांच्या लखलखाटाशिवाय दुसरें कांहीं नाहीं. शिमग्याच्या लावणींत मदनदाह व प्रद्युम्न जन्म याचें वर्णन करून त्याच्या तडाक्यांत सापडलेल्या विश्वामित्राची त्रेधा वर्णितांना कवीनें एकदम दोन तीन चरण हिंदी घातले आहेत:—रहा साठ हजार बरस जो एक पावपर खडा। उडविला त्याच्या तपाचा खडा॥ इ. पुढें रतिमदनाचें स्वयंवर होतें. ही स्वयंवर कल्पना मोठी मार्मिक आहे. स्वयंवरकालीं निरनिराळीं वाद्यें वाजतात. स्वयंवरविलोकनार्थ पुढील शिष्ट ग्रामस्थ गर्दी करतात. जोशी, पुराणिक, गोसावी, भारती, देशमुख, पटवारी, पाटील, वैदिक, पंडीत वगैरे. ते शुभमंगल सावधानाच्या ऐवजीं। रतिच्या नांवानें गर्जती। गायक, वारांगना, आणि नट, नृत्यांगणिं नाचती। श्रीमंतां पोस्तदान मागती॥ आणि आपलें शिमगा काव्य शिष्टाचारास सोडून नाहीं अशा

आणीवेनेंच ।' विष्णु कवीच्या पदरचनेवर तुमची असू द्या निगा ॥ असें म्हणून कवी श्रोत्याजवळून पोस्तच मागतो आहे कीं काय असें वाटतें.

पुढें ९ शृंगारिक लावण्या नायिकेच्या आहेत. त्या सर्वांत विरहावस्थेचे निरनिराळे प्रकार वर्णिले असून, सगमोत्सुकता दाखविली आहे. नाटकां-मधून विप्रलंभ शृंगाराचीं जीं वर्णनें येतात व मदनबाधेंत ज्या ज्या अवस्था नायिकेच्या होतात अशाच याठिकाणीं वर्णिल्या आहेत. त्यात उत्तान शृंगार मुळींच नाहीं. दुसरींत गृहिणी कुलटेचा पश्चात्ताप वर्णिला आहे. ती सागते:-- सासरमाहेर बुडवून प्रियकराच्या मांडीवर मान ठेविली पण ती त्यानें कापली. नाहींतरी ॥ आम्ही मूर्ख स्त्रियांची जात यास्तव घात दग्यानें होतो ॥ असा तिनें निष्कर्ष काढला आहे. नवव्या लावणींत अबोला सोडा म्हणून प्रियकराची विनवण्या करणारी नायिका हाच निर्णय देते. व म्हणते--" शतमूर्ख स्त्रियांची जात उगी नागवती । जळो आग लागो या तरुणपणाची नवती ॥ बाकीच्यात काहीं विशेष नाहीं. कोणी प्रियकरास परनारीनें मोहनी घातली म्हणून तळमळतें; तर कोणी तारुण्यात स्वातंत्र्य नाहीं म्हणून तडफडतें; तर कोणी हिरव्या रंगाची हौस पुरवा म्हणते. पाचव्या लावणींतली रुसलेल्या पतीची समजाविशी मात्र फार मजेची झाली आहे. नाना तऱ्हा केल्या तरी रुसवा जात नाहीसें पाहून ती म्हणते.

लग्नासि उद्या मुळ मजला धाडिल वहिनी ॥
मग मजसि आठवित बसाल महिनोमहिनीं ॥
कां बसलां मजवर रुसून । अपराध एकहि नसून ।
मसि बोला एकदा हसून । किती पहाल कसोटी ।
पुढें येईल अनुभव दिसून ॥ इ. ॥

ह्या पदाचा रस सभासदजनास रुचला अशी कवीनेंही ग्वाही दिली आहे.

नायकाच्या १५ लावण्यातही असाच विरहविलास व विप्रलंभ शृंगार आला आहे. विशेषतः स्त्रीरूपवर्णनें पुष्कळ आहेत व तीं सर्व नेहमींच्या धर्तीचींच आहेत. ह्यात मात्र मधून मधून उत्तान शृंगार डोकावतो. यातील काहीं उपमा मात्र अभिनव आहेत:--

( १ ) जशि भटास पोळी ऊन, तूप, तशि कोण रूपवति दिसली ।

( २ ) येइ ना जसा अंगुळित, मिसळला धुळित, चंचल पाग । सुंदरी तूं
 घ्यालिम वारा ॥ १५४ ॥

( ३ ) वर वर दिसतिल खडिसाखर जशि । पर अंतरिं कडुकुटकी॥ १५५·१॥

( ४ ) प्राण करि शरिरीं येरझारा । जसा उन तेलामधिं झारा ॥१६८।·४॥

वर म्हटल्याप्रमाणे काहीं लावण्या उत्तान शृंगारपर आहेत तर १६३ मारख्या काहीं विरक्तिपरही आहेत. उ.॥ विषयाचा नको नारि पृथ, जाहलों मत, सोडिलें पाणी । आता भजन हरहर सदाशिव शूलपाणी ॥.

पुढील पांच नायक नायिकांच्या लावण्यात प्रश्नोत्तरे असून त्यांची खुमारी वक्रोक्तीनें वाढली आहे. यातील शृंगार बराच उत्तान झाला आहे. तरी कवि म्हणतो त्याप्रमाणे ह्याही ॥ लावण्या नाहित कम असला । विष्णु कवि बोले घ्या मामला ॥ १६६–११ ॥.

मागे सांगितल्याप्रमाणें शेवटल्या ११ व्या पुरवणी भागात पदें, स्तोत्रें, आख्यानें, अष्टकें, आरत्या आल्या आहेत. शाब्दिक ज्ञानाचें पुढील वर्णन किती रोखठोक आहे पहा:—

शाब्दीक ज्ञान प्रकटे जरि गाढ वाचें ।
ओझेंचि व्यर्थ गमतें तरि गाढवाचें ॥
अभ्यासि लागल जेव्हा क्रमशः कळाया ।
तेव्हांचि येइल त्रिविक्रम आकळया ॥

येथवर कवीच्या चरित्राची व त्याच्या काव्याची ओळख करून दिली. आतां त्याच्या काव्याच्या अंतर्बाह्य स्वरूपाचें सामग्र्यानें समालोचन करून त्याचें स्थान निश्चित करावयाचें आहे. हें काव्य जरी बहुतांशी पारमार्थिक व भक्तिरसपर असलें, तरी त्या प्रकारांतही कवीनें विपुल विषयवैचित्र्य प्रगट केलें आहे. त्याचप्रमाणें कवितेच्या बाह्य स्वरूपांतही पुष्कळ विविधता आढळते. कारण त्यानें जसा अक्षरगण वृत्तांचा तसाच मात्रागण वृत्तांचा, प्राकृत वृत्तांचा व गेय पद्यांचा उपयोग केला आहे. अष्टकांत त्यानें शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, मालिनी, वसंततिलका, भुजंगप्रयात, व चामर या अक्षरगण वृत्तांचा अवलंब केला आहे. पण हा प्रयोग त्यास फारसा

मानवलेला दिसत नाहीं. कारण यतिभंग, लघुगुरु वगैरेसंबंधीं घडलेले दोष जागोजाग आढळतात. उ.जी अटोपली प्रत्यक्ष नाहिं राजि वासना ॥१०८–७॥ ( चामर ) केलें तुझें भजन कीं निष्काम नाहीं । आता अमो दुरपरी दुष्काम नाहीं । ११२–३। वसतति. अनुष्ठान सध्या मालिका त्रिपदेचीं। षडन्यास मुद्रा योगसूत्रें पदेचीं । ११५–४ ( भुजगप्रयात ) । दुहेरी विष्णूनें चढल प्रितिचा रगहि तरी ॥१०४-१०॥ (शिखरणी). या ठिकाणचे गणदोष अगदीं ठळकपणें दिसून येण्यासारखे आहेत. ऱ्हस्वदीर्घाची ओढा ताण विचारूच नये. ती वाटेल तेथें दिसेल; दुग; विष्णूदाम; शुकादी ईकडे; अज्ञेनें; मित्र; नीलाजरी; दिन ( गरीब ); दीवस; इ. इ. एकदरीनें अक्षरगण वृत्तात तो सराईत तर नाहींच पण अगदीं अडखळत चालणाऱ्या नवशिक्यासारखा दिसतो. मात्रागणवृत्तांत फक्त थोडेशा आर्या त्यानें केल्या आहेत. अभग ओंवी, दिंडी, व घनाक्षारी असे प्राकृत छदही त्यानें योजिले आहेत. दिंडींतही कोठें कोठें मात्रा कमी जास्ती झाल्या असून, यतिभगही झाले आहेत. ( उ. अष्टक १३२. पद्दा.) पाळणे, भूपाळ्या, आरत्या, धृपदें, व निरनिराळ्या चालींची पद्ये बरीं झालीं आहेत. सामान्यत: कवितेच्या ह्या अंगाकडे कवीनें विशेष लक्ष पुरविलें नाहीं असें दिसतें. गुण अभिमानी, रक्तमासअस्थि, आदिमध्यअवसानीं, दिनदयाळ, ससाराऽ चवलीस; नाना ऽऽ कृती; सदाऽभग; अशीं व्याकरणदुष्ट रूपेही आढळतात. अट्टा केला; मदाळ बोरें; करताल, धरताल अशा प्रांतविशिष्ट वाक्प्रचाराचा व भविष्यकाळरूपांचाही त्याने क्वचित् उपयोग केला आहे. तरी पण त्याच्या काव्यात सुंदर व अर्थबोधक म्हणी व सुभाषितें हीं जागोजाग विखुरलेलीं आढळतात. उ. ओटींत घणें; पदर पसरणें, राईचा पर्वत व पर्वताची राई करणें; तुला नजर होईल; आस धरणें, डोळे भरून पाहाणें; शाई लावणें; तोंडास काजळ लावणें; ससारास अंतरणें, सोमलाचा अनुभव पाहूं नये; अदृष्टिं लिहिणें; गळां पडली दृढ संचिताची दोरी, आडवाटे नेणें; चलित दिवसांची काकी मामी । परि निवार्णी नये कोणी कामी।; टळेना गोष्ट होणारी । सुख दु:खाचें चक्र सदोदित फिरतें संसारीं ॥ ; केसानें मान कापणें, हातपाय घासाला लावणें; कंकणास न लगे आरसा, फुटकी घागर भरत नाहीं, मांडीवर ठेविलेली मान कापणें व मधून मधून लावण्यरत्न-

माणिके; श्रीसकलगुणालंकारणे; सकलांतरव्यापिनी, अजरामरवरदायके, असे लांबलांब संस्कृत समासही आढळतात. कवीस हिंदी भाषाही अवगत होती असें दिसतें. त्यानें कांहीं पूर्ण हिंदी पदें व कांहीं एक ओळ हिंदी एक मराठी अशीं मिश्र पदें केली आहेत. फकीर, बेफिकीर, यार्की; कायदा; पुकारा, अर्जी असे त्या भाषेतील शब्दही त्यानें योजले आहेत. एकदरींत त्याचें वाचन व अवलोकन जरी बरेंच झालें असावें असें दिसते, तरी त्याच्या ठिकाणीं शास्त्राध्ययनानें येणारी परिपूर्तता दिसून येत नाहीं. पण साध्या सुबोध व अकृत्रिम भाषेमुळे त्याच्या काव्यास अव्याज मनोहरत्व आलें आहे. तसेंच प्रेमळपणा व प्राजळता या दोन विशिष्ट गुणांमुळें तर त्याचें काव्य सर्वत्र अत्यंत मधुर व मोहक झालें आहे. पोवाडे व लावण्यांनीं त्याचा एकांगीपणा घालवून त्यास रुचिवैचित्र्य आणिलें आहे. तेव्हां या कवीस मत- लौकिक कवींत बरेंच वरचें स्थान देण्यास कोणी अनमान करील असें वाटत नाहीं. सामल्याकरितां पुढें कांहीं उतारे दिले आहेत, त्यांवरून रसिकांस कवीची योग्यता ठरवितां येईलच; पण दुसऱ्यांत कवीचें स्वतःचेंही मत दिसेल.

## ( १५१ ) नायकाची लावणी.

निरभ्र शुभ्र नक्षत्रतुल्य ही ललना कोणाची ।
चपळ दृष्टि सुविलोललोचनीं उपमा हरिणीची ॥ ध्रु० ॥
पद्मवदन पद्मिनी गौरतनु केतकि वर्णाची ।
ब्रह्मदेवें निर्मिली वाटे शशिच्या किरणाची ॥
पर्वकाळ, शिवरात्र, शिवार्चन, वेळ पुराणाची ।
पुष्पहार गुंफीन, हतामधिं झारि सुवर्णाची ।
लावण्याकृति पाहुन उडाली भ्रांती प्राणाची ।
कधीं पडेल ती पडो मस्तकीं रणधुळ चरणांची ॥ १ ॥
गजराज मस्तिमधि मस्त, धुंद तशि विषयामधिं डोले ।
शुंडाकृति भुजदंड सरळ, कुच पहात सदा चाले ।
संपूर्णालंकृत, गुण सुलक्षण, भाषण मृदु बोले ।
भ्रमर चुंबितां नलिनी तशी मृगराजकटी हाले ।
शृंगार गोफ पूतळ्या, गळ्यामधिं दाटि भूषणांची ।
शालजोडि जरतारि दुहेरी, साडी पैठणीची ॥ २ ॥

( कवीचें स्वकाव्याविषयींचें मत. )

आरस नाहीं सरस आहे खिरस गाईचा। मिळेना बहु महागाईचा।
घ्यावा मासला मधून केवळ साखर साईचा। आहे बहु तुमच्या सोईचा।
सुगंध पुष्पासहित पसरला वेल जाईचा। पोवाडा राधाबाईचा।
विष्णु कवीची घाट वाजली,सुटली रेलगाडी। आतां काय खेळण्याची गोडी॥

[ पोवाडा १३७।३२ कडवें ]

पोवाडा ( राजाराम मडके ह्याचा ).

नका खाउ हें जहर दादा पैसा सरकारी। नाडले पाटिल पटवारी॥ध्रु०
या पैशानें केलि खराबी हुशार लोकाची। उडाली फजिती कैकाची॥
पैशासाठीं का गमवीता अब्रू लाखाची। पुडी का खाता विखाची॥
पोटासाठीं पसरुनि ओटी भीक मागावी। परंतु कैद न भोगावी।
भुलुनि जाल चुकुनि खाल ग्याल ओकारी॥ नाडले पाटिल पटवारी॥ १॥

अष्टक अंबाबाई.

जन्मा येउनि व्यर्थ मानव कुळीं एरंडसा वाढलों।
झालों मी धड ईकडे न तिकडे आधेमधें नाडलों।
नाहींची परमार्थ स्वार्थ लवही स्वप्नांतरीं लाभला।
अंबाबाई आता नको पुनरपी संसारिं घालूं मला॥ १॥

८० कटाव.

नेसुन जरिचा घट्ट पितांबर, भडक दुशाला लाल तुंबर, किंमत रुपये सुर्ती शंभर, भरज्वानीची चढती उम्मर, रुंदावलि बहु सुखात कंबर;......... नित्य पक्तिचा बेत बरोबर, घोटिव रंध्याच्या पाटावर, पाणी पिण्याला सुंदर झारी,...अडणीवर ताटें सोनेरी,......अंबेमोहर उत्तीचे आगळे, तादुळ शिजले शुभ्र मोकळे, मधें दाट तें वरण पिंवळे, ताजें लोणकढें तूप रवाळ, वाट्या भरून वरति उफाळे,.........परोपरीच्या भाजा चटण्या, जिरे हिंगाच्या कडक फोडण्या,......मेथी कोथिंबिर चमकोरा, गवार भेंडी चवळी अवरा,चुका चाखवत माठ पोकळा,मुळे दोडके दूध भोपळा,...परोपरीची मिष्ट लोणचीं, आंबट अंब्याची लिंबाचीं,...लवण शर्करेपरी पाढरें, सार आमटी कढि शांबारे,...मोतीचूर दळ बेसन बुंदी अटिव दुधाची खिर

बासुंदी, श्रीखंडाची फार सुगंधी,......पोकळ नळिची गोड जिलबी,...... साखरपाकाची गोडंबी, खाज्या करंज्या गोड साटोऱ्या, अपमानानें फुगल्या पुऱ्या.......साजुक आला भात मागला, घुसळुन साइसकट चांगला, घट्ट दह्याचा मठ्ठा काढिला,...या परि थाटाचें भोजन, परोपरीचे मित्र आप्तजन, पांथस्थाचें काय प्रयोजन, धर्म पळाला शत दुर योजन, घरांत जमले बहुत पाहुणे, मारे मामे भाचे मेहुणे,......लाजिरवाणें ऐसें जीणें, हरि भक्तीविण सर्वही उणें, सतत या सपत कोणाची, लंका जळली सुवर्णाची, कुदशा उडाली रावणाची, वास्तव धरी प्रीत हरिचरणाची, विष्णुदास म्हणे भगवंता, भज सोडोनिया सर्व अहता ॥

## श्री विष्णुदासाची कविता खंड २ रा.

मागल्या खंडाप्रमाणें हाही खंड श्री.नरहर सदाशीव जोशी ऊर्फ खर्शीकर शास्त्री यानींच संपादिला असून, शारदाश्रम यवतमाळ या संस्थेतर्फेंच प्रकाशित झाला आहे. ह्या पुस्तकास य. खु. देशपांडे बी. ए. एल. एल. बी. ह्यानीं प्रस्तावना लिहिली असून ह. प. ल. ग. पागारकर ह्यानीं पुरस्कार लिहिला आहे, आणि रा. व्यंकटराव दातार यानी त्यांत ‘ पुरुषोत्तम महाप्रसाद’ हा लेख लिहिला आहे. हा भाग पहिल्या भागाचीच पुरवणी असल्यामुळे यात पहिल्या भागाप्रमाणेच कवीची उपास्य देवता रेणुका हिजवर भक्ति, करुण वत्सल इत्यादि रसांनीं भरलेल्या कविता आल्या आहेत. त्याचप्रमाणे देवी, शंकर, राम, कृष्ण, दत्त व संत यांजवर पदें, आरत्या, अष्टके, दिंड्या, साक्या, श्लोक, जन्म व पाळणे वगैरे पद्याचा त्यांत समावेश केलेला आहे. उपदेशपर ही काहीं कविता त्यात आढळतात.

रेणुका मातेजवळ लडिवाळपणानें कोटिक्रम करून तिला निरुत्तर करून टाकण्याची व आपल्या उद्धाराचा सर्व भार तुजवरच आहे हा सिद्धांत स्थापित करण्याची कवीची अनुपम हातोटी मागल्याप्रमाणेच येथें ही प्रत्ययास येते. मागें अशीं उदाहरणें पुष्कळ आलीं आहेतच. येथील एक पहा:–अहंकार आम्ही परिहरिल्या मग त्वां दुर्गे भेटावें ॥ पश्चिमिनें रजनीतम गिळिल्या मग रविनें प्रगटावें ॥

काहीं ठिकाणीं भोंवतालच्या परिस्थितीबद्दलचे विचारही कवीनें मोठ्या मार्मिकतेनें प्रगट केलेले आढळतात. कलियुगासंबंधीं तो म्हणतो:–राज्य

कठिण हें आलें कलिचें वर्तमान भलें नव्हे ॥ परम वृत्ति धन हरण कराया निघती कायदे नवे नवे ॥ घरोघरीं अंधार परंतु रस्तोरस्तीं दिवे दिवे ॥इ.॥

एकंदरींत कवीची भूमिका ज्ञानपूर्वक भक्तीची असल्यामुळें ज्ञानयुक्त भक्तीचेंच प्रतिपादन प्रामुख्यानें ह्या कवितांत दिसून येतें. यांतील विविध पद्यांवर तुकारामाचे अभंग, वामनी श्लोक, अमृतरायाचे कटाव व मोरोपंती आर्या यांचा चांगला ठसा पडलेला दिसतो.एकंदरींत सर्व वातावरण भक्तिमय झालेले आढळते.

---

**टीप**:—पहिल्या भागाची चर्चा सविस्तर झाली असल्यामुळें व त्याचीच ही पुरवणी असल्यामुळें ह्या भागाची चर्चा स्वतंत्रपणें करण्याचें व उतारे देण्याचें प्रयोजन नाहीं. तो जाने. १९३८ मध्यें प्रसिद्ध झाला असल्यामुळें केवळ त्याचा नामनिर्देश येथें केला आहे.

# प्रकरण ५ वें.

## बळवंत रावजी पाटील. (स. १८५६ फेब्रुवारी)

गुणवतः क्लिश्यते प्रायेण भवन्ति निर्गुणाः सुखिनः ॥

हे शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण. यांचे मूळगाव संगमनेर. तेथें त्यांचे घराण्यात पाटीलकीचें वतन वंशपरंपरेनें चालू होतें. पुण्याच्या मांडेतीन शहाण्यापैकीं जे प्रसिद्ध विठ्ठल सुंदर, ह्यांच्या घराण्याशीं त्यांचा आप्तसंबंध होता. विठ्ठलसुंदर यांजकडे देशपांडेपणाचें वतन होतें. पुढें हीं दोन्ही घराणीं पेशवाईत पुण्यास गेलीं. तेथें नाना फडणविसाशीं विठ्ठल सुंदर यांचें न जमल्यामुळें ते इकडे निजाम साहेबांकडे आले. व त्यांनीं त्यांची मर्जी संपादून उत्तम नावलौकिक संपादिला. विठ्ठल सुंदराच्यापासून नवव्या पिढींतील बळवंतरावजी पाटील होत. यांचा वडिलोपार्जित धंदा गंध्याचा होता व त्याबरोबर यांचे वडील सावकारीही करीत असत. ह्यांचे वय आज ८१ वर्षांचे आहे.

हे वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध सद्‌गृहस्थ शालीबंडा ( हैद्राबाद ) येथें रहात असून ह्यांची प्रकृति इतकी खडखडीत आहे कीं ते आपल्या उद्यमशीलतेनें कोणाही तरुणास लाजवितील. त्यांनीं आपली जीवनकथा प्रस्तुत लेखकास स्वत: सांगितली व तिच्यांतील मुख्य मुख्य गोष्टींचें सनावलीसह एक भलें मोठें टिपणही करून पाठविलें. यावरुन ह्यांचे जीवनवृत्त इतकें वैचित्र्यपूर्ण, अद्‌भुतरम्य व रोमहर्षण दिसत आहे कीं तें एखाद्या उत्कृष्ट कादंबरीचा विषय होऊं शकेल. अशी चरित्रात्मक कादंबरी पुढें कोणी लिहिणारा निघेल तेव्हां निघो! तूर्त येथें त्यांच्या केवळ वाङ्मयीन जीवनाशीं संबद्ध असलेल्या गोष्टींचाच उल्लेख करून समाधान मानलें पाहिजे.

ह्यांचा जन्म शके १७७७ माघ वद्य ८ मीस पुणें येथें झाला. त्यांचें प्राथमिक शिक्षण बुधवारवाड्यांतील तात्यापंतोजीच्या शाळेंत झालें. आपल्या लग्नासंबंधीं ते म्हणतात, " माझें लग्न मजहून एक वर्षानें वडील व शरीरानें मजहून दांडग्या अशा धिप्पाड मुलीशीं, तिला न बघता केवळ

हुंडयाच्या आशेनें, खोट्या पत्रिकेवर नवव्या वर्षी केलें गेलें. ह्या लग्नाचा प्रताप मला अझून भोंवतों आहे." सन १८६७ जूनमध्यें बा. गं. टिळकाबरोबर हे हायस्कुलात प्रविष्ट झाले व पुढें ल्याटीन भाषा घेऊन स. १८७६ मध्यें म्याट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. सन १८८७ पर्यंतच्या आकरा वर्षांत त्यानीं अनेक वेळां मास्तरची नोकरी खाजगी वर्ग व व्यापार-धंदा वगैरे उद्योग केले व पी. ई. ( Previous ) ची परीक्षा देऊन ते डेक्कन कॉलेजात पुढील अभ्यासासाठीं गेले. ह्या काळात "Experiences of a barrister" ह्या पुस्तकांतील "Accommodation Bill" ह्या गोष्टीचें 'न्यायदंडन' ह्या नावानें भाषांतर करून त्यानीं प्रसिद्ध केलें. स. १८८२ स 'मालिका' हें मासिक सुरू केलें. परंतु एक वर्षांतच तें बंद पडलें. ह्यात जगातील चमत्कारिक नैसर्गिक स्थळाचीं वर्णनें, वक्तृत्व, ऐतिहासिक कादबऱ्या, नाटकें, संस्थानाचे इतिहास, शास्त्रीय माहिती इत्यादि विषय येत असत. नंतर त्यांनीं 'ऐतिहासिक नाटक कथावली' सुरू केली. पण तीही तीन वर्षांनीं बंद पडली. रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांच्या सांगण्यावरून "जगद्धितेच्छु" वर्तमानपत्र सुरू करून त्याचें संपादकत्व ४ वर्षेंपर्यंत त्यानीं केलें. मध्यंतरीं हरि कृष्ण दामले वगैरे प्रकाशकास शालोपयोगी पुस्तकें लिहून देण्याचें व 'Times of India'च्या बातमीदाराचें ही काम त्यानीं केलें. कालेजांत पुनः शिक्षणास सुरवात करून फर्स्ट बी. ए. व सेकंड बी. ए. अशा दोन्ही परीक्षांस बसण्याची त्यानीं तयारी केली, तों इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनीं पुढील उपदेश त्यास केला "तूं किती वेडा आहेस! अरे! आम्हीं आपल्या नावापुढें 'बी. ए.' लिहिणें सोडून दिलें. तुझी योग्यता आम्हीं ओळखीतच आहोत. पुनः तुला नोकरीही धरावयाची नाहीं. मग परीक्षेची खटपट कशाला? दे सोडून." त्याबरोबर त्यानीं तो नाद सोडून दिला. सन १८८७ ते ९७ च्या दशकांत Camp Education Society, Bhave Native Institution मध्यें मास्तरकी, केसरी मराठा पत्राचें मुद्रण नीरीक्षण, अप्पाजी विनायक जोशी याजबरोबर लाखाचे खाक होइतों व्यापार, पाटस येथें शेतकी, वा. शि. आपटे यांच्या संस्कृत कोशाचीं मुद्रितें तपासण्याचें काम "Studies in Indian Music" या तीन अंकाचे प्रकाशन, पुनः जगद्धितेच्छूचें संपादन वगैरे

अनेक कामें करून १८९८ फेब्रुवारींत हैद्राबादेस येऊन २० रुपये हालीवर ( हैद्राबादी नाणें ) वैदिक धर्मप्रकाशिका शाळेचे ते हेडमास्तर झाले. तेथें तीन वर्षे अटोकाट मेहनत करून त्यानीं ती शाळा नावारूपास आणली. सरकारी ग्रँट सुरू झाली. पण इतक्यांत हणमंतराव अत्रे ह्यानीं ४० रुपयावर आपल्या एका बी. ए. ची नेमणूक केली तेव्हा त्यास हा अन्याय सहन न होऊन त्यांनीं नवाब जाफरजंग बहादर ह्याजकडे नोकरी धरली. ( स. १९०० ). ह्या नोकरींतही धरसोड केलीच. तरी पण नवाबसाहेबाकडून १०० रु. दरमहा त्यास आज २७ वर्षे चालू आहे.

सन १८९६ मध्यें त्यानीं अमेरिकेंतून एक " प्रिंटिंग प्रेस " आणिवला व त्यात ' अखबार ' नावाचें वर्तमानपत्र छापून हैद्राबाद येथें सुरू केलें. पण नेहमींप्रमाणें अश्रयाभावीं तें बंद पडलें. मग वैदिक धर्म प्रकाशिकेच्या आश्रयाखालीं त्यानीं ' संजीवनी ' मासिक सुरू केलें. त्याचा पहिलाच अंक आषाढ शके १८२० मधला मिळाला आहे. त्यातील उपोद्घातात संस्थेची माहिती देऊन,पुराणांचें सोप्या व रसाळ भाषेंत भाषांतर करून मासिक स्वस्त किंमतीस विकत देण्याची योजना त्यांनीं जाहीर केली आहे. ह्या अंकांत गणेश पुराणातील सहा अध्यायाचें भाषांतर आलें असून त्यांत सौराष्ट्राधिपति गलतकुष्टी सोमकांत ह्यांची कथा व भृगुऋषीच्या आश्रमाचें वर्णन इतका भाग आला आहे. त्यापुढें वाल्मीकि रामायणाच्या बालकांडास सुरवात करून ऋष्यशृंगाचे प्रलोभनापर्यंत कथाभाग आला आहे. घोषणेप्रमाणें भाषा अगदीं साधी, सोपी, रसाळ व मोठी आकर्षक झाली आहे. पण हेंही मासिक कांहीं दिवसांनीं बंद पडलें.

संजीविनी बंद पडल्यावर पाटीलबोवांनीं वाल्मीकिरामायण, महाभारत, भागवत व गीता हे ग्रंथ मराठी पद्यात अगदीं सोप्या भाषेंत करण्याचा निश्चय करून तो पुरा केला. ह्यापैकीं पहिला हप्ता "गीतामाधुरी" ग्रंथाचा होय. हा ग्रंथ स. १९०६ मध्ये प्रसिद्ध झाला. प्रेमरामायण ग्रंथसंख्या २५०००, मधुरभागवत ग्रंथसंख्या एक लक्ष हे ग्रंथ लिहून तयार असलेले स्वतः लेखकांनें पाहिले आहेत. जगद्गुरु मठ विरूपाक्ष यानीं आपल्या नं. ६१३ च्या आज्ञापत्रांत म्हटलें आहे की ' श्रीमद्भगवद्गीता व श्री वा. रामायण हे दोन संगीत ग्रंथ प्राकृत भाषेंत केले आहेत ते फार चांगले

केले आहेत............हें आपण केलेलें काम पसंत आहे. करितां सर्व ग्रंथ छापून काढावेत, म्हणजे सर्वत्रास उपयोग होईल. याबद्दल तुम्हास सर्व सद्गृहस्थ मदत करतील. कळावे इ." पण जगद्गुरूंचा हा आशीर्वाद ही अद्यापि सफळ झाला नाहीं; व ते ग्रंथ आतां छापून निघण्याची मुळींच आशा दिसत नाहीं. असो.

'संजीविनी'च्या मुख पृष्ठावर, न्यायदंडन ( नाटक ) प्रातप मुकुट, (नाटक ), हेमचंद्र ( नाटक ), क्राफर्डसाहेबाचे प्र. मोगलाई; पुण्यग्राम रहस्य ( कादंबरी ), चंद्रगुप्त ( कादंबरी ), सेमिरामिस, जगदेव पवार, वक्तृत्व ( निबंध ), सरवाल्टर स्कॉटचें चरित्र इ. ग्रंथाचे कर्ते असें पाटील बोवानीं आपल्याबद्दल म्हटले आहे. बळवतरावजीनीं एवढें मोठें टिपण धाडलें पण त्यात स्वतःच्या ग्रंथाची यादी कशी दिली नाहीं, न कळे. त्यांनीं तोंडीं नाटकादि बरीच ग्रंथरचना प्रसिद्ध केल्याचें सांगितलें. परतु त्याच्याजवळ आज एकही ग्रथ राहिलेला नाहीं. त्याच्या सागण्यावरून शालीबडा ग्रथसंग्रहालयात चौकशी केली, परतु तेथेंही त्यांचा मागमूस लागला नाहीं. स्वतःच्या संग्रहीं असलेलीं दोन त्रुटित फाटकीं पुस्तकें बळवंतरावानीं पाठविलीं आहेत. त्यापैकीं वर उल्लेखिलेलें 'वक्तृत्व' हें एक आहे. व दुसरें आंतील मजकुरावरून, राजपुतान्याच्या इतिहासाचें असावें असें वाटतें. ह्याची माहिती यथास्थल गद्य विभागात येईल. तूर्त 'गीता माधुरी' एवढें एकच पद्य पुस्तक उपलब्ध झालें आहे. या ग्रंथाच्या प्रसिद्धीचे वेळीं पाटीलबोवांनीं साप्रतच्या जाहिरात युगातील एका अपूर्व योजनेचा अवलंब करून त्रेसष्ठ हजाराच्या रोखीच्या ३०० बक्षिसांची जंगी लूट लावली होती. परंतु हें आमिष पुरेसें आकर्षक न वाटल्यामुळेंच कीं काय "येत्या वर्षप्रतिपदेच्या आत ज्यांची वर्गणी येईल त्यांस सेमिरामिस अथवा आर्यावर्ताचें प्राचीन वैभव ही ऐतिहासिक कादंबरी किं. रु. १ ही बक्षीस देऊं" अशीही घोषणा त्यांनीं केली होती. पण ह्या सोडतींतही बळवंत रावजींचा नंबर निघाला नाहीं असें वाटतें !

## गीता माधुरी.

मराठी वाङ्मयास प्रारंभींच गीतेस देशीकार लेणें मिळालें. महानुभावांनीं निराळा पंथ काढला तरी त्यांनीं गीतेलाच श्रेष्ठ स्थान दिलें. गीते

वर त्यांच्या अनेक टीका आहेत. मराठवाड्यातील एकट्या दासोपंतानें 'मानवां सुदुस्तर तो ', असा सवा लाख 'गीतार्णव' निर्माण करूनही आणखी 'गीतार्थबोध' 'स्थूलगीता' व 'सार्थगीता' असे ग्रंथ लिहिले. ज्ञानदेवानें गीताही परमेश्वराची वाङ्मयी मूर्तिच आहे, असें जें म्हटलें आहे तें अगदीं अक्षरशः सार्थ वाटतें. ह्या मतींवर अनेक भाषांत अनेकांनीं आपापल्यापरी अनंत पुष्पें वाहिलीं आहेत, आजही वाहात आहेत व पुढेंही वाहात राहातील. तेव्हा बळवंतरावानीं एकदम दोन पुष्पें वाहिल्याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. शिवाय त्यांत त्यानीं आपलें अपूर्व वैशिष्ट दाखविलें असल्यामुळें त्यांची कृति समर्थनीय ही आहे. ह्या दोन टीकापैकीं एका टीकेंत निरनिराळ्या रागांत व तालांत सुमारें शेंमवाशें पदें केलेलीं आहेत. तर दुसऱ्या टीकेंत एकाच वृत्ताचा अवलंब केला असला तरी त्यावर हवा तो राग बसतो, दोनतीन ताल बसतात व अलीकडील शेंदीडशें संगीत चाली बसतात. म्हणूनच कवीनें 'संगीत टीका' असें यथार्थ नाव या ग्रंथास दिलें आहे, आणि संगीत हाच त्याचा विशेष होय. म्हणजे आजपर्यंत गीतेस केवळ शास्त्रीपंडित, वेदांती व मुमुक्षु या मंडळींतच महत्त्वाचे स्थान होतें, पण ह्या ग्रंथद्वारें पाटीलबोवानीं तिला गवय्ये, बजवय्ये याचे जलसे, गाण्याच्या मैफली, संगीत नाटकें, व गानलोलुप भक्ताची देवगृहें ह्यांचीं द्वारें खुलीं करून दिलीं. अर्थात् समाजाच्या सर्व थरापर्यंत गीतेचे लोण पोंचविण्याचें श्रेय कवीस देणें क्रमप्राप्त होतें. कवीनें ह्या वृत्ताचें जुनें नांव न सांगतां त्यास आपल्या आवडीचें 'मधुरवृत्त' असें नाव दिलें आहे. 'या वृत्तांत आजपर्यंत मराठींत काव्यरचना झाली नाहीं; व मला तें गुरुकृपेनेंच लाधलें' असेंही तो म्हणतो. तेव्हा या दृष्टीनेंही ग्रंथाची अपूर्वता सिद्ध होत आहे. हुजुरी वामनराव वैद्य मृदंगशास्त्री व लक्ष्मणराव हार्मोनियमसंगीतकोविद ह्यांच्या सारख्या तज्ज्ञानीं या संगीत टीकाच्या योगें भजनानंदास सुरस वळण लावल्याबद्दल कवीस धन्यवाद दिले आहेत.

पहिल्या टीकेंत बहुतेक श्लोकास श्लोक भाषांतरात आहे. तालरागाकडे यांत विशेष लक्ष दिलें असल्यामुळें अर्थाच्या सौंदर्याकडे किंवा अचूकपणा-

कडे कवीला बारकाईनें लक्ष पुरवितां येणें शक्य झालें नसेल हें साहजिकच आहे. आणि अशा गानप्रधान कृतींत ह्या गोष्टींची कोणी अपेक्षाही करणार नाहीं. गीतेंतील कांहीं दुर्बोध स्थळाचें स्पष्टीकरण शांकरभाष्यांत, भावार्थ दीपिकेंत, यथार्थदीपीकेंत अगर गीतारहस्यांत कसें केलें आहे हें वाचक जसें शोधकबुद्धीनें शोधावयास त्याजकडे जातो, तसा तो या संगीत टीकांकडे खचित वळणार नाहीं. श्लोकाचा साधारण भावार्थ समजून त्याचें रूपांतर रागतालांत कसें काय बसतें,हेंच तो पाहील. अशा वाचकास मात्र ह्या दोन्ही गोष्टींत आनंद व समाधान झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण 'धन्य ती गायनी कला' ज्यास अवगत नाहीं, अशाचें लक्ष पद्यगानाकडे गुंतणे शक्य नसल्यामुळें, त्यांतील उणीवा हुडकण्याकडे वळणें स्वाभाविक आहे. अशाना मात्र पुढील दोष दिसतील:—( १ ) भाषांतरात मूळातील कांहीं शब्द व पदें गाळलेलीं आढळतील. उ. अ.९-१ ज्ञानविज्ञान सहितम् व अनसूयवे हीं पदें गाळलीं आहेत. पहा:—'हें हितगुज सांगतमों जें जाणसि तरि अशुभातुनि सुटसी ॥ ध्रु० ॥ अ. ९–२० 'त्रैविद्या' पद गळलें आहे. अ. १२–८ अतऊर्ध्वं पद गळलें आहे. ( २ ) भाषांतर बरोबर झालेलें नाहीं असें कांहीं स्थळीं आढळेल. उ:—अ. ९-२ प्रत्यक्षा-वगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् = साक्षात् अवगम धर्म जाण हा अव्यय करि जे देत सुखासी ॥ अ. ९-२२ एवं त्रयीधर्म इ. = कामीं त्रयिधर्मे वागती ॥ गत आगतां लाभती । तसेच शब्द भाषांतरात राहिले आहेत. वाचकांस काय अर्थ कळला ? अ. १२. ५ अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भि-रवाप्यते = देहाची गत अव्यक्त तया दुःख ॥ ३ ॥ मुळातील अर्थ यात कोठें आहे ?

अ. १२-११ सर्व कर्मफल फलत्यागं ततः कुरु यतात्मवान् = मग यत वा कर्मफळाच्या त्यागातें ॥ ९ ॥ यतात्मवान् ह्याचा अर्थ नुसत्या "यत्" क्रियापदानें येत नाहीं. अ. १२.१२ त्यागात् शांतिः अनंतरम् = ध्यानाहुन त्यागच ( श्रेय ); शाती त्याहून ( श्रेय ). हा अर्थ येथें बरोबर नाहीं. अ. १२-१९ संतुष्टो येनकेनचित् = समनिंदास्तुति ज्या नित्य तृप्त मौनी ॥१७॥ येथील भाषांतरही बरोबर नाहीं. अ. १२. २०:–येतु धर्म्यामृतमिदं यथोक्तं इ. – जे धर्मी अमृत मम हे उपासती॥ इ. या ठिकाणीं पण मुळातील सर्व

अर्थ उतरला नाहीं. ( ३ ) अशुद्धताः—तूं शकी. मी सांगतसों; आरंभें ( न. लिं ) त्यागिलीं !; बहुश्रद्धें (?) यजती; आश्रा ( आश्रय ) धरीत. छिनलीं; भूअंतरीं; तपज्ञान. इ.

हीं उदाहरणें विशेष परिचित अशा ९।१२ अध्यायांमधून केवळ नमुन्यासाठीं म्हणून दिलीं आहेत. असे दोष जरी क्वचित आढळले तरी सुबोधता व गेयता ह्या गुणाच्या उत्कटतेंत ते लुप्तप्रायच होतील असें वाटतें.

गानप्रेमी वाचकास पुढील अवतरणें प्रिय होतील:—

( चाल:—काय मत्वा भूल पडलि ).

कुटिल दुःख आठवलें विषम समर्थि या ॥
स्वर्गकीर्ति जयीं बुडे पार्थ अनार्या ॥
क्लीवसें नका करू न योग्य हें तुला ॥
ऊठ त्यजी नीच काम न हो दूबळा ॥ १ ॥ गी. अ. २.२.३.

पद ( चाल:—आम्ही काशीचे ब्राह्मण ).

जे मानव श्रद्धावत सतत मानित हें मम मत ॥
ते कर्मातुन या मुक्त ॥ ध्रु० ॥ अर्जुना ॥
जे पडित मूढमती, मत न मानिती, असूया करिती ॥
ते नष्ट जाग या होती ॥अर्जुना॥ १॥ इ. गी. अ. ३.३१-३५॥

पद. श्लोक अ. ७, १४-१९ ( चाल—भैरवी. लागला मसि छंद )

पार्था जे केवळ मज भजती ॥ दुस्त्यज गुणमय माया त्यजती ॥ ध्रु० ॥
नर माये मूढ असुर बनले ॥ अधम न येती मज प्रत दुष्कृति ॥ १ ॥
आर्त जिज्ञासु अर्थार्थी ज्ञानी ॥ चहुपरि माते भजती सुकृती ॥ २ ॥
परि योगी एक भक्त ज्ञानी ॥ तो प्रिय मम त्याची मस प्रीती ॥ ३ ॥

पद. अ. १०. ३९-४२ ( चाल:–तिलक कामोद, ताल एका ).

सर्वभूतीं बीज जें बघ जाण मी तें अर्जुना ॥
देख भूतीं चरचर या काय आहे मज विना ॥ ध्रु० ॥
दिव्य मम गा विभूतींचा अंत पार्था नाहिं रे ॥
संक्षेपें कथियलें मी समज नच या विस्तरें ॥ १ ॥

प. अ. ११-१४ ( चाल—वसंती बघुन मेनकेला ).

मजवर अनुग्रहच केला। गुह्य परम अध्यात्म ऐकतां मोह लया गेला॥ध्रु.॥
भवलय भूतांचा कळला। तुझें सत्य माहात्म्य ऐकुनी आत्मा बहु तोषला॥
कथिलें तू अपणा जैसें। बघू वाछितों रूप ईश्वरी कृष्णा मी तैसें॥
बघणें सत्य जरी गणसी। तरीच योगेश्वरा या मला तूं दर्शन देसी॥ १॥

## मधुरवृत्त टीका.

दुसरी टीका ' मधुर ' ह्या नूतन नामांकित वृत्तात गुफली आहे. छद: शास्त्रांतील ह्याचें जुनें नाव लक्षणासह कवीनें सांगितलें असतें तर सामान्य वाचकास मोठी सोय झाली असती. तदभावीं त्याचें पृथक्करण करून लक्षण बांधण्याचा प्रयत्न आम्ही पुढें केला आहे तो कितपत यशस्वी झाला आहे हें तज्ज्ञानीं पाहून न्यून तें पुरतें करून घ्यावे, अशी त्यांस सविनय विनती आहे.

प्रा. डॉ. पटवर्धनांनीं आपल्या अभिनव 'छंदोरचना' ग्रथात वृत्तें, जाति व छंद असे वृत्तांचे तीन वर्ग कल्पिले आहेत. अक्षर गण लघु गुरु ह्याच्या तंत्रानें केलेलीं तीं वृत्तें; केवळ मात्रांनीं नियमित केलेल्या त्या जाति; व मात्रा व अक्षरसंख्या ह्या दोहोनीं बांधलेले ते छद होत. प्रस्तुत पद्ये पहिल्या किंवा शेवटच्या वर्गात बसत नसून जातींत येतात. जातींच्या अनेक प्रकारा-पैकीं तीं ' पादाकुलक ' ह्या प्रकारात मोडतात. पादाकुलकात १६ मात्रा असून पद्मावर्तनाचीं दोन आवर्तनें असतात. पद्म म्हणजे कमळ. त्यास आठ पाकळ्याा असतात, म्हणून आठ आठ मात्रांचा एक चरण अथवा गट होतो; व तदतीं यति येते. ह्यात अक्षर संख्येचा निर्बंध नाहीं. मात्र पादाकुलक छंदांत तो आठ अक्षराचा आहे. यतिभंग हा दोष गणला आहे खरा, परंतु आधुनिक कवितेंत त्याला फारसें महत्त्व दिलेलें नाहीं. तेव्हा ह्या टीकेंत अशीं स्थळे जरी जागोजाग आढळलीं तरी कवीस फारसा दोष देण्याचें कारण नाहीं, पण ' प्रथम ग्रासे मक्षिकापात: ' कसा झाला आहे तो पहा:—धर्म कुरुक्षे। त्रि मिळोनि झुंजत॥ मम सुत पाडव काय करीत। पाडव सैन्य ब। घोनी जुळलें॥ दुर्योधन गुरु। संनिध बोले॥ ३॥ चर-णांतीं ऱ्हस्व अक्षर येऊं नये असा सामान्य नियम आहे. तरी पण क्वचित्

पादांतीं ऱ्हस्वास गुरुत्व येतें ह्या अपवादानें ह्या दोषाचें समर्थन करितां येण्यासारखें आहे. पुन: हें वृत्त गेय असल्यामुळें गान कुशलाच्या गानांत अशा प्रकारचीं वैगुण्यें सहज लुप्त होण्यासारखीं आहेत.

मराठींत ह्या वृत्तातील ही पहिलीच रचना आहे हें कवीचें विधान सापवाद आहे. कारण मोरोपतानीं आपलें ' कल्याण रामायण ' या मात्रा-वृत्तांत रचलें आहे असें पतकाव्याच्या संपादकांनीं पादटीपेंत म्हटलें आहे. गंगादासानीं आपल्या संस्कृत ' छंदोमंजरींत ' ह्या वृत्तास ' पज्झटिका ' असें नाव दिलें असून त्याचें लक्षण वरील ' पादाकुलका ' प्रमाणेंच दिलें आहे. मात्र दुसऱ्या आवर्तनाचा आरंभ गुरु अक्षरानें व्हावा असें त्याचें म्हणणें आहे. पण हा नियम पंतानीं व प्रस्तुत कवीनेंही पाळल्याचें आढळत नाहीं. आणि प्रा. डॉ. पटवर्धनानींही हा निर्बंध गाळला असून 'पादाकुलक' असें त्याचें नामांतर केलें आहे. सारांश हें वृत्त पूर्वीपासून संस्कृत मराठींत चालू होतें व आजही तें चालू आहे.

गीतार्थासंबंधीं पहिल्या टीकेंत जें धोरण आढळतें तेंच दुसरींतही आढळतें. भाषांतरांत छंदानुरोधानें कोठें हें तर कोठें तें, मुळांतलें पद गाळलेलें दिसतें. तेव्हा अर्थदृष्ट्या ह्या टीकेची चर्चा करण्याचें कारण दिसत नाहीं. मात्र अर्थ सुबोध आणि सरळ करण्याचा केलेला प्रयत्न सर्वत्र चांगला साधलेला दिसतो. पहिल्या टीकेनें ग्रंथाचीं ६८ पानें व्यापिलीं आहेत तर दुसरीनें ३८ पानांतच आपली वामन मूर्ति समाविली आहे. पहिल्या पद्-काचे २८० गीता श्लोक मधुरवृत्ताच्या १४३ पद्यांत म्हणजे अर्ध्या संख्येंत निरूपिले आहेत. तेव्हा संक्षेपाच्या दृष्टीनें वाचकास हा एक लाभच झाला आहे.

एकंदरींत ह्या दोन अभिनव संगीत टीकासंबंधीं ज्ञानदेवाच्या शब्दांत असें म्हणावेंसें वाटतें कीं:—" तैसा गाणिवेते मिरवी। गीतेवीण ही रंगु दावीं। तो लाभाचा प्रबंधु वोवीं। केला मियां ॥ १८–१७४१ ॥

मासल्याकरितां कांहीं अवतरणें खालीं दिलीं आहेत:—

काम क्रोध या मूळ रजोगुण। पापी घातुक वैरी जाण॥ धूमें वन्हि आदर्श मलानें। गर्भ मळें तैं हा वृत तेणें ॥ १९ ॥ अ. ३ रा। इह न पर विनाश न कीं त्याप्रत। न कल्याणकृत् जाईल दुर्गंत ॥ ६-२० पुण्य जनीं

शाश्वत सम वसुन । शुचि श्रीमंत गेहिं घे जनन । अथवा धीमत् योगि कुळांत । दुर्लभ जन्म असा लोकांत ।। ६.२१। शाश्वत् शाति धर्मात्म्या नित । पार्थ जाण मम भक्त न नष्टत । पाप योनि स्त्री वैश्य शूद्र जर । मज आसरितां पावत गतपर ।। ९-१६ । का न भक्त राजर्षी ब्राह्मग । अनित्य लोकीं भज मम अर्जुन ।। मन्मन भक्ता यज करि नमन । योगी हो येसि मत्परायण ।। ९-१७

---

# प्रकरण ६ वें

## दातारपितापुत्र व गुरु ब्रह्मानंद

### माधवराव ज्योतिपत दातार. [ स. १८५६-१९१४ ]

हे मूळेच हैद्राबाद येथील राहाणारे ह्यांनीं आबासाहेब रामदासी ह्या गृहस्थांजवळ संस्कृत, पारसी व गणित ह्या विषयांचा उत्तम अभ्यास केला होता. ह्यानीं निझाम सरकारची ४० वर्षं नोकरी करून पेन्शनही बहुत वर्षे घेतले. अंतकालाच्या आधीं ह्यांनीं काहीं दिवस सन्यास घेतला होता. ह्यानीं वैशाख शु. ॥८ मी. शके १८५६ मध्यें देह ठेवला. पेन्शन घेतल्यावर त्यांनीं आपला काळ भजनपूजनादि पारमार्थिक कृत्यात घालविला. परमार्थ विषय-पर निरनिराळे छोटे ग्रथ करून ते लोकास फुकट वाटीत असत. ह्यानीं पुढील ग्रंथ केले आहेत:—

( १ )विष्णुसहस्रनाम टीका ( सन १९१५ ):-ही टीका पद्यात्मक असून एक एक नामावर एक एक अभंग रचलेला आहे. ह्यास ॥ श्री विष्णोर्नाम गीता ॥ असें ग्रंथकारानें नांव दिलें आहे. प्रस्तावनेंत ग्रथकार म्हणतो ' श्री माधवकृपेनें या मूकाकडून श्री विष्णुनाम गीता बोलविली. त्यांत अबद्धवाणी पडली असेलच तथापि सज्जनानीं त्या दोषाकडे न पाहातां हंसाप्रमाणें नामामृत सारच गृहण करावें." याची यथार्थ कल्पना खालील उताऱ्यावरून येईल:—

मूळः—॥ ३ ॥ योगं त माधवं वंदे ॥

भाषांतर:-प्र ० ३ योग माधवा रमापति । पुरुषोत्तम द्या मोक्षगति ॥

मूळः—१८ योगोऽस्त्येकत्वभावो हि क्षेत्रज्ञ परमात्मनोः ॥

भाषांतर:-१८ ॥ योगः सदा चित्तरोध । जेणें जीव होय शुद्ध ।

मूळः—१९ त्वंहि योगविदांनेता योगक्षेमंसतां वहन् ॥

भाषांतर:-१९ ॥ योगविदांनेता हरि । संतयोगक्षेम करी ॥

---

टीपा—१८ इंद्रियाणि निरुध्य मनसासह क्षेत्रज्ञपरमात्मनोः एकत्वभावनायोगः

२० प्रधानं प्रकृति मीया पुरुषो जीवः तयोरीश्वरः प्रधानपुरुषेश्वरः

मळ—२० त्वं मायाजीवयोरीशः प्रधानपुरुषेश्वरः ॥

भाषांतरः– ॥ २० प्रधानपुरुषेश्वर । मायाजीवाचा ईश्वर ॥

मूळः—२१ नरसिंहवपुः शूरो वपुषानरसिंहयोः ॥

भाषांतरः–२१ ॥ नरसिंहवपुः सुधी । भक्तपाल दुष्टा वधी ॥

अशा शास्त्रीय थाटात ही सहस्र नामावली पुरी झाली आहे. ती परमार्थपर भक्तास प्रिय होईल.

(२) श्रीश्रुतिगीत साभंगः–(अंबिकाप्रेस महाराजगंज हैदराबाद इ.स. १९२६)

मूकबोल जरि अशुद्ध निर्गुण ब्रह्मीं जयात गुणगान ॥
साभंगाश्रुतिगीता, गाऊनि साधू करो समाधान ॥ ३ ॥
माधव कृपाच वदवी ही श्रुतिगीता अभग मूकमुखें ॥
श्रवणें पठणें ज्याच्या संसारी ही अखंड राहि सुखे ॥ २ ॥

ह्या प्रस्तावनारूप दोन आर्यांत ग्रंथकाराचें हृद्गत स्पष्ट दिसत असल्यामुळें त्या वर उध्दृत केल्या आहेत. हे श्रुतिगीत भागवताच्या दशमस्कंधातील ८७ व्या अध्यायातले आहे. परीक्षिताच्या प्रश्नावरून शुकाचार्यांनीं सनकसनंदनसंवादकथा सांगितली. तींत प्रत्येक श्रुतीनें एक एक पद्य, अशा २८ पद्यांत, सगुण निर्गुण ईश्वराचें वर्णन केलेलें आहे. ह्या ग्रंथात प्रथम मंगलाचरण, राजाचा प्रश्न, शुकाचें उत्तर व श्रुतिगीतसंगति मूळ व भाषांतर यासह सांगून नंतर २८ श्रुतींचे मूळ दिले आहे. त्यापुढें श्रुतिगीत भूपाळी दिल्यावर, एक एक श्रुति घेऊन तिचा अन्वय, अर्थ, तत्संबंधीं इतर श्रुति त्यांचा अर्थ, भजन, अभंग व आर्या या अनुक्रमानें २८ श्रुतींचें विवरण करून केशवाच्या आरतीनें हें ८३ पानाचें पुस्तक संपविलें आहे. ह्या पुस्तकाची योग्य कल्पना पुढील उताऱ्यावरून येईल.

॥ पंचविंशति वृंदीय श्रुतयः ॥ २५ ॥ ( पानें ७४,७५,७६ )

श्रुतिः–( १ ) द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ॥
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्योऽभिचाकशीति ॥

**अर्थ–दोन सुंदर पक्ष असणारे सहोदर पक्षी, मित्रभावानें एकाच वृक्षावर आश्रय करून राहिले आहेत. त्यांपैकीं एकजण गोड गोड अशा फळाचा उपभोग घेतों आणि दुसरा उपभोग न घेतां साक्षीरूपानें असतो.**

श्रुतिः २—समानेवृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमानः । जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः ॥

या पूर्वोक्त वृक्षावर निमग्न झालेला मुग्ध जीव आपण अनाथ आहों असें म्हणून शोक करीत राहातो. पण आत्मज्ञान करून घेऊन जेव्हां अन्य पक्षाचें ( आत्मारामाचें ) दर्शन घेतो तेव्हा शोकरहित होतो.

श्रुति ३ रीः—अजामेकां लोहितशुक्लकृष्णां बव्हीं प्रजा जनयन्तीं सरूपां । अजोह्येको जुषमाणोऽनुशेते जहात्येना भुक्तभोगामजोन्यः ॥

सत्वरजतमोगुणानीं युक्त अशी व पुष्कळशी सरूप प्रजा प्रसवणारी अशा मायेशीं रममाण होणारा जीवात्मा तिच्याशीं क्रीडा करीत राहातो. परंतु दुसरा परमात्मा ( अज ) भुक्तभोग अशा मायेस झुगारून देतो.

॥ श्रुतिगत भजन २६ ॥

स यदजया गुण जीव भोगितो कुत्सित तनु भवजाळीं
तूच एकटा माया त्यजसी सर्प जसी कांचोळी ॥

॥ श्रुतिगत अभग. २५ ॥

स यदजया गुणभोगी जीव होय जो अभागी ॥ १ ॥ अविद्येस आलिंगन, जीवा करीत मोहन ॥ २ ॥ अस्वातंत्रें जीवा खेद शिवा स्वानंदें आनंद ॥ ३ ॥ जीवकर्म फळा भोगी, शिव असंगे विरागी ॥ ४ ॥ त्यागिसी तू मायाजाळी, जैशी नागीण कांचोळी ॥ ५ ॥ माधव कृपे मूक भाषा होवो सत जनीं तोषा ॥ ६ ॥

॥ श्रुतिगीत आर्या ॥ २५ ॥

माया विना विरजे, सच्चित् जैसा अहि त्वचा हीन ॥
पडती माया मोहे मृत्युमुखीं जीव ते सदा दीन ॥

ह्यावरून ग्रंथ कर्त्यांचा श्रुतींचा सार्थ व सखोल अभ्यास त्याचप्रमाणें मराठी भाषेवरील व अभंगार्यादि छंदावरील त्यांचे प्रभुत्त्व सहज व्यक्त होत आहे. अज्ञास सुज्ञ करून त्यांस ईश्वरप्राप्तीचा मार्ग सुकर करून देण्याचें अखंड व्रत त्यांनीं चालू ठेविलें होतें. सरकारी सेवेतून निवृत्त झाल्यावर ही जनसेवा त्यांनीं अत्यंत कळकळीनें व स्वतःच्या खर्चानें चालू ठेविली होती. ज्यास ईश्वरप्राप्तीची चाड आहे अशाच्या तोंडून त्यास ह्याबद्दल धन्यवाद निघाल्याशिवाय राहाणार नाहींत.

( ३ ) श्रीबालकृष्ण लीला:—ह्या ग्रंथकाराचे तिन्ही ग्रंथ हैद्राबाद येथेंच छापून प्रसिद्ध झाले आहेत, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. नाशीकचे पं. हरिबाबा यांनीं श्रीमद्भागवतातर्गत दशमपूर्वार्धांतील कांहीं श्लोकांवर स्वतः शंका घेऊन त्यांवर विनोदगर्भ उत्तरें दिलीं आहेत. ह्यांत कोटयांबरोबर उत्तम काव्यही दृष्टीस पडतें. पण हें वाङ्मय संस्कृतात असल्यामुळें त्याचा मराठी वाचकांस आस्वाद मिळावा म्हणून त्याचा अनुवाद प्रस्तुत ग्रथकारानें पद्यात केला आहे. कवि म्हणतो " वार्धक्यावस्थेंत, इद्रियांचे व्यापार शिथिल झाले असताही हें काम ईश्वरकृपेनें पूर्ण झाले ह्याबद्दल त्याचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. आमचीं पुस्तकें विनामूल्य वाटण्यांत येतात त्याप्रमाणेंच हेंही वांटण्यात येत आहे. लोकांनीं तें वाचून स्वतःचें मनरंजन करून घेतलें तर कर्त्याला श्रमाचें सार्थक झाल्यासारखे वाटेल." हा उतारा देण्याचा हेतु एवढाच कीं त्यावरून लोकाचें औदासिन्य व ग्रंथकाराची निरपेक्षबुद्धि वाचकांस कळावी. असो.

पंडित हरिबाबानीं क्रमानें १ ते १६ व पुढें २२, २७, २९, ३०, ३१, ३२, ३३ व ४९ अशा अध्यायातील श्लोकाची यथारुचि निवड करून त्यातील काव्यसौन्दर्य अक्षर गणांतील विविध वृत्तांत प्रगट केले आहे. त्याचा मराठी अनुवाद प्रस्तुत कर्त्यानें आर्यांत केला आहे. मूळातील एकंदर १०७ श्लोकांवर पंडितजींचे १३९ श्लोक आहेत तर त्यावरील अनुवादास ३०८ आर्या खर्ची पडल्या आहेत. एकंदर अध्यायांपैकीं यदृच्छया पुढील निवड करून ह्यात काव्यसौन्दर्य कसें काय दिसतें तें पाहू.

मू. अ. ६ वा. यांतील १७ वा श्लोक:—

मूळः—विबुध्यतां बालकमारिकाग्रहं चराचरात्मा स निमीलितेक्षणः।
अनंत मारोपयदंकमंतकं यथोरगं सुप्तमबुद्धिरज्जुधीः ॥१७॥

उत्प्रेक्षाः—ऐहिकं तु नहि साधनमस्या दृश्यतेण्वपि पुरातनमस्ति।
किं नवेति भगवान् ध्रुवमंतश्चिंतनाय कृतनेत्रपिधानः ॥३०॥

मराठी आर्याः—नहि पुण्य हिचें आतां पूर्वींचें ही नसेचि लवमात्र॥
झाकुनि नेत्रा माधव वदती मद्दर्शनें कृपापात्र ॥ १३६ ॥
विष भरुनी जरि आली पाजाया स्तन्य मायसी दिसली
मिलिताक्ष कृष्ण वदती उद्धरु इजला असो जरी कसली॥ १३७

हिचें प्रारब्ध कर्म तर शुभ नाहींच. परंतु थोडेंबहुत "संचित" पुण्य तरी हिच्या गांठीं आहे कीं नाहीं ह्याचा जणुं विचार करण्यासाठींच कीं काय भगवतानीं डोळे मिटले! हें अर्थसौन्दर्य आर्येंत प्रतीत होत नाहीं.

( २ ) उत्प्रेक्षा:—दातुं स्तन्यमिषाद्विषं किल धृतोद्योगे यमास्ते यत: ।
पीतंचेत् प्रभुणा पुरो बत गतिः का वास्मदीया भवेत् ॥
इत्थं व्याकुलितान् निजोदरगतान् आलोक्य लोकान् प्रभुः ।
व्यक्तं भात्यभयप्रदानवचनं चक्रेऽक्षिसमीलनम् ॥ ३१७

आर्या:—ही विष पाजूं आली प्रभु जरि पीति मरूं अम्ही उदरीं ॥
या परि भित्र्या देवा नेत्रकटाक्षेच कृष्ण अभयकरी ॥१३८॥
ज्याला विष बाधीना उदरीं त्याच्या अम्ही कसें भ्यावें ॥
नाम अमर जरि अमुचें निर्भय उदरात कृष्णगुण गावे॥१३९

ह्या अनुवादांतही दुसऱ्या उत्प्रेक्षेची मौज उतरली नाहीं.

( ३ ) उत्प्रेक्षा:- -या स्त्री बहिर्मृदुपदा निजमातृभावं । लोके प्रदर्श्य विषवद् हृदये नृशसा ।
कार्यं न तन्मुख निरीक्षणमित्यनंत: । संबोधयन् स निजनेत्रपिधानमाधात ॥३२

आर्या:—हृदि दुष्ट मिष्ट वचनीं पाहुं नये स्त्री कदापि पुण्यनर ॥
हें सुचवायासाठीं वासुदेव कृष्ण नेत्र झाकि खरे ॥ १४० ॥
अपवित्र पूतना ही अतदोषी गुणांस वर दावी ॥
स्तनपानीं विष घाली पाहुं नये म्हणुनि नेत्रपट लावी॥१४१॥
डोळे झाक करावी अपराध्याला क्षमा करावी कीं ॥
ही श्रेष्ठ नीति जाणुनि नेत्र कपाटास कृष्ण तो झाकी॥१४२॥

ह्या अनुवादांत मूळातला अर्थ पुष्कळ चांगला उतरला असून त्यांत तिसऱ्या आर्येनें थोडेशी भरही टाकली आहे.

अत्तर एका कुपींतून दुसऱ्या कुपींत ओततांना त्याचा मूळचा मृदु मधुर सुवास जसा पुष्कळसा उडून जातो त्याचप्रमाणें भाषांतराचें व विनोदाचें आहे, हें सुज्ञांस विदितच आहे. शिवाय संस्कृत भाषेची अर्थबोधकता व व्यंजकता, तिच्या श्लेषसुलभ शब्दांच्या नाजूक भावछटा ह्या मराठीस तितक्या प्रमाणांत अझून प्राप्त झाल्या नाहींत हेंही विसरतां कामा नये. त्यामुळें पंडितजीनीं मुळावर केलेली मनोरंजक मखलाशी मराठी

अनुवादांत प्रतीत होत नसल्यास त्याचा दोष अनुवादकाकडे फारसा जात नाहीं. कविकल्पनेनें जिथें जिथें भाषांतराच्या मर्यादेपलीकडे उड्डाण केलें आहे तेथें तेथें तिच्या स्वतंत्र विहाराचें तेज चमकताना आढळतें. उ. वर्णूं मूक कसा मी विबूधगिरा जेथ वर्णितां थांबे ॥ ५२ ॥ प्रिय वश अतिशात तसा भर्ता प्रभु जरि सती सुता मागे । हें सतिलक्षण मंगळ जाणुनि भू कष्ट भातया सागे ॥ ५ ॥ जरि अतुल तेज आलें कदापि होऊं नयेच उन्मत्त ॥ थोराची रीत अशी सुतेज पावक अम्हीं दिसूं शांत ॥ ८० ॥ स्वर्गादिकास भुवनें वदती उदकास ही भुवन नाम ॥ यम भुवन लोक मारी परि यमुना भुवन पाळी जळधामा ॥ ८ ॥ लोकात हीच नीति दावावें कीं दयार्णवा कष्ट ॥ कालीय भीति यमुना उदरा फाडूनि दावि विस्पष्ट ॥ ९५ ॥ त्याच प्रमाणें भूभार हरणार्थ श्रीकृष्ण अवतारणार हें ऐकून भूमीस झालेला हर्ष व वसुदेव बालकृष्णास मथुरेस नेत असता यमुनेनें दुभगून दिलेला मार्ग वगैरे प्रसंगावरील मराठी अनुवाद फारच विनोदपूर्ण झाला आहे. पारमार्थिक काव्यकारांचें लक्ष भाषेच्या बाह्यांगाकडे फारसें जात नाहीं हें सुप्रसिद्धच आहे. तेव्हां ह्या मराठी अनुवादांत कोठें अपसपि, कोठें 'देवकीहौस देवकिगर्भ, गुरुघरीं' असे समास तर कोठें 'विधि पयोब्धि (ला) गेला' किंवा शुभशकुनें (न. लि?) असे व्याकरणदुष्ट प्रयोग आढळले तरी तिकडे वाचक नेहमीं सदयतेनेंच पाहातात. पण अशीं स्थळें फारच थोडीं आहेत एवढेंच त्यास सांगितलें म्हणजे पुरे आहे. तेव्हां अशा दृष्टीनें ही आर्याशतकत्रयी वाचल्यास वाचकास काव्यानंद व परमानंद ह्या दोहोंचाही लाभ होईल असें वाटतें.

---

## निजानंददास ब्रह्मानंद (स. १८७१)

ब्रह्मानंदानें श्रीगुरुनिजानंद महाराजाचें पद्यमय चरित्र लिहून तें शके १८३६ मध्यें दक्षिण हैद्राबाद येथें फाटक आणि कंपनी यांचे छापखान्यांत छापून स्वत:च प्रकाशित केलें आहे. ह्यास प्रस्तावना किंवा उपोद्घात जोडलेला नाहीं. त्याऐवजीं "दृष्टि व आर्ती" आढळतात. ग्रांतीच्या

फुलानीं सद्गुरुची दृष्टि काढल्यामुळें त्यांच्या कृपेनें आपली अहंकार दृष्टि उतरली आहे असें त्यांत सांगितलें आहे. आर्ती नेहमींप्रमाणें असून ती ब्रह्मानंदि लुप्त झाली निजानंदाचे पार्यी ' ह्या कडव्यानें संपविली आहे. नंतर ध्यान करून चरित्रास आरंभ केलेला आहे. चरित्र सहा प्रकरणांत सांगितलें असून प्रत्येकाच्या प्रारंभीं एक एक संस्कृत श्लोक घातलेला आहे. पहिल्याचे आरंभीं पुढील चरित्रसूचक श्लोक आढळतो.

य: सौभाग्यपुरे जनेषु जनयन् मोदं तनु जग्रहे ॥
कायस्थाननुकंपयोद्धरति य: कायाविहीन: स्वयम् ॥
य: पचायनत: सदा जपितवान् पूर्णं पराख्य शिवम् ॥
नानाशिल्पकलाऽगरायच निजानदाय तस्मैनम: ॥ ३ ॥

आरभीं गुरुवर्णन करून व त्याजजवळ अंभगरूपी चरित्र गाण्यास स्फूर्ति दे असें वरदान मागून चरित्राम आरभ केलेला आहे. भागा नगरांत राजा चदूलाल 'तपोनिधि, स्थिर मनबुद्धि देवापार्यी ' असे होऊन गेले. त्यांस मोहनलाल ह्या थोर जहागिरदारानीं आपली सुकुमार व गुणवंत कन्या मोती बीबी दिली होती. ह्या दांपत्याचे पोटीं शके १८०३ मध्यें चैत्रमासीं पचमीस एक कन्यारत्न जन्मास आलें. तिचें नाव अन्नपूर्णा ठेविले होतें. पूर्व संचितानुसार तिला बाळपणापासूनच ईश्वरभक्तीची गोडी लागली. वडिलाजवळ गीताभागवत मोठया आवडीनें ऐकत बसावें, अभंग, अष्टपद्या, स्तोत्रे पाठ करून घडाघड म्हणावीं असा तिचा क्रम असे. ती पांच वर्षांची असतां एकदा मल्लनाथ औसकर हे साधू हैद्राबादेस आले होते. त्याच वेळीं तिला मत्रोपदेश झाला. ती १४ वर्षांची होते न होते तों राजा चंदूलाल स्वर्गवासी झाले. नंतर तिच्या आईनें गिरधर प्रसाद ह्या श्रीमान् तरुणाशीं तिचें लग्न लावून दिलें. ह्या नवीन पतिपत्नीचें प्रेम एकमेकांवर फारच जडलें होतें. व त्याची वागणूक सौजन्ययुक्त व कित्ता घेण्याजोगी असे; परंतु त्यांस पुत्र नाहीं म्हणून खेद होत असे. इतक्यांत तिचे सौभाग्यावरच घाला पडला. पण सामान्य स्त्रियांप्रमाणें रडत न बसतां तिनें त्याच क्षणीं वैराग्य वरिलें. त्याप्रसंगाचें वर्णन मोठें गंभीर झालें आहे:—

---

टीप—आपली पूर्वाश्रमीची चरित्रविषक माहिती प्रसिद्ध होऊं नये अशी ब्रह्मानंदांची इच्छा असल्यामुळें ती येथें देतां येत नाही.

ऐशा समयांत झाला तो आकांत। सौभाग्य नासत नाशवंत ॥ १ ॥ तेच क्षणीं वरिलें वैराग्य सौभाग्य । सद्‌बुद्धीचें अंग पूर्वी होतें ॥ २ ॥ सिंह वैराग्याचें भरलें असें वारें । पुन्हा मागें सरे ऐसें नाहीं ॥ ३ ॥ सुंदर सुकुमार अमीराची कांता । नेहमीं असत गोषामध्यें ॥ ४ ॥ अहो या साध्वीस सूर्याचें दर्शन । होणें कधी जाण शक्य नाहीं ॥५॥ एवढें असता वैराग्याच्या बाणें । छेदिले संपूर्ण दु:ख सारे ॥ ६ ॥ ग्रहादिक द्रव्यालंकारासहित । तुच्छ तें मानीत सर्व सुख ।। ७

अशी वैराग्यवृत्ति धारण करून ती मातोश्रीमह औशास गेली व तिथें तिनें एकनिष्ठेनें गुरुसेवा केली. तेव्हां शंकर प्रसन्न होऊन त्यानीं सिद्धमल्ल रूपाने त्यांस दर्शन दिलें. व गुरुपदेश करून तिचें " निजानंद " हें नाव ठेविलें. पुढें जगन्नाथाच्या यात्रेस गेली असता निजानंदानें सन्यास दीक्षा घेतली नंतर सिद्धमल्ल गुरुनीं आपला अवतार संपविला. निजानंदानें औशाची मुक्ताबाई, हैद्राबादचे शंकरराव वदनापूरकर याची पत्नी पार्वती, ह्यास मंत्रोपदेश दिला. पुढें सिंहस्थांत नाशिक क्षेत्रा गेले तेथें कवि म्हणतो ' मज अबलेचा करूनि उद्धार । सहा महिने स्थिर वृत्ति केली ॥ ३.१४॥ असा अनेकाचा उद्धार करून शके १८३३ मार्गशीर्ष व० तृतीयेस निजानंदानीं भौक्तिक देह साडिला ! निजानंदाच्या भजनाचे वर्णन मोठें सुरस झाले आहे.

भजनाचा रंग ऐकणारा दंग । सर्व यथामाग असतसें ॥ ३.४५ ॥ चिपुळियाचा ध्वनी वाजे झुमझुमकार । एकनारेचा गजर मस्त बहू ।४६। यावरी स्वामीचा आवाज मधूर । ताल आणि सूर यथायोग्य ॥ ४७ ॥ तत्त्वज्ञानी होती अर्थामध्ये दंग । ताल सूरीं गुंग कोणी होती ॥ ४८ ॥ कोणी भक्तिपर डुलती प्रेमात । कोणी गुंतलेत लावण्यात ॥ ५ ॥ एकदा बसत आसना घालोनी । नेत्र हे झाकोनी भजनी स्थिर ॥ ५१ ॥ आले गेले कवण त्याची शुद्ध नाहीं ! केव्हां केव्हां होई सूर्योदय ॥ ५२ ॥ ऐशामुळें श्रीशीं बहु पीडा झाली । परी ते सोसिली स्थिर चित्तीं ॥ ५५ ॥ स्वजन परानें छळितां परोपरी । मधूर उत्तरीं स्वामी बोले ॥ ५६ ॥ निंदकासी नमुनी म्हणे महाराज । श्रम झाले मजसाठीं तुम्हां ॥ ५७ ॥ मज अभाग्याची बाळगुनि चिंता । जीभ कष्टवितां कुशब्दानीं ॥५९॥ बहुत ताडितां कुत्सित

शब्दानें धरणीप्रमाणें सहन शक्ति । मेघ येवो जावो भरला सागर । तसें चित्त स्थिर आनंदात ।। ६० ।।

जो जो जसा भेटे तसा त्यास महाराज उपदेश करीत. तीव्रास अभ्यासाचा क्रम सांगून त्याचे मनाचा उपशम करीत तर मंदास उपासना सांगून सन्मार्गास लावीत. अशा प्रकारें हें भक्तोद्धार नामक तृतीय प्रकरण ब्रह्मानंदाने संपविलें आहे. त्याने चवथ्यात कर्मोपासना व ज्ञान ह्याचें स्पष्टीकरण केले आहे. ज्ञान गुरुमुखाविना होत नाहीं. उपासना म्हणजे गुरुचरणीं निष्ठा ठेविणें व जो असें करतो त्यास मुक्ति मिळते. इत्यादि बोध ह्यात आला आहे.

ब्रह्मानदानें पाचव्या प्रकरणात अभ्यासक्रमाचें कथन फार सुबोध रीतीनें केलें आहे. सहाव्यात ज्ञानाचे महत्त्व सांगून आरंभ, विवर्त व परिणाम वादाचें स्पष्टीकरण केलें आहे. आणि पुनः गुरुभक्तीचें महात्म्य वर्णन करून 'ब्रह्मानद तुझी दासी ही लडिवाळ । माउली दयाळ तूंचि एक ।। ७।१०० ।। असा समारोप केला आहे. व पुनः आरती करून चरित्रभाग पूर्ण केला आहे.

दुसऱ्या भागात निजानदाची हिंदी वेदांतपर पदें दिलीं आहेत. ह्याप्रमाणें ह्या लहानशा पुस्तकांत स्त्रीगुरुचरित्र व स्त्रीशिष्य काव्य अशा दोन्ही असाधारण गोष्टी पाहावयास सापडतात.

तीन वाद

आरभ विवर्त आणि परिणाम । तीन वाद जाण शास्त्रामध्यें ।। ७।३८ ।। मूळारभीं कांहीं नसे अधिष्ठानीं । सहज स्फुरणीं स्फूर्ती उठे ।। ३९ ती ही स्फूर्ती कैसी वंध्या पुत्रा परी । शशशृंगापरि शब्द मात्र ।। ४० जन्मलाच नाहीं मत्यु कैसा ठावा । बागुल हा बोवा स्थाणु पुरुष ।। ४१ आरंभ तो वाद सांगे ऐशा परी । विवर्त कससरी पुढें ऐका ।। ४२ विवर्त म्हणजे एकावर अनेक । भासवी क्षणिक सत्यापरी ।। ४३ मृत्तिकेवरती शोभे जैसा घट । तंतुवरी पट तैशापरी ।। ४४ सुवर्णावरती जैसे अलकार । ब्रह्मावरी जग तैशापरी ।। ४५ परिणाम वाद असे तो मौजेचा ऐकणारा साच बुडुनि जाय ।। ४७ रत्न शोधायासी कोणी एक गेला । आपण रत्न झाला तेच क्षणी ।। ४८ लवण सागरा भेटायासी गेले । आपणचि झाले सागर रूप ।। ५०

## व्यंकटेश माधव दातार ( स. १८७६ )

ह्यांचा जन्म उस्मानाबाद येथें सन १८७६ त झाला. प्राथमिक शिक्षण तेथेंच संपवून कलबुर्गा येथें ते इंग्रजी शिकावयास गेले. तेथून म्याट्रिक परीक्षा दिल्यावर ते हैद्राबाद येथें निझाम कॉलेजात उच्च शिक्षणासाठीं दाखल झाले. त्यानीं दुसरी भाषा म्हणून फार्शी भाषा घेतली होती. बी. ए. च्या परीक्षेंत गणित विषय घेऊन ते उत्तम प्रकारें उत्तीर्ण झाले. संस्कृत, आरबी, व उर्दू या भाषाचेहीं यांनीं पुढें चागलें अध्ययन केलें. सन १९०० मार्चमध्यें ते हैद्राबाद येथील फायनान्स खात्यात नोकरीस लागले. तेथें आपल्या अगच्या हुपारीनें लौकरच चमकूं लागून वरीष्ठ अधिकाऱ्याच्या आदरास व कृपेस पात्र झाले. त्यामुळें त्यास भराभर बढत्या मिळत गेल्या आणि शेवटीं त्याच खात्यांत त्यास डेप्युटी सेक्रेटरीची बहुमानाची जागा मिळाली. ह्या जागेवर त्यानीं १२ वर्षे मोठ्या हुपारीनें काम केलें. बजेटाच्या कामात त्याच्याइतका वाकबगार कारभारी सर्व कचेरींत दुसरा नव्हता. त्यामुळें रा. ऑ. सर अकबर हैदरी हे फडणीस झाल्यापासून त्यांची त्याजवर फार मर्जी बसली. बजेटाच्या कामाची सर्व जबाबदारी त्यानीं त्यांजवर सोंपविली होती.

सर अकबर यांनीं हैद्राबाद संस्थानच्या बजेटात ज्या मूलग्राही सुधारणा सुचविल्या, त्या बजेटांत बसवून तें व्यवहार्य करून दाखविण्याचें श्रेय रा. दातारानाच आहे. कर्तव्यपरायणता, लीनता व सौजन्य या गुणांनीं सर्व फायनान्स कचेरी त्यानीं आपलीशी करून टाकिली होती, एवढेंच नव्हे तर ज्या ज्या इतर बड्या अधिकाऱ्याशीं त्याचा संबंध येई, त्याना त्याना त्याच्याविषयीं पराकाष्टेचा आदर वाटे. सर अकबर हैदरी साहेबासारख्या थोर गुणग्राहकानींही त्याच्या गुणाचें चीज केलें; आणि त्यांस आपल्या सेक्रेटरी-च्या महत्पदीं चढविलें. हेंही काम त्यानीं मोठ्या कर्तबगारीनें करून दाखविले आणि सेवानिवृत्त होण्याची परवानगी मागितली. पण सर साहेबाचा त्यांच्यावर इतका लोभ जडला कीं बजेट तयार करण्याच्या समयीं प्रतिवर्षी तीन महिने पुनः कामावर येत जाईन अशी अट जेव्हां त्यानीं त्यांच्याकडून कबूल करून घेतली तेव्हांच त्याची सुटका केली. आणि ती अट त्यांनी वर्ष दोन वर्षें पाळलीही. पण परमार्थाकडे डोळे लागलेल्या

माणसास त्यांत गोडी थोडीच वाटणार! सर साहेब विलायत्ला गेल्याची संधि साधून त्यांनीं एकदम चतुर्थाश्रम स्वीकारला आणि हेंही प्रेमबंधन तोडिलें ( १९३६ ).

अशी मोठया कष्टाची व जबाबदारीची नोकरी निरलसपणें बजावीत असता त्यांची स्नानसंध्या जपतपादि आन्हिक कर्मे यथासांग, यथाकाल व शास्त्रोक्त पद्धतीनें ३६ वर्षेपर्यंत अगदीं अखंड रीतीनें चाललीं होतीं, व त्यांबरोबरच श्रुति स्मृति पुराणें व उपनिषदें इत्यादि संस्कृत ग्रथांचें, ज्ञानेश्वर तुकारामादि मराठी सतवाङ्मयाचें, त्याचप्रमाणें उमरखय्यामच्या रुबयां-साठीं, फारसी व इग्रजी वाङ्मयाचे अध्ययन त्यांनीं अक्षय चालू ठेविलें होतें. वेद, उपनिषदे, ज्ञानेश्वरी व दासबोध इत्यादि अनेक ग्रंथांतील महत्त्वाचे भाग त्यांस मुखोद्गत म्हणतांना पाहून अलीकडील कोणीही विद्वान थक्कच होतो. त्याची ती किंचित् स्थूल पण निरामय शरीरयष्टी, अपार भूतदयेच्या आश्रयार्थ जणूं विस्तृत झालेलें विशालोदर, मुद्राक्षतांकित भव्य भालप्रदेश, तपस्तेजानें तळपणारे डोळे, विद्याविनयादिगुणानीं सदासुप्रसन्न असणारे मुखमंडल, इत्यादि लक्षण युक्त विभूति पाहतांच विस्मयादरानें जो प्रेक्षक आपोआप त्यांच्यापुढें लवूं लागतो, तो तीच मूर्ति आपणापुढें दंडवत् पडलेली पाहून, तो अगदीं स्तिमित होऊन जातो. त्याचे ठिकाणीं कर्मभक्ति व ज्ञान ह्याचा उत्कृष्ट समुच्चय पहावयास मिळतो. ह्या त्याच्या अंगच्या गुणाचा ठळक ठसा त्यांच्या ग्रथातही जागोजाग दृष्टीस पडतो. त्यास फार दिवसांपासून अभग, पदे, करण्याचा नाद आहे. त्याच्या कवनानीं भरलेलीं अनेक बाडें त्याचे जवळ पडलीं आहेत. सध्या त्यांचे नावांवर प्रकाशित असे दोनच ग्रंथ आहेत. श्रीगुरुकरुणामृत. म्हणजे—उमर खय्यामचे रुबयांचा भावार्थ ( स. १९३३ ) आणि सत्संग सरिता ( स. १९३६ ) ज्याचा ब्रह्मानद मायी म्हणून आपल्या 'श्रीगुरुकरुणामृता'च्या अर्पणपत्रिकेंत उल्लेख केला आहे, त्या ह्याच्या गुरु माऊली होत. त्याच्या ग्रथाचें विवेचन मागें आलेंच आहे.

श्रीगुरुकरुणामृत

उमर खय्यामच्या रुबया हा विषय म्हणजे स्थिरचर व्यापून दशांगुळें

उरणाऱ्या ब्रह्मासारखा, विश्वांतील विराट वाङ्मय व्यापून उरलेला आहे. उमरच्या कवितांचें महत्त्व जगापुढें यूरोप व अमेरिका येथील पंडितांनीं प्रथमत: आणिलें. इ. स. १६६३ त बटलरच्या ' ह्युडीब्रासमध्यें ' उमरचें वर्णन आहे. तेव्हा पासून आज २७५ वर्षें ह्या विषयाची चर्चा चालूच आहे, व ती जगाच्या अंतापर्यंत अशीच चालू राहाणार असें वाटतें. अॅब्रोज जार्ज पाटर ह्यानें उमरवर लिहिलेल्या पुस्तकाची यादी दिली आहे ( स. १९२९ लंडन ) तीवरून असें दिसतें कीं फिट्‌जेरल्डचे भाषांतराच्या ३१० आवृत्त्या स. १९२९ पर्यंत इंग्लड व अमेरिका येथें निघाल्या. इतर ग्रंथकराचीं रुबयाचीं इंग्रजींत १०० भाषांतरें आहेत. इतर युरोपियन २१ भाषांत १२४ आहेत, तर आशीयातील २९ भाषात त्याम भाषांतराचा मान मिळाला आहे. गिरधरशर्मानें ७५ रुबयाचें संस्कृतात भाषांतर केले आहे. हिंदींत ३, उर्दूत ३, बंगालींत ३ उडियात १, गुजराथींत ७ प्रो. मब्बाराव यांचें तेलगूंतील एक व गुंडाप्पा व गोविंद पाय ह्यांची कानडींतलीं २, मराठींत प्रा. डॉ. पटवर्धनाचीं २ गो. गो. अधिकारी, करंदीकर, उपाध्ये यांची व प्रस्तुत अशीं एक एक मिळून सहा भाषांतरें आहेत. शिवाय उमरच्या काव्यावर विवेचनात्मक ग्रंथ ९८, नाटकें व प्रहसनें ३४ खय्याम क्लबचे ग्रंथ ६ व ७६ मासिकात कैक वर्षे चाललेली चर्चा—हें विस्तीर्ण वाङ्मय ऐकिलें कीं ' उमरनें या जगात केवढा दंगा माडला आहे ह्याची कल्पना होईल.'

कवीनें गुरुमाउली ब्रह्मानंद माधींच्या आज्ञेवरून हा ग्रंथ लिहिला म्हणून त्यानें त्यास ' गुरुकरुणामृत ' असें म्हटलें आहे. हें नामाभिधान, ह्या दृष्टीनें जरी समपर्क असलें, तरी उमर व त्याच्या रुबाया ह्यांचें तें मुळींच निदर्शक नसल्यामुळे, तें अगदीं भ्रामक आहे असें म्हटल्याशिवाय राहावत नाहीं. हें रूपांतर अवघ्या दोन महिन्यांत तयार झालें आहे. मूळाचें रूपांतर १०७ पानांत झालें आहे तर प्रस्तावनेस १४७ पानें खर्चीं पडलीं आहेत, हें पाहून वि. का. राजवाडयाच्या ७६ पानांच्या ' राधामाधव विलासचपूकाव्याच्या ' २०० पानाच्या प्रचंड प्रस्तावनेची वाचकास आठवण झाल्यावांचून रहाणार नाहीं. ज्याप्रमाणें प्रो. परांजप्याच्या केकावलींत योग शद्बावरील टीपेंत अष्टांगयोगाची समग्र माहिती पाहावयास सापडते तसेंच येथें ही " प्रेम " शद्बावरील टीकेंत नारदीय भक्ति सूत्राचें सपूर्ण व्याख्यान ३५

पानें विस्तारलेलें आढळतें. ह्या योगें ग्रंथकारानी गाढ विद्वत्ता जरी निःसंशय दिसून येत असली, तरी सामान्य वाचकास हें विषयांतर किंचित् कंटाळवाणें व तज्ज्ञास अनावश्यक वाटल्यावांचून राहात नाहीं, असें म्हणणें भाग पडतें. मात्र त्याचा हा प्रयत्न अगदीं स्वतंत्र आहे हें निःसंशय. असो. या प्रचंड प्रस्तावनेंत आपण किंचित् डोकावून पाहू या.

दातारानीं ( पा. २ ) उमरच्या एका सहाध्यायाच्या अध्ययन कालाच्या उल्लेखावरून त्याचा जन्म स. १०१८ ते १०२३ मध्ये झाला असावा असे सांगितलें आहे. आणि सांप्रत छापत असलेल्या त्याच्या इंग्रजी पद्य भाषांतराच्या प्रस्तावनेंत तर त्यानीं ह्या सालांच्या उमरच्या कुंडल्या मोठ्या परिश्रमानें तयार करून त्याच्या चरित्राशीं बहुतेक जुळणारी अशी एक कुंडली ठरवून त्याचा जन्म सन निश्चित केला आहे. उमरचें चरित्र थोडक्यात असें:—त्याच्या बापाचें नाव कोणी इब्राहीम तर कोणी उस्मान होतें असें म्हणतात. हा खोरासानमध्यें निशापुरांत राहाणारा. अध्यात्म, धर्म, नीति, वगैरे शास्त्रांत तो पारंगत होता म्हणून त्याला गियासुद्दीन ( धर्मोद्धारक ) ही पदवी मिळाली होती. तो वादकुशल होता म्हणून त्यास अबुल्फतह व धर्मनिर्णय देणारा म्हणून इमामुल खुरासान अशा पदव्या त्यास मिळाल्या होत्या. शिवाय हुज्जतुल्हक ( न्याय प्रवीण ); व मलिकुल हुकमा ( तत्त्वज्ञ-मुकुटमणि ) ह्याही पदव्या त्यास दिल्या गेल्या होत्या. त्याचा सहाध्यायी निजामुल्मुल्क दिवाण झाला तेव्हा त्यानें उमर यास निशापुरचे खजिन्यातून १२०० मिसकल ( होन ) वेतन चालू केलें होतें. पण त्यास द्रव्याचा, अधिकाराचा, मानमान्यतेचा व संसाराचा हव्यास नव्हता. विद्याव्यासंग व परमार्थचिंतन ह्यांतच तो सदा निमग्न असे. सुलतान मलिकशहाचे कारकीर्दींत त्यानें इ. १०७५ त एक वेधशाला स्थापून ग्रहगतीचीं कोष्टकें तयार केलीं. तो फलज्योतिषांतही प्रवीण होता. व त्याचें भविष्य खरें ठरत असे असें म्हणतात. त्यानें आपले स्वतंत्र विचार आपल्या ग्रंथात निर्भयपणें मांडले. त्यामुळें त्यास अनेक शत्रु उत्पन्न झाले. कुराणाच्या सातही पठण पद्धति ( किरआत ) त्यास अवगत होत्या व तो मोठा कुराणज्ञ म्हणून मानला जाई. उमरनें ११ ग्रंथ लिहिले. बीजगणित, युक्लिडचे भूमितीवर सिद्धांत ग्रहगतीची कोष्टकें, पदार्थविज्ञान—[redacted]

हलक्या सोन्यांतील मिश्रण शोधणें; जगत् व दैव, वातावरण व ऋतु, रुबाया (फारशी), आरबी कविता, व रोजतुल् कुलब (हृदयाराम), ह्या निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथांवरून त्याची अलौकिक बुद्धिमत्ता व्यक्त होत आहे. तो 'सुफी' पंथी होता. 'प्रेमाने परमात्म्याशीं संलग्न होणे हेंच जीवाचें मुख्य कर्तव्य आहे. तदर्थ इतर वस्तूंचा त्याग केला पाहिजे.' हें ह्या पंथाचें वैशिष्ट्य आहे. उमरची कविता गूढ असल्यामुळे तिचे सामान्य जनास आकलन झालें नाहीं. त्यामुळें त्यास फार शत्रु झाले व तो निरीश्वरवादी, काफीर, पैगंबरास न मानणारा आणि दहरिया (भौतिक वादी) आहे, असे आरोप त्यानीं त्याजवर केले. काहीं मुल्लानीं तर त्यास ठार मारण्याचा निश्चय केला. हें ऐकून तो निषापूर सोडून यात्रेस गेला. त्यानें मक्केत हज्ज केलें. तो मदिनेंत पैगंबराचे समाधीजवळ कांहीं दिवस राहिला व शेवटीं परत निषापुरांत येऊन इ. ११२३ मध्यें 'प्रभो माझे अपराधाची क्षमा कर. मी तुला जाणण्याचा शक्य तेवढा प्रयत्न केला, अशी प्रार्थना करून त्यानें आपला देह ठेविला.

रुबायांच्या बहिरंगासंबंधीं माहिती दाताराच्या प्रस्तावनेंत दिली आहे. आर्या अथवा श्लोक साधे अथवा गायनांत म्हटले जातात, तशीच रुबाई साधी किंवा ताल सुरांत म्हणता येते. ठुमरी (खुमरी) फार्शीत असते ती रुबाईतच असते. फार्शी अद्यापिही रुबाईस दोबेती किंवा तराना म्हणतात. गवयी लोक गज्जल म्हणतांना मध्यंतरी रुबाई तराना म्हणतात. मगण अथवा तगणानें आरंभून मोरोपंती आर्येच्या समचरणात २ मात्रा अधिक घातल्या कीं हज्ज वृत्ताचें रुबाईचें चरण होतें. आणि उमरचें हेंच वृत्त बहुधा साऱ्या रुबाईत आहे असें दातार लिहितात. पण माडखोलकर व पटवर्धन म्हणतात कीं रुबाई गेय नाहीं.

शके १८३८ मध्यें उमर खय्यामचें रूपांतर-म्हणजे गुरुकरुणामृत हें बिबलियाग्रफींत (पान ३०८ नं. १६) नोंदलेल्या दक्षिण हैद्राबादच्या प्रतीवरून झाले. ह्या हैद्राबादी प्रतींत परिशिष्टासह १०३० रुबया छापल्या आहेत. गुरुकरुणामृतात १४ रुबाया कांहीं यमक अथवा चरणानुक्रम भेदानें व कांहीं शब्दशः पुनरुक्त दिसल्या त्या सोडून प्रथम १०१६ छापल्या

रत्नाकर अंक जानेवारी व एप्रील १९३० व पटवर्धनांची प्रस्तावना पहा.

आहेत. पुढें १०१७ पासून १०६७ पर्यंत जे श्लोक दिले आहेत त्यांत हैद्राबाद प्रतींत नसणाऱ्या रुबयाचा भावार्थ सांगितला आहे. अशा रीतीनें ह्या प्रतीस शक्य तेवढी पूर्णता दातारानीं आणिली आहे.

पण दातारांच्या गुरुकरुणामृताचे खरें वैशिष्टय व महत्त्व त्यांनीं स्वीकारलेल्या रुबायाच्या अर्थपद्धतींत आहे.

दातारांनीं मदिरा*—शब्दाचा अर्थ भक्ति घेऊन रुबायांचा अर्थ अध्यात्मपर लावला आहे. सूफी मताचे मुसलमान जर मदिरेचा अर्थ भक्ति घेतात तर सांप्रदायाबाहेरील लोकास विपरीत अर्थ घेण्याचा अधिकार काय? असा प्रश्न विचारून मद्य शब्द अध्यात्मिक अर्थानें योजल्याचे दातारानीं अनेक आधार दिले आहेत. वैदिक वाङ्मयात त्याचा अर्थ पारमार्थिक सुख, असा आहे, ऐहिक विषयानंद नाहीं हें अनेक अवतरणानीं त्यानीं सिद्ध केलें आहे. ते पुढें म्हणतात—"फार्सीची मातृभाषा झेंद हिच्यांत ही 'मय'' शब्द, ज्ञान, सद्गुण या अर्थानें आहे. पण 'मय' शब्द उमरनें पारिभाषिक अर्थानें वापरला का बाजारी अर्थानें? ह्याचे उत्तर संदर्भानुरूप दोन्ही अर्थानें. कोणत्याहि रुबाईत मदिरावाचक शब्दाचा अर्थ काय घ्यावा हें ती रुबाईच सांगते. रुबाई परपक्षखंडनात्मक साधनाग, नीतिपर, किंवा स्वानुभववर्णनात्मक आहे हें प्रथम ठरविले कीं तेथे अर्थ वैराग्यपर आहे कीं वैषयिक हें सहज समजेल उ.—

गु. क. ३५२:—पहाडींसि देसी जरी प्रेम नाचे। असे नष्ट जो निंदितो प्रेम वाचे ॥ मला मागसी प्रेम नाहीं सुखाचें। अरे बोध, आत्मा, असें प्रेम साचे.

पट. ४३०. मधु सिंचन गिरि नाचवि करुनी तुष्ट। दूषित गणिती मधुस जन ते दुष्ट! ॥ आशापिशि का मधुपासुनि निवृत्ती'? जीवन हें बघ करी तनूसही पुष्ट ॥ पहिल्या ३ चरणात मुळांतील 'बादा' चा अर्थ मधु केला आहे. हा 'बादा' काय आहे हें उमर सांगतो: रुहऽ स्त के तबियंते बखस

टीपः १ उ. मुकुंदमाला मधु=हरिभक्ति ऋग्वेद म. १।१५४।४; त्रिसुपर्णः इ. त्याचप्रमाणें मद्याऐवजीं मुळांत 'मय' शब्द दोनशेंवेळा आला आहे.

* प्रा. पटवर्धन-दारु हा अर्थ घेतात प्र. पा. ९

कुनद ' म्हणजे तें असें चैतन्य आहे कीं तें पुरुषास नीतिशिक्षण लावतें; तरबियत म्हणजे नीतिशिक्षण. मग चौथ्या चरणांत ' देहपोषण–पुष्टतनु ' असा अर्थ पटवर्धनांनीं कसा केला ? पहाडास म्हणजे पाषाणहृदयासही चैतन्य कोण आणते तर ' प्रेम ' असा त्याचा पारिभाषिक अर्थ आहे. मूळ ग्रंथकाराच्या सहधर्मी व सहभाषी अशा गुरूकडून ग्रथ परिभाषा समजावून घेऊन केलेले भाषांतरच यथार्थबोधक होईल अन्य विडंबनपर होईल. "

दातार पुढें म्हणतात–" मराठीत मद्यार्ची परिभाषा प्रचलित नाही, म्हणून मुळातील मदिरा धुवून किंवा त्याऐवजीं गोकुळातील परिभाषा योजून गुरुकरुणामृतांत केवळ भावार्थ निदर्शनाचा यथामति प्रयत्न केला आहे. मुळांतील बहिराम, जमशेद, कैकुबाद, कैखुस्रु, इ. व्यक्तींच्या किंवा तूस, बगदाद इ. स्थळांच्या इकडील व्यक्तीस्थळांनीं उल्लेख केला आहे. ख्य्याम बद्दल ' मन ' शब्द वापरला आहे. १ खराबात = गुरुमंदिर २ बादा फरोश साकी, मुग=श्रीसद्गुरु. ३ रिंद, आपक, मस्त=अवधूत, भक्त, संत, ४ षाहिद्–प्रेय–देखणा. ५ गमरू–गुरू. वगैरे.

नंतर त्यांनीं प्रस्तावनेंत उमरची रुबाई लोकप्रिय व जगांत चर्चेचा विषय ज्या गुणांमुळें झाली त्याचें वर्णन सविस्तर व सोदाहरण केलें आहे. तें फार हृद्य झालें असल्यामुळें तें मुळातच वाचलें पाहिजे.

नंतर त्यांनीं पटवर्धनांच्या ५ व्या वर्गातील " कामरूपी तत्त्व आमर आहे " ह्याचा फोलपणा दाखवून, आपलें षड्विध वर्गीकरण सोदाहरण पुढीलप्रमाणें दिलें आहे. ( १ ) विवेक वैराग्यपर ( २ ) वादपर ( ३ ) स्वानुभवपर ( ४ ) नीतिपर ( ५ ) भक्तिपर व ( ६ ) ईशस्तवनपर. त्याचप्रमाणें त्यांनीं उमरचे विचाराशीं कांहीं संस्कृत सुभाषितें कशीं जुळतात हें तुलनात्मक उतारे देऊन दाखविलें आहे. नंतर आभारप्रदर्शन करून व शुद्धिपत्रावर एक सुंदर, चटकदार आणि विनोदपूर्ण रूपक लिहून ही प्रदीर्घ प्रस्तावना संपविली आहे.

येथवर केलेल्या दिग्दर्शनावरून "गुरुकरुणामृताच्या" स्वरूपाची व वैशिष्ट्याची कल्पना सहज येण्यासारखी आहे. हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर कांहीं विद्वानाचे व वृत्तपत्राचे रुचिपरत्वें अनुकूल व प्रतिकूल अभिप्राय आले.

उदाहरणें अनुक्रमें:—गुरुकरुणामृत-२३९, १००६; ४०; ५०: ८५; ४८ इ.

परंतु ग्रंथकारानें हे परिश्रम " यशसेऽर्थकृते " केले नसल्यामुळें त्यास दोहों-पासून हर्षविषाद वाटला नाहीं. बहुतेक आक्षेपकांचा कटाक्ष भाषाव्याकरण दोषाकडे आहे. आणि हे आक्षेप बहुतांशीं खरेही आहेत. तरीपण रामदास म्हणतात " भाषा त्यागूनि अर्थ घेणें " असें केल्यास वाचकांस आनंद व ज्ञान ह्याचा लाभ झाल्याशिवाय राहाणार नाहीं असें वाटतें.

उतारा—ईशस्तवनपर

तुझे दास्य योगांत नाहीं निमालों। तुझे दारिं लोटांगणीं नाहीं आलों ॥५२८ दयेला तुझ्या पै न विस्मृत्त झालों। असे एक ते दोन नाहीं म्हणालो ॥५२८ धरीसी करें माउले बालकाला। कृपेने सदा झांकिसी पातकाला। दया तू करी दीन या याचकाला। तुझेवीण नेणेंच मी आणि-काला ॥८६६ मदाम्या दिली जी पुरी सोनियाची। ध्रुवाला दिली जी गती योगियाची। प्रभो काय वेचेल देता फुकाची। झुळूकी मला आपुले वार-याची ॥८६७ दयेनें दिली द्वारका त्या पृथूका। अघाचे निधी वारिले एक हाका। प्रभूची दया होतसे ज्या नरा का। करी मुक्त दृष्टीसवें तीन लोका ॥ ९६४वियोगे मला भस्मिजे कीं समूळीं। सुयोगें पदीं ठेवि कीं पाय-धळी। कळेना विनती तुला जे करावी। हितज्ञा तुला आवडे तेविं ठेवी ॥२३॥

व्यं. मा. दातार.

नसें मी जधीं, तें वसं मी स्वरूपीं
जसा का चढे, तेंवि ये अंधकूपीं
अहा दाविलें कौतुका माय बापीं
असे मस्त मी तेव्हांढा चित्स्वरूपीं
तनू कोवळी चद्रिका ही दयेची
मना मोहितो मावळा हा स्वयेंची ॥
पुनः सागतो देह पाहूं नयेची।
नसे जोडही सागण्याची, क्रियेची
तुझी प्रीत लौकीक शास्त्रा विरुद्ध।
मला आवडे, मी तुझे पायिं बद्ध ॥
मला गोड मायी कद्ध कीं निषिद्ध ॥
तुझे कारणी ते, निषिद्धाचि शुद्ध

प्रा. मा. त्रिं. पटवर्धन.

स्वतः मरतो जों जों तों तो जगतों
खचतो तों तो जों जो वर वर धकतों
आणि नवल हें कीं भवमदिरा पिउनी
मूढच होतो जो जो जणूं सकतों
कटाक्ष तव सखि चंचल आणि सुढाळ,
जाऊ नको, बस, शातव हा कल्होळ
"बघू नको मजकडे" त्वदाज्ञा कशी ही?
जणूं 'चपक धर वक्र,बिंदुहि न ढाळ!'
शास्त्रगर्ह्य मधु तथापि ते स्वादिष्ट
युवति करींचें तर रूचिर अरिष्ट!
निषिद्ध कटु तें तरी मज मधुरच वाटे
सत्य सनातन, निषिद्ध जें ते इष्ट!

गुरू गोजिरा देखुनी चित्त हासें ॥
गुरू पादुका हातिं माझे प्रकाशे ॥
सुखी रोप ते आपुलालें विकासे ॥
आतां या स्थिती देह जाऊ विनासे
दुरूनि पति येत एका दिसाला ।
घरीं लौकिकाचार, एकादशीला ॥
उपासी निजे नाहिं एकांत झाला ।
प्रभातीं सखा दूर गेलाचि गेला

पुष्पमुखीला माझे अंतर खिलगे ।
मधुचषकाला सदैव मत्कर खिलगे;
घेईन दर अवयाकडून निजभाग ॥
संस्थितीस तो अजुन न जोंवर खिलगे ॥
मद्यतु निघे कीं येई रमजान ।
न चाले मधुचें सुवर्णचलन–रजा न–
अपीत राही मदिरा, हाय मजा न !
अनाविद्ध अन् मुक्ता–गौहरजान !

## सत्संगसरिता. ( फे. १९३६ ).

ह्या सत्संगसरितेच्या उगमाचें निवेदन कवीच्या वदनानेंच वदविलेलें बरें:– " अच्युताश्रमस्वामींनीं हें लेंकरूं श्री. सद्गुरु ब्रह्मानंद माउलीचे ओटींत घातलें. या माउलीनें अंजन घालून बोलण्यास शिकविलें. सत्संगाचा अगाध महिमा दाखविला......उपजीविकेकरितां सद्गुरुमाउलीचेच उंबरठ्या-पासून वाहात असलेल्या सत्संगसरितातीरीं रमविलें. ही सत्संगसरिता श्रीसद्गुरु माउलीच्या मंगल सान्निध्यात वसणाऱ्या प्रेमळ, निर्मळ, भाविक संतांचें निर्हेतुक भजन पूजन कीर्तन आत्मचर्चा आणि सुखसंवाद यात वाहाणारी चिद्गंगा होय. अर्थ बोलाची वाट पाहे । अभिप्राय अभिप्रायातें विये । भावाचा फुलौरा होत जाये । मतिवरी ॥ ज्ञाने. ॥..."...कवीनें सद्गुरुमाउलीच्या बोधगंगेतून हे उद्धृत केलेले बिंदु संतचरणीं निवेदन केले आहेत. ह्या नितात सुदर निवेदनावरून ह्या ग्रंथाचा विषय त्याचा हेतु त्याची प्रेरणा व त्याचें फल वगैरे गोष्टी वाचकाच्या सहज लक्षांत येण्या-सारख्या आहेत.

श्री. बाबासाहेबांचा विद्याव्यासंग अतिशय दांडगा आहे. इंग्रजी,संस्कृत, पर्शियन, उर्दू, मराठी, या भाषा त्यांस उत्तम अवगत आहेत. श्रुति, स्मृति, रामायण, भारत, भागवत, गीता,उपनिषदें वगैरे ग्रंथाचें लक्ष्यपूर्वक अध्य-यन त्यांस घडलें आहे. ज्ञानेश्वरी तर त्यांस मुखोद्गत आहे. एकीकडे फड-

दातार–६५६।५१९।६०।३८२।२३५॥ पटवर्धन–३७।१७१।२६०।२६९। २९१॥

णीशी खात्यांतील आंकडेबाजीची किचकट नोकरी तीन तपें उत्कृष्ट तऱ्हेनें बजावीत असता दुसरीकडे बाकीच्या आयुष्याचा त्याचा प्रत्येक क्षण गीतेंत सांगितल्याप्रमाणें "सततं कीर्तयंतो माम् यतंतश्च दृढव्रताः । नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥९।१४॥ अशा तऱ्हेनें जात आहे. जगप्रसिद्ध महाकवि उमर खय्याम हा मद्य व मदिराक्षी यांच्या पायीं बुडाला असेंच पाश्चत्यांचे अनुकरण करणारे सर्वजण आजपर्यंत मानीत होते, परतु ह्या दोन प्रकारांच्या बुडाशीं असलेलें भक्तिज्ञानवैराग्य कसें पाहावें ही दृष्टि देण्याचें श्रेय बाबासाहेबांच्या 'श्री गुरूकरुणामृतास' कसें आहे हें मागें आलेंच आहे. परमार्थाचा दृढव्यासंग व संतसंग याचा " थेंबे थेंबे तळें साचें " या म्हणीप्रमाणें जो आजन्म संचय बाबासाहेबांनीं करून ठेविला होता, त्यातूनच " जल तुंबतां तडागीं फोडावा लागतो जसा पाट " या न्यायानें प्रस्तुतची सत्संगसरिता उम्दवली आहे, व ती या ग्रंथरूपी पात्रांतून प्रसरण करीत असलेली दिसत आहे. तेव्हां तिच्यांत मी स्वतः अभिषेक करून वाचकांसहीं तिच्या पवित्र तोयाचें आचमन करविण्याचा प्रयत्न पुढें केला आहे.

**ग्रंथाचें नामकरणः**—ग्रंथकारानें या ग्रंथाचें सत्संगसरिता हें नामकरण फारच चतुराईनें केलेलें दिसतें. कारण गंगा ही शुचित्वें मोठी शुचि आहे व पापतापही तिच्यामुळें जातो. पण तींत बुडण्याची भीति असते आणि " काश्यां मरणान्मुक्तिः" असें आहे. परतु प्रस्तुत सरिता अगाध खोलीची असली तरी तींत बुडण्याची तर भीति नाहींच, उलट न मरतां रोकडाच मोक्ष भक्तास मिळवितां येतो. गंगेला तरी पावनत्व साधूनींच साधून दिलें आहे, ॥शुचिपण दिलें तीर्थां गंगादिकांसहि साधुनीं(मोरोपंत );मग ह्या प्रत्यक्ष सत्संगसरितेचें शुचित्त्व काय वर्णावें ?

**ग्रंथ परिचयः**—या सत्संगसरितेचे चार प्रवाह कल्पिले आहेत. प्रथम प्रवाहात भक्तिज्ञान, गुरुमहिमा उपासना पुरुषार्थ वगैरे विषयांचें स्पष्टीकरण प्रश्नोत्तररूपानें केलेलें आहे. त्यांत मधून मधून " जातें काय जातें "' बानी मर्दांची ' ( १३५ ) वगैरे सारखी गंभीर व गूढ अर्थाची ही रचना आहे. यांत आर्या पदें, व भुजंगप्रयात, उपजाति, शार्दूलविक्रीडित, वियोगिनी, यांसारखीं अक्षरगणवृत्तेंही आहेत. " कमला कमला धरीं करीं ॥ सुमनाला

सुखवी परोपरी ॥ अशी कर्णमधुर शब्दरचना वामनपंडिती थाटाची झालेली आढळते. क्वचित् हिंदी भाषेतील पदेही त्यांत आढळतात. या भागांतील तात्त्विक विचारांची माडणी विविध स्वरूपाची व चमत्कृतिजनक असल्यामुळें वेदांताची रूक्षता त्यात नाहीं खरी, तरीपण त्यातील खरें रहस्य त्यात मुरलेल्या माणसासच उकलावयाचें !

प्रवाह २ राः—यात अनेक देवदेवतावर स्तोत्रें, अनेक छंदात रचलीं आहेत. त्यातल्या त्यात गुरुमहिम्यावर ८ आहेत. यातील प्रेमळपणा व भक्तिरस प्रत्यक्षच आस्वादण्याजोगा आहे. "का मजि बोलत नाहीं ॥ आई.॥ हें पद जितकें साधें तितकेंच सहज सुदर व करुणरसपूर्ण झालें आहे. (१७) लावुनी आजि लळा; (१९) सदा राही वो ममोरी ॥ हीं पदेंही ह्याच्याच तोडीचीं आहेत. प्रेमळपणा हा ह्या काव्याचा ठळक गुण आहे. व तो सर्वत्र दिसून येतो.

प्रवाह ३ राः—पहिल्या दोन प्रवाहांत वाचकाची पूर्वतयारी झाल्यावर तो तृतीय प्रवाहात दाखल होतो.हाच सत्संगसरितेचा मध्यबिंदु होय. येथे प्रवाहास एकदम निराळेंच वळण लागलेले दिसते. हा आख्यानमय आहे. महाभारत, रामायण, स्कदपुराण, ऋग्वेदसूक्तें, संतचरित्रें वगैरे अनेक ग्रथातून या आख्यानाची कथा आधारास घेऊन कवीने त्यावर स्वतत्र रचना केली आहे. ह्या सर्व गुणामुळे या सरितेस नुसत्या कीर्तनतरंगिणीपेक्षा कितीतरी मनोरमता आली आहे. एवढेंच नव्हे तर भजनसग्रह मनोरजक करण्याचा हा प्रकार पारमार्थिक मराठी वाङ्मयांत अपूर्वच म्हटला पाहिजे. महाभारतापैकीं ६।७ आख्यानात " सुलभा जनक संवाद " फारच उत्कृष्ट वठला आहे. वेदांतविषयक सवादातील जनकासारख्या जीवन्मुक्तासही निरुत्तर करणारा कोटिक्रम पाहून वाचक स्तिमित होतो, व त्याच्याच प्रमाणें तोही " अविनाशी, सद्गुरु माउले ! या हृदयीं संतत तृप्ति होय सुखवासी " असें सुलभेस विनवितो. " म्हणे जनक तिला तू अशी कशी संन्यासी ? " हें त्याचें पालुपद तर वाचकांच्या जिभेवर नाचतें व कानांत गुणगुणत राहातें. ऋग्वेदसूक्तांतील " अंभृणी व सरमा " ह्या आख्यानांचा परिचय मराठी वाचकांस नव्यानेंच घडत आहे असें वाटतें. आणि

मुकुंदराजाचें कुतूहलजनक पूर्वचरित्र व चमत्कृतिपूर्ण निजामुद्दीन पटाख्यान याची भर मराठी संतवाङ्मयांत मोठी महत्त्वाची समजली जाईल.

प्रवाह ४ था:—याम कल्पकदंब असें मार्मनांव दिलें आहे. ह्या प्रवाहतीरावर ८६ कल्पतरू लाविले आहेत. त्यापैकीं कोणत्याहि एकानें इष्टलाभ होण्यासारखा आहे. मग सर्वांची गोष्ट काय विचारावी ? संवादात्मक कथानीं अध्यात्मज्ञान देण्याचा केलेला हा उपक्रम खरोखर अभिनव आहे. पंचतंत्र हितोपदेशांतील कथाप्रमाणें पहिली कहाणी दुसरीस विते, आणि वाचकांचें लक्ष पुढें पुढेंच खेचित नेते. त्यामुळे हा भाग एकदा वाचावयास घेतला की शेवटपर्यंत तो खालीं ठेववत नाहीं. अलीकडे लघुकथात्मक वाङ्मयाची आवड फार पसरली आहे, म्हणून लघुकथांचें पीकही बेसुमार वाढत आहे. त्यापैकीं काही हृद्य आहेत, व रम्यही आहेत. परंतु त्या सर्व एकांगी म्हणजे केवळ प्रापंचिक आहेत. पण प्रस्तुत कहाण्या प्रपंचपरमार्थाची उभयविध जोड करून देणाऱ्या आहेत. तेव्हा त्याचा आस्वाद वाचकांनीं अवश्य घेऊन पहावा. यात ८६ तरू आहेत. आणि ते कल्पतरू असले तरी प्रत्येकाच्या फळाची रुचि नवी नवी आहे. ह्याकरिता त्याचे वानगीसाठीं तरी कोठले म्हणून फळ तोडून दाखवावें ? वाचकानींच त्याचा रसास्वाद स्वतः घ्यावा हेंच उचित. यांतील दुर्वासनारदाचे संवाद वाचून वाचक दुर्वासाप्रमाणेंच म्हणेल की " मी या संवादांनीं धन्य झालों. अंधारात भटकत होतों. आज मला उजाडलें." मनुष्यामध्ये स्वाभाविक असणारे दुर्गुण म्हणजे आशा, तृष्णा, महत्त्वाकांक्षा, अहंकार, गर्व, लोभ, मोह, मद, मत्सर यांचें प्रतीक दुर्वासास कल्पून, प्रत्येक कहाणीनें त्याची आत्मोन्नति स्वधर्माचरण, घटशुद्धि, वासनात्याग, तप, उपासना, श्रीहरीची दया, सत्समागम, संतसेवा, व शेवटीं गुरूची दया अशी पायरी पायरीनें कशी होत गेली आहे हें मोठ्या चित्ताकर्षक व उद्बोधक रीतीनें दाखविलें आहे. एकंदरीत दुर्वासाचें स्वभाव–चित्रण फारच हृदयंगम वठलें आहे. तें चित्र म्हणजे एक त्रिकालदर्शी आरशासारखेंच झालें आहे. त्यात प्रत्येकानें आपापलें नुसतें बाह्य मुख नव्हे तर अंतर्मुखही पहावें आणि आजूबाजूला कोणी पाहात नाहीं अशी खात्री करून घेऊन, त्याला लागलेलें मालिन्य सत्संगसरिताजलानें धुवून टाकावें. यांत लोककल्याणाच्या संयुक्त संस्था स्वावलंबन तत्त्वावर

कशा चालविल्या जातात, शिष्यस्य अपराधे गुरोर्दंडः या न्यायानें गुरूच अन्नत्यागरूप प्रायश्चित्त कसें घेतात, लोभी खंडोजी झटाळ,सोनाचा घट घेऊं पाहतो, तों त्याचे मानगुटीस त्याचेंच भूत कसें बसतें, कंसाच्या कुशल मंत्रिमंडळानें नूतन कलायत्राचे धर्मध्वंसक, भक्तिभंजक, श्रद्धाखडक. कारखाने कसे काढले होते, त्यातील माल खपविण्यास अनेक बुद्धिभेदशास्त्री वेतनें देऊन कसे ठेविले होते; व वृत्तिनियम, देवधर्म, यज्ञयाग, उपनयनविवाह इ. सव झूट आहे; साधुसंत, भक्त धूर्त आहेत, स्वैग्वर्तन हाच पुरुषार्थ आहे, असा उपदेश ते कसा करीत होते, नानामतांचा गलबला कोणी पुसेना कोणाला, किंवा गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ अशी स्थिति कशी झाली आहे, वगैरे गोष्टी इतक्या कुशलतेनें वर्णिल्या आहेत कीं आपण हल्लींची एखादी अद्भुतरम्य सामाजिक व राजकीय कादंबरीच वाचीत आहों असें वाटतें. सर्व वासनाचा अहंकार जिरला तेव्हा दुर्वास मुनीवर श्रीहरीची दया झाली व त्याचा उद्धार झाला, तसा वाचकांचाही व्हावा हीच फलश्रुति ग्रंथाची आहे.

समीक्षकानें केवळ स्तुतिपाठच गावयाचे नसतात. ग्रथांतील गुणांप्रमाणें दोषाचेंही कथन त्यानें करावयास पाहिजे, म्हणून पुढें काहीं दोष दाखविले आहेत. प्रथमतः यात मुद्रण दोष पुष्कळ झाले आहेत. पण वाचकास ते; सहज सुधरून घेतां येण्यासारखे आहेत. श्रीगुरु आज्ञा, श्रीअच्युतजी, कामधेनूपय वगैरे ठिकाणीं संधिनियमांकडे लक्ष दिलेलें दिसत नाहीं. भाववाचक प्रत्ययाची द्विरुक्ति दास्यत्त्व सारख्या शब्दांत आढळते. मुद्दत, वायदा, रुकले, बिस्तर, खजाना यांसारखे परकीय शब्द योजलेले दिसतात. मनाचे नाचणें बद्दल नाचणी ( नर्तकी ), दांड बनुनी माझे उरा भोंकीसी ( भोंक पाडतोस ), प्रवाही, ( प्रवाहा बरोबर जाणारा ) असे अप्रयुक्त शब्द योजलेले आहेत. “ चिमणा हा बटु बाळ ब्रह्मचारी ” अशी पुनरुक्तिही पडली आहे. कान्हा याचें संबोधनाचें रूप कान्हो;नद यशोदा बसले; स्मरे, विसरें बद्दल स्मरीं, विसरीं, असे व्याकरण दोषही क्वचित् सांपडतात.

संतसांप्रदयांतील कवि बहुधा कवितेच्या या बाह्यांगाकडे फारसें लक्ष पुरवीत नसतात, हें सर्वांस ठाऊक असल्यामुळें वाचकांनीही अशा दोषांकडे ढळत्या नजरेनेंच पाहावें आणि “ कार्यसिद्धि ते सर्वही। अर्थाच पाशीं ”

ह्या कव्युक्तीकडे लक्ष देऊन, सत्संगसरितेंतील भक्तिरस कवि स्वत: सेवून आणिकास वाटीत आहे, त्याचें त्यांनीं यथेष्ट सेवन करावें अशी त्यांस नम्र विनंति आहे. इतिशम्.

### प्रथम प्रवाह–बिंदु.

#### पद २४ वें. कारण काय रुसाया !

इतुके! कारण काय रुसाया? माझे नयना आड बसाया ॥ ध्रु० ॥
स्थिरचर व्यापुनि, माझे हृदयीं कारण काय नसाया? ॥ १ ॥
संसारामधें मजला फासुनि, तुज तेथें न फसाया ॥ २ ॥
परता पाहसी, बोलसि न मसी, येत मी नाहिं डसाया ३ ॥
म्हणसी ' जवळचि सदा असे मी ' कारण कां न दिसाया ? ॥ ४ ॥
शामसुंदरा! हें तव लपणें वाटे प्रेम डसाया ॥ ५ ॥
माधव-सुत म्हणे दर्शन देई, वाढवि प्रेम रसा या ॥ ६ ॥

२७. प्रश्न—उपासनेस अशौच प्रतिबंधक आहे काय?

उत्तर:—नित्य उपासनेस नाहीं, व भक्तीस नाहींच नाहीं.

श्रीहरि यशोदा संवाद–पद ( राग. काफी. ताल–दीपचंदी ).

ह. का सरसी अति दूरी? असये! ध्रु० ॥
य. काऊ शिवला म्हणुनी बसलें बाहिर मी दिन चारी ।
तुजला श्रीपति! शिवता मजला निंदिति हे संसारी ॥ १ ॥
ह. येरे गरुडा! लवकर येउनि सगळे काऊ मारी ।
असये! भूकचि लागलि भारी. नलगे शीरापुरी ॥ २ ॥
य. थोर अता तू बाल मुकुंदा! सावळिया गिरिधारी ।
हट्ट नको करू, घेउनि खायी तथिल गोड शिदोरी ॥ ३ ॥
ह. दहि तें आंबट, दूधही पाचट, लोणी ओसट भारी ॥
वडा तिखट, पापडही खारट, घेवर देत सिसारी ॥ ४ ॥

\+ \+ \+ \+

गडबड धरणीं लोळण घेई लाघवि हा कंसारी ।
साहत नाहीं तिळभर अंतर नेणे कांहिच थोरी ॥ ५ ॥

शंका संशय शोक मोह मद सर्वहि गुप्तचि चोरी ॥
निर्मल स्नेहें गाजि यशोदा अच्युत- बाळ विचारी ६ ॥

द्वितीय प्रवाह. ३१ श्रीसद्गुरुरहस्याष्टक.

भुजंग प्र. गुरू माउले ! गोड झालीस भारी ।
न बाधे मला विश्व हो कां विखारी ॥
जरी सृष्टि माझे सर्वे दुष्ट सारी ।
परी त्वत्स्मृती संकटें सर्व वारी ॥ ६ ॥

तृतीय प्रवाहः

मुकुंदराजानीं आपलें भविष्य खोटें झालें म्हणून अग्निप्रवेशाचा निश्चय केला.

लावणी ( राग-जोगी. ताल-धुमाळी ).

गुरुसेवारत चाखी अमृत ते देखुनि पंडित,
जाहला महस्त्रधा खंडित।
अहंपणें मत्सर सि मांडित, निजतत्त्वा मांडित।
जाहला पाखडें मंडित॥
चिंता चेते चिता धगधगित, पडे तिथें दुश्चित।
पातला मृत्यू त्या धुंडित॥

अग्निप्रवेशापूर्वी मुकुंदराज रामानंद गुरूच्या दर्शनास आले:—
येउनी गुरुपदीं आदळि आपुले शिरा।
मज खोटें केलें, मरतों आता खरा॥
गुरु म्हणे 'राखिलें सेवेस्तव लेंकरा'।

सेवेसाठीं शिष्यास मरणातून वांचविलें. त्यात तुला मरायचें काय कारण ? असें म्हणून त्याचे शिरावर आपला दंड हाणिला, त्यासरशीं मुकुंदराजास चित्स्वरूप मिळालें.

मार मारिता मरणचि मेलें, ऐसी अच्युत छडी ।
सुता ने कैवल्याचे थडी॥
चरणांनीं या मरण चुके हो तरण भवाचे थडी।
न जावी स्मरणावाचुनि घडी॥ २७॥

\+ + + +

विश्वावसु शबरानें विद्यापतीस श्री जगन्नाथाचा प्रसाद दिला:—

प्रसाद हरिचा मिळे, दुरित मोह चिंता गळे।
प्रपंचपट मावळे, मन हरीपदाब्जीं वळे॥
निमे विषय-क्षुल्लता, हृदयि भक्तिविद्युल्लता।
समाधि सहजी सता-सह कथमधे डुल्लता॥ २० ॥ २१।३

## चतुर्थ प्रवाह-४३ चंद्रकला-राधा संवाद.

चंद्रकला:–बोले चंद्रकलाधरूनि हरिला मी मंदिरीं आणिला, ।
सौगंधे उटिला, फुलें सजविला कस्तूरिनें रेखिला॥
नानाकाव्यकलापचातुरिकला मी वर्णिला सेविला, ।
राधे! लाभ मला असा. तरि तुला तो कोणता जाहला?॥ ३ ॥

राधा:—बाई! धन्य तुझी परी, मम घरीं येई न जाई हरी।
कुंजीं एकसरीं धरी मज करीं, नेणों निशी वासरीं॥
नेणें मी कुसरी कला, कशिंदरी मी आहिरी पामरी।
जें जे नाथ करी, स्मरी न विसरी, दासी तयाची खरी॥ २ ॥
चंद्रकलेच्या कलाचतुर अंत्रपेक्षा राधेचाच आत्मयोग श्रेष्ठ.

## ८१ गौळी व महाभारत.

गौळी दादाचा शोध अपूर्व आहे. पद्य:–

गौळी ठाकत ओणवा, हनुवटी ठेवूनि काठीवरीं, ।
ऐके भारत, अर्थ मात्र नुमजे, एकाग्र दृष्टी खरी. ॥
नेणे एक उनाड पोर बसलें येऊनि पाठीवरी. ।
" होता भारतभार चार मण!" हें जाऊनि सांगे घरीं॥

तात्पर्य—चाले साधक श्रीहरीस भजण्या होऊनिया सोवळा।
प्रेमावाचुनि वित्तवैभव, क्रियापांडित्य भाडी कळा॥
आली गप्त घमंड, नेणत कशी धामीण वेष्टी गळा।
सारे वर्म चुके, परी म्हणतसे ' सर्वांत मी आगळा॥ २ ॥

# प्रकरण ७ वें.

## ह. भ. प. संतकवि दासगणू महाराज ( स. १८६३ ? )

बघूनि बहु ज्यांचिया नव रसाळ काव्याप्रति
महीपतिच जन्मला फिरुनिया गमे संप्रती ॥ दे. ल. महाजन.

ह्यांचें मूळ नांव गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे. पंढरपुरीं विठ्ठलचरणीं देह अर्पण केल्यापासून " दासगणू " हें नांव त्यांनीं धारण केलें. हें शाण्डिल्यगोत्री कोंकणस्थ ब्राम्हण आहेत. संत कवींनीं मराठवाड्यांत सुमारें ६।७ शतकें प्रज्वलित ठेविलेल्या ज्ञानज्योतीची परंपरा आजतागायत चालू ठेवण्यासाठींच कीं काय विद्यमान संतश्रेष्ठ दासगणू महाराज आपली मायभूमीही सोडून इकडे धावत आले आणि पुराणेतिहास प्रसिद्ध अशा पवित्र नंदिग्रामीं ( नांदेड ) कायमचे राहिले आहेत असें वाटतें. नांदेडास त्यास धोंडो दत्तात्रय याचा आश्रय मिळाला. याचें चरित्र स्वतंत्र रीतीनें अजून प्रसिद्ध झालेलें नाहीं. तरी पण त्यांनीं "भक्तलीलामृत" ह्या ग्रंथाच्या शेवटच्या म्हणजे ४५ व्या अध्यायात स्वतःसंबंधानें बरीच विस्तृत माहिती सांगितली आहे. " संतलीलामृत " व " भक्तिसारामृत " यात स्वनामाचा जन्मभूमीचा, पितराचा गुरुचा, कुलदेवतेचा व काकामामा याचा उल्लेख आढळतो. त्याचप्रमाणें 'शिष्यबोध' या लहानशा ग्रथांत त्यांच्या शिष्यांची माहिती मिळते. पण "श्री पामष्टी भावार्थदीपिकेत" प्रकाशक विठ्ठल लक्ष्मण सुबंध यानीं त्यांचें अल्पचरित्र दिलें आहे. तें थोडक्यांत असें:----

नगर जिल्ह्यात आकोळनेर गावीं पौष शु० ११ ( शके ? ) त्याचा जन्म झाला. घराण्याचें मूळ गाव पंढरपूर तालुक्यातील करकंब हें होय. अझून ही त्याचें काहीं भाऊबंद करकंब मोडनिंबकडे राहातात. सावित्री व दत्तोपंत हीं त्यांची मातापितरं होत. घरची श्रीमती असूनही तिचा विशेष उपयोग त्यांस झाला नाहीं. प्रथम नगर येथेंच पोलिसखात्यात त्यांनीं १३ रुपयावर कॉनस्टेबलची नोकरी पत्करली. १० वर्षांच्या अनुभवानतर तिचा वीट येऊन ती त्यांनीं सोडून दिली. नोकरींत असतांना नानासाहेब चांदोरकर ह्या

वरिष्ट अम्मलदारांच्या संगतीनें त्यास लावण्याची गोडी लागली व लावण्या पोवाडे रचण्याचा उपक्रम त्यानीं सुरू केला. आपल्या लावण्यांच्या नादामुळें एका शाळा मास्तरास दंड झाला हें ऐकून त्यानीं केलेलें सर्व श्रृंगारिक कवन फाडून टाकिलें. एक नाटकही त्यानीं लिहिलें होतें. पण त्यास प्रसिद्धीचा योग आला नाहीं. ह्याच वेळीं त्यानीं " जलददूत " नांवाचें एक काव्य लिहिलें. " महाराणी व्हिक्टोरिया यास निरोप " हा त्याचा विषय होता. एल्फिन्स्टन व ॲस्टन याच्यावरही स्तुतिपर कविता त्यांनीं केल्या होत्या. पुढें एकदा नानासाहेबांबरोबर त्यास शिर्डीच्या प्रसिद्ध सांई बाबांच्या दर्शनाचा लाभ झाला तेव्हां त्याच्या ठिकाणीं त्याची अढळ भक्ति जडली व त्यांच्याच आज्ञेनें नोकरी सोडून देऊन कीर्तन व कवित्व करण्यास त्यानीं आरभ केला. साईबाबांसंबधीं त्यानीं अनेक स्थळीं अत्यंत आदरयुक्त उद्गार काढले आहेत:—

अगाध शक्ती अघटित लीला तव सद्गुरुराया ।
जडजीवातें भविं ताराया तू नौका सदया ॥ ध्रु० ॥
वेणी माधव आपण होऊनि प्रयाग पद केलें ।
गगायमुना द्वय अंगुष्ठीं प्रवाह दाखविले ॥ १ ॥
कमलोद्भव कमलावर शिवहर त्रिगुणात्मक मूर्ति ।
तूंचि होऊनि साई समर्था विचरसि भूवरती ॥ २ ॥

दासगणूनीं असें त्याच्या चमत्काराचें वर्णन केलें आहे एवढेंच नव्हे, तर त्यांस ते देवाचा अवतारच मानीत असत. कीर्तनें करण्यास सुरवात केल्यापासून त्याची पुष्कळ प्रसिद्धि झाली. अंगीं उत्तम कवित्व असल्यामुळें त्याचीं सर्व आख्यानें प्रेमळ, रसभरित, सालंकार व नाविन्यपूर्ण अशीं झालीं आहेत. त्यामुळें तीं फार परिणामकारक होतात. अद्यून मुंबईपुण्यासारख्या ठिकाणींही त्यांच्या कीर्तनावर लोकांच्या उड्या पडतात. सद्धर्माचें व भक्तिमार्गाचें उत्तम शिक्षण समाजास कीर्तनद्वारा देण्याचं व्रत त्यांनीं अद्यून अव्याहत चालविलें आहे. हरिकीर्तनाची बिदागी कधींही ते घेत नाहींत. कित्येक वेळा त्यांनीं हजारों रुपयाची बिदागीही नाकारली आहे. त्यानीं कीर्तनोपयोगी अशीं सुमारें ४०।५० आख्यानें रचलीं आहेत.

त्यांत बहुतेक सर्व जुन्या संतांचीं चरित्रें व काहीं पौराणिक कथा असून अहिल्याबाई होळकरीण, भर्तृहरी व टिळक ह्यांच्या चरित्राचाही समावेश त्यांत झाला आहे. त्याच्या कीर्तनकौशल्याबद्दल काहीं विद्वानांनीं पुढील प्रमाणें अभिप्राय व्यक्त केले आहेत:—

भक्तिप्रेमें गाऊनि ज्यानें आकळिले प्रभुला । (बा. रि. देव.)
संतकुळींचा भाट तुझा हा "दासगणू" आला ॥
शतशा व्याख्यानांनीं जो का परिणाम अल्पमा न घडे ।
एकाच कीर्तनानें तुमच्या होतो मला दिसें उघडें ॥ (द. ल. महाजन)

त्यांचे आचरण अत्यंत उदारतेचें व विश्वप्रमाचें असून ते फार कर्मठ व नियमनिष्ठ आहेत. त्याच्या कुटुंबाचे नाव रयताई. त्याना मूलबाळ कांहीं नाहीं. त्यांनीं दामोदर ऊर्फ दामुअण्णा आटवले यांस पुत्रवत् वाढविले. ते उत्तम गवई असल्यामुळें त्याच्या कीर्तनास उत्तम साथ करीत. त्यामुळें कीर्तनास फार रंग चढे. तसेंच त्याचे काव्य लिहिण्याचेंही ते काम करीत असत. पण ते दुर्दैवानें शके १८४६ मध्ये वारल्यामुळें दासगणूचा उजवा हातच गळून पडला!

वाङ्मय सेवा:—त्यानीं आजपर्यंत लहानमोठे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. भक्तलीलामृत, संतकथामृत, भक्तिसारामृत, अमृतानुभव, भावार्थमंजरी, गोदामहात्म्य, विष्णुसहस्रनाम बोधिनी, श्रीरामसृष्टी भावार्थदीपिका हे आठ ग्रंथ महत्त्वानें किंवा आकारानें मोठे आहेत. मनाचे श्लोक, सुभाषितशतक, ईशावास्य भावार्थबोधिनी, शिष्यबोध, व स्फुट पदें हे पांच लघु ग्रंथांत मोडतील. टिळक पोवाडा, रंगपंचमीचा पोवाडा, उमाचा पोवाडा व मिठाचा पोवाडा असे चार पोवाडे त्यांनीं केले आहेत. यापैकीं टिळक पोवाडा सरकारजमा झाला आहे. निरनिराळ्या देवदेवतावर ७ स्तोत्रं व अठरा अष्टकें त्यानीं लिहिलीं आहेत. ही रचना अगदीं किरकोळ स्वरूपाची आहे. ह्याशिवाय वर उल्लेखिलीं कीर्तनोपयोगी ४६ आख्यानेही त्यानीं रचलीं आहेत. अझूनही ग्रंथरचना चालूच असून "श्री एकनाथ चरित्र" नुकतेंच प्रसिध्द झालें आहे. अशारीतीनें त्यानीं आजपर्यंत अदमासें एक लाखाहून-अधिक कविता केली आहे. इतकें अफाट काव्य अलीकडे आंग्लाईत किंवा मोगलाईंत कोणत्याहि एका कवीनें केलेले नाहीं.

ते आधुनिक छोटे दासोपंत होत. तेव्हां ग्रंथसंख्येनें व पद्यसंख्येनें त्यांस सांप्रतच्या कवींत प्रथम स्थान दिलेंच पाहिजे. जुन्या वळणाच्या धार्मिक व भक्तिमार्गी काव्यांत गुणानेंही त्यांचें काव्य बऱ्याच श्रेष्ठ दर्जाचें ठरेल. कारण तें भक्तिरसानें ओथंबलेलें असून उपमादृष्टान्तादि अलंकारानीं नटलेलें आहे. तात्त्विक प्रतिपादनानें त्यास भारदस्तपणाहि प्राप्त झाला आहे. तें जुन्या वळणाचें असलें तरी नवविचारानीं मंडित आहे. परमार्थप्रवण असून ही तें मनोरंजक झालें आहे. अशा या प्रचंड काव्योदधीचें मंथन करून त्यातील अमूल्य रत्नांचें बरवर दर्शन करून देण्यास किंवा त्यातील अमृताचा आस्वाद अशतः चाखवण्यास एक स्वतंत्र ग्रंथच पाहिजे. म्हणून प्रस्तुत स्थळीं कांहीं ग्रंथाचा स्थूल परिचय, तर कांहींचा अल्पोपन्यास, कांहींच विहंगमालोचन तर कांहींचा केवळ नामनिर्देश, ह्या पद्धतीचा अवलंब करावा लागला आहे.

स्तोत्रें:–ग्रंथविवेचनात सोप्याकडून कठिणाकडे लहानाकडून मोठयांकडे जाणें सोईचें वाटतें, म्हणून वरील ग्रंथांचें विवेचन व्युत्क्रमानें पुढें दिलें आहे. सात स्तोत्रांत अंबिकास्तोत्र सप्तशृंग गडावर आहे. ( ओ. १३५. ) गोदा, चंडिका व दत्त हीं स्तोत्रें नित्यपाठासाठीं रचलीं आहेत. पांडुरंग स्तोत्रात भगुणलीलाचें वर्णन आहे. ( १२ ) श्रीवेंकटेशस्तोत्रात त्या देवाची पांडुरंगाशीं अलंकारिक पद्धतीनें तुलना केली आहे. संतस्तोत्र २२५ ओंव्यांचें असून त्यात प्राचीन अर्वाचीन, अखिलभारतीय, सर्व संतास भाषा व जाति यांचा भेद न करितां, अक्रमानें नमन केलें आहे. व सतत हरिभजन घडो म्हणून वरदान मागितलें आहे. कवि म्हणतो मी या स्तोत्ररूपीं देव्हाऱ्यांत अवघे संत बसविले आहेत. ॥ मराठीरूप पागाऱ्याचा । ऱ्यां देव्हारा मांडिला साचा । गीर्वाणरूप चंदनाचा कोठून आणू बापहो ॥८८॥ तरी तो मान्य करून घ्या अशी त्यांची नम्रविनंति आहे. नंबरी भजनांत पांडुरंगाची पदें आहेत त्यांत ॥ श्यामसुंदरजी आयो दरशनमा । मथुरा गोकुल छोडीने ॥ हें गुजराती व ॥ सब देवनका देव विठोबा है पंढरीमें खडा ॥ हें हिंदी अशीं पर भाषतील पदें आलीं आहेत. अष्टकें सर्व देवदेवतांवर आहेत.

पोवाडे:—पोवाडयांत रंगपंचमीचा पोवाडा हा ऐतिहासिक आहे. सवाई माधवरावाच्या रंगाचें वर्णन बखरकारांनीं व शाहिरांनीं फारच उत्तम केलें आहे. त्यावरूनच हा पोवाडा रचण्याची स्फूर्ति कवीस झालेली आहे. तें वैभवशाली शहर पहावें अशी त्यास इच्छा झाली. म्हणून तें पहाण्यास तो गेला. पण त्याला काय दिसले ? ज्या शहरामध्यें रंग उडाला तेथ उडे सांप्रत माती ॥ असें पाहून तो खिन्न झाला. पुढें नवें पुणें व जुनें पुणें यांतील पोषाक, पराक्रम, चालीरीति यांतील विरोध पाहून त्यानें दुःखोद्गार काढले आहेत. स्त्रियांच्या नव वेषभूषेवरही त्यानें छिछोरपणाचा शिक्का मारला आहे. चहा, सोडा, लिंबू व पावभिस्कुटें यांचीं दुकानें पाहून त्यास कसेसेंच वाटतें. दुर्भिक्ष, प्रौढविवाह, विभक्तकुटुंबपद्धति, स्त्रीपुरुषमिश्र समाज, टेनिस—क्रिकेट खेळ, हातावरील घडयाळें, पुनर्विवाह, वगैरे गोष्टी समाजात प्रचलित झालेल्या पाहून शेवटीं तो उद्गारतो ॥ ही अशी दशा कां केलिस नारायणा ॥ अशी पुण्याची विपरीत स्थिति पाहून कवि म्हणतो—

हे मत्कविते ! तुला न नृप वैभव तें वर्णाया !
मिळेल बाई ! गोदातटीं तूं चाल हरीचे गुणगाया ॥
फंदि प्रभाकर जोशीबुवानीं स्वराज्य रंगासी लुटिलें ।
दास गणूला परवशतेच्या बेरंगा बघणें आलें ॥१०॥

यांत कवीचा पूर्व वैभवाचा पूर्व पराक्रमाचा व स्वराज्याचा अभिमान व्यक्त होत असून परवशता व परकीय संस्कृति याबद्दलची त्याची हळहळ प्रतिबिंबित झाली आहे.

**शिष्य बोधः—**

आता लघु ग्रंथांकडे वळू. "शिष्य बोध" हें एक चिमुकलें चोपडें आहे. याच्या १२६ ओंव्या असून त्यात दासगणूंनीं आपल्या पट्टशिष्यास उपदेश केला आहे. संस्कृत प्राकृत संत कवींस प्रारंभीं जें नमन केलें आहे, त्यांत वामन, मोरोपंत रामजोशी, अनंतफंदी वगैरे आले आहेत. नंतर त्यांनीं साईबाबास व वामनशास्त्री इस्लामपुरकरास गुरु म्हणून वंदन केलें आहे. परशुरामक्षेत्रांत जन्मलेला आपला पट्ट शिष्य दामोदर वामन आठवले, यास हा उपदेश दासगणूनीं केला आहे. हा पोरका व दासगणु

निपुत्रिक, तेव्हां त्याचा प्रतिपाळ यांनींच केला. उपदेशात ते सांगतात. " पूर्वी माझे तीन शिष्य झाले. तुळशा, पंढरीनाथ व सीता. ते आज्ञाधारक होते. पण त्यांचा संसाराकडे ओढा. परमार्थाकडे त्याचें लक्ष लागेना. तुला प्रपंच आवडेल तर खुशाल कर. तो नेटकाही कर. पण त्यात प्रवाहपतिता-सारखा रहा. तारुण्यांत जपून वाग. स्वस्त्रीपरायण हो. नीतीनें चाल, शृंगा-रिक भाषण वर्ज कर, व्रतनेम धर, नाच तमाशे टाळ. ॥ राजा राजसत्तेचा । करूं नये अव्हेर साचा । कां कीं अंश विष्णूचा । आहे राजा प्रत्यक्ष ॥९७॥ राजद्रोह केल्या जाण । कोप होईल विठ्ठलाचा ॥९९॥ पराचिया धर्माची । निंदा करू नये साची । कोणत्याही जातीची । अवहेलना करूं नये ॥१०५॥ तू माझी म्हातान्याची काठी आहेस, माझा वारस तूच. मी रागावलों तरी माझा जीव तुझ्या कल्याणासाठीं तिळतिळ तुटतो तेव्हा तू त्याबद्दल कधीं विषाद मानू नको. श्री विठ्ठल माझ्या मनीं शिरून ही बोधवाणी तुला वदत आहे. तेव्हा त्या बोधाप्रमाणे वर्तन ठेव हं." अर्थात् हा उपदेश प्रापंचिकांस व परमार्थ्यांस दोघांसही घेण्यास योग्य असाच आहे. त्यांतील परधर्म-सहिष्णुता, राजनिष्ठा व विश्वबंधुत्व हीं तत्त्वें विशेष लक्षात ठेवण्यासारखीं आहेत. मात्र ही म्हातान्यांची काठी यमाजी पंतानीं श. १८४६त हिरा-वून नेल्यामुळे त्याच्या आशेचा डोलाराच समूळ कोसळून गेला !

सुभाषितशतकः—या १०० श्लोकात व्यावहारिक बोध, क्वचित अर्था-तरन्यासानें, क्वचित् सरळ व केव्हां अन्योक्तीनें केलेला आहे. त्यांत कांहीं नित्य सत्यें ही सुभाषित रूपानें सांगितलेलीं आहेत. उ. जे थोर साहति मदोदित ते छळाला ॥४॥ भलें कधि न होय तें नियम टाकुनी वर्तता ॥७॥ भिन्नत्व तें दिसुनि ये जगिं जाग जागीं ॥ ८ ॥ असत्संगानें ये सहज कवणालाहि लघुता ॥ १३ ॥ जन्मस्वभाव मुळिंचा नच पालटे तो ॥१४॥ ना दे महत्त्व महदाश्रय हीन दोषा ॥२०॥ एकास इष्ट दुसऱ्यास अनिष्ट तेंच ॥३०॥ निर्द्रव्यता कठिण ही अवघ्यात मोठी ॥४०॥ वेळेवरी कधिं न होय बरी तयारी ॥४८॥ कोणालाहि न वारितां खचित ये लल्लाट रेषा खरी॥५१॥ मोठे-पणाची नच चाड प्रेमा ।५२।शितें सरुनि गेलिया सहज दुष्ट होती भुतें ।६०। हीं वचनें अर्थपूर्ण असून सहज तोंडीं बसण्यासारखीं आहेत. त्यात व्याव-हारिक अनुभव साठविलेला आहे.

वामनानें भाषांतरित केलेल्या भर्तृहरीच्या श्लोकाची दाट छाया यांतील कांहीं श्लोकावर पडलेली दिसते. उ. परंतु खल चित्त तें वळवितां कदापी नये ॥ २७ ॥ विद्या नय, शौर्य बाहुस पहा, यावीण सारें वृथा ॥ ६८ ॥ षड्रिपूचें दमन करावें, वासना, तामसवृत्ति, हाव, दुर्जनसगति यांचा त्याग करावा; क्षमा चांगली पण दुष्टावर दया केली तर तो सर्पाप्रमाणें उलटतो. इ. स्त्रियासंबंधींही कवीनें आपले विचार बरेच ठिकाणीं प्रगट केले आहेत. उत्तम कांतेनें पतिकोपीं नम्र असावें, न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति, मात्र तिचा त्याग करू नये, तला नेहमीं रंजवावें, तिला ताडन करू नये कारण कांच घणानें ठोकून कधीं वाढली आहे काय? त्यास नेहमीं प्रेमानें वागवावें, इ. अबलांवरील पुढील श्लोक त्यांतील कोटीमुळें व सुंदर विरोधाभासामुळें वाचनीय आहे:—असून अबला परी प्रबलशा नरा जिंकिती। करीं नमुनि शस्त्र तें वरिवरी सरांप्ररिती॥ असह्य शर तें; नये जखम ती कुणा दाविता। शुकाविण न जाहलें कुणि समर्थ त्या जिंकिता ॥ ५३ ॥ हा श्लोक पुढील संस्कृत श्लोकाची सहज आठवण करून देतो:—नूनं हि ते कविवरा विपरीत बोधाः। ये नित्यमाहुरबला इति कामिनीस्ताः॥ याभिर्विलोलतरतार कदृष्टिपातैः शक्रादयोऽपि विजितास्त्वबलाः कथं ताः॥ यांतील सांकेत्य विडंबनाचा मोठा गमतीचा व उपरोधगर्भ एक श्लोक देऊन हें सुंदर नीति बोधप्रद लघु काव्य वाजूस सारूं:—

केसानीं वधुनी श्याम अपुलें कृष्णत्वहि त्यागिलें।
लक्षावें विपयास ना म्हणुनि ते चक्षुहि मंदावले॥
ताठा टाकुनि वाकली बघ तनू सर्वांस वृद्धाश्रया।
चित्ता! टाक अता तरी भटकणें शोभे न जें या वया॥ ७७ ॥

यावरून जसें ओवीछंदावर तसेंच अक्षरगणवृत्तावर ही कवीचें प्रभुत्व चांगलें होतें असें दिसतें.

**स्फुट पदें:**—रा. गणेश अनंत सराफ यानीं संतचरित्रात्मक आख्यानांत इतस्ततः विखुरलेलीं पदें या ग्रंथात सकलित केलीं आहेत. पहिल्या भागांत ५६ व दुसऱ्यात ५१ पदें असून शेवटीं दोन विठोबाच्या आरत्या दिल्या आहेत. पहिल्या भागांत पुष्कळ स्तवनपर पदें आहेत. २१ वें पद्य फटका आहे. त्यात आर्य मही्ची सध्याची विपन्नावस्था वर्णून, लोकांच्या

अविचाराच्या राहणीवर फटके ओढलेले आहेतः–पोटभर अन्न नसलें तरी शनवार बुधवार नाटकाला, व सिनेमा रेसिसना गर्दी होते, कृतिशून्य बोलघेवडया वक्त्याचा सुळसुळाट झाला आहे, अंतःकलह, दुही स्त्रीपुरुषाचे टेनिस वगैरे खेळ, फ्रेंच कट मिशी, किंवा साफ क्षौर, पुरुषाचे भाग, यांमुळें समाजात स्त्रैणपणा व दुर्बलता पसरली आहे, हें पाहून कवि म्हणतो–देवा निजू नको जागा हो आणि आर्य महीचें रक्षण कर. येथें रंगपंचमीच्या पोवाड्यातील विचार पुनरुक्त झाले आहेत.

२३ ज्यात दांभिक व बोवाबाजीवाले यापासून मला दूर ठेव असें त्यानें देवास सांगितले आहे. ५०,५१ हीं दोन हिंदी पदें "रहम नजर करो अब मोरे साई" माई यावावर आहेत. तर ५५,५६ हीं डाकूरच्या गिरिधारीवर गुजरातींत केलीं आहेत. दुसऱ्या भागात पदें, फटके, लावण्या वगैरे असून तीं सर्व बोधपर आहेत. सद्गुणाचें आचरण करावें, दुर्गुणाचा त्याग करावा, ढोंगधत्तुरेवाल्यापासून दूर रहावें, हरिनाम सेवन करावें, असा त्यांत उपदेश केलेला आहे. ४६।४७,४८।४९।२१ हीं पदे हिंदी व ५० वें गुजराती आहे. सद्यःस्थितीवरील पद्यात कवीनें आधुनिक सुधारणांवर बरेच कोरडे उडवले आहेत. मागील एकदोन ठिकाणच्या ओझरत्या उल्लेखानीं समाधान न झाल्यामुळेच की काय त्यानें ह्यांत त्याचा सामग्र्यानें समाचार घेतला आहे. पहिल्याप्रथम पाप वाढल्यानें सर्व आपत्ति देशावर कोसळल्या आहेत, असें तो सांगतो; व नंतर आपत्तींची मालिका गुंफितो. प्लेग, पटकी, इन्फ्लुएन्झा मधुमेह हे रोग बोकाळले आहेत. तरुणाना मलशुद्ध्यर्थ रोज त्रिफळा फाकावा लागतो तर प्रदरादि रोगामुळें तरुणींचीं अर्भकें हाडाचे सापळे बनलेले आहेत. आवर्षणामुळे तृणधान्याचा अभाव, वाऱ्यानें उडणारीं खिल्लारें, अग्निहोत्र्यास उपास तर व्याहिजावयाम शिरापुरी, इकडे देवळें नादुरुस्त होत आहेत पण तिकडे "ब्रदरहुडचे हॉल" टोलेजंग उठत आहेत. कथापुराणें ओस पडलीं आहेत तर नाटकें सिनेमात बसावयास जागा नाहीं. श्रुतिस्मृति, भारत, भागवत व ज्ञानेश्वरी याचा अव्हेर, तर भाकड कादंबऱ्याचे स्तोम, संतास नाकें मुरडतात तर सवाई गंधर्वांस आणावयास टांगा पाठवतात, स्नानसंध्येला फुरसत नाहीं, पण नेकटाय टायलेटला तास तास पुरत नाहीं. अतिथीला अन्न नाहीं पण गॅदरिंगमध्ये

पंचपक्वान्न. तेथें सोडा लेमन ढसाढसा पितात नी व्हिस्कीच्या बाटल्या फोड तात. हें झालें पुरुषांचें वर्तन. स्त्रियांचा नखराहि वाढतच आहे. प्रेम पळालें, द्वेष दुणावला, अस्पृश्यांकडे कोणी बघत नाहीं, सत्याचा लोप झाला. अशा रीतीनें सर्व समाज रसातळाला चालला. दूध पचत नाहीं म्हणून कोको, कॉफीवर भर, मग शक्तीसाठीं कॉडलिव्हर ऑइलचें टॉनिक. इ......समाजाचें असें भेसूर चित्र कवीनें पुढें मांडलें आहे, व पुण्यार्जन, चातुवर्ण्यरक्षण, सन्मार्गाचरण, पूर्वजस्मृति वगैरे उपाय त्यांवर सुचविले आहेत. शेवटीं कवि काकुळतीनें म्हणतो कीं मी शपथपूर्वक सांगतो कीं, " मी उगीच कोणाचें उणें काढलें आहे असें नाहीं. मीही तुमच्यांतील एक आहे, आपलें वर्तन बिघडलें आहे तें सुधारावें म्हणून बोललों आहे. तेव्हा शेवटची विनंती हीच कीं दुष्कर्म टाकून पंढरीचा विठ्ठलराजा भक्तीनें आपलासा करा." ¹

येथें वर्णिलेली समाजाची दु:स्थिति जरी कोणासही पटण्यासारखी असली तरी तिची कारणमीमांसा व तिजवरील उपाययोजना, मात्र सर्वांसच पटेल असें नाहीं. तथापि तिची जाणीव करून देऊन कवीनें सर्वांसच उपकृत केलें आहे खरें.

## भक्तलीलामृत.

हा भक्तलीलामृत ग्रंथ कल्पद्रुम । भक्तलीला हीं फळें उत्तम ।
पद्यरचना ही शोभायमान । पर्णें साच तयाचीं । १–५०

हा ग्रंथ कवीनें सीता बेद्रे या बाईस सांगितला आहे. प्रत्येक कथेंत तिचा उल्लेख त्यानें केला असून शेवटीं तो म्हणतो. ॥ सिते हें भक्तलीलामृत । भवसिंधूचें तारूं सत्य । तें लोटून भवाब्धींत । जाऊं पैल तटाला ॥ ४५।१३४ हा ग्रंथ रचण्यास त्यानें का घेतला ह्याचें कारणही त्यानें शेवटच्या अध्यायांत तिला सांगितलें आहे. तो म्हणतो " एकदां चांदोरकरां बरोबर मी संत साईच्या दर्शनास गेलों होतों, तेव्हां त्यांनीं चांदोरकरांस म्हटलें तू संतांस मेजवानी दे पण त्यांस आमंत्रणें गणूनें द्यावीं ". ह्यांतील

---

¹ ह्या ग्रंथलेखनाच्या स्थलकालादिकांचा उल्लेख अखेरीस नाहीं. जगद्धितेच्छु छापखान्यांत शके १८२८ त छापला असं मूळ पृष्टावर आहे.

अर्थ प्रथम माझे ध्यानांत आला नाहीं. पण मी संत चरित्रें लिहावीं असा त्याचा गर्भित अर्थ आहे, ही गोष्ट पुढें मला चादोरकरानीं सांगितली. त्या प्रमाणें मी गुर्वाशेवर भिस्त ठेऊन अपात्र तरी, लेखनास सुरवात केली. पुढें माझी जामखेडास बदली झाली. तेथील रंगेल मंडळींत रंगल्यामुळें ग्रथाचें काम अर्धवटच राहिलें. पण पुन: साईच्या प्रेरणेनें तें हातीं घेऊन पुरें केलें. त्यांत कवीनें आपली पूर्ण वंशावळ सीतेस सांगितली आहे. आप्पासाहेब—एकनाथ—दत्त—दासगणू. अशी वडिलांकडून व आप्पाराव—सई—दासगणू अशी मातेकडील वंशावळ दिली आहे. दोहोंकडील कुलें उत्तम व श्रीमंत. पण गणूस त्याचा उपयोग झाला नाहीं. ॥ माझी घरात किंमत। आहे पोतेऱ्यापरी सत्य। म्हणून मी अनाथ झालों. आप्तानीं मला आव्हेरलें तरी माझ्या विठ्ठलानें मला पदरांत घेतलें, असें तो स्पष्ट सांगतो.

देवदेवताम व गुरु ज्ञानार्क, ज्ञानघन, पंडित वामनशास्त्री इस्लामपूरकर यास वंदन करून महिपतीनें वर्णिलेल्या संतांव्यतिरिक्त अर्वाचीन संताची चरित्रें कवीनें गाईलीं आहेत. ह्या ग्रथाचे ४५ अध्याय असून ओंवीसंख्या ५६९८ आहे. प्रथमच महिपतीचें चरित्र देऊन कवीनें पूर्व संतचरित्रकाराचें ऋण फेडिलें आहे. चरित्र वर्णनाची ह्याची पद्धति सामान्यत: अशी आहे कीं वर्ण्य व्यक्तीचें स्थळ काळ, मातापितरें, बालपण, परमार्थपरता, गुरु-लाभ, गुरुप्रसाद व सिद्धता याची माहिती प्रथम द्यावयाची नंतर सिद्धाव-स्थेंत केलेले चमत्कार, सांगावयाचे. आणि ते सांगताना ज्याचा ज्यांचा त्या साधूशीं संबंध आला असेल त्यास त्याचेकरवीं, प्रसंगानुरूप, धर्म, नीति, आत्मानात्मविचार, भूतदया, परोपकार, विश्वबंधुता, व्यावहारिक बोध, सगुणभक्ति वगैरेंचें सुलभ ज्ञान देऊन त्यास सन्मार्गास लावावयाचें. ह्या गोष्टींच्या प्रतिपादनात मनोरंजकता साधण्यासाठीं, पर्वत, नद्या, ऋतु, रात्र, वनें, वगैरेंचीं वर्णनें करावयाचीं. मधून मधून चटकदारपणा आण-ण्यासाठीं, लोकव्यवहार, व जनस्वभाव यांवर मजेदार चुटके द्यावयाचे आणि भक्ति, करुण, वत्सल, इत्यादिपैकीं प्रसंगोचित एखाद्या रसाचा अविर्भाव करून त्यास रसाळपणा आणावयाचा; व शेवटीं साधूच्या समाधि प्रसंगाचें वर्णन करून त्याच्या शिष्य प्रशिष्यांची माहिती देऊन चरित्र पूर्ण कराव-याचें. ही माहिती काल्पनिक नसून कवीनें जागोजाग जाऊन चौकशी करून

अगर ग्रंथद्वारें मिळविली आहे. ज्या ठिकाणीं असा विश्वसनीय आधार मिळाला नाहीं त्या ठिकाणीं त्यास दंतकथेवर भागवावें लागलें आहे. पण अशी स्थळें फार विरळा. कित्येक ठिकाणीं तर त्यानें माहिती देणारांची व ग्रंथांचीं नावें दिलीं आहेत. आणि कित्येक ठिकाणीं तर तो असें सांगतो कीं मजवर विश्वास नसेल तर अमक्या तमक्यानें केलेलें चरित्र वाचा (उ. तोतारामकृत गोविंद चरित्र पहा. अ. अ. १७). त्यामुळें हीं चरित्रें केवळ चमत्कारपुराणें झालीं नसून त्यास ऐतिहासिक मूल्य आलें आहे. म्हणूनच संतवाङ्मय असूनही तीं वाचनीय झालीं आहेत.

ह्या ग्रथांत सुमारें ४०।४५ संतांचीं वर्णनें आलीं असून त्यांत पुढील प्रमुख आहेत. महिपतिबोवा ताराबादकर, चंडीराम कवाडकर, सखाराम बोवा अमळनेरकर, माणिक प्रभु हुमणाबादकर, खुशालबाबा रंगारी, यशवंतराव देवमामलेदार, नरसिंहसरस्वती, शिरडीचे साईबाबा, अक्कलकोटचे स्वामी, श्रीमती बहिणाबाई, नानावली, बाळकृष्णबोवा, शेखमहमद, इंदुरणीचे कडु महाराज तर्ली; इ. पुण्याचे काळबोवा, भाबुरड्याचे जगली महाराज, ग्वाल्हेरचे शीलनाथ, व हुबळीचे सिद्धारूढस्वामी वगैरे संतांचा केवळ नामनिर्देश केला आहे. अर्थात् इतक्यांची चरित्रविषयक माहिती येथें देणें अशक्य व अनावश्यकही आहे. म्हणून ह्या ग्रथांत प्रसंगोपात्त कर्त्यानें प्रगट केलेले विचार व ग्रथाचें सामान्य धोरण वगैरे गोष्टींचेच दिग्दर्शन करण्याचें योजिलें आहे.

संतचरित्रग्रथांत हा ग्रंथ पहिलाच असल्यामुळे कवीनें ह्यांत संसार, पुरुषार्थ, पुरुषधर्म, स्त्रीधर्म, व्यवहारनीति, बद्ध, शब्दपंडित, साधक, सगुणोपासना, कर्म, भक्ति, योग, ज्ञान, आत्मानात्मविचार वगैरे गोष्टी प्रामुख्यानें प्रतिपादिल्या आहेत. त्यांचें थोडक्यांत अवलोकन करूं. संसार निःसार त्यांतून मला सोडवा असें जेव्हा चांदोरकर साईबाबास म्हणाला तेव्हा त्यानीं उत्तर दिलें:—अरे संसार मलाही आहे. कोणी त्यांतून सुटला नाहीं. मात्र त्याचीं रूपें अनेक आहेत. शरीरधर्म इंद्रिय मनोव्यापार हा सर्व संसारच आहे. हें बंधन कोणास तुटलें नाहीं. दारापुत्रादि बाह्य संसारास त्रासून रानांत गेलास तरी हा संसार सुटत नाहीं. तो तुझा तूंच निर्माण केला आहेस. प्रारब्धाप्रमाणें येथें उत्तम–मध्य–नीच योनि अगर

अवस्था प्राण्यास प्राप्त होते. त्याप्रमाणें सुखदुःख मिळतें. आतां सुखदुःखानाच कंटाळला असशील तर तीं खरीं नाहींत. ती भ्रांति आहे, हे मनाचे तरंग आहेत. तेव्हां षड्रिपु जिंकलेस कीं सुखदुःख निमालेंच समज. खरें सुख म्हणजे मुक्ति. व दुःख म्हणजे जन्ममरणाचा फेरा. तेव्हां प्राप्तस्थितींत समाधानानें रहावें. सवर्त्तांत सज्जनांशीं नम्रता, दुर्जनाशी कठोरता ठेवावी. उदारपणा बरा पण उधळेपणा वाईट. परोपकार व अनाथास साह्य यांत पैसा खर्चावा, सत्तेचा सदुपयोग करावा, लाचलुचपत घेऊ नये, सर्वांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें व प्रेमानें वागवावें. उत्तम कार्य अंगीकारावें व प्रयत्नानें ते शेवटास न्यावें आणि कीर्तिरूपानें उरावें हाच पुरुषार्थ होय. अंगी कर्तृत्व असावें, निर्माल्यवत् असूं नये हाच पुरुषार्थ. कर्मफलाचा अभिमान न धरता त्याग करावा. असें राहिलें कीं संसारबाधा होत नाहीं. देहप्रारब्ध भोगीत असता नीतीनें वागावें. असत्यभाषण, विडंबाद, परस्त्रीगमन, दुर्जनसंगति हीं वर्ज्य करावीं. सत्यकथाश्रवण, पितृसेवा, बंधुप्रेम ह्या गोष्टी आचराव्या. पत्नीस प्रेमानें वागवावें पण स्त्रैण होऊ नये. फक्त गृहकार्यांत तिचे अनुमोदन घ्यावे. पुत्राशीं थट्टा, नोकराशीं सलगी, कन्याविक्रय ह्या गोष्टी करू नये. ह्या पुरुषधर्मांनीं जो वागेल त्यास बद्ध स्थिति बाधणार नाहीं. स्त्रीधर्मांत स्त्रियांनीं पुरातन आर्य स्त्रियांचे नियम पाळावे. पति हाच देव त्यांनीं मानावा व दुर्दैवानें वैधव्य आल्यास कडक सन्यस्त वृत्तीनें रहावें असें त्यानें सांगितलें आहे. त्यानंतर बद्धाच्या लक्षणांत धर्माधर्माचे अज्ञान, नास्तिकपणा, प्रपंचरति यांना व कपट, लोभ, निंदा, ढोंग या दुर्गुणांचा अंतर्भाव केला आहे. बद्धस्थितीची जाणीव होऊन सत्संगाची आस करणारा तो मुमुक्षु होय. केवळ शब्दपांडित्य फुकट आहे. मुख्य मन हें चंचल व दुःसाध्य आहे. तें स्थिर करण्यास मूर्तिपूजेचा प्रकार ठीक आहे. पण मूर्तींत परमेश्वर नाहीं. मात्र तिची पूजा करावी कारण तिच्यायोगें चित्ताची एकाग्रता होते. नंतर आत्मधियेनें मुक्ति घरीं चालून येत्ये. इ. (अ. ३२.३३)

मोक्षाच्या भिन्न मार्गांविषयीं बोलतांना त्यांचें तरतमभावानें पुढीलप्रमाणें वर्णन केलेलें आढळतें. (२७ अ.) जे कर्ममार्ग आचरतात त्यास कर्मफळें भोगणें प्राप्त होतें आणि जन्ममरण चुकत नाहीं. ज्ञानमार्ग हा अत्युत्तम

आहे पण तो अवघ्यांस सुगम नाहीं. भक्ति मार्गानें जातां मात्र शीण नाहीं. ( असें गंगागीर साधुस स्वप्नात नारायणानें सांगितलें आहे. )

सातव्या अध्यायांत ब्रह्मप्राप्त्यर्थ 'योगसाधनानें' षड्रिपूंचे ठाणें हृदयांतून उठवावें असें सांगितलें आहे. त्या ठिकाणीं मूळ बंध, जालंदर बंध, ओढिआणा ( ओडियाण ) बंध, कुंडलिनी, इडा पिंगळा इ. नाड्या यांचें ज्ञान चंडिरामास गुरूनें दिलें, परतु ह्या सर्व क्रिया गुरुगम्य आहेत म्हणून मी येथें सागत नाहीं असें कवि म्हणतो. पुनः अ. ४४ मध्यें स्वामी गोविंदनाथांनीं देवनाथाची परीक्षा घेतली तेव्हा योगाचा संबंध आला आहे. देवनाथानें उत्तरात इडा पिंगला सुषुम्ना यांपैकीं शेवटची मोक्षाप्रत नेते असें सांगितलें. नंतर समदृष्टि खेचरी, नासादृष्टि भूचरी, उर्ध्वदृष्टि चाचरी, अंतर्दृष्टि अगोचरी, निवृत्ती अलक्ष व सहावी षण्मुख अशा सहा योगमुद्रा देवनाथानें सांगितल्या. तेव्हा तुला मोक्ष त्वास मिळेल असें त्यांनीं त्यास सांगितलें. पण हा योगमार्ग ॥ क्लेशोऽधिकतरस्तेषा ॥ हें तर प्रसिद्धच आहे. तेव्हा सर्वांस भक्तिमार्गच सोपा खरा.

आता थोडक्यात तत्त्वज्ञान सांगून हें प्रकरण आटोपतें घेऊं:--

जो अक्षय, अव्यक्त, अभंग, सच्चिदानद त्याच्या इच्छामात्रें करून ब्रह्मांड आकारास आलें. ब्रह्म मूलतः नामरूपातीत आहे. त्या चित् स्वरूपापासून माया झाली. मायेपासून सृष्टि झाली. म्हणजे मायोपाधिक ब्रह्मापासून हें साकार ब्रह्मांड निर्माण झालें आहे. पचमहाभूतें मायेपासून झालीं. मग सर्व सृष्टि निर्माण झाली. या सर्वांस मूळ कारण ब्रह्म वस्तु आहे. तोच नारायण सर्वांपाशीं अहर्निश जागृत असूनही अज्ञानानें कळत नाहीं. तेव्हां उपाधिरहित होऊन स्वस्वरूपीं मन लावावें म्हणजे ब्रह्मप्राप्तीसाठीं दुसरीकडे जाण्याचें कारण नाहीं. अशाच तऱ्हेचे विचार ग्रंथभर पसरलेले आहेत.

२. येथवर निर्दिष्ट केलेल्या गोष्टी संत वाङ्मयांत कोठेंही आढळणाऱ्या आहेत. त्यांत कोणत्याही बाबतींत वैशिष्ट्य नाहीं. मात्र त्यात कधीं न आढळणारा राष्ट्राभिमान, स्वराज्यप्रेम स्वभाषाप्रीति हे गुण ह्यांत व्यक्त झालेले पाहून वाचकास आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. कवि म्हणतो कालचक्र फिरलें आणि पूर्वीची गीर्वाण भाषा जाऊन तिच्या जागीं

भरत खंडांत अनेक देशी भाषा उत्पन्न झाल्या. भाषापरत्वें व देशपरत्वें लोकसमूहात भिन्नत्व आलें. असे देशाचे तुकडे पडले कीं एकराष्ट्रीयत्वाची कल्पना लोप पावते. राष्ट्रीय शक्ति जागृत करणारे ग्रंथही बुडाले. त्यामुळें भारतास विपन्नावस्था आली आहे. परस्पर द्वेष वळावला. गुजराती, पंजाबी, मारवाडी, दक्षिणी, आपसात भाडू लागले. एवढेंच नव्हे तर ब्राह्मण, कुणबी, महार, मांग, भिल्ल, रामोशी याचेंही ऐक्य बिघडलें तेव्हा निरनिराळ्या जातींत संत उत्पन्न झाले. त्यानीं अविरत श्रम करून जागृति केली. आणि परधर्मीयांचे स्वाऱ्यास तोंड देण्यास राष्ट्रांत सामर्थ्य आणलें.

पुढें ४ अध्यायात देवनाथ महाराज पुण्यास गेले. तेव्हा त्याच्या कीर्तनास आलेल्या पेशवे सरदारांचें, पुण्याच्या वैभवाचें, सवाई माधवरावाच्या दरबाराचें वर्णन मोठ्या थाटाचें झालें आहें. तें अवश्य मुळांत पहावें. त्यावेळीं देवनाथानीं सवाईस राजनीति सांगितली. तिच्या वर्णनांत कवि म्हणतो:—

स्वराज्य प्राण राष्ट्राचा । स्वराज्य हाची मोक्ष साचा । स्वराज्य पाया धर्माचा । त्यावीण अवघें वोखटें । ११० । स्वराज्य सुखाची सौख्यखाणी । स्वराज्य वैभवनभींचा वासरमणी । स्वराज्य हाची चिंतामणी । चिंतिलें फळ देणार ॥ सैनिकांचे जोरावर । स्वराज्य रक्षणें साचार । एकीचे राहो सरोवर । त्यास पाट फोडू नका । ११२ ।। एकी स्वराज्याची जीवन कळा । एकी स्वधर्माचा पुतळा । एकी व्यापाराचा मळा । आहे धनत्तर वागाईत ॥ ११३ । आपमतलब हेवा द्वेष सकळ । ते एकीचे शत्रू प्रबळ । विघ्नसंतोषी दुर्जन खळ । यांचा त्याग करावा । स्वराज्याचा वृक्ष जाण । निर्माण एकीपासून । तो तू करावा फार जतन । हे सवाई माधवा ११५॥ यातील कवीचे स्वराज्याचें प्रेम किती उत्कट दिसत आहे हें सांगणें नलगे.

महाराष्ट्राच्या गतवैभवाबद्दल हळहळ व दुष्काळीचे परिणाम हीं २९ व ३६ अध्यायात पुनः पाहण्यास सांपडतात.

३ दुसरी महत्त्वाची व अपूर्व गोष्ट म्हणजे जातीजातींतील वैमनस्य जाऊन हिंदुमुसलमानांत सलोखा, परस्परविश्वास, परस्परांच्या धर्माबद्दल आदर व विश्वबंधुता ह्या वृत्ति दृढमूल व्हाव्या म्हणून कवीनें माणिकप्रभु, साईबाबा, नानावली, बाळकृष्णबुवा, शेख महंमद, नरसिंगजी वगैरे दोन्ही

ग्रंथांतील साधूंचीं चरित्रें मोठ्या उदारतेनें व कौशल्यानें रंगविलीं आहेत. तीं खात्रीनें इष्ट परिणाम घडवून आणल्याशिवाय राहाणार नाहींत.

४. भक्तिरस, वत्सलरस ( ४ ), मुलाची बोबडी भाषा, पुत्रशोक ( ३० ) मातृशोक ( २४ ), शृंगार इत्यादि रसवर्णनानीं ह्या ग्रंथास रसाळपणा आला आहे. त्याचप्रमाणे, अनंततनयाचें चंडीरामचरित्र, कवयित्री बहिणाबाई, जयराम स्वामीची दशमावरील टीका, दयाळनाथाची हैद्राबादेतील समाधि, इ. उल्लेखांनीं त्यास वाङ्मयेतिहासाचें महत्त्व आलें आहे. कवीबद्दलचे पुढील प्रशंसोद्गार रामदासाची आठवण करून देतील:—

सीते जेथडे कवीश्वर । ते सरस्वतीचें मंदीर ॥ ते ब्रह्मदेव साचार । आहेत शब्दसृष्टीचे ॥ ४५।३८ जेथ न रवीची गती । तेथ कवींच पावती । ते अज्ञान धुरोळा निवटिती । ऐसे ज्ञानप्रभंजन ॥ कवी काव्यरत्नाचे रत्नाकर । कवी ज्ञानधनाचे कुबेर । कवी बापडे माहेर । आहेत जगत्रयाला । असें म्हणून आधुनिक कवींचें नामसंकीर्तन केलें आहे. त्यांत:—होनाजी बाळ, प्रभाकर, विठोबा अण्णा दफ्तरदार, मयूर. परशुराम, पाळंदे, गोडबोले, पेठकर, ओक, कानिटकर, डोंगरे, देवल, किर्लोस्कर, लोंढे लेले, टुल्व, माधवानुज. कुंटे, आपटे, मोगरे, बाटे, राधारमण, भिंडडुय, मुझुमदार, लेले, खरे, चिपळूणकर, आठल्ये, करंदीकर वगैरे कवि आले आहेत.

ही दास गणूची वाणी बोबडी । मान्य करा जेंवी साखर खडी । पद्य-रचना वेडी वाकुडी । दोष याचे पाहू नका. असें म्हणून ग्रंथ समाप्त केला आहे.

**संतलीलामृत**:—मागें महिपतीनें संतचरित्रें वर्णिलीं तशीं आपणही वर्णावीं अशी दास गणूस स्फूर्ति झाली. या स्फूर्तीचा उगम साईबाबा महाराजांच्या सूचनेमुळें झाला असें मागें सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें त्यानें "भक्तलीलामृत" हा ग्रंथ प्रथम लिहिला व त्यानंतर प्रस्तुतग्रंथ लिहिला आहे. ह्या ग्रंथात महाराष्ट्राच्या प्राचीन संत कवींनें सांगितले आहेत. ह्यात ही सुमारें ४० संतांचें वर्णन आलें आहे. त्यात गोविंद महाराज, माणिकप्रभु, नरसिंगजी व साईबाबा यांची चरित्रें त्याच्या निरनिराळ्या लीला देऊन पुनः गाइलीं आहेत. त्यात पुढील संतमंडळी प्रामुख्यानें आढळते:— गुरुगोविंदसिंग; तेगबहादूर, एेनाथ, साधुमहाराज, माल्कीचे शुकानंदनाथ,

माधवाचार्य, संताचार्य, देशिकेंद्रनाथ, श्रीधरमहाराज, सखारामबुवा, तुकाराम अवतार उत्राणकर, चिन्मयानंद, नागेंद्र भारती, श्री सखाराम लोणीकर, गोचरस्वामी, तुकारामबोवा येहळेगावकर, गुडामहाराज, व्यंकटेश-दाजी महाराज, सीताराम महाराज मंगळ वेढेकर, दादादीक्षित, शहा-साहेब, रामकृष्ण परहंस, वासुदेवानंद सरस्वती. इ.इ.

संतलीलामृत या ग्रंथाचे अध्याय ६१ असून ओवी संख्या ६५५६ आहे. पहिला अध्याय नमनपर आहे. संतसंप्रदायास अनुसरून सरस्वतीस आपल्या जिव्हाग्री वसण्यास व शंकरास आपला हात धरून लिहिण्यास कवीनें प्रार्थना केली आहे. एवढेंच नव्हे तर उपेक्षा कराल तर तुमचें नाव बुडेल व हसें होईल असें प्रेमळ मल्लगीनें त्यास बजावलें आहे. कोल्हापूरची जगदंबा आपलें कुलदैवत असल्याचें तो सांगतो तसेंच मातापितरांचीं काका-मामाचीं व गुरूचीं हीं नांवें त्यानें दिलीं आहेत. देवतानमनानंतर कवीनें पौराणिक संत व संस्कृत कवि, तसेंच महाराष्ट्रसंत व महाराष्ट्र कवि यांस नमस्कार केला आहे. कालिदास, भवभूति, भारवी, शूद्रक, मम्मट, अमरसिंह, जयदेव, जगन्नाथ, नाथपंथी कवि, रघुनाथ, वामन, मयूर, महिपति, मुक्तेश्वर श्रीधर वगैरे मंडळी त्यांत प्रामुख्यानें आढळते. ह्यावरून कवीचा विद्या-व्यासंग व बहुश्रुतता ही बरीच असावीत असा तर्क होतो.

ह्याच ग्रंथांत पुढें जे ग्रंथ व ग्रंथकारांचे उल्लेख आले आहेत त्यांवरून ह्या तर्कास चांगली पुष्टि मिळते. त्यांत कपिलगीता, गीताभाष्य, पंचदशी, विवेकसिंधू, ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध, तुकारामाचे अभंग, इ. मोरोपंताची तर त्यानें फारच स्तुति केली आहे.—मराठीचा कालिदास। झाला वागमतीस। त्याच्या काव्य रसास। सेवितां न होय तृप्ति कधीं ॥ २४.२८ ॥ ऐसा महात्मा मयूरपंत। साता प्रांतीं पंडित। जोशी बोवानीं केली मात। सोलापुरीं राहुनी ॥ २९. पुनः त्यास महाराष्ट्र कविकुळभूषण पंत अशी बहुमानाची पदवी त्यानें दिली आहे. ॥ त्वमेव प्रत्यक्षं तत्त्वमसि ॥ असे श्रुतीचे आधार; छांदोग्योपनिषदांतील प्राणवाद जैवली कथा, श्वेतकेतु-प्रश्न, व अज्ञाननिरसन वगैरे प्रकरणाच्या उल्लेखावरून उपनिषदें त्याच्या चांगलीं परिचयाचीं दिसतात. योग वासिष्ठ, भागवत हे ग्रंथ त्यानें पाहिले

१ अ. २०; अ. ११। अ. ५६

असावे. योगासंबंधीं तर त्याची माहिती बरीच खोल आहे. ४० व्या अध्यायांत त्यानें सिद्ध, बद्धपद्म, वज्र, स्वस्तिक, मच्छ, शव, कुक्कुट, मयूर, मंडूक, मकर, भुंजग, ऊष्ट्र इ. आसनें, पंचमुद्रा, पचबंध, व धौति, बस्ती, नेति, त्राटक, नैली आणि कपाल भाति हीं हठयोगांतील ६ कर्में इत्यादिकाचा उल्लेख त्या शास्त्रांतील पूर्ण माहितगाराप्रमाणें केला आहे. अध्याय ४६ मध्यें पुन: कुंभक, पूरक व रेचक व त्यांचे ८, ३२ व १६ मात्राचें प्रमाण व कुंभाच्या ८ प्रकारांचें वर्णन त्यानें केलें आहे. आणि एवढें करूनही तो विनयानें म्हणतो:—योगाचे वर्णनास स्वानुभव पाहिजे. मज माकडा हातून तें होणें अशक्य असे ॥ ४६·९३ ॥ पुढील चार्वाकाचे वर्णन किती मार्मिक आहे पहा:–जैसें एरंडाचे गुऱ्हाळ जाण। रस ना ऊस ते ठायीं ॥ २५।५३ ह्या सर्व विवेचनावरून कवीची बहुश्रुतता सहज सिद्ध होत आहे. पण याच्या उलट तो स्वत: असें सांगतो कीं:–मी मूढ अज्ञान। पाहिलें नसे व्याकरण। नाना शास्त्राचें अध्ययन। म्यां न केलें दीनबंधो ॥ अ. ५० ॥ यांत विनय जरी असला तरी त्यांत थोडेसें सत्यही आहे. त्याच्या विद्याभ्यासाविषयींची माहिती चरित्रांत दिलेली नाहीं. पण त्याचें पायाशुद्ध शास्त्राध्ययन झालें नसावें असे दिसतें. नाहींतर पाद्य; भूप आशेकरून; ममोदरींचा; पतीशाधारक, प्रेम्णाभक्ति; तुष्टमान; अशीं रूपें आढळलीं नसतीं. त्यास मराठी, संस्कृत, ऊर्दू, हिंदी व गुजराती ह्या भाषा अवगत आहेत. आणि इंग्रजीचा ही अगदीं थोडासा गंध त्याला असावा. त्याच्या हिंदी गुजराती पदाचा उल्लेख मागें आलाच आहे. ह्या काव्यांत ऊर्दु शब्दाचा उपयोग पुष्कळ ठिकाणीं केलेला आढळतो. ह्याचें कारण निझामचे राज्यांतील नांदेड येथील त्याची वस्ती हें होय. पुढें कांहीं उदाहरणें दिलीं आहेत:—अदालत, फिर्याद, कर्ज, जमानत, हुकूम; तहशीलदार तनकी करण्यास आले (३३); वजिफ्याची (पेनशनची) वेळ आली (५१); तनखा; तेरा चक्कर निकल गया अफसोस नहिकरना; मोहतमीम; जमाना; वगैरे. इतर काव्यांतूनही मधून मधून असे शब्द पुष्कळ सांपडतात. सतत उर्दूच्या परिचयामुळें असें होणें अपरिहार्यही आहे. त्याबद्दल कवीस फारसा दोष देणें वाजवी होणार नाहीं; तरी पण मराठी भाषेवर त्याचें चांगलें प्रभुत्व होतें ह्यात संशय नाहीं. इतर काव्यांप्रमाणें ह्यांतही सुंदर

वाक्प्रचार व म्हणी इतस्ततः विखुरलेल्या आढळतात. कांहीं विशेष उदाहरणें पहाः–विद्याची परीक्षा घेऊ नका; हाळोपाळी बातमी पसरली; मुळान्ही मुलगी नेण्यास आला; पक्कानें टाकून सजगुऱ्या सेवणे; मांदें पाडलें इ. एकंदरींत ह्या कवीचे ठायीं साधारण व्युत्पत्ति, विस्तृतग्रंथावलोकन, अनेक-भाषाभिज्ञता, योगवेदांताचा दृढाभ्यास, सूक्ष्म निरीक्षणशक्ति इत्यादि गुण आहेतच. त्याचप्रमाणें काव्यशक्तिही आहे. कारण त्याच्या तरल कल्पनेचा विलास व प्रतिभेची उदात्तता त्याच्या अनेक सुंदर वर्णनांत व समर्पक उपमारूपकदृष्टांतादि अलकारयोजनेंत व रसपरिपोषांत कोठेंही आढळते. पुढील काहीं उदाहरणांवरून ह्याची खात्री पटेलः—नभरूप करंडा भरला। अंधःकार काजळानें ॥ ४३-३१ । दागिने असले असंख्य । परि एक नसतां कुंकुमतिलक । ते न कदा शोभती देख । तैसे जेवण तुपाविणें ॥ एकाताचा संकेत । जैसा कळे कांतेप्रत । तैसे ईशध्वनी गुंडाप्रत ॥ जैसे फोनो करी गायन । परी अर्थदृष्टि नसे जाण । तैसेच ते ब्राह्मण । आले वेद पढूनी ॥ ३४–१०२ ॥ समार्गी या स्त्रियाची । योग्यता आहे थोर साची ॥ जेविं सभेंत पंडिताची । महती जाणा मुज्ञ हो ॥ ४२-८७ ॥ ऐका श्रोते समस्त । हा संत कथामृत नामे ग्रंथ । साक्षाद्नु वसंत । संतकथा या आम्रतरू ॥५७-२॥ चमत्कार फांद्या मोज्वळ । पद्यरचना पर्णे कोमळ । बोधरूपी आलें फळ । तें सेविण्या कोकिळ व्हा ॥ ३ ॥ हा ग्रंथ मानस सरोवर । पद्यरचना हेंच नीर । संत कथा कमळें थोर । या कामार्गी विकसलीं । ४ बोधरूपी मकरंद । या कमळीं असे शुद्ध । तो सेविण्यासी मिलिंद । व्हा हो तुम्ही अवघे ॥५॥ असो. अशीं मनोहर रूपकें जागोजाग पसरलेलीं आहेत. याचा निसर्ग-वर्णनात हातखंडा आहे. या प्रचंड ग्रंथात अनेक तऱ्हेचीं वर्णने आलीं आहेत. सह्याद्रि, गोदावरी, जान्हवी, महाराष्ट्र, पुणें, कोंकण इत्यादि स्थलवर्णनें; महापूर, पाऊस, रात्र इत्यादि सृष्टिवर्णनें; म्हातारा विठू, शेतकरी, हरिदास, व वीर इ. व्यक्तिवर्णनें फारच चेतोहर झालीं आहेत. आणि ह्याच्यामुळेच ह्या चमत्कारपुराणास रम्यत्व आलें आहे. स्थलाभावामुळें केवळ मासल्या-साठीं म्हणून त्याचें किंचित् दिग्दर्शन केलें आहे. ( १ ) रात्रिवर्णनः– रात्र झाली तीन प्रहर । तमें दाटलें अंबर । कृष्ण शालू चराचर । रजनी

वाटे नेसलो । ५४-४६ ॥ नक्षत्रें त्या शालूवर । खडी वाटे मनोहर । नक्षत्रपुंज हाच पदर । शोभे तया शालूचा ॥ ४७ ॥ निद्रावश अवघेजन । मंद वाहे समीरण । उषःकालालागून । अवधि अला थोडका ॥ ४९ ॥ (२) महापुराचें वर्णनः—ते पावसाळ्याचे दिवस । पूर आला गोदेस । जांण्या पैल तटास । वाट नाहीं राहिली ॥ ४१-१४ ॥ सागर तुल्य गोदावरी । तेधवां झालीं साजिरी । तें पाहून मडळीं सारी । भ्याली मनीं अतिशय ॥ १५ ॥ जोरावला झंझावात । नभ मेघानीं केलें व्याप्त । सौदामिनी तळपत । कडकड ध्वनी करूनी ॥ १७ ॥ मोठेमोठे तरु धरणीं । पाडिले झंझावातानीं । आच्छादिली मेदिनी ॥ मेघोदकानें ये वेळा ॥ १८॥ गंगा भरली दोन्ही थडी । न चाले यात सागडी । नाव सोडण्या नावाडी । तयार ना गुरुराया ॥ १९ ॥

(३) कंजूष गुंडा व उदार पत्नी राजा यांचें विरोधात्मक चित्र पहाः— घेणें देणें वहुतावर । गुंडा सराफ सावकार । कृपणपणाचा सागर । कंजुषपणाचा मेरु तो ॥ ३५ । १३ ॥ ब्रह्म जयाचें द्रव्यार्जन । द्रव्य हेंच संध्यास्नान । एवच द्रव्यावाचून । काहीं नावडे गुडातें ॥ १४ ॥ राजा नामें वधू त्याची । खाण केवळ सद्गुणाची । योग्यता त्या साध्वीची । काय वर्णन करावी ॥ १५ ॥ पति असे महा कृपण । आपण उदार कर्णासमान । पतिव्रता धर्म जाणे पूर्ण । नामस्मरणीं रत सदा ॥ १६ ॥ पाहून या जोडप्यासी । लोक म्हणती देगलुरासी । एक भाग एक तुळशी । एके ठायीं लागली । एक चंदन मलागिरी । एक सकटक साबरी । एक थिल्लर एक गोदावरी । एके ठायीं झाली कशी ॥१८॥ एक शर्करा एक लवण । एक मेण एक पाषाण । एक छाया तरु सघन । एक वृक्ष शिंदीचा ॥ १९ ॥ (४) म्हातारा विठूः—घेऊनियां द्विजवेष । देगलुरा आला जगन्निवास । गुंडोजीच्या सदनास । येता झाला स्वइच्छे ॥ ३६ ॥ अनंत ब्रह्मांड ज्याचे पोटीं । तो धरिता झाला करीं काठी । काचा वेष्टूनिया कटी । वळकट बाधिली श्रीरंगें ॥ ३५–३७ ॥ डुगडुगा ती हाले मान । तनू धनूचे समान । दंतावळी भाडण करून गेली मुखासी । ॥ ३८ ॥ ऐसा धरून अभिनव वेष । बोलता झाला राजाहंस । मी याच याचनेस । आलों आहे करावया ॥ ३९ ॥ इ. इ. (५) दुसऱ्या बाजीरावानतरचें पुणें:—त्यावेळीं तें शहर पुणें । दिसू लागलें

अवघे सुनें । श्रीमंताचें तेथून ठाणें । गेलें ब्रह्मावर्तास ॥ ४६-१४ ॥ जेवीं कुडींतून गेल्या प्राण । देह होतो मृत्तिकेसमान । तेविं प्रेतकळा पुण्यालागून । येती झाली ते काळीं ॥ १५ ॥ स्वराज्यरूप प्राण त्याचा । नष्ट झाला पुण्याचा । मग तया प्रेताचा । कोण करी अंगिकार ॥ १६ ॥ जेथें नित्य वेदाध्ययन । तेथें नो, गो, लो, सो, भाषण । करूं लागले विद्वान । गीर्वाण भाषा टाकूनी ॥१८॥ शिखा गाईचे खुरापरी । जेथें होती निर्धारीं । तेथेंच शिपतरें झालीं सारीं । नटासमान श्रोते हो ॥ कमलें नष्ट होता सरोवरीं । तेथें हसांची न येत फेरी । निर्भय होऊन जलावरी । काढिती विरोळे डोक्याला ॥ २२ ॥ तैसें पुणेंरूप पल्वलातून । धर्मरूप कमल गेलें जाण । तें समर्थांनीं जाणून । त्याग केला पुण्याचा ॥ २३ ॥

रंगपंचमी पोवाड्यातील वैभवशाली पुणें दुसऱ्या बाजीनंतरचें हें प्रेतप्राय पुणें व पोवाड्याचे उत्तरार्धातील विपरीत पुणें, या तिन्ही अवस्था पाहून "सा रम्या नगरी महान् नृपतिः सममतचक्रहि तत् । इ. श्लोकाची आठवण झाल्यावाचून राहात नाहीं.

हा ग्रंथ प्रामुख्यानें संतचरित्रांचा व संतलीलाचा आहे. ज्यांची चमत्कारांवर आजकालही श्रद्धा असेल त्यांस तर तो अद्भुतरम्य मेवाच वाटेल. परंतु हल्लींचें युग चमत्काराचें व श्रद्धेचे नसून विज्ञानशास्त्राचें व बुद्धिप्रामाण्याचें आहे. तेव्हां या ग्रंथात केवळ अद्भुत चमत्कारच वर्णिले असते तर इतराम तो इतका रुचकर व आकर्षक झाला नसता. परंतु संतकथांच्या आश्रयानें त्यात सुंदर काव्य अवतरलें असल्यामुळे तो जसा रसाळ झाला आहे, त्याचप्रमाणें चरित्रवर्णानुसार त्यात ऐतिहासिक व सामाजिक गोष्टी आल्यामुळे तो लोकप्रिय व आदरणीय होण्यासारखा आहे. जुन्या संतकवींची परमार्थावरच एकांतिक दृष्टि होती. बाह्य जगातील घडामोडीकडे, देशस्थितीकडे व लोकस्थितीकडे त्याचे सहसा लक्ष कधीं गेलें नाहीं. पण ही उणीव दासगणूंनीं भरून काढल्यामुळे त्याचे ग्रंथ जुन्या नव्या लोकांस प्रिय होण्यासारखे आहेत. दासगणूंच्या ग्रंथाचे हें वैशिष्ट्य ध्यानांत ठेवल्यास केवळ जुन्या वळणाचे ग्रंथ म्हणून त्याच्या ग्रंथाची उपेक्षा वाचकाकडून होणार नाहीं.

प्रथमतः ह्या ग्रंथातील ऐतिहासिक माहितीकडे वळूं. ( १ ) पेशव्याचे उल्लेखही कोठें कोठें आले आहेत. ४६ व्या अध्यायांत कोंकणाचें नांव येतांच कवीस धर्म रक्षण करणाऱ्या बाळाजी विश्वनाथाची, कलियुगांतील द्रोणासारख्या परशुरामभाऊ पटवर्धनाची व नानाभानूंची आठवण झाली आहे. त्याचप्रमाणें उदगीरचें नाव निघतांच मोठा पराक्रम करून पेशव्यांनीं मिळविलेल्या जयाचें तो गोडवे गातो. त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजीरावाच्या कुटिलपणाच्याहि गोष्टी निर्भिडपणें सांगतो. पढरीस एकदां गुंडामहाराजाचे कीर्तन चाललें असता दुसरा बाजीराव तेथें गेला व त्यानें दिवे मालवले. राजसत्तेच्या जोरावर तू असें केलेंस तेव्हां तुझें राज्य जाईल व निर्वंश होईल असा शाप त्यांनीं त्यास दिला ! ! पुढें रत्नागिरीकडील गंगाधर देव म्हणून साधु पुण्यास गेले होते तेव्हा बाजीरावानें " माझें राज्य किती वर्षे चालेल " म्हणून त्यांस विचारलें. "तीन वर्षेपर्यंत चालेल." असें त्यास उत्तर त्यानीं दिल्याचें लिहिलें आहे. पण ह्या भेटीचा काल दिला नसल्यामुळें ह्या भविष्यवाणीचा पडताळा पाहाण्याचें साधन नाहीं.

( २ ) पुढील हैद्राबादचें वर्णन किती सुंदर आहे पहाः—

असो तेलगणीं भागानगर। मुमा नदीचे काठावर। ज्यास हल्लीं मुज्ञ चतुर। हैद्राबाद बोलती ॥ १९-२१ ॥ जी गादी निजामाची। भूपती महबूब दौलाची। खाण केवळ संपत्तीचीं। इंद्रपुरीचे समान ॥२२॥ देशिकेंद्र साधू तेथें गेले होते. तेव्हा मदारुल माहाम् विद्वन्मणी व हिंदुधर्माभिमानी राजा चंदूलाल यांनीं त्यास "धनज गाव" जहागीर दिला. महाराजा किशन प्रसाद हैद्राबादचे दिवाण टाकळीस दाजी महाराजाच्या दर्शनास गेले. तेव्हां सुभेदारादि सर्व अधिकारी त्यांचे बरोबर होते. त्याची निरिच्छता पाहून ते संतुष्ट झाले. पण त्यानीं आपल्यासाठीं कांहींच न मागतां आपले सरकार अलाहजरत महिबूब दौला यास आशीर्वाद मागितला. केवढी राजनिष्ठा ही ! कवीनें राजनिष्ठांची स्तुति करून " ना विष्णुः पृथ्वीपतिः " अशी शास्त्रोक्ति आधारादाखल दिली आहे.

( ३ ) मंगळवेढयाचे सीताराम महाराज एकदा पंढरपुरास गेले होते. त्यावेळीं तेथें ह. प. ल. रा. पांगारकर हे त्यांच्या दर्शनास गेले होते. त्याचे थोडक्यांत काढलेलें शद्बचित्र किती सुंदर झालें आहे पहाः—त्या

अवघ्या मंडळींत । होता एक भाविक भक्त । पांगारकर रामचंद्रसुत । लक्ष्मण नाम जयाचें ॥ ६९ ॥ तो आंग्ल भाषाभिज्ञ असूनी । असे संतांचा अभिमानी । मोरोपंत चरित्र ज्यानीं । लिहिलें प्रेमळ वाणीनें ॥७०॥ काकडलों भवरूप थंडीनीं । ऐसें वर्णन पंतानीं । एके आर्येंत केलें जाणीं । आळवावया रामचंद्रा ॥७१॥ ती आर्या म्हणत म्हणत । येत होते रामचंद्रसुत । प्रवेश करिता मंदिरांत । त्यांनीं आर्या थांबविली ॥ ७२ ॥ व त्या संताच्या कट्टया भक्तानें महाराजास साष्टांग नमस्कार घातला. त्यावेळीं महाराजांनीं त्यास सांगितलें कीं मला माग्रत थंडी वाजते, जरा स्वस्थपणें बसूं द्या. पांगारकराना त्यावेळीं मनींची खूण पटली व महाराजाच्या अंतरसाक्षित्वाबद्दल त्याची खात्री झाली. ह्या शब्दचित्रात बी. ए. झालेले, भाविक व संताभिमानी, प्रेमळ वाणीचे, पंतचरित्रकार, अफाट पाठांतर असलेले व म्हणूनच नेहमीं कोणतें तरी पद्य गुणगुणारे असे ह. भ. पांगारकर बुवा आपल्यास हुबेहुब दिसत नाहींत काय ? त्यावेळीं पांगारकरकरांच्या तोंडांत बहुधा खालील आर्या असावी:—

प्राकृत संस्कृत मिश्रित यास्तव कोणी म्हणेल ही कंथा ।
भवशीतभीतिभीतस्वांनाला दाविला बरा पथा ॥ १ ॥

वरील उल्लेखांमुळें जरी कांहीं नवीन ऐतिहासिक माहिती पुढें आली नसली तरी त्यात दासगणूची " क्षणचित्र " काढण्याची उत्तम हातोटी, त्याची चौरस माहिती, स्वदेश, स्वराज्य. व स्वधर्म, यावरील त्याचें दृढ प्रेम, त्याची निस्सीम राजनिष्ठा, शिवाजी महाराज व पेशवे यांबद्दलचा योग्य अभिमान वगैरे गोष्टींची पूर्ण ओळख पटते. ह्या वैशिष्ट्यामुळें, त्याच्या जुन्या वळणाच्या काव्यास अप्रतीम नाविन्य आलें आहे.

( ४ ) निजाम उल्मुल्क बहिरी याचा इतिहास शेवटच्या ६१ व्या अध्यायात आला आहे. परभणी जिल्ह्यात पाथरी गावात तिमा भट म्हणून एक भैरव भटाचा पुत्र होता. त्यास मुसलमान धर्माची दीक्षा देऊन त्याचें नांव निजामउल्मुल्क बहिरी असें ठेवलें गेलें. परंतु तो आपलें पूर्व कुळ विसरला नाहीं. त्याचे पोटीं अहंमदशहा जन्मला. त्या अहंमदशहानें हिजरी सन ९०० त अहंमदनगर वसविलें. हा फार पराक्रमी राजा झाला. ह्याचें राज्य राजमहेंद्रीपर्यंत पसरलें होतें. बहिरीनें आपल्या राजछत्राची एक कळी

हिंदुत्वाची खूण म्हणून लाल ठेविली होती. त्याचे हिंदुधर्मावर फार उपकार आहेत. त्यानें हिंदूंना मोठ्या अधिकाराच्या जागा दिल्या. ॥ अहमद निजाम शहा बहिरी । भूपती झाला जनकापरी ॥ असें त्याचे आदरयुक्त वर्णन दुसऱ्या ठिकाणीं कवीनें केलेलें आढळतें ( अ. ४९ ) त्याचेच आश्रयानें मालोजी पुढें आला. शहाशरीफ अवलियाच्या प्रसादानें त्यास दोन पुत्र झाले. त्यापैकीं शहाजीस जाधवरावाची कन्या जिजाबाई दिली होती. ॥ त्या जिजाईचे उदरीं । भगवान अवतरले त्रिपुरारी । असें शिवाजीचें वर्णन मोठ्या अभिमानाने व गौरवानें केलें आहे.

( ५ ) पूर्वी निझामशाहींत अहमदनगरात चहाडखोराचें बंड माजलें. एकी मोडली. दुष्काळी झाली. ते पाहून मलिकअंबरनें खिडकी शहर वसविलें. तेंच हल्लींचें औरंगाबाद शहर होय. एकदा औरंगाबादचे सुभे, नबाब मुकतदरजंग, हे शहासाहेब साधूच्या दर्शनास गेले होते. साधूची निरिच्छ वृत्ति पाहून ते संतुष्ट झाले, व सरकारांतून त्यानीं त्यास १५ रु. दरमहा चालू केला. त्यासंबंधीं कवि म्हणतो:—पहा स्वराज्याची केवढी महती ॥ आश्रय स्वधर्मा प्रति । मिळतसे हो निश्चिती । म्हणूनी स्वराज्य असावें ॥ ५३–२३ ॥ ह्यावरून व इतर मागील उल्लेखावरून कवीच्या ठिकाणीं निजाम सरकारा बद्दल कीती प्रेम व राजनिष्ठा वसत आहे हें उघड दिसतें. त्याचप्रमाणें राजा चंदूलाल, महाराजा किसनप्रसाद बहादूर, व अल्लाहजरत महबूब बादशहा ह्याचें उल्लेख त्यानें अत्यंत आदरानें केले आहेत. । नादेडचे सर देशपांडे कमलाकर याचे वतन राजा चंदूलाल यानीं सोडलें. या कमलाकरानें मराठी कविता केली आहे व तिचें पदलालित्य फार गोड आहे असें कवि म्हणतो. पण त्या ग्रंथाचें नाव मात्र त्यानें सांगितलें नाहीं. मताचार्यास ही राजा चंदूलालनीं त्याच्या गुरुच्या समाधीसाठीं जहागिरी दिली. तेव्हा पुनः कवि म्हणतो: ॥ स्वराज्याचे वाचून धर्मकृत्या न मिळे मान । स्वसत्तेवाचून । अवघीं कृत्यें बापुडीं ॥ १७–१८ ॥

ह्या ग्रंथाचें सामाजिक दृष्टयाही फार महत्त्व आहे. कारण प्रसंगोपात्त कवीनें निरनिराळ्या बाबतींत आपलीं उदार मतें व्यक्त केलीं आहेत, ती क्रमानें पाहू. शुकानंद महाराजांनीं सासरी जाताना मुलीस उपदेश केला

आहे. तोः—" बाळे सासरीं गरिबीनें वागावें, वडिलांची सेवा करून त्यांचा मान ठेवावा, जावा नणदा भावेदीर यांवर प्रेम करावें, पतीस देवा ठिकाणीं मानावें, कुढेपणा वर्जावा, आनंदी वृत्ति ठेवावी. पतिकोपीं नम्र असावें, अतिथिसत्कार करावा " वगैरे गोष्टींवरून शाकुंतलांतील कण्वाच्या उपदेशाची आठवण होते. वाल्हूतेली जेव्हां महाराजाच्या मागें लागून संसाराकडे लक्ष देईना त्यावेळीं त्याच्या बायकोच्या संतापांत नामदेव-तुकारामाच्या बायकांच्या वृत्तींचें प्रतिबिंब दिसतें. दुसऱ्या ठिकाणीं कवि म्हणतो एकंदर बायका अज्ञान अतएव मोक्षास अनधिकारी. पण संसारांत त्यांची योग्यता फार थोर आहे. ही गोष्ट त्यास मान्य आहे. शैव वैष्णवांच्या परस्पर द्वेषाबद्दल त्यानें तीव्र नापसंती दर्शविली आहे. ह्यासंबंधीं जिंतूरच्या नारायणराव मोहरीराची व मल्हारराम साधूची मोठी मनोरंजक गोष्ट त्यानें सांगितली आहे. तींत कवि सांगतो कीं शिवविष्णूच्या द्वेष्ट्यांस यमकुंभीपाकांत घालून त्यांचे डोळे फोडतो. शेवटीं वीर वैष्णव शिवद्वेष्टे नारायणराव मोहरीर लोणीस गेले व त्यांनीं शिवावर अभिषेक केला. त्याचप्रमाणें शूद्रांस कमी लेखणें फार वाईट आहे. हेंही तत्त्व श्रीधर महाराजांकडून ब्राह्मणास मोठ्या चातुर्यानें कवीनें पटवून दिलें आहे. "पद्भ्यां शूद्रोऽजायत" या श्रुतिवाक्याप्रमाणें विराट् पुरुषाच्या शरीराचा शूद्र हा एक मुख्य अवयव आहे. तो काढून टाकल्यास तो पुरुष लंगडा होईल तेव्हां सर्वावयव आपआपल्यापरी जसे शरीरस्वास्थ्यास महत्त्वाचे आहेत तसाच शूद्रवर्ग समाजस्वास्थ्यास आहे, असा सुंदर युक्तिवाद त्यानें केला आहे. त्याचप्रमाणें जातिजातींत मत्सर वाढविणारा बद्ध जाणावा असें स्पष्ट सांगितलें आहे ( ४४-८६ ). जातिमत्सर हा एक रोग आहे. त्याची उपेक्षा केली तर तो धर्मपुरुषाचें सर्व शरीर ग्रासून टाकून त्याचा नाश केल्याशिवाय राहाणार नाहीं. त्यावर "भूतदया" हें रामबाण औषध म्हणून त्यानें सांगितलें आहे. ( २२-३५-७० ). फक्त जातिद्वेष नसावा पण अजिबात जातिभेद नसावा असें मात्र तो कोठें म्हणत नाहीं, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. दुष्काळ दारिद्र्य रोग वगैरे आपत्ति धर्मग्लानिमुळें उद्भवतात त्यांचा नाश धर्मनिष्ठा व धर्माचरण यांशिवाय होणार नाहीं हें मत त्यानें सर्व ग्रंथांतून प्रतिपादिलें आहे. पण ही कार्यकारणमीमांसा

आज कोणास पटण्यासारखी नाहीं. अनेक पक्वान्नें व डागिने यांच्या लांब लांब याद्या कवीनें प्रसंगानुरूप दिल्या आहेत. पण त्यांत नाविन्य नाहीं.

मारोती गणोबा असरकर हा सावकार वऱ्हाडांत अकोटगावीं रहात असे. त्याचा कृषीवर विशेष भर असे. त्याचें वर्णन करतांना शेती व शेतकरी यांसंबंधीं फार महत्त्वाचे विचार कवीनें वाचकांपुढें मांडिले आहेत. (अ. ४८-१२ ते ) तो म्हणतोः—शेती जगाचें जीवन, राष्ट्राचें भूषण, व्यापाराचा प्राण आहे. ज्या देशांत शेतीची पायमल्ली झाली तो दरिद्री झालाच समजावा. जेथें शेतकरी अशिक्षित असतात तो देश ऊर्जितावस्थेस कधींही येणार नाहीं. शेतीची सुधारणा झाली म्हणजे देशाची झालीच म्हणून समजावें. हे विचार आजच्या स्थितींत किती मननीय आहेत हें सांगायला नकोच. बोवाबाजी जरी आज दिवेकरशास्त्र्यानीं उघडकीस आणिली असली तरी ती सर्वकालीन आहे. आणि अनेक संतानीं तिजवर तोशेरे झाडले आहेत. पुढील उतारा खुद्द दिवेकर शास्त्र्यांना ही आश्चर्यांत पाडीलः—

या सांप्रतच्या शतकांत। जे आपणां म्हणविती संत। ते रंगविती तनुप्रत। मुद्रा रेखून नानापरी॥ ५४. १३॥ उभ्या टोप्या घालिती कोणी। मखमलीच्या करवोनी। भरजरीची अंगीं कफनी। घालून मोहती जनांला॥ १४॥ वेदमंत्रें करून। आम्हास घाला म्हणती स्नान। शिष्यशाखेच्या गृहा जाऊन। नानाविध घेती पूजा॥ पलंग पाहिजे निजावया। सिंहासन पाहिजे बसावया। सेवेसाठीं लागती बाया। सुस्वरूप श्रीमत १६॥ केशर कस्तूरीचीं उटणीं। मर्दन करावीं शिष्यांनीं। महाराज महाराज म्हणोनी। सेवेस तत्पर असावें॥ १७॥ पट्टी वर्गण्या करून। मंदिरें ठेविती बांधून। गावोंगांव फिरोन। शिष्यशाखा करिताती॥१८॥ संतत्वाची बतावणी। करण्या ख्याती चक्रपाणी। संतत्वाविरुद्ध भाव मनीं। जागृत राहे सर्वदा॥१९॥ ऐसा थाट जेथें असे। तोच लोकांसी संत दिसे। खऱ्या संतास म्हणती पिसें॥ यानेंच बुडालें हें जग॥२०॥ मृगजलास पाहून। जैसें काननीं फसे हरिण। तैसें नाटकी संतास देखून। जन नादी लागती॥२१॥

येथवर संतलीलामृत या ग्रंथांतील सामान्य विषय, त्याच्या मांडणींत दिसून येणारी कवीची कल्पकता, भाषाप्रभुत्व, वर्णनचातुर्य, उपमादि

अलंकारांची समर्पक योजना, रसाविर्भाव, ऐतिहासिक धार्मिक व सामाजिक गोष्टींच्या आनुषंगिक उल्लेखानीं त्यास आलेली मनोरंजकता इत्यादि गोष्टींचा विचार झाला. संतचरित्रांचा विषय कवीचा स्वभावतःच आवडीचा असल्यामुळें त्याचा काव्यौघ ग्रंथभर अगदीं दुथडी भरून वाहात चाललेला दिसतो. कित्येक वेळां त्याला मर्यादित ठेवणें त्यास दुष्कर होतें. ६।। हजारावर ओंव्या झाल्या तरी कवीची तृप्ति झालीशी दिसत नाहीं. ग्रंथविस्ताराची भीति त्यानें जागोजाग प्रगट केली आहे. ही कथा आतां आवरती घेतों नाहीं तर ग्रंथ सागराप्रमाणें वाढेल असें त्यास सांगणें भाग पडलें आहे. शेवटल्या अध्यायांत कवीनें आपल्या जन्मभूमीचें मोठें झोंकदार वर्णन केलें आहे. आपल्या नगर जिल्ह्याचें ऐतिहासिक, वाङ्मयिक, व धार्मिक महत्त्व सांगून "त्याची बरोबरी कवणाच्यानें न होय" असे अभिमानोद्गार त्यानें काढले आहेत." व त्या मन्माय देशाला। मी करितों वंदनाला। मातेसम मानिला। पाहिजे आपला मायदेश ।।६१-६१।। असें म्हणून त्यास प्रेमानें वंदन केलें आहे. नंतर ग्रंथाची फलश्रुति मोठ्या विस्तारानें सांगून कवीनें अश्रद्ध नरकाप्रत जातील असा धाक घातला आहे. शेवटीं पुढील प्रमाणें कवीनें ग्रंथस्तुति करून स्थलकाल निर्देश करून ग्रंथ संपविला आहे.

> हा ग्रंथ केवळ भागीरथी। संतकथा यमुना निश्चितीं।
> शब्दरचना सरस्वती। ऐसें महा प्रयाग हें ।।६१·१।१४०
> हा ग्रंथ केवळ शंकर। संत कथानक रमावर।
> शब्दाचे जे अलंकार। ते चतुरानन जाणावे ।। १४१ ।।

हा ग्रंथ शके १८३० त कीलक नाम संवत्सरांत उत्तरायण माघ मासांत व. ।।१४ स इंदुवासरीं गोदेच्या उत्तरेस टाकळींत पूर्ण झाल्याचें शेवटीं सांगितलें आहे. तो भाविकांना कदाचित् वैकुंठिचा जिना होईल. पण सामान्य वाचकास निदान तो आनंददोला खास होईल.

> स्वस्ति श्री संतकथामृत। काञ्चनाचें मंदिर सत्य।
> हा अध्याय रत्नजडित। कळस बैसवी दासगणू ।।६१-१५१।

१ अ-१।१०।११।३५।२४।४०।४१।५८। इ.

भक्तिसारामृतः—कवीनें प्रारंभीं नमनाध्यायांत नेहमींप्रमाणें देव-देवतास गुरूस व पितरास वंदन केलें आहे. नंतर तो म्हणतो ॥ मागील दोन ग्रंथ—भक्तलीलामृत संतलीलामृत—हे तुझ्या कृपेनें पूर्ण झाले, तसा हाही तूं करव. लिहितालिहविता पंढरिनाथा तूंच आहेस. मी विद्वान् नाहीं, मजजवळ धडसा शब्दभरणाही नाहीं तेव्हां गावंढळ शब्दानीं नटविलेलीं हीं संत-चरित्रें जरी अपेक्षेप्रमाणें मधुर नसलीं तरी पचामृताप्रमाणें तीं वाचकास रुचकर वाटोत." ह्यात प्रदर्शित केलेली ही विद्वत्तेची उणीव त्यानें जागोजाग प्रगट केली आहे. तीर्थयात्रा करण्यास द्रव्यसामर्थ्य व शरीर-सामर्थ्य पाहिजे. पण मी पडलों दरिद्री आणि माझे शरीर पडलें वातुळ त्यामुळें त्या घडणें अशक्य झालें, म्हणून संतचरित्रगंगेत मी पुनः अवगाहन करीत आहें असें ग्रंथनिर्मितीचें निमित्त तो सांगतो.

हा ग्रंथ सर्वांत मोठा आहे. याचे *६३ अध्याय असून ओंविसंख्या १२७३३. म्हणजे मागील दोन्ही ग्रंथाच्या एकंदर ओव्याहून यांतील ओंव्या अधिक आहेत. यात सुमारें ४५।५० लहान मोठ्या संतांचीं चरित्रें आलीं आहेत. ॥ साक्षात्कारावाचूनी। जमा साधू पटत नसे॥ ३५ ७८॥ ह्या त्याच्या म्हणण्याप्रमाणें—आणि तें बहुतांशीं खरेंही आहे—त्यानें प्रत्ये-काचें चरित्र नवल कथानीं, व अद्भुतरसानें नटविलें आहे. यांतील काहीं प्रमुख संताचीं नांवें पुढील प्रमाणें आहेत.

गोपाळनाथ, हरिबुवा भोंडवे, देवनाथ, सोहिरोबा, नंद महार, मुग्राव, सद्रोद्दीन, हंसराज स्वामी, घाडगे बुवा, बाबा भरती, विवेकानंद, शील-नाथ, बाबा गोखले, काका पुराणिक, सावळया न्हावी, सिद्धारूढ, व ताजोद्दीन. ह्यांचीं वर्णनें झाल्यावर कलशाध्यायांत कवीनें अशी ग्वाही दिली आहे कीं, अखिल महाराष्ट्रात साक्षात्कारी सिद्धयोगी कोणी संत वर्णावयाचा राहिला नाहीं. मात्र पोटभरूचीं वर्णनें गाळलीं आहेत. गत व विद्यमान साधकांचीहीं पुष्कळ नावें त्यानें दिलीं आहेत. त्यांपैकीं पुढील काहीं बरींच प्रसिद्ध आहेत. गोरक्षणपरायण दासबोध प्रेमी चंवडे बोवा, प्रचलित भाषाकोंदणांत ज्ञानेश्वरी हिरा बसविणारे विनायकबोवा साखरे, ब्रह्मचर्यनिष्ठ स्पष्टवक्ते विष्णुबोवा जोग, मुखोद्गत ज्ञानेश्वरी असलेले केशव-

---

* अ. ३ व ५३.

राव देशमुख, तुकारामगाथा तोंडपाठ म्हणणारे जयराम बोवा, ब्रह्माचें निरूपण करणारे वकटस्वामी, ज्ञानोत्तर भक्तीचा पुतळा असा धोंडिबा नाशिक सातारकर, हरिभक्त परायण लक्ष्मणराव पागारकर, धर्मशाळा बांधणारा मडकेबुवा परीट: इ. इ.

ह्या प्रचंड ग्रंथाचा बरवर परिचय करून देणे सुद्धा मोठें अवघड काम आहे. यांत संतचरित्रें आलीं आहेतच पण त्याचबरोबर कवीनें अनेक प्रचलित विषयाचा ऊहापोह आपल्या दृष्टीनें केला आहे. यांत राजनीति, लोकरीति, सामाजिक स्थिति, धार्मिक अवनति, व राष्ट्रोद्धाराचे अनेक प्रश्न यावर विवेचन केलेलें आढळतें. त्याचें विहंगमदृष्ट्या अवलोकन करू. पहिल्या प्रथम कवि रोखठोक सांगतो कीं "माझीं संत–चरित्रे म्हणजे कादंबरी किंवा करमणूक कथा नव्हत ( ६३ ) तर आपल्या जीवन यात्रेचा पंथ सुगम करण्याचें तें साधन आहे. जरा विचार करा. तुमचा देश म्हणजे सर्व विद्यांचें व कलांचें माहेर घर होता. तो. आज दारिद्र्यनिकेतन झाला आहे. त्याचे अगदीं मातेरें झाले आहे." अशी दशा त्यास का आली त्याचीं कारणें सांगून देशोद्धारार्थ त्यानें काहीं उपाय ही सुचविले आहेत ते पाहू.

राजे व राजनीतिः–प्रजेचें दुःख जाणतो तोच राजा ( ३।१३ ) हल्लींच्या राजास धर्माचें वावडें झाले आहे. विलायत हें त्याचें आदिदैवत झाले आहे. घरात पुरुष स्त्रिया मुलें याची वेषभूषा, खाणें पिणें सर्व इंग्रजी तऱ्हेचें. खेळ ही इंग्रजी. बोलणें इंग्रजी. साहेब म्हणून घेण्यांतच त्यांस अभिमान वाटतो. ( २१ ) अहिल्याबाई होळकरीण हिंदुधर्माचें भूषण, सुनीतीची पताका, भारताचें कंठरत्न होऊन गेली. हल्लींच्या राजांस तशीं कृत्यें आवडत नाहींत. ख्यालीखुशालींत ते तल्लीन. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका हीं त्याचीं तीर्थ क्षेत्रें. व्हाईसरॉय व गव्हर्नर याजवर आचार्याप्रमाणें प्रेम; बॉल, पोलो, टेनिस ह्या त्याच्या क्रीडा. कथेला मात्र नाकें मुरडतात. सगळी चैन रयतेच्या जीवावर चालते. कमी पडलें कीं लागलीच कर वाढलेच ! हें काय प्रजानुरंजन ! कवि बजावून सांगतो कीं "हा सर्वेषां सिद्धांत नाहीं" कांहीं थोर आहेत त्यांस हें लागू नाहीं. ( ४७ ). पटवर्धन-विंचूरकर जे पूर्वी स्वधर्म व स्वराज्य यांसाठीं रणमैदानांत नाचले, त्यांचेच वंशज आतां

टेनीस कोर्टांवर नाचत आहेत. (५७-९७) पोलीस (महाराष्ट्रांतले) जुलमानें पैसे घेतात. (२६-४९) पाटील कुळकर्णी म्हणजे खेड्यांचीं दैवतें. (३४-७२); कांहीं करावयास जावें तों पोलीस रूपी दुर्दैव आडवें येतें (६०-४०). पण कवीनें निजामसाहेबाची मुक्तकंठानें स्तुति कशी केली आहे पहाः—

मोगलाई प्रांताचा भूपती। महबूब दौला सन्मती। पुण्यश्लोक अकबराप्रती। कीर्तिध्वजा फडकतसे॥ ६२-१३॥ हिंदु आणि मुसलमान ज्या राजाशीं समसमान। उस्मान उद्दौला पुत्ररत्न॥ पोटीं बादशहाच्या॥ ६२-१४॥ तेव्हा संस्थानिक व राजेरजवाडे यानीं आपल्या प्रजेच्या सुस्थितीकडे लक्ष दिलें पाहिजे, असें त्याचें म्हणणें आहे.

**लोकस्थितिः**—ही पण सर्व बाजूंनीं बिघडली आहे. तो म्हणतो राष्ट्रोद्धाराच्या कामाला चार प्रकारचे पुरुष लागतात. (१) आशीर्वादासाठीं साधुजन, "तेथें पाहिजे अधिष्ठान भगवंताचें" ह्या साठींच त्याची अवश्यकता आहे. (२) भौतिकशास्त्रसंशोधक व तत्त्ववेत्ते याचे महत्त्व आजकाल राष्ट्ररक्षणांत किती आहे हें सांगणें नलगे. (३) उज्वलध्येय पुढें ठेऊन मार्ग दर्शविण्यास कवि व ग्रंथकार पाहिजेत. (४) व स्वदेशासाठीं प्राणाहूति देण्यास तयार असणारे तलवार बहाद्दर वीर हवेत. साधू अलौकिक कृत्यांनीं धर्मश्रद्धा व एकी वाढवितात. तर भौतिकशास्त्रवेत्ते राष्ट्राची निर्बलता घालविण्याचे उपाय योजतात. कवि निर्भीडपणें सत्यासत्य प्रकार जनतेपुढें मांडतात. वीर म्हणजे स्वातंत्र्याचे शाहीर. अशा चार प्रकारच्या विभूति निर्माण झाल्याशिवाय राष्ट्रोद्धार होणें शक्य नाहीं. तेव्हां अशा विभूति धाडण्यास्तव देवाची प्रार्थना केली पाहिजे. निदान आज तरी ह्या समाजात त्या दिसत नाहींत. साधु ढोंगीं झाले आहेत. तत्त्ववेत्ते द्वेषाची उभारणी करण्यांत दग आहेत, तर कवि पैसे घेऊन व्याजस्तुति करूं लागले आहेत, आणि शूरांनीं आपलें सामर्थ्य परास विकलें आहे. तेव्हां सर्वांगीण सुधारणा केल्याशिवाय तरणोपाय नाहीं. (६३) त्या कोण कोणत्या तें पाहू. आधीं पहिल्यानें (१) धार्मिकः—हिंदुधर्माचा हाच धडा आहे कीं व्यक्ति स्वातंत्र्यास समाजस्वातंत्र्यापेक्षां गौण लेखावें. व्यक्तिव्यक्तिमधील द्वेष मत्सर नाहींसा झाला पाहिजे. जें समाजाचें हित तेंच

व्यक्तीचें, ही खूणगांठ ज्यास पटली तोच हिंदु. अंधश्रद्धेनें परधर्मद्वेष करूं नये. कोणत्याही धर्मतत्त्वांत फरक नाहीं. सर्व धर्म ईश्वरास आवडतात. दयेपुरतें जैनबुद्ध व्हावें. तेजसपणांत यवन व्हावें. पण तात्विक विचारांत हिंदु असावें. कारण हिंदुस्तानात सर्व धर्मांची खिचडी आहे. सर्वांस मान द्यावा. देशभाषा व धर्म हीं एकीचीं साधनें आहेत. सर्व समाजात एकी झाली पाहिजे ( २३ ). कवीने साईबाबांचा जो उपदेश दिला आहे तो खरोखरी मननीय आहे:—

सर्वत्र सच्चिदानंद पहावा। तोचि अल्ला इलाही। तोचि आहे शेष-शायी। तुझा खंडोबाही नाहीं। त्याहून बापा निराळा॥ ५२·७०॥ आम्ही जातीचे ब्राह्मण। आमचे सोयरे मुसलमान। असें आहे एक वचन। पूर्व कालींच्या संताचें॥ ७५॥ ह्या वचनास कल्पांतीं बाध येणार नाहीं. हिंदु, यवन ह्या जाति वरवरलीं सोंगे. जाति हा केवळ बाह्य पोषाख. पूर्वीही ह्या जाति सलोख्यानें वागत होत्या. यवनाकडून बटवाडीगाव एका संतास इनाम मिळाला होता. त्यावेळीं देशाचें वैभव वाढलें. जातिमत्सर बरा नाहीं. ( ४९ ) तेव्हां हिंदुमुसलमानाचें ऐक्य प्रथम झाले पाहिजे.

( २ ) जातिभेद:–हिंदूत तरी आपसात कोठें एकी आहे? ब्राम्हणांतच पहा. देशस्थ कोंकणस्थ वाद:–कोंकणे म्हणतात देशस्थ तेवढे अजागळ असतात. उलट ते त्याना म्हणतात "कोंकण्ये तेवढे दुर्बळ." या उभयतांच्या द्वेषाने समाज मात्र दुर्बल होतो हें दोघेही विसरतात. ह्या लोकांच्या भाडखोरपणामुळेच त्यांच्या भाळीं कडवे, नागली व साळी विधीनें लिहिल्या असें कवीस वाटते. खरें पाहता हा आर्यावर्त अवघा सलग गालीचाच पसरला आहे. तेथें देश कोंकण हे भेद कशाला? (२४) मराठेशाईत ब्राह्मण मराठयांत दुफळी नव्हती तेव्हां त्यांना स्वराज्यसुख मिळालें. त्यावेळीं मराठा अदमी यही बदन। बम्हन उसकी रूह है॥ २८।१३८॥ असें त्याविषयीं यवन म्हणत असत. ब्राह्मण मराठे एक होते तेव्हा भगवें निशाण दिल्लीवर फडकलें ५०।१३. सांप्रत त्याच सातार्‍यांत ब्राह्मण मराठयांचे विपट पडलें आहे. परस्पराचा घात करण्यांस ते टपले आहेत. म्हणून कवि करुणा भाकतो.॥ एकी ब्राह्मणमराठयांची। कधीं करशील देवा साची॥ त्यावीण मायभूमीची। दैना फिटणें अशक्य॥

५०।१६ ॥ सत्यसमाजी तमाशे व ब्राह्मण ब्राह्मणेतरवाद अजून तरी थांबायला नकोत काय? ब्राह्मण मराठ्यांचा चालू असलेला परस्परद्वेष समाजाला घातक आहे. एकोप्यानें राहिल्याशिवाय उन्नतीची आशा करणें व्यर्थ आहे ५३।२१०. जातिद्रोह, धर्मद्रोह, पंथद्रोह, राजद्रोह, गोत्रद्रोह, नीतिद्रोह हीं अनर्थांचीं द्वारें आहेत. तीं बंद झालींच पाहिजेत. (५३।२१२) पण जातपात अजीबात नाहींशी करावी या मताचा कवि नाहीं. कारण तो स्पष्ट सांगतो कीं ॥ चातुर्वण्यपद्धति योग्य आहे व्यवहारापुरती ॥ एका शरीराच्या अवयवाप्रमाणें सर्वांनीं सहकार्य करून गुण्यागोविंदानें राहावें. हेवा मत्सर या भावनांस थारा देऊं नये. परमार्थांत मात्र तिला मुळींच महत्त्व देऊं नये. (३८ व, ६०) पण ही दुहेरी कसरत कठीण नाहीं काय?

(३) अस्पृश्यता:—कवीने अस्पृश्यतेसंबधीहीं पुष्कळ ठिकाणीं उदार विचार प्रदर्शित केलेले आढळतात. भंगी घाणेरें काम करतात म्हणून त्यास नीच मानणें योग्य नव्हे. माताही आपल्या मुलाची मलमूत्रे साफ करित्ये. तिला जर त्यानें अपवित्रपणा किंवा नीचपणा येत नाहीं तर समाजाचें तशाच प्रकारचे काम करून त्यास आरोग्य देणाऱ्या जातीस कमी लेखणें अयोग्य आहे. त्याचप्रमाणें एका महारणीच्या तोंडीं पुढील ओंव्या घातल्या आहेत. ॥ महारांनीं भरल्या पाणी। काय विटाळे स्वर्धुनी। वा महार नीच म्हणूनी। काय त्यागिलें भूमीनें ॥ २४।१०७ ॥ ह्यावरून पानवठ्यावर महारांस पाणी भरण्याची आडकाठी दूर झाली पाहिजे असें कवीचे मत दिसतें. त्याचप्रमाणें विमलानंद साधूनीं पाट गावीं एका महारणीस स्पर्श करून महारोग बरा केला. तेव्हां सर्व ब्राह्मणानीं त्यांजवर भ्रष्टपणाचा आरोप केला. तेव्हा साधूनें त्यांस बजावलें कीं ह्या तुमच्या पोकळ कर्मठपणामुळेंच कोंकण दारिद्र्यडोहांत बुडालें आहे (२४), भूतदया कशाला म्हणतात हें तुम्हांस ठाऊक नाहीं, अशी त्यांची कान उघडणी केली आहे. त्याचप्रमाणें "नतराज मंदिर प्रवेश" मागणाऱ्या एका नद पारियाच्या चिदंबर ब्राह्मणांनीं केलेल्या छळाचें वर्णन अत्यंत हृदयद्रावक आहे. ह्यावरून देशोन्नतीसही अस्पृश्यता घालवणें अवश्य आहे असें कवीचें मत दिसतें.

* ब्राह्मण—मराठ्यांच्या वादाचें काल्पनिक चित्र मुळांतच वाचण्यासारखें आहे अ. ५३.

(४) सावकार व शेतकरीः–हिंदुस्तानांत जसे रजपूत तसे महाराष्ट्रांत मराठे होते. पण पडित काळांत, त्याच्या हातीं नांगर आला. पुढें त्याच कुणब्यानीं शिवाजीस स्वराज्य संस्थापनेस मदत केली. परंतु पुनः त्यांचें आज मातारें झालें आहे. कर्जांत ते आज बुडून गेले आहेत. कुणब्याची दानत व सावकाराची जुलूमजबरदस्ती, कऱ्हाड जवळच्या कोळे गावीं राहाणाऱ्या विटोबा घाडग्याच्या गोष्टीनें कवीनें सांगितली आहे. तें वर्णन आजच्या-स्थितीस लागू असून अगदीं करुणाजनक आहे. विटोबास साहूचें वडिलोपार्जित कर्ज होतें. तगाद्यास पठाण आला – ( त्यांचें वर्णन अगदीं हुबेहुब केलें आहे )–तव्हां कुणबी विनती करतो:––

आज द्याया काहीं नाहीं। घरामध्यें एकही पै। मका पिकला शेताठायीं। तिच्यावरीच गुजराण। ३१–२४। सकाळीं कण्या भरडितों। अस्तमानीं कणसें खातों। ताटें बु खंडे घालितो। गाई म्हशी गुराना ॥ २५ ॥ कशाचा आमचा संसार। सगळा फजितवडा थोर। आज महिने झाले चार। नाहीं लुगडें कातेसी। तवल्या मडकीं स्वयंपाका। हातरण्यास कावळा देखा। तो ही बहुत फाटका। सहस्रनयन इंद्रासम ॥ २७ ॥ पण तें पठाण मानीना व कोणापाशीं बायको गहाण ठेऊन पैसे फेड असें त्यानें सांगितले. शेवटीं कुणब्याला त्यानें सावकाराकडे नेलें. त्यानें त्यास तीन दिवस बळदांत कोंडून ठेवले. बळदाचें वर्णन इतकें किळसवाणें व भयकर आहे कीं तें विसापूर तुरुंगासही लाजवील. पुढें त्यास जामीनावर सोडले. तेव्हा तो उद्‌गारतो॥ धिग् धिग् शेतकऱ्याचे जिणें। धनी मात्र कष्टाचे ॥४६॥ पुढें बायको म्हणतये। साहू मेले खुशालचंद। चैनीमंध सदा धुंद। लक्ष्मीचा अंगीं मद। ओतप्रोत भरलासे॥ ४७ ॥ आम्ही कष्ट करावे। खळे त्यानीं भरून न्यावें। मातेऱ्यावरी काढावे। दिवस आम्ही मागुती ॥ हे त्याच्या बायकोचे सात्विक संतापाचे उद्गार किती सत्य आहेत! ते कोणास दया व चीड आणणार नाहींत? शेवटीं तो कोल्हापुरास जाऊन शिलेदार झाला व आपले आणि भावाचेंही कर्ज त्यानें नोकरीवर फेडले. ही गोष्ट अत्यंत उद्‌बोधक आहे. शेतकऱ्यांची स्थिति सुधारल्याशिवाय देशाचा उद्धार होणें अशक्य आहे, असेंच कवीचें मत आहे.

( ५ ) शिक्षणः—देश अज्ञानात बुडाला आहे. तेव्हां शिक्षण सार्वत्रिक

केलें पाहिजे त्याशिवाय देशोद्धार होणें नाहीं ही गोष्ट कवीस मान्य आहे. पण शिक्षण कोणतें द्यावें व कसें द्यावें ह्या विषयीं मात्र त्याचीं मतें स्वतंत्र आहेत. प्राथमिक शिक्षण घरींच झालें पाहिजे. तें उत्तम व्हावें म्हणून प्रथम स्त्रियांस सुशिक्षित केलें पाहिजे. येथवर कोणाचा मतभेद होणार नाहीं. परंतु त्याचे मतें हल्लींचें स्त्रिशिक्षण निरुपयोगी आहे. त्यायोगे स्त्रिया फाजील व उद्धट होतात. दया धर्म नीति त्यांच्या ठिकाणीं बाणत नाहीं. (११–७६–८०). म्हणून त्यांस धर्मग्रंथ पढवावे, व नीतिपाठ द्यावे, म्हणजे पुढें मुलेंही धार्मिक व नीतिमान होतील. जननी हाच बालकाचा खरा शिक्षक आहे. तीच एक त्यास सुपथास लावूं शकते. जें मास्तर शाळेंत छडीनें शिकवतो तेंच आई प्रेमानें घरीं शिकवते. हल्लीं भरत भूमींत माताच अशिक्षित असल्या-मुळें मुलांस छड्या खाव्या लागत आहेत. स्त्रिया सुशिक्षित झाल्या कीं बालकें प्रज्ञावंत होतात, म्हणून ॥ ज्यादेशीं स्त्रियाचा। वर्ग सुशिक्षित साचा। त्या देशींच लक्ष्मीचा। वास होतो निश्चयें ॥ ३९–३२॥ हें मतही सर्वांस ग्राह्य होईल असेंच आहे.

एकंदरींत पूर्ववैभवाचा अभिमान, स्वातंत्र्यप्रिति, स्वदेशप्रेम, सद्यस्थिती-बद्दल हळहळ व भावी उत्कर्षाची आशा, या ज्या गोष्टी राष्ट्रीय कवितेच्या द्योतक म्हणून मानल्या जातात, त्या सर्व उत्कटत्वानें दासगणूच्या काव्यात आढळतात. तेव्हां तो जरी संतकवि असला तरी राष्ट्रीय कवि ही आहे. आतां त्यानें सुचविलेले सुधारणेचे सर्वच मार्ग जरी सर्वांस पसत होतील असे नसले तरी त्याविषयींची त्याची तळमळ दिसून आल्याशिवाय रहात नाहीं. । गुलामगिरी नरकाहुनि नरक खरी ॥ १८-६३ ॥ किंवा ॥ ज्याचे मनीं न स्वदेशप्रीति। तो जंताहून नीच अति ॥ त्यामुढाचें निश्चिति ॥ तोंड कदापि पाहूं नये ॥ ३५-२६ ॥ या उद्गारांवरून त्याच्या हृदयाची ओळख सहज होण्यासारखी आहे.

रसपरिपोषासंबंधीं पाहतां अद्भुत व भक्ति या मुख्य यजमानांच्या पंक्तीला भयानक, बीभत्स, करुण व वत्सल हे पाहुणे बसलेले आढळतात. शृंगाररस क्वचित् उत्तानतेनें पंकिल झालेला दिसतो. कोंकणवर्णन, यात्रा वर्णन, हिमालयवर्णन, माहूरचें वर्णन, वगैरे स्थलवर्णनें त्याचप्रमाणें कर्कशा, कोमटी सावकार, उन्मत्त अधिकारी, मराठा व पोलिस इत्यादि

व्यक्तिवर्णनें फार मनोरंजक झालीं आहेत. तसेंच त्याचे वर्गवैशिष्ट्यदर्शक चुटके फारच चटकदार आहेत:—

**ब्राह्मण:**—कोकण व कोकणे इ.–जसें देहात हृदय तसें महाराष्ट्रात कोकण श्रेष्ठ. पण भिकार. तें दारिद्र्यनिकेतन आहे. चित्पावनांत भाऊबंदकी फार. विभक्तपणाची आवड. कोकणी, कानडा, मारवाडी, याना पहाताच लोक कपाळाला आठी का बरे घालतात? ॥ द्वेषी तितुके कोकणी। कपटी ते कानडे जाणीं। मारवाड्यालागुनी। घातली माळा मतलबें ॥ ३–६६ ॥ हे त्याचे उत्तर. ऋग्वेदी ते ऐटखोर। यजुर्वेदी कृपण फार। कण्व अवघे कपटागार। छा छू करिती चतुर्थवेदी ॥ १९–१८ ॥ सामवेदी चैनीत राहती। कर्‍हाडे जामात वधिती। हिरण्यकेशी रागीट असती। कोकणी अवघे बगळ्यासम ॥३९-२९ ॥ बहुतेक माध्वमतानुयायी दांभिक सोवळें करतात ३९।१२८. या आरशात ज्यानें त्यानें आपापलें प्रतिबिंब ओळखावें व निदान आपल्याच मनात तरी हळूच म्हणावें, "अरेच्या! खरेंच कीं!" **याचक** २९।५४ याचकात, कोपिष्ट, वैरागी, तेलगे लोचट, क्षेत्रस्थ तोंडपुजे, वारकरी ढोंगी, रामदासी दांभिक, शीख मगरूर, गोसावी दुष्ट, आणि फकीर उत्कर्षासहिष्णु, असे नमुने आढळतात. **धंदे:**–नोकरीत ताबेदारी, व्यापारात लबाडी, वकिली म्हणजे अनीतीची शाळा, जशीं काहीं शहरातलीं गटारें, वरून स्वच्छ पण आत घाण! वैद्यक परोपकारक्षम आहे पण काहीं वैद्य रोगाच्या माथींत खिसे भरतात ॥ ४१. ६६ ते ७६ ॥ ४४–११ ॥ मारवाडी तर पक्के सत, मुदलास हात लावीत नाहींत, कुराव्याज मात्र वारवार नेतात. ४५-७०.

ह्याशिवाय समाजांतील अनेक प्रचलित व्यंगे त्याच्या सूक्ष्म दृष्टींतून सुटलीं नाहींत. पुत्रप्राप्तीसाठीं अघोर आचरण करणाऱ्या स्त्रिया (६); पंढरपूरच्या अनाथलयात जाणाऱ्या बाया (१९); सासुरवास करणाऱ्या सास्वा (२८); जारणमारणादिप्रयोग करणारे बोवा व बाया: (५६) "मिस १९३४" (२८); नाटकी कीर्तनकार (२६); भोंदू वारकरी (२८); कचरापेटी भिक्षुक (६२); मद्यपी शाक्त (१०); तुरगब्रह्मचारी, कॉलेज

तरुण ( ४५ ) (Over-grown bachelors). या सर्वांची हजेरी कवीनें घेतली आहे.

या ग्रंथात अनेक ग्रंथ व ग्रंथकार यांचे उल्लेख आल्यामुळें जसें त्याचें वाङ्मयीन महत्व वाढलें आहे, तसें अनेक ऐतिहासिक व्यक्तींच्या नामनिर्देशानें त्यास ऐतिहासिक महत्त्व आलें आहे. उ. हरिबोवा भोंडव्याचा हरिबोध, बाबापाध्यांचा धर्मसिंधु, रमा वल्लभदासाची गीतटीका, ज्ञानेश्वराचे अनेकत्व, सरस्वतीकंठमणी रामजोशी, गुलाम महंमदाची गर्भगीता, हंसराज स्वामीची वाक्यवृत्ति, प्रतिबृहस्पति विवेकानंद, व जिवबा दादा बक्षी, शिंदे, नाना फडणवीस, मराठे सरदार, कर्नल मॉटगॉमेरी, नामदार गोखले व ह. भ. प. पांगारकर इ. ह्यांपैकीं शेवटल्या दोघाच्याच गोष्टी कुतुहलास्तव येथें दिल्या आहेतः–( १ ) शाके १८२७ कार्तिक व. १० मीस ना. गो. कृ. गोखले विलायतेस जाताना यदुबाबा ह्या कोंकणी साधूचा आशीर्वाद घेण्यास गेले होते. त्याच्या साहेबी पोषाकावरून दोघात झालेला संवाद व तदनंतर मी आपलें शिरोभूषण–पगडी–विलायतेंतही कायम ठेवीन असें त्यानीं दिलेलें आश्वासन हीं मोठीं मनोरंजक व उद्बोधक झालीं आहेत. त्यावेळीं गोखल्याना अप्रतीम यश आलें असें कवीनें सांगितले आहे ( अ. ५१. )

( २ ) वऱ्हाडचे गुलाबराव महाराज ( जन्म श. १८०३ ) हे जन्मांध होते. अमरावतीस ते एकदा गेले असता त्याचे दर्शनास अनेक लोक गेले होते. त्यापैकीं एकानें त्याना पहाताच दंडवत घातल. महाराज त्याची नाडी धरून म्हणाले. “ हे का पांगारकर आले ? ” त्यानंतर त्याचा हात धरून त्यांनीं त्यास देवालयात नेलें व तेथें ॥ “ विश्वचि माझें घर ” या ज्ञानेश्वरी ओवींवर प्रहरभर व्याख्यान दिलें. ह. भ. प. पागारकर बोवा वरील चमत्काराची साक्ष अझून देतात.

आटोपशीर व्याख्या, व्यवहारिक सुभाषितें व सुंदर म्हणी हीं तर ग्रंथभर विखुरलेलीं आहेत. त्यामुळें या ग्रंथास भाषादृष्टयाही फार महत्त्व आलें आहे. स्थलसंकोचास्तव थोडेसा नमुना दाखवून, हें फार लांबलेलें प्रकरण पुरें करूं:—

( १ ) जो प्रजेचें दुःख जाणें तोचि राजा म्हणावा. ( ३–२३ )

( २ ) काढा कडू लागतो जरी। परिणाम त्याचा सुखकारी ॥६–९९॥
( ३ ) ऐसेंच असावें कलत्र। कीं जें भर्त्या साह्य करी ॥
( ४ ) माय पावतां मरण। माहेर मुलीस पारखें ॥ ५–१८ ॥
( ५ ) रोग न कथिल्या वैद्यास। औषध त्यानें काय द्यावें ॥१५–१७॥
( ६ ) बदमार्गी बदमाष व्हावें। ऐसें गीताशास्त्र सांगे बरवें ॥अ. १९॥
( ७ ) रिता डेरा घुसळल्यावरी। शीण मात्र पदरीं पडे ॥ ३५–६॥
( ८ ) कशाला मी बी. ए. झालों। आता मात्र पस्तावलो ॥ ४६–६५

एवंच निजधर्माची टवाळी प्राण गेला तरी करूं नका, धर्मांतर करूं नका, चालीरीतींना धक्का लावूं नका, जातिमत्सर सोडा, सोवळें ओंवळ्यांतील दांभिकपणा टाका, राजा हा समाजाचा प्राण आहे म्हणून राजनिष्ठ रहा, अशी श्रोत्यास कवीने विनती केली आहे. पुढें नेहमींप्रमाणें ग्रथपठणाचें फळ देऊन आपली स्वत:ची हकीकत सांगितली आहे तिची पुनरुक्ति येथें नको. मात्र 'पूर्वी मी शिवभक्त व विष्णुद्वेष्टा होतों. आता त्यांस अभेद दृष्टीनें पहातों, ह्या ग्रथाचें लेखन माझा पट्टशिष्य दामोदर आठवले यांनीं ६२ अध्यायापर्यंत केले, तो एकदम निवर्तल्यामुळें माझी म्हाताऱ्याची काठी गेली.' वगैरे नवीन माहिती आपणास मिळते. पुढें आपल्या ग्रथाची नामावली देऊन मोरोपंताप्रमाणें। सुसंगति सदा घडो।...... न निश्चय कधीं ढळो ॥ अशी देवाजवळ त्यानें मागणी मागितली आहे. "प्रतिवर्षी वारी घडो, सगुण दर्शनाचा हेतु पुरो, चतुर्थाश्रम मिळो आणि विनादैन्येन जीवन चालून अनायासेन मरण येवो" तिच्यांतील ही प्रार्थना ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

हे पांडुरंगा रुक्मिणी पती। वंदन करून तुजप्रती।
शांति शांति त्रिवार शांति। वदून ग्रथ संपवितों ॥

हा ग्रंथ पंढरीस श. १८४७ त क्रोधनामसंवत्सरीं कार्तिक व.१० मीला दामोदराश्रमात बुधवारीं तीन प्रहरीं समाप्त झाला.

## गोदामाहात्म.

ब्रह्मांड पुराणांतर्गत गौतमी महात्म्यावरून प्रस्तुत गोदामहात्म्य कवीनें लिहिलें आहे. याचे अध्याय ३१ असून एकंदर ओंवीसंख्या २६३३

आहे. यांत पुराणातील अनेक कथा व तीर्थांचें महत्त्व यांचें वर्णन मुख्यतः आलें आहे. शिवपार्वती विवाहांत शृंगाराची चुणूक दिसते ( २ अ. ). सगरोद्धार, कुमारतीर्थ, कृत्तिकातीर्थ, पैशाचतीर्थ, पंचवटीतीर्थ, सनकाची मात्रागमनपापनिवृत्ति, वगैरे वर्णनें पुराणकथावाचकास रिझवतील. गोदावरी प्रदक्षिणा सिंहस्थांत करावी. सर्व झाली नाहीं तरी नाभीपर्यंत तरी करावी असें कवि सांगतो. शिवप्रदक्षिणा ब्रह्मगिरी, मुख प्रदक्षिणा पुणतांबे नगरी, कंटप्रदक्षिणा पैठणपुरी, हृदयस्थान मंजरथीं, नाभिस्थान शंखतीर्थी ( नांदेडात ), कटि मथनतीर्थी, जानु धर्मपुरी व चरण राजमहेंद्री, अशी गोदेची सर्वांगीण प्रदक्षिणा सांगितलेली आहे. कवीनें स्वतः ३५ स्त्रीपुरुषांसमवेत गोदेचीप्रदक्षणा केली होती. त्यात त्याचा पट्टशिष्य दामू हाही होता. ( ३१ ).

प्रसंगानुसार इतर ग्रंथाप्रमाणें ह्यांतही काही इतर माहिती आली आहे. शुक्रतीर्थाजवळ गोदावरीस रघुनाथदादानीं घाट बांधला आहे. त्यासंबंधीं कवि म्हणतो "तो धर्मनिष्ठ होता पण स्त्रैण असल्यामुळे त्यानें पुतण्याचा वध करविला, फिरंग्याना घरात घातलें, राजसत्तेच्या नाशाचा पाया ह्या राघ्यानेंच घातला. तो कुलांगार जन्मला. अशा पाप्याचा स्पर्शही नको म्हणूनच कीं काय त्या ठिकाणीं गोदेचा प्रवाह आटून गेला व ती उत्तरवाहिनी झाली." अर्थात् हा कार्यकारणभाव काव्यमय समजावा. पण याचवेळी त्यास भीष्माचार्यतुल्य बाळाजी विश्वनाथाची, रामलक्ष्मणाप्रमाणें शोभणाऱ्या बाजीचिमाजीची आटवण झाल्याशिवाय रहात नाहीं. धारणगाव कुमारीच्या हेमाद्रीनें बांधलेल्या, गौतमेश्वराच्या देऊळात आज दिवाही लागत नाहीं हे पाहून त्यास दुःख होतें. पण नांदुर नगराजवळ इंग्रज प्रभूनीं गोदेस धरण बांधल्यामुळें दुष्काळाची भीति नाहींशी झाली आहे. लोकहिताचें हें महत् कार्य करून इंग्रजानीं आपलें बुद्धिचातुर्य व्यक्त केलें आहे. आमच्या इंग्रज सरकारला असाच परदुःखाचा कनवाळा येवो म्हणजे आम्हाला त्याचेकडून सुखलाभ होईल अशी गोदेस कवीनें प्रार्थना केली आहे. त्याचप्रमाणें चहू वर्णांची एकी कर व आमचें स्वातंत्र्य आम्हांला त्वरित आणून दे. परकराच्या दास्यात कोणालाही ठेवूं नको अशीही मागणी त्यानें केली आहे. मोरोपंतानें आपल्या इष्टमित्राबद्दल ग्रामस्थांबद्दल जशी गगावकिली केली आहे,

तशी कवीनेंही आपल्या सर्व नात्यागोत्याच्या मंडळीबद्दल गोदावकिली केली आहे, व त्यापैकीं जे मृत असतील त्यास पावन कर व जिवंत असतील त्यांस दीर्घायु देऊन सुखी कर अशी विनंति केली आहे. सरतेशेवटीं हा ग्रंथ शके १८४३ दुर्मतीनाम संवत्सर, सिंहस्थ, चैत्र शु. ३ सोमवार या रोजीं उस्मान उद्दौला बहादूर सिंहासनावर विराजमान असतां नांदेडास पूर्ण झाला असें म्हटलें आहे.

## श्री पासष्टी भावार्थदीपिका

तिर्यपरी जो इया । दर्पण करील ओविया ।
तो आत्मा एर्‍हवीं दिसा । मिळेल सुखा ॥ ६३ ॥ पासष्टी.
तेवीं या ओविया । जो दर्पण करील पाहावया ।
आत्म स्वरूप तें ठाया । विचारदृष्टीनें दिसेल त्या ॥४९३॥ पा. दी.

पूर्वकाळीं महाश्रेष्ठ ज्ञानेश्वराय यांनीं श्रीमद्भगवद्गीतेवर भावार्थदीपिका करून मराठीला देखीकार लेणें चढविलें. त्याचप्रमाणें विद्यमान संताचार्य दासगणू महाराज यांनीं ज्ञानेश्वराच्या "पासष्टीवर" भावार्थदीपिका लिहून तिजवर एक साधें पण उज्ज्वल भरण घातलें. दिसण्यांत या ग्रंथाची अगदीं वामनमूर्ति आहे. पण त्यानें कीर्ति फार मोठी मिळविली आहे. त्याच्या सर्वांच्या सर्वच गोष्टी अगदीं असामान्य! श्री विष्णूचा अवतार म्हणून मानले गेलेले, योगज्ञानपारंगत, व बाळवयी ज्ञानेश्वर यांच्यासारखे मूळ उपदेशक आणि अप्रसिद्धिमग्न, तपोनिष्ठ व १४०० शें वर्षांचे वृद्ध चांगदेव यांच्या सारखे उपदेश जिज्ञासु. संत कवि दासगणू महाराज यांच्यासारखे त्याचे भावार्थप्रदीपक. संतसेवारत सुखधासारखे भावार्थदीपिका-प्रकाशक. तसेंच संतपरिषदेचे स्वागताध्यक्ष, संतवाङ्मय प्रेमी, कविवर्य, रसिकाग्रणी, प्रकांडपंडित प्राध्यापक चाफेकर यांच्यासारखे त्या ग्रंथाचे प्रस्तावक आणि श्रीमंत सरकार सर गंगाधरराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन के. सी. आय.ई. मिरज (सीनियर) संस्थानचे अधिपति यांच्या सारखे अर्पणपत्रिका ग्राहक—या सर्व गोष्टींचें रमणीय मीलन पाहून "उदात्त

* "पासष्टी" महानुभाव चक्रधराची आहे असें चांदोरकरांचें म्हणणें होतें. परंतु अंतर्बाह्य पुराव्यावरून ती ज्ञानदेवाचीच आले आहे असे सिद्ध झाले आहे.

वस्तुनो संपत्" अशा लक्षणयुक्त उदात्त अलंकाराची आठवण होते. आणि हें समृद्ध सौभाग्य आमच्या भागानगरातील एका चिमुकल्या चोपड्यास मिळालेलें पाहून कोणास सकौतुकाभिमान वाटणार नाहीं? मराठवाड्यांतील आधुनिक मराठी वाङ्मयासही महाराष्ट्रीय वाङ्मयात किती मोठें मानाचें पान मिळतें ह्याचें हें निदर्शक आहे.

ह्या लघु काव्याचा जन्मही चमत्कृतिपूर्ण प्रसंगात झाला आहे. सिद्धिसामर्थ्यानें फुगून गेलेल्या चांगदेवानें एकदा ज्ञानदेवास भेटण्याचें योजिलें. भेटीसाठीं पत्र लिहिण्यास घेतले. तो मानापमानाच्या गोंध्यात गुंतल्यामुळे त्याने पत्र कोरेंच पाठविलें! चांगदेवास सुधारण्याची ही सुसंधि आली आहे, असें निवृत्तिनाथानें जाणून "त्याचें मन अजून कोरें आहे, म्हणजे सुसंस्कारक्षम आहे, असा त्या कोऱ्या पत्राचा सदर्थ घेतला; व ज्ञानदेवास त्या कोऱ्या कागदावर सद्बोधगर्भ उत्तर लिहिण्यास सांगितले. त्या उत्तराच्या ६५ ओव्या म्हणजेच ही "पासष्टी" होय. चांगदेव किती, तो वटेश्वर कसा झाला, ज्ञानदेवाच्या भेटीची उत्कंठा, कोराकागद, सिद्धाईचे चमत्कार, भेटीला जाते वेळचें त्याचे ऐश्वर्य, भेटीचा अपूर्वप्रसंग, त्याचा संवाद, चांगदेवाची शरणागति पासष्टीचा सारांश व मुक्ताबाईचा त्यास उपदेश वगैरे संपूर्ण माहिती ह. प. रा. पांगारकर यानीं आपल्या ज्ञानेश्वर महाराज यांचें चरित्र आणि ग्रंथ विवेचन या ग्रंथांत (प्र. ७ वें पा. ११२ ते १२०) आपल्या नेहमींच्या वक्तृत्वपूर्ण, रसाळ व आकर्षक पद्धतीने सांगितली आहे. त्यांचें हें सर्वच प्रकरण–विशेषतः दुर्मिळ अभंगांच्या भरीनें–नितांत मधुर व श्रवणसुभग झालें आहे. तें प्रत्येकानें अवश्य वाचावें अशी आमची आग्रहाची सूचना आहे. असो.

पासष्टीवरील भावार्थदीपिका हा जरी येथें मुख्य विषय असला तरी दीपिकेनें जो भावार्थ स्पष्ट झालेला पाहावयाचा आहे त्याचें मूळ स्वरूप अगोदर काय याची सारभूत कल्पना असणें अवश्य आहे. ती अशी:—

चांगदेवानें मूळ पत्र (कोरें का असेना) कां पाठविलें? तर ज्ञानदेवाची भेट व्हावी म्हणून. पासष्ट ओव्यांत ज्ञानदेवानें उत्तर काय दिलें आहे? तर–मी, तू असें द्वैत कल्पिल्यामुळें तुला भेट व्हावी असें वाटतें. पण हा भेद अविद्यामूलक आहे. कारण तत्वतः "एकमेवाद्वितीयं ब्रह्म" मीतूंच

नाहीं. मग भेट कोणी कोणाची घ्यावयाची? हें अद्वैतज्ञान तूं पक्कें मनांत ठसव कीं भेट स्वयंसिद्धच आहे–असें उत्तराचें तात्पर्य आहे. आतां हें कसें सिद्ध केलें आहे हें थोडक्यांत पाहू:—

या तत्त्व विवेचनात एकंदर चार पदार्थांचें विवेचन करणें प्राप्त होतें. एक ब्रह्म (परमात्मा–आत्मा–शिव वगैरे एकच) व दुसरें जगत् ही एक-जोडी व दुसरी "तूं मी" ची जोडी. ब्रह्म किंवा परमात्मा किंवा संविद् हा एकच एक पदार्थ सर्वत्र भरलेला आहे. संविदच जगदाभासानें प्रकाशत आहे. सोनें–अलंकार; उदक–तरंग; चंद्र–कला; सूत–लुगडें; भिंत–तीवरील चित्रें; गूळ–त्याची गोडी; वस्त्र–त्याची घडी इ. अनेक दृष्टातानीं ह्या प्रश्नाचा ऊहापोह सर्वबाजूनीं केलेला आहे. दृश्य द्रष्टा दर्शन ही त्रिपुटी जर प्रत्यक्ष दिसते तर संविद्‌मधेंही भेद असणारच. या आक्षेपास उत्तर असें कीं संविद् भेदावस्थेस न येताच ही त्रिपुटी भासते. ती भ्रांतिजन्य आहे. आत्माच सत्य आहे. उ. आरसा पाहाण्यापूर्वी, तो पाहात असता, व तो दूर केल्यावर तिन्ही काळीं "मुख" एकच असतें. किंवा वाद्यामध्ये ध्वनि आणि काष्टांत अग्नि जसा सहजावस्थेंत असतो, तसा आत्मा जगतात असतो. त्याचप्रमाणें ध्वनि किंवा अग्नि जसा, वाद्यकाष्टावाचून असतो त्याप्रमाणें त्रिपुटीवाचून आत्मा स्वयंपणें असतो, ध्वनि वाद्यापूर्वी होताच. वाद्यानें तो प्रगट झाला इतकेंच. त्याचप्रमाणें दृङ्‌मात्र वस्तु पूर्वी होतीच. ती जगतामुळें कळून आली एवढेंच काय तें. तेव्हा जग हें आत्म्याहून भिन्न नसून आत्माच जगद्‌रूपानें आपल्याला सन्मुख झाला आहे. बुद्धि-मालिन्यामुळें आत्म्यावर जगत्पणाचा आरोप होतो. तें नाहीसें झालें कीं जगत्पणा जातो, व सर्वत्र आत्म वस्तु दिसते.

आता दुसरी जोडी "तूं मी." ची. "तू" ची हकीकत अशीः— जेवीं रवा कापुराचा। तेवीं तूं पुत्र वटेशाचा॥ २६६। कापुरचा एक रवा असला तरी तो सर्वगुणधर्मांनीं कापूरच आहे. त्याचप्रमाणे तू चांग-देव वटेशाचा म्हणजे आत्म्याचा अंश आहेस. मी ही वटेशाचा अंश आहें. तेव्हा तूं मी हें द्वैत निरर्थक आहे. डाव्या उजव्या हातानीं एक-मेकांस प्रेमानें मिठी मारली तरी काय झालें? दोन्ही हात एकाच देहाचे अंश. दोन्ही हातांचा स्पर्श आत्म्याला कळला. आधीं तुटी असेल तर मग

भेटी. चागदेवा येथें तुटी ही गोष्टच खोटी होत आहे, पहा. शुद्ध आत्म्याचे ठायीं "मी तूं भेद" नाही. तो एकच एक आहे. चागदेवा तुझें दर्शन घ्यायला जों माझें मन इच्छितें, तोच तें आत्माकार होऊन बसतें. मग भेटीचा व्यवहार वाया होतो. तेव्हां हे सखया चागदेवा तुझ्या भेटीस जीव उल्हासतो पण ती सिद्ध भेट वाया जाईल, बिघडेल, म्हणून भय वाटतें. तेव्हा देहविषयींची आत्मबुद्धि टाकून कूटस्थ आत्म्याची ओळख करून घे म्हणजे तुझी माझी भेट झालीच असें समज. तेव्हा हे मित्रा जी भेट व्हावयासाटीं तू हा खटाटोप केलास ती भेट तुझ्याच ठायीं आहे, हें तुला शेवटीं कळेल. अशा रीतीनें या पत्रभेटीची समाप्ति मोठ्या चातुर्यानें व नवलाईनें केलेली आहे.

आतां आपण दासगणूच्या भावार्थदीपिकेकडे वळू. ह्या टीकेच्या रचनेचा विचार कवीच्या मनात गोदातटीं नादेडास असतांना आला. पण ग्रंथास आरभ चद्रभागातटावर पढरपुरास झाला. आणि त्याची समाप्ति मिरज संस्थानातील मोडनिंब तालुक्यातील अरण गावीं शके १८५२ माघ शु.॥ पंचमीस शनिवारीं झाली. हा ग्रंथ अति रसाळ आहे. मात्र अहंकाराचा मळ निघाल्यावर याची प्रचीति येईल. आणि मग तो मुमुक्षूस अध्यात्माचा मार्ग दाखवील असें कवीने जे शेवटीं म्हटले आहे त्यात पुष्कळ तथ्य आहे.

या ग्रंथांत प्रथमतः २५१ ओव्यांत ज्ञानेश्वराचें चरित्र दिलें आहे. तें बहुधा सर्वविश्रुत चरित्रानुसारच आहे. पण त्यात एकदोन प्रश्नासबधीं ग्रथकारानें आपलीं मतें स्वतत्रपणें प्रगट केलीं आहेत तीं अशीं. ( १ ) संन्यसाश्रम टाकून पुनः गृहस्थाश्रम स्वीकारण्यांत विठ्ठलपत खरोखरी दोषी होता. परंतु पश्चात्तापानें व तत्त्वविचारानें तो पवित्र झाला होता. असा विचार गोदावरी नदीच्या तोंडीं त्यानें घातला आहे. ( २ ) चमत्कार करून सिद्धाईला उगी प्रतिष्ठा येते व परमार्थ बुडतो. हें दुसरें तत्त्व होय. ( ३ ) आपण मुंजीच्या आग्रहांत पडूं नये. आता शुद्धिपत्र मिळाले आहे तेव्हढें बस्स झालें. कारण मुज केल्यानें कर्मपरपरा बुडेल. पुढल्यास आपलें उदाहरण होईल, आणि संन्यास दीक्षेस कमीपणा येईल. आपल्या वडिलाचें करणें जरी अपरिहार्य अडचणीमुळें क्षम्य असलें तरी मतलबी लोक जाणूनबुजून ह्याचा गैरवाजवी फायदा घेतील म्हणून असें उदाहरणच

घालून देणें इष्ट नव्हे, अशी विचारसरणी निवृत्तीचे तोंडी कवीनें घातली आहे. ह्यावरून परंपरारक्षणाबद्दल कवीला विशेष कळकळ वाटत आहे असें अनुमान काढावेंसें वाटतें.

पुढें पासष्टीचें विवरण केलेलें आहे. या ग्रंथावर कांहीं[1] गद्य विवरणें झालीं आहेत परंतु पद्यटीका ही पहिलीच आहे. या ६५ ओव्यावर एकंदर ५९३ ओव्या आहेत. यांतील उपक्रमोपसंहारांच्या सुमारे ४७ ओव्या वगळल्या तर मूळ १ ओवीस अदमासें ८।९ ओव्या असें सरासरीनें प्रमाण पडतें. आणि हें माफकच आहे असें कोणासहि वाटेल. ह्यात सुमारे ⅕ म्हणजे १३ ओव्यावर २ ते ४ च टीकेच्या ओव्या आहेत, तर सुमारे ९।१० ओव्यावर सरासरी प्रमाणाच्या दुपटीहून अधिक आहेत. आणि ६३ व्या ओवीवर मात्र सर्वांत जास्त म्हणजे ४१ ओव्याची टीका आहे. आता या संक्षेपविस्ताराकडे जरा सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तर असें दिसतें कीं जेथे मूळ ओवींतली कल्पना सोपी आहे तेथे प्रचलित भाषेत तिचा फक्त अर्थ सांगून कवि पुढें जातो. अवश्य तर एखादा दृष्टांत देऊन तो अर्थ अधिक स्पष्ट करीत असतो. उ. ४३ व्या ओवीवर फक्त अर्थ सांगणारी २ ओव्याची टीका आहे. पुढें ४७ व्या ओवीवरील टीकेत "तू मी" कल्पनेला वाव कसा उरत नाहीं, हें सांगण्यास "मीठ जलाचा" उत्कृष्ट दृष्टांत त्यानें दिला आहे. १६ ओव्याची टीका प्रथमतःच ३८ व्या ओवी-वर येते. "येथे तळहातातळीं मिठी देणें" ही कल्पना जरा नवीन असल्यामुळे तिचें स्पष्टीकरण विस्तारानें करून "जलानें जलाचा गदेला करून त्यावर आपल्या लोळण्याचा सोहळा करून घेतला तरी तेथे भेद आहे का?" ह्या नवीन दृष्टान्तानें अर्थ सुलभ झाला आहे. ६० ते ६४ ओव्यावर अनुक्रमें १६, १५, ३३, ४१, २२ अशी टीका ओव्याची संख्या आहे. पहिलींत जीवब्रह्मैक्यज्ञानाचें विवरण केलें आहे. पण ६१ वी ओवी अगदीं सोपी असूनसुद्धां २ ओव्यानें होणाऱ्या कामास १५ ओव्या खर्ची घातल्या आहेत. याचें कारण असें कीं तींत निवृत्ति माऊलींचे–म्हणजे गुरुदेवतेचें–व तिच्या अलौकिक लाऊचें वर्णन सविस्तर केल्याशिवाय कवीला पुढें पाऊल टाकिता येईना. ६२ व्या ओवींतील "दोन्ही डोळस

१ हरिपाठ व चांगदेव पासष्टी–विष्णुबोवा जोगकृत. स. १९१९ आवृत्ती.

आरसे ” हें रूपक फार विस्तारानें व मोठ्या चातुर्यानें उकलून दाखविलें आहे. तर ६३ व्या ओवीवरील टीकेंत पहिल्या ५ ओंव्यातच अर्थ सागून झाला आहे. तरी “ हा ओंवीया दर्पण ” दाखविण्यास चांगदेवासच का निवडलें याचें स्पष्टीकरण—बिगर यत्तेंतील मुलांस अंकगणित शिकवितात, प्रौढास बिजगणीत शिकवितात—हा समर्पक दृष्टांत देऊन केलें आहे. त्याच प्रमाणें अध्यात्म ज्ञानास कर्म–भक्ति-या पायऱ्यानेंच जाणें कसें अवश्य आहे हें सहज जाता जातां सागितलें आहे. आणि पुंडलिक, नाभा, चोखा हे समान अधिकारी असून निराळे कसे हें आता सागून उगीच भाकड-कथा मी लाववीत नाहीं, असें म्हणून पाल्हाळाच्या भीतीनें त्यानें तें प्रकरण आटोपतें घेतलें आहे. ह्या विवेचनावरून दासगणुमहाराज सक्षेपविस्तार कोठें व कसा करतात ह्याची कल्पना वाचकांस येईल.

पण दीपिकेचें वैशिष्ट्य व महत्त्व वेदातासारख्या रूक्ष व गहन विषयाच्या अगदीं साध्या व सोप्या भाषेंत करून दाखविलेल्या फोडींत आहे. मूळ ग्रंथाच्या जुन्या व दुर्बोध भाषेमुळे सामान्य जनास अशा साह्याशिवाय तो समजणें अशक्यप्राय झालें आहे. त्यांत अनुभवाचे व खुणेचे बोल अस-ल्यामुळें गुरुमुखाशिवाय त्याच्या अतरीची खूण कळणार नाहीं. हें अवघड कार्य या दीपिकेनें मोठें सुलभ केलें आहे. त्यांत काव्य नाहीं व काव्याचा हा विषयही नव्हे. काव्याची अपेक्षाही कोणी अशा ग्रंथात करणार नाहीं. पण एकावर एक समर्पक दृष्टान्त देऊन त्यातील कूटस्थलें विशद करण्यात दासगणूंचा हातखंडा आहे. त्याचप्रमाणें तात्विक सिद्धात निरनिराळ्या तऱ्हेनें घोळून घोळून सांगून वाचकाच्या मनांत तो ठसविण्याचें कौशल्यही त्याचे अंगीं अपूर्व आहे. सामान्यतः त्याची पद्धत अशी आहे कीं—मूळ ओंवीचा साधा अर्थ प्रथम सागावयाचा. नंतर श्रीवटेशु, शिव, संवित्ति वगैरे शब्दांचे लाक्षणिक व पारिभाषिक अर्थ विशद करावयाचे, मग एखादें रूपक असेल तर संदर्भानुरूप त्याच्या गूढ अर्थाची उकल करावयाची. तें झाल्यावर दृष्टात व दार्ष्टांतिक यांतील पदांचा समन्वय सांगावयाचा. अमुक तमुक पदाचीच योजना ज्ञानोबानें कां केली अशी आपणच शंका उत्था-पित करून तिचें समाधान करावयाचें आणि ओंव्यांचा जन्यजनकभाव समजावून देऊन प्रस्तुत विषय जणूं करतलामलकवत् सुस्पष्ट करून द्यावयाचा.

जशी ज्ञानदेवांनीं तत्कालीं आबाळ सुबोध अक्षरांनीं ज्ञानदेवी गुंफली तशी दासगणूनीं आजकालच्या आबाळ सुबोध अक्षरांनीं ही भावार्थदीपिका प्रज्वलित केली. आणि म्हणूनच "पासष्टी" सर्वांस व्यक्तार्थ व सुदर्शनीय झाली आहे. तिची भाषा साधी असून ओघवती आहे. पण वेदांतासारख्या गभीर प्रतिपादनात पुढीलप्रमाणें वारंवार येणारे परकीय शब्द कर्णकटु व अरोचक वाटतात ह्यात संशय नाहीं:--हमेश; वायदा; कायदा; गप्पा; मवलत; मतलब; पत्ता; गदेला, खुलासा; चीज; झिलई; शिल्लक; मलमा; घिगर; बडिजाव; असो. हा एक दोष वगळला तर "पासष्टीची दीपिका उत्तम झाली आहे. ज्ञानदेव म्हणतात तशा "पासष्टी"च्या ओव्या दर्पण रूप आहेत खऱ्या; पण कालांतरानें साचलेला त्या दर्पणावरील दुर्बोधत्व-रूपी मल, दीपिकेनें दग्ध करून तो दर्पण पुन: दर्शनक्षम करण्याचे श्रेय दासगणूसच दिले पाहिजे. कालिदासाची उक्ति ही अशीच आहे:—

छाया न मूर्छति मलोपहतप्रसादे। शुद्धे तु दर्पणतले सुलभावकाशा ॥

नमुन्यासाठीं पुढें एक उतारा दिला आहे:—

सोनिया वरकल सोनें जैसा। का मुख मुखा हो आरिसा।
मम तुज संवाद तैसा। चक्रपाणी ॥ ४० ॥

अथवा जैसें सुवर्ण। आणि तपासण्याचे साधन। कसोटीही पूर्ण। सोन्या-चीच जाहली ॥ ३०० ॥ वा मुख कराया अवलोकन। मुखचि झालें दर्पण। तैसा तुझा आणि माझा जाण। संवाद ये ठाया ॥ ३०१ ॥ म्हणजे आत्माच हें सांगतसे। ज्ञानेश्वराच्या मिषें। आणि आत्मा तोच ऐकतसे। चांगदेव होउनी। २। म्हणजे ज्ञानेश चांगदेव बोलणे। हें आत्म्याचेच आहे स्फुरण। आत्म्या व्यतिरिक्त वस्तु आन। कोठें नसे कीं ॥ ३ ॥ हीच गोष्ट पुढारी। सांगतील इंद्रायणितटविहारी ॥ अवधान द्यावें अहो चतुरी। तयाचिया बोलाकडे ॥ ४ ॥

## अमृतानुभव भावार्थ मंजिरी ( मंजरी )

ही भावार्थ मंजरी। अमृतानुभवरूप जलावरी।
उठली आहे केवळ लहरी। काहीं न या पलीकडे ॥ ३५१ प्र. १.

ही मंजरी दास गणूनीं शके १८४९ प्रभव संवत्सर ज्येष्ठ व. ॥ १ गुरुवार या रोजीं गोदातटाकीं रामपुरी येथें पुरी केली. सातप्रकरणें संपल्यावर म्हणजे सुमारें २६०० ओंव्या लिहून झाल्यावर मोत्यासारखें सुंदर अक्षर काढणारी त्यांची दामू नांवाची लेखणी कालरुपी वाऱ्यानें मोडली. बाकीचें लेखन भगवान विठ्ठल काडयांनीं पुरें केलें असें ग्रंथकर्त्यानें निवेदन केलें आहे. दामू हा त्यांचा शिष्य होता व त्यावर त्याचे सुतनिर्विशेष प्रेम होतें हें मागें सांगितलेंच आहे.

ज्ञानेश्वराच्या अमृतानुभवाचीं प्रकरणें १० असून त्यांच्या सर्व ओंव्या ८०५ आहेत. मंजरी टीकेच्या ओंव्यान्ची संख्या ३११९ आहे. म्हणजे सरासरी प्रत्येक ओंवीवर ४ ओंव्याची टीका आहे. संक्षेपविस्ताराचें धोरण पांसष्टीप्रमाणेंच येथेंही आढळतें. जिथें मूळ ओंवी सोपी आहे तेथें तर एक एकच टीका ओंवी आहे. उ. प्र. ७ मूळ ओ. ७,८,९,१० यांत्र एक एकच ओवी आहे. व जास्ती म्हणजे १५ ते२० पर्यंत टीका ओव्या आहेत उ. प्र. ९–६९ । प्र. ९–२५ प्र. ४–३ । यावर अनुक्रमें १५।१६।२१ ओंव्याची टीका आहे. टीकापद्धति ही अगदीं तशीच आहे. पण परकी शब्द फारसे नाहींत. "संदूक" सारखा एखादा क्वचित् सांपडतो.

आतां मूळ ग्रंथाकडे थोडेसे वळूं. हा ग्रथ ज्ञानेश्वरी नंतरचा असून त्यांत परिणतप्रज्ञाची वाणी सर्वत्र विलसत आहे. स्वतंत्र ग्रंथरचना करण्याची सूचना निवृत्तीनें केल्यावरून तो ज्ञानदेवानें लिहिला असावा व मुकुंदराजाच्या परमामृतावरून अमृतानुभव हें नांव त्यास दिलें गेलें असावें असा कांहींजणांचा तर्क आहे, व तो अनुपपन्न दिसत नाहीं. "अनुभवामृत" असें दुसरें नांव ग्रंथाचे शेवटीं ज्ञानदेवानें दिलेलें आढळतें व तें त्यांतील विषयदृष्टया अगदीं यथार्थ वाटतें. या ग्रंथास मराठी वाङ्मयांत अपूर्व मान आहे. त्यावर एकंदर १० टीका झाल्या आहेत. त्यांपैकीं प्रल्हादबाबा बडवे व सहजानंद याच्यातर संस्कृत टीका आहेत. मोरोपंताच्या केकावलीशिवाय दुसऱ्या मराठी ग्रंथाचा असा बहुमान झालेला आढळत नाहीं. मराठी टीकाकारांत शिवकल्याण याची नित्यानंददीपिका नांवाची टीका शके १८५७ मध्यें झाली. हंसराज स्वामी (स. श. १७७७ परभणीचे) यांची समश्लोकी टीका आहे. अलीकडील टीका म्हणजे विष्णुबोवा जोग,

यांची सुप्रसिद्ध आहे पण ती गद्यांत आहे. भावे म्हणतात ह्या ग्रंथांतील विषय व भाषा हीं अवघड असल्यामुळें तो ज्ञानेश्वरीहून दुर्बोध झाला आहे. तरी मधून मधून उपमा दृष्टांत चिमतोड आहेत. ह. भ. पागारकर म्हणतात —हा सिद्धानुवाद आहे. भाषा सुबोध, मनोहर व काव्यपूर्ण आहे. तत्त्वज्ञान व काव्य ह्यांचा सुंदर संगम अन्यत्र पहावयास मिळणार नाहीं. आणि दोहोंतहीं थोडें थोडें सत्य आहे. दहा प्रकरणांत पुढील विषय आले आहेत—

१ प्रकृति पुरुषाचें ऐक्य २ सद्गुरुनमन ३ अविद्यात्मक वाणींतून मुक्त झाल्यावर विद्यात्मक वाणीचें बंधन उरतें, त्याचा निरास कसा करावा हें सांगितले आहे. ४ ज्ञान—अज्ञान—धर्मरहित अध्यात्मभावाचा विकास. ५ ज्ञानस्वरूप आत्म्यांत सच्चिदानंद कल्पनेचा लय कसा होतो ह्याचें प्रतिपादन. ६ शब्दमंडण व शब्दखंडण. ७ अज्ञानखडण व " जग अवघी वस्तुप्रभा " किंवा " जग चिद्विलास आहे हा मुख्य सिद्धांत मांडला आहे. ८ ज्ञानखंडण. ९ अभेदभक्तीचीं कर्में. १० ग्रंथमहिमा व उपसंहार. या सर्वांत ७ वें प्रकरण अत्यंत महत्त्वाचें आहे. कारण त्यांत ज्ञानदेवानें आपला मुख्य औपनिषदीय सिद्धांत मोठ्या थाटानें मांडला आहे. वसुगुप्ताचार्यांच्या शिवसूत्राची व बृहदारण्यकोपनिषदांतील ॥ विभाति यस्य भासा । सर्वमिदम् ॥ ह्या वचनाची दाट छाया त्यावर पडली आहे. ह्यांत शंकराचार्यांहून भिन्न असें नवीन तत्त्वज्ञान ज्ञानदेवानें तयार केलें आहे. तो म्हणतो:—ब्रह्मानें उघडलीं कवाडें । प्रकाशाचीं । म्हणजे नामारूपात्मक जगद्रूपानें ती ब्रह्मवस्तु विकासित केली. द्रष्टा ( आत्मा ) व दृश्य ( जगत्) यांचें पूर्ण ऐक्य आहे. दृश्य ( जग ) द्रष्ट्यावर ( आत्म्यावर ) अध्यारोपित आहे असें ( शंकराचार्यांप्रमाणें ) मानण्याचें कारण नाहीं. ( ओ. १६५ ते २६६ पहा ). हा ग्रंथ टीकेसह वाचतां वाचतां भाषेचें काठिण्य दूर होत जातें व मग त्यांतील अनेक स्थळांतील काव्यसौन्दर्य प्रतीत होऊं लागतें. जिज्ञासूनें पुढील स्थळें अवश्य पाहावीं. प्रकृतिपुरुषांचें ऐक्य( प्र. १ ओ. १—३९ )सच्चिदानंद या पदांचा लय ( प्र. ५. २२ ते २४); शब्दमंडण शब्दखंडण ( प्र. ६. १ ते ८ ) अविद्येचा अभाव वगैरे ( ६—४७ ते ५५ ).—

आतां दासगणूंच्या भावार्थ मंजरीचें वैशिष्ट्य कायतें पाहूं. टीकेचें उद्दिष्ट मुळांतील कठीण शब्दांचे संदर्भानुरूप अर्थ सांगणें, पूर्वापर संबंध

जोडणें, रूपकांचें स्पष्टीकरण करणे, व गूढार्थांचें प्रकाशन करणें, हें होय. आणि असें करतांना ग्रथकार स्वतःच्या अनुभवाचे अगर परपरेंत चालू असलेले अनेक दृष्टात देऊन मुळावर पूर्ण प्रकाश पाडीत असतो. ह्या निकषावर जर प्रस्तुत टीकेचें परीक्षण केलें तर ती सर्वतोपरी कसास उतरते असेंच म्हणावे लागेल. अर्थात् ही गोष्ट पुढील कांहीं उदाहरणांवरून सहज पटण्यासारखी आहे:--

अगदीं पहिलीच ओंवी पहाः-मुळांतील ॥ उपायवन वसंतु जो आज्ञेचा अहेव तंतु ॥ इ. मधील रूपक सुबोध रीतीनें स्पष्ट केलें आहे. वनातील निरनिराळ्या वृक्षाना पुष्पफलें येण्यास जसा वसतऋतु अवश्य तसा ईश्वरप्राप्तीचे नाना मार्ग फलद्रूप होण्यास गुरुकृपा अवश्य आहे. पतिव्रतेचें सौभाग्य जसें मंगळसूत्रामुळें, तसें ब्रह्मविद्येचें सौभाग्य गुरुमुळे होय.

दुसरींत आडवें, भव, या शब्दाचे अरण्य व फेरे असे अर्थ सांगितले आहेत. त्याचप्रमाणें गुरु या भवारण्यात षड्रिपुरूपी हिंसक पशूच्या तावडींतून शिष्यास सोडविण्यास कारुण्यानें धावलें हा गूढार्थ प्रकट केल्यामुळें सर्व ओंवी अगदीं प्रसन्नार्थ झाली आहे. त्याचप्रमाणें निवृत्ति शब्दावरील मूळच्या कोटीचें-सद्गुरुस्वरूप निवृत्तिच आहे तेथें उपमेय उपमेची गति कुंठते, व तें सापेक्ष धर्मरहित निवृत्तिरूप निवृत्तिच आहे-हें स्पष्टीकरण किती मजेदार झाले आहे (प्र. २. ७०-७१). वस्तु जरी एकच असली तरी तिचें एकत्व न भंगतां तिच्यात अनेकत्व असू शकतें ह्याला ज्ञानोबानें डोंगर कोरून देव, देऊळ व परिवार करण्याचें सामान्य उदाहरण घेतलें आहे, तर त्यावर वेरुळच्या कैलास लेण्यांचें विशेष उदाहरण किती समर्पकपणें दिलेलें आढळतें ! व त्यावर लगेच वृक्ष खोड, मूळ, फांद्या, पानें ह्याचें स्वतःचें दुसरे उदाहरण कवीनें दिलें आहे (प्र. ९-४१). त्याचप्रमाणें ह्याच प्रकरणातील शेवटच्या ओंवीवरील टीका फारच बहारीची झाली आहे. पहाः—हे गुरुराया " मी तूं "ची भावना वेचून तूं सोयरा झालास. आणि त्यानेंच तूं तुष्ट झालास. ह्या ओवीचा भावार्थ दासगणूनें असा दिला आहेः-जगत् हें प्रकृतिपुरुषाचा विलास आहे. हें भेदत्रयरूप असतां मूळ वस्तु शोधूं गेलें तर ती एकच आहे. त्याची अभेदता यत्किंचित्‌ही ढळत नाहीं. कारण तिन्ही चिद्रूपच आहेत. ह्यास उदाहरण पहाः-गूळ, गोडी,

आणि पिवळेपण ही त्रयी गुळांतच एकवटून आहे. तिहीं मिळूनच गूळ होतो. त्याचप्रमाणें पुरुष, प्रकृति व जगत् किंवा गुरु-शिष्य-व-भजन ह्या त्रयी आहेत. म्हणून आत्मविद् कर्म, भक्ति, व ज्ञान ही त्रयी सोडीत नाहीं, व एतद्विरुद्ध भाव अभावरूपानें घेतो. आणि ज्ञानोत्तरकाळींही कर्मोपासना असतात. पण त्या सकल्पविरहित असतात. उ. आंबा खाणारा, रस खातो पण साली कोयी फेकतो. अशीं जागोजाग स्वतःच्या निरीक्षणातलीं उदाहरणें देऊन प्रतिपादनास मोटी नवाळी व नवलाई आणली आहे. आता यातील काहीं उतारे देऊन हें प्रकरण पुरे करूं:—

( १ ) मोक्षबंध खोटे आहेत.

बागुलाचेनि मरणें ॥ तोषावें कीं बाळपणें ॥
येरा तो नाहीं मा कोणें ॥ मृत्यु मानावा ॥ १ ॥ प्र. ३. १३.

बागुलाच्या मरणानें । बालचि तोषे अज्ञानपणे । इतरा न समत बागुल असणें ॥ मग तत् मृत्यु कोण मानी ॥ ५८ ॥ लहान लेकरातें बरवा । खरा वाटे बागुलबुवा ॥ म्हणून तो मेल्याचा व्हावा । आनद त्या हा न्यायचि ॥ ५९ ॥ बागुलाचें बागुलपण । लेंकरा खरें वाटे म्हणून । भिऊं लागे त्याचें मन । तेंच तोषे तो मेलिया ॥ ६० ॥ एवच बालका—ठायीं अज्ञान । वास्तव्य करी म्हणून । बागुलाचें जननमरण । बागुलासह झालें खरें ॥ ६१ ॥ तेंच ज्ञानें पाहता । बागुल खोटा सर्वथा । जन्म मरणाची ही वार्ता ॥ खोटी त्याच्या सहजची ॥ ६२ ॥ यावर मोरोपंत पहा:—
कीं भीतो भ्रांत तृषा मृगजळमग्नासि काय तारावें ? ॥ सत्यचि हें, परि शिशुचें भय जाया बागुलासि मारावें ॥ [ संशयरत्नामाला ॥ १५ ॥ ]

( २ ) अनुभवामृत महात्म्य

ज्ञान देवो म्हणे श्रीमत । हे अनुभवामृत ।
सेऊंनि जीवन्मुक्त ॥ हैंचि होतु ॥ प्र, १०.१९

म्हणून म्हणती निवृत्ती छात्र । हा आमचा अनुभवामृत । खराच आहे श्रीमंत । सर्व लक्ष्मी ये ठाया ॥ ७६ ॥ जे जे कोणी जीवन्मुक्त । ते अनुभवाच्या सेवनें सत्य । ऐश्वर्यावान श्रीमंत । तेचि पैं ॥ ७७ ॥ आणि त्याच्या

श्रीमंतीचा । केवळ अनुवाद आमुचा । अनुभवामृत नावाचा । ग्रंथ आहे ॥ ७८ ॥ श्रीमंती श्रीमताटायीं असे । परी पुढें निशाण विलसे । जे निशाण खूण असे । तयाचिया श्रीमंतीची ॥ ७९ ॥ वा आम्ही कदम म्हणून । चोपदार म्हणे राजा लागुन । तेथें काय अधळेपण । आले होतें नृपासी ॥ ८० ॥ ही ललकारी तयाची । व्यर्थ परी खूण माची । भूपतीच्या वैभवाची तेवी अनुभवामृत हें माझें ॥ ८१ ॥

असो. अनुभवामृत * हा ग्रंथ जसा थोर आहे तशीच त्याच्यावरील ही मजरीटीका ही थोर आहे. अंजन डोळ्यात घातले की भूमिगत अर्थसंपत्ति दिसते असें म्हणतात. दासगणूच्या टीकांजनाने अमृतानुभवाची निगूढ अर्थसंपत्ति मात्र खरोखरी प्रतीत होत्ये. दुर्बोध आणि केवळ गुरुपरंपरेच्या कडीकुलपांत अडकलेलें अध्यात्मज्ञान साळ्याभोळ्या लोकांस सहज मिळवून देण्याचे साधन निर्माण केल्याबद्दल टीकाकारास कोणीही धन्यवादच देईल.

**कीर्तनोपयोगी आख्यानेः**--दास गणूस कीर्तनाची आवड असल्या मुळे त्यांना कीर्तनोपयोगी अशीं सुमारें ४७ आख्यानें रचल्याचें मागे सांगितलेच आहे. चोखा महार, रोहिदास चांभार, सेना न्हावी, सावता माळी, गोरा कुंभार, कबीर, शेखमहमद, मिराबाई, जनाबाई, कान्होपात्रा, अहिल्याबाई होळकरीण वगैरेंचा, जातपात, धर्म, व स्त्रीपुरुष इ० भेदाभेद न करिता त्यात समावेश केला आहे. हीं सर्वच आख्यानें मोठी उद्बोधक व

* **टीपः** अमृतानुभव ग्रंथ हा अत्यंत लोकप्रिय आहे. त्यावर अनेक कर्त्यांना अनेक टीका केल्या आहेत. ( १ ) शिवकल्याणाची 'नित्यानंद दीपिका' शके १५५७ ( २ ) निरंजन रघुनाथ यांची 'अनुभवामृत पदबोधिनी' ( ३ ) सहजानंदाची सहजानंदी संस्कृत टीका ( ४ ) वांरेश्वराची ( ५ ) हंसराज स्वामींची ( स. १८८५ समाधि ) समश्लोकी टीका १००० ओव्या ( ६ ) रा. कृ. गर्दे यांच्या ओव्या ( ७ ) आत्माराम श्रीकृष्णाजीमहाराज केण-श्रीगोंदेकर श. १८५० 'अमृतलहरी' गद्यटीका ( ८ ) विश्वनाथराव ( उर्फ भय्याकाका कोल्हापूरकर ) 'यांची ज्योत्स्ना' ( ९ ) प्रल्हादबाबाकृत समश्लोकी. त्यांपैकी कांहींचा उल्लेख अण्णा मोरेश्वर कुंटे यांनीं 'अमृतानुभवाचे' प्रकाशन करतांना केला आहे. शके १८१०.

रमाळ झाली आहेत. हीं कीर्तनोपयोगार्थच केलीं असल्यामुळें यांस अपूर्ण चरित्रें म्हणणें किंवा गद्यपद्यमिश्रित म्हणून कडबोळीं म्हणणें युक्त होणार नाहीं. नमुन्याकरितां मागें आख्यानरत्नमालेंतून प्रसिद्ध झालेलें तुकाराम-चरित्र व आतां नुकतेंच छापलेलें एकनाथचरित्र याचा विचार करूं.

तुकारामचरित्रः—याचा पूर्वरंग दे. ल. महाजन यानीं लिहिला आहे. त्यांत ॥ नाम सर्कीर्तन साधन पैं सोपें। जळतील पापें जन्मातरींचीं ॥ १ ॥ हा तुकारामाचा अभंग पालुपदासाठीं घेतला आहे. ह्या दोन चरणाचें प्रतिपादन दोन भागात, ज्ञानदेव, एकनाथ याचे उतारे व तुकारामाच्या इतर अभगाचे चरण आधारादाखल घेऊन, कलियुगात नामसर्कीतन हा एकच मार्ग ईश्वरप्राप्तीस सोपा आहे, असें सिद्ध केलें आहे. हा पूर्वरंग अगदीं साधा व सहज समजण्यासारखा झाला असून एकदरींत बरा आहे. तरी पण आख्यानात तुकाराम चरित्र यावयाचें असल्यामुळें पूर्वरंगाची उभारणी मुख्यत: तुकारामाव्यतिरिक्त इतर साधूच्या वचनानी झाली असती व उत्तर भागात उदाहरणादाखल तुकारामचरित्र आलें असतें म्हणजे हें आख्यान अधिक उठावदार दिसलें असतें. असो. आता उत्तर भागा-कडे वळू. त्यात श्लोक, दिंडी, ओवी, आर्या, पद, साकी वगैरे क्रमानें येणाऱ्या पद्यामुळें आख्यानाची बाधणी वैचित्र्यपूर्ण, मनोरम व गायना-नुकूल अशी झाली आहे. त्यामुळे हें आख्यान मोठें श्रवणसुभग झालें आहे. ॥ जया भग नाहीं अशा त्या अभगा रचोनि सदा गायिलें पाडुरंगा ॥ ह्या श्लोकार्धातच तुकाराम आपल्या वैशिष्ट्यासह आपल्यापुढें अवतरलेला दिसतो. नतर तुकारामाची पूर्वस्थिति, त्याचा भोळसरपणाचा व्यापार व "जेविं जळू घे अशुद्ध शोषोनी" याप्रमाणें लुच्चाचें त्यास लुटणें, स्वप्नांत नामदेवदर्शन व शतकोटि अभगपूर्तीचा आदेश व रामेश्वरभट्टाचें अभंगा-च्या वह्या बुडविणें, त्यास अनगडशहाचा शाप, व तुकारामाचे हस्त-स्पर्शानें त्याचे देहाची शाति व त्याचें तुकारामशिष्यत्व वगैरे लोकप्रसिद्ध गोष्टी त्यात आल्या आहेत. ह्यातील ॥ दिला त्रास ग मेल्यानीं। हो तळ-पट याचें अवनीं ॥ असें म्हणणाऱ्या तापट जिजाबाईचें व ॥ भर दे कटोरा भर दे ॥ ओरडणाऱ्या अधीर अनगडशहाचें स्वभावचित्र मोठें ठसठशीत

झालें आहे. पण तुकारामाच्या मुलीचें-भागीचें-स्वभावरेखन बरेंच अस्वाभाविक वाटतें. कारण दुडदुड धांवणाऱ्या लहान बालिकेनें ॥ म्हणण, म्हणीं, जगत्‌लयीं धनहीनतेनें दिधला थाला । विठू वनमाली लाजी राहील ॥ असे संस्कृत शब्द व वाक्प्रचार थोडया भाषेत का होईना उपयोगात आणणें शक्य दिसत नाहीं. असो.

एकनाथचरित्रः—मिरज (सीनियर) संस्थानचे अधिपति श्रीमत बाळासाहेब पटवर्धन यांस अर्पण केलें आहे. व त्यास फर्ग्युसनकॉलेजातील प्राध्यापक श्री. परशुराम महादेव लिमये एम. ए. यानीं मार्मिक प्रस्तावना लिहिली आहे. हें अधिक टापटिपीचें व व्यवस्थित असून रसाळ व प्रासादिक झालें आहे. यातील अध्यात्मविवेचनही मोठें सुबोध व आकर्षक झालें आहे. ह्याचें चार भागांत विवेचन केलें आहे. (१) बालपण, दृष्टान्त, गृहत्याग, गुरुभेट, गुरुप्रसाद, व दत्तदर्शन वगैरे चरित्रभाग यांत आला आहे.(२) अत्यजगृहीं भोजन; (३)अत्यजास श्राद्धाचमसमर्पण: जातिबहिष्कार, स्वर्गस्थ पितरांचें अवतरण व दत्तदर्शन इ. गोष्टी सांगितल्या आहेत. (४) मुसलमानांची अडवणूक व त्याची समजूत. ह्याचें वर्णन ह्या भागात आलें आहे. हीं वर्णनें क्वचित् भक्तिरसानें व क्वचित करुणरसानें मोठीं बहारीचीं झालीं आहेत. मागील आख्यानाप्रमाणें ह्यांतही श्लोक, दिंडी, ओंव्या, कटाव, आर्या, गझल, कवाली व पदें अशीं संस्कृत, प्राकृत व विदेशी वृत्तें योजून त्यास दासगणूनें मनोहर विविधत्व आणिलें आहे. विशेषत: त्याची प्रसंगानुकूल योजना इतकी उत्कृष्ट झाली आहे कीं तीं एकताक्षणींच एकनाथांचा वर्ण्य विषयांत समाधि लागते. साधी सोपी भाषा व उचित दृष्टांत ह्यानीं ह्या आख्यानास फार रम्यत्व आलें आहे. दासगणू स्वत: उत्तम कीर्तनकार आहेत. त्याच्या तोंडून त्याचीं आख्यानें ऐकण्याचें भाग्य ज्यास लाभलें असेल ते धन्य होत! कीर्तनसंस्था हाच कर्म, ज्ञान, भक्ति व वाङ्मय यांच्या प्रसाराचा एक मुख्य जुना मार्ग होता. अद्यापहि तो थोडयाशा फरकानें का होईना चालच आहे, म्हणून या आख्यानांस त्या दृष्टीनें थोडेबहुत वाङ्मयीन महत्त्व देणें जरूर आहे. असा विचार केला असतां दासगणूच्या ह्या अनेक आख्यानानीं मराठी वाङ्मयांत एक प्रकारची चांगली भर घातली आहे. असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

# प्रकरण ८ वें

## ज्योतिर्विभूषण[1] भगवंत गोविंद तोडेवाले.

### (स. १८७३–१९१८)

या असामान्य गृहस्थाचा जन्म शके १७९५ (सन १८७३) भाद्रपद शु॥ ८ स तालुका आंबा जोगाई जिल्हा बीड येथें झाला. हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण होते. गंगाबाई व गोविंदराव हीं त्यांची मातापितरें होत. उभयतांही सदाचारसंपन्न व धार्मिक प्रवृत्तीचीं होतीं. गोविंदराव औरंगाबाद येथें सुभेदार कचेरींत नोकर होते. प्राथमिक शिक्षणासाठीं त्यांनीं आपल्या मुलास तेथील सरकारी शाळेंत घातलें होतें. भगवंतरावाचें पहिलें लग्न ११ व्या वर्षी झाल्यावर त्याचे मामेभाऊ भालचंद्र जोशी यांजकडे जोगाईस थोडेसें संस्कृत व नित्य ब्रह्मकर्म याचें अध्ययन त्यांनीं केलें. नंतर बीड येथें त्यांनीं फारशीचा उत्तम अभ्यास केला. लहानपणापासूनच त्याचा कलाकौशल्याकडे फार ओढा असल्यामुळे, सुंदर हस्ताक्षर लिहिणें, चित्रें काढणें व कातरकाम करणें या गोष्टींत त्यांनीं फार आश्चर्यकारक असें प्रावीण्य संपादन केलें होतें. पुढें कांहीं दिवस त्यांनीं वकीलीच्या परीक्षेचा अभ्यास केला, परंतु त्यांत त्यास यश आलें नाहीं. त्याचें चित्त पहिल्यापासूनच संसाराकडे व नोकरीकडे नव्हतें. त्यांत सुप्रसिद्ध साधु बाळकृष्ण महाराज यांचा कृपाप्रसाद झाल्यापासून तर तें त्या गोष्टीवरून अजीबात उडालें. प्रपंचाचें दुसरें साधन नसल्यामुळें त्यास पुढें जरी नोकरी धरावी लागली, तरी तिजवर त्यांची आसक्ति कधींच नव्हती. एवढेंच नव्हे तर अनेक वेळां तींत त्यांनीं धरसोड केली. पहिले कुटुंब निवर्तल्यामुळें शके १८२१ त त्यांनीं दुसरा विवाह केला. बाळकृष्णबोवांनीं त्यास एक

---

१ श्रीमज्जगद्गुरु करवीर व संकेश्वरमठ यांनीही त्यांच्या काळाबंधादि कृतिंवर प्रसन्न होऊन त्यांस एक सुवर्ण पदक व महावस्त्र देऊन "ज्योतिःकलादर्श" ही पदवी दिली व त्यांस त्यांच्या भागांत धर्मोपदेशक नेमिलें.

कुंडली काढून दिली होती. तीच आज्ञा असें समजून ह्या विषयाचा त्यांनीं सांगोपांग अभ्यास करण्याचा निश्चय केला. ज्योतिषशास्त्राचें अध्ययन फार परिश्रमपूर्वक करून, त्यात त्यानीं उत्तम प्रगति केली. एका फकिराजवळ रमलशास्त्राचेंही अध्ययन त्यानीं केलें होतें. ह्यामुळें फलज्योतिष हेंच त्यांच्या उपजीविकेचें मुख्य साधन झालें. त्यानीं अनेक ठिकाणीं प्रवास करून मोठमोठ्या विद्वानांस व अधिकाऱ्यास आपल्या अलौकिक कुंडलीविज्ञानानें थक्क करून सोडलें. द्वारका मठाच्या श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्याकडून भगवंतरावांना "ज्योतिर्विभूषण" अशी पदवी मिळाली. पुढें त्यांनीं पुष्कळ प्रवास केला व जागोजाग फलज्योतिषावर व्याख्यानें देऊन व कांहीं सिद्धींचे अपूर्व चमत्कार दाखवून मोठाच नावलौकिक मिळविला. हिंदुमुसलमान जनता व अधिकारी त्याजवर प्रेम करीत असत. शृंगेरीच्या जगद्गुरूनींहीं अंब्यास त्यांस महावस्त्र देऊन त्यांचा मोठा सन्मान केला. त्याचप्रमाणें अचूक भविष्यफळ वर्तविण्यात व मनांत धरलेल्या गोष्टी बरोबर सांगण्यांत त्यांची फारच ख्याति झाली होती. शके १८२२ त त्यानीं पैठणास "ग्रहविहारभुवन व फलज्योतिषादर्श" नावाची संस्था केवळ स्वतःच्या हिमतीवर स्थापन केली. ह्या संस्थेंत ज्योतिषशास्त्राच्या अनेक ग्रंथांचा संग्रह केला गेला होता व तेथें त्याचें अध्ययन करण्यास सर्वांस मोकळीक असे. परंतु पुढें कांहीं अनभिज्ञ व परोत्कर्षासहिष्णु लोकांकडून त्यांस त्रास होऊं लागल्यामुळें त्यानीं एकांतवास पत्करला. ह्या काळांत वेदांत ग्रंथांचें परिशीलन व ग्रंथलेखन हीं कार्यें त्यांनीं केलीं व अज्ञान कंसवध, जगन्नाथ पंडित, महम्मदसाहेब, नोकरीचा राजिनामा, संगीत चूडाला नाटक, प्रकाश, कृष्णकुंडली, राधाविलास, प्रारब्धाचा नमुना, रावण-मंदोदरी संवाद, साधु बाळकृष्ण महाराजांचें चरित्र, दैव व जगत्, सद्रत्नपद्यमाला, चेहऱ्यावरून कुंडली मांडणें, वगैरे ग्रंथ लिहिले. ह्यांपैकीं आज्ञान कंसवध, बाळकृष्ण महाराजाचे चरित्र, चेहऱ्यावरून कुंडली मांडणें, लोलिंबराजचरित्र वगैरे पुस्तकें छापून प्रसिद्ध झालीं आहेत. ह्या सर्वांत आज्ञान कंसवध हा ग्रंथ सर्व बाजूंनींच अद्भुतरम्य झाला असल्यामुळें तो श्रेष्ठ आहे. त्याचें प्रथमतः विवेचन करूं:—

## अज्ञान कंसवध.[1]

आठांत आहे पूर्ण प्रगट । परिगुणहि भरले त्यानें आठ ॥
करुनि पहावी त्वां खटपट । आतां झटपट कंस राया ॥

मराठवाडा ही संतांची तशीच मराठी वाङ्मयाची मायभूमी म्हणून आज ६।७ शतकें गाजत आली आहे. आणि तेथ निवृत्तीचे मळे पिकविण्याची परंपरा पुरातन ज्ञानदेवापासून तों आद्यतन दासगणूपर्यंत चालू आहे. ह्या मळ्यांत आजपर्यंत अद्वैत वेदान्तानें अमोप पीक पिकलें आहे, परंतु त्यात अद्भुत कल्पना, सूक्ष्मबुद्धिवैभव, गाढ विद्वत्ता, व गूढसंशोधन ह्या दृष्टींनीं हें चिमुकलें खोरडें अतीव स्पृहणीय झालें आहे. भक्तिज्ञानाची अशी अपूर्व मांडणी आजपर्यंत कोणत्याहि ग्रंथात आढळत नसल्यानें ह्या ग्रंथाची नवलाई केवळ इकडच्याच प्रथांत अलौकिक नसून सर्व मराठी वाङ्मयांत सुद्धां ती कौतुकास्पद झाल्याशिवाय राहाणार नाहीं. असो आतां ह्या ग्रंथाच्या भूमिकेकडे वळू.

भूमिका व कथानुसंधानः—

काममोहित क्रौंच मिथुनापैकीं एकाचा आकस्मिक वध पाहून आद्य कवीस काव्यस्फूर्ति झाली व लागलीच छंदोमयी वाणी त्याचे मुखांतून अवतरली. त्याचप्रमाणें ह्या कवीस ज्या दिवशीं मंत्रोपदेश झाला त्याच रात्रीं बारा वाजतां वरील ओवी स्फुरली. पुढें वेळोवेळीं जशी स्फूर्ति होत गेली तशी रचनाही होत गेली व हें लहानसें काव्य निर्माण झालें. विषय जरी जुना तरी त्याची मांडणी अगदीं नवी व गूढ असल्यामुळें पद्यातील प्रतिपादन व्हावें तेवढें सुबोध झालें नाहीं, ह्या जाणिवेनेंच ग्रंथकारानें स्वतःच विषयप्रवेशिकेंत गद्यांत आपली भूमिका स्पष्ट केली आहे. ती अशीः—

( १ ) देवकी मुलांत आठवा, प्राण घेईल मथुराधवा
संकट तुमच्या आहे जीवा, निराळवाणी वदतसे ॥१९॥

ही आकाशवाणी ऐकून कंसानें देवकीच्या आठव्या मुलाचा प्राण घेण्याचा निश्चय केला. इतक्यांत नारद प्रगट झाला. व त्यानें परमेश्वर

---

१ प्रा.द्धि १९१५ यशवंत प्रेस पुणें, किं. १२ आ. द्वितीयभाग स. १९२९.

सर्व व्यापी कसा आहे हें युक्तिवादानें सिद्ध केलें. देवकीचीं सर्व मुलें कंसाकडून मारलीं जावीं असा नारदाचा मूळ हेतु होता हें प्रसिद्धच आहे. त्यास अनुसरून प्रत्येक मुलाचा आठाशीं संबंध कसा येतो हें त्यानें कंसास मोठ्या चमत्कारिक युक्तिनें सांगितलें. तें असें:—

पहिला:—आठाचा पाडा लिहिला व अनुक्रमें त्यातील अंकाची मिळवणी करीत गेलो तर ८,७,६,५,४,१२,११,१०,९,८, असे अंक येतात. यांतील शेवटच्या पाच अंकातून ८ वजा केले तर सर्व अंक ८,७,६ ५,४,४,३,२,१ असे येतात. तेव्हा ह्याप्रमाणें ८ वा पहिल्यानेंच येतो. तेंव्हा त्यास मारलें पाहिजे.

शेवटला:—आठ दाहीं ८० होतात, व त्याची मिळवणी ८ च तेव्हा तोही मारला पाहिजे.

मध्यवर्ती:—उलट क्रमाने लिहिलेल्या अंकात पांचवा व सहावा अंक चार चार आहे. याची बेरीज ८ होते म्हणून मधल्याही मारला पाहिजे.

इतर:—वर दाखवलेल्या पाड्यातील अंकाच्या मिळवणींत दुसरा अंक ७ व शेवटाकडून दुसरा १ याची सरासरी ८ च येते.

त्याचप्रमाणें राहिलेल्या अंकाची सरासरी ८ च येते. ह्यावरून सर्वात 'आठवा' कसा हें सहज समजण्यासारखें आहे. म्हणजे "आठात आहे पूर्ण" ह्या चरणातील "आठ" या शब्दात तो पूर्ण प्रगट आहे व बाकीच्या "दुसरा, तिसरा, चौथा" इत्यादिकात तो गुप्त आहे एवढेंच. त्याच-प्रमाणें "आठव्या वाचून" कोणती वस्तु पूर्ण नाही. हें तत्त्व महत्त्वाच्या अनेक आठ वस्तूंच्या उदाहरणानीं सिद्ध केलें आहे. उ:--अष्टगणेश, अष्टगण, अष्टगंध, अष्टगिरी, अष्टनेत्रें, अष्टदळचक्र, अष्टदळ कमळ, अष्ट दिग्गज, अष्टदेह, अष्टविवाह, अष्टनायिका इ. अशीं अनेक उदाहरणें देऊन शेवटीं ॥ अष्ट नामें असतीं काळा । सर्वांत पहा अष्टम वाळा । नाही कशांत तो सावळा । घननीळ कृष्ण सांग बा ॥५३॥ अशी पृच्छा नारदानें कंसास केली आहे.

( २ ) "तोच आठवा ॐकार स्वरूपी आहे. हा दुसरा मुद्दा स्पष्ट केला आहे. ॐकारामध्यें 'अ,' 'उ', व 'म' असे तीन वर्ण आहेत. ह्या तीहीं पासूनच

सृष्टीची उत्पत्ति आहे व त्यातच तिचा लय आहे. तिहींचें महत्त्व मागल्याप्रमाणें अनेक उदाहरणांनीं नारदानें सांगितलें आहे. उ. प्रजापतीनें अनेक वार तप केलें तेव्हा व्याहृतींपासून हे तीन वर्ण निघाले. नंतर त्यानें तिहींस एकाकार बनविलें तेव्हा "प्रणवमंत्र" तयार झाला. ह्याचें तेज अपरिमित असून तो सर्व वस्तूंचा प्रकाशक असल्यामुळें तो परमात्म्याचा वाचक झाला. ह्या मंत्राचा ऋषि ब्रह्मा, छंद गायत्री व देवता परमात्मा होय. बिंदु ही त्याची शक्ति "उ" "म" ही त्याचीं बीजें असून त्याचा विनियोग वेदांती मोक्षाकडे करतात. असें तत्त्व प्रतिपादन करून पुढें अनेक उदाहरणांनीं "तीन" या अंकाचें महत्त्व वर्णिलें आहे:—त्रिमूर्ति देव, वर्णत्रय, अवस्थात्रय, स्वरत्रय, त्रयीवेद, अग्नित्रय, त्रिकाळ संध्या, गुणत्रय, स्वरादेयात व वैद्यकांत नाड्या तीन, व्याकरणांत पुरुष तीन, अस्ताई, अंतरा व आभोग अशीं प्रबंदाचीं स्थानें तीन, औहाट गोल्हाट व ललाट हें त्रिकूट, त्रिभुवनें तीन, लक्षणा व लिंग तीन, ग्राम अक्षरें तीन, इ. इ, अशीं उदाहरणें देऊन, तीन स्वरूप सर्व ठिकाणीं। एक रूपें राहिलें ॥ असें शेवटीं सांगितलें आहे. आतां ह्या प्रणवाचा किंवा ॐकाराचा आठव्याशीं "सनत्कुमारसिद्धांते प्रणवो विष्णुरुच्यते" असा संबंध पाराशरानें बृहत् पाराशर स्मृतींत सांगितला असल्यामुळें प्रणव, विष्णु झाला; व "सर्वं विष्णुमयं जगत्" ह्या वचनाधारें विष्णु सर्वत्र आहे. हाच विष्णु, वासुदेव व तुझा अंतक आहे. कारण गीतेंत (अ. ९) मध्यें "पिताहमस्य जगतो......वेद्यं पवित्रमोंकार इ." असें सांगितलें असल्यामुळें—ओंकार—प्रणव—आठवा—विष्णु—वासुदेव कृष्ण, सर्व एकच असून तो सर्वव्यापी आहे हें सिद्ध झालें. तेव्हा ईश्वर* सर्व सूत्रचालक आहे असें ध्यानांत ठेवून कंसा! तूं मृत्यूचें सर्व भय सोडून दे, असें नारदांनीं त्यास सांगितलें. तुझा शत्रु अकारांत आहे म्हणजे साकार आहे असें सांगितलें व आतां तो निराकार सर्व व्यापी आहे असें म्हटलें तरी त्यांत विरोध येत नाहीं. कारण "अकारो वै सर्वा वाक्" "अक्षराणा अकारोऽस्मि" अशीं वचनें प्रसिद्ध असल्यामुळें अकारांत ओंकार, कृष्णावतार आहे. साकार निराकार सर्व एकच ब्रह्म आहे. "अकारो वासुदेवस्य" ह्या एकाक्षरी कोशाचे आधारानें हेंच सिद्ध होतें.

* वरदः सर्वं भूतानां सर्वं व्याप्यैव तिष्ठति ॥ महाविद्योपनिषद.

(३) ह्याचा परिणाम कंसाचे मनावर इतका विलक्षण झाला कीं त्यास सर्वत्र जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं कृष्णाच दिसूं लागला व आतां आपला अंतकाल समीप आला असें त्यास वाटूं लागलें. हें पाहून नारदानें त्याची अशी समजूत केली कीं तू मरणाला इतका का भितोस? तें कोणासच चुकलें नाहीं. पुनः मरण देहासच आहे. "आत्मराम न मरे कदा." आणखी एक गोष्ट अशी आहे कीं तूं भ्रांतचित्त झाल्यामुळें आकाशवाणीच तुला नीट कळली नाहीं. "देवकीमुलांतें आठवा" अशी मुळांत ती असून तूं "देवकी मुलांत आठवा" अशी ती समजत आहेस, हें चुकीचें आहे. तुझ्या बुद्धींत शून्यपणा आला आहे. पुढें ह्या शून्याचें महत्त्व अनेक उदाहरणांनीं सिद्ध करून ॐ कारांतही शून्य आहेच असें सांगितलें आहे. मग नारदानें पुनः आकाशवाणीचा आणखी दुसरा अर्थ सांगितला तो असाः—"देव कीं मूलात आठवा" म्हणजे हा कृष्णावतारी देव मूलतः आठवा अवतार आहे. "तेव्हां तो देवकीच्या उदरीं केव्हां जन्मेल याचा नेम नाहीं. हें ऐकून कंस सावध झाला. (४) पुढील कथा भाग रूपकांत वर्णिला आहे. तीं रूपकें अशीं:— कंस अज्ञान, षड्रिपु त्याचे महानायक, पूतना दुष्टबुद्धि ही अज्ञानकंसाची बहीण, अक्रूर धैर्य, सद्बुद्धि वसुदेव भार्या देवकी, सद्भ्यासंग बळराम, कृष्ण ज्ञान नारद विनोद, राधा जागृति, अनया अनय, अष्टनायिका अष्टसिद्धि, वगैरे. कथानकांत कृष्णजन्मकथा, बाललीला, राधाविलास, अक्रूरागमन वगैरे प्रसंगाचीं वर्णनें मोठीं चातुर्ययुक्त व बुद्धिग्राह्य अशीं झालीं आहेत. अक्रूरानें कृष्णास मथुरेंत नेल्यावर तो "अज्ञान (कंसाच्या) सभेंत गेला. तेथें त्याच्यावर काम क्रोध दंभ अहंतादि महावीर धावून गेले. सद्भ्याससंगासह (बळरामासह) कृष्णानें (ज्ञानानें) त्यांस मारलें व शेवटीं एका क्षणांत अज्ञानाचा (कंसाचा) वध केला. नंतर कृष्णाचे विवाह व त्याच्या अष्टनायिकांचे चतुरालाप यांचें वर्णन केलें आहे व त्यांतील रुक्मिणीस जशी सायुज्यता मिळाली तशी प्रत्येकानें मिळवावी व नरतनूचें सार्थक करावें असा उपदेश करून कथाभाग संपविला आहे. शके १८२८ त अश्विनांत विजयादशमीस ग्रंथ पुरा केल्याचें सांगून पुढील विनय पूर्ण ओव्यांनीं कवीनें तो संपविला आहेः—

नाथ उच्छिष्ट पडलें जेथें। कृष्ण चरित्र लिहिलें तेथें।
पूर्ण केलें श्री एकनाथें ॥ मम अल्पज्ञाचे करवीं ॥ ४९८ ॥
बाळकृष्ण गुरु श्रीएकनाथ। धरूनि चाळविती माझा हात।
निमित्त मात्र करिती जगांत। मज मी पण मिरविण्या ॥ ४९९ ॥
अपराधी हा असे अत्यंत। नामधारी दास भगवंत ॥
तुम्हींच लिहविलें मज हस्तें। श्रीकृष्णाचें चरित्र हें ॥५०४॥

या ग्रंथाचा उत्तरार्ध चित्ररूप आहे. पहिला भाग वाचून मग हा भाग वाचल्यास ग्रंथातील विषयाची समजूत फारच सत्वर होऊन ग्रंथकाराच्या चमत्कृतिकौशल्याबद्दल सकौतुकाश्चर्य निःसंशय वाटेल. हीं एकंदर ३० चित्रं असून तीं पहिल्या भागाबरोबर विषयानुक्रमानें पहाण्यासाठीं योजिलीं आहेत. त्यायोगें पद्यातील कल्पना चित्ररूपानें मूर्त होऊन आपल्यापुढें प्रत्यक्ष उभ्या राहतात. एकच देव अनेक रूपानीं कसा नटला ही एकच मध्यवर्ती कल्पना निरनिराळ्या तऱ्हेने विशद केली आहे. मराठींत, उर्दूत, फारशींत व आरबींत "तीन" या अंकाचें रूप एकच आहे. मराठींत "तीन" ह्या अंकावरून जर ॐकार रूप सिद्ध होतें तर यावनी भाषात "अल्लाह" चें रूप दिसतें. त्याचप्रमाणें सर्व भाषात ८ चें रूप ही एकच आहे. ॐ व अल्लाह हे केवळ शब्द भेद आहेत पण त्याचा अर्थ एकच आहे. हिंदुमुसलमानात ऐक्य व प्रेम उत्पन्न करण्यास अशा प्रतिपादनाची फार मदत झाली असली पाहिजे कारण उभय समाजांत ग्रंथकारास फार मान्यता होती. मनुष्यास अंगे अष्टच असतात व अवयवाचे आकार विशिष्ट स्थितींत सारखेच दिसतात. दशावतारांतील पहिल्या ४ अवतारावरून "कृ" हें अक्षरसिद्ध होतें तर दुसऱ्या ४ वरून "ष्ण" हें होतें, व दोन्ही मिळून "कृष्ण" शब्द होतो. शेवटीं गणपति, शंकर, दत्त वगैरे देवातही ॐकार आहे, हें दाखवून सर्वत्र परमेश्वर भरलेला आहे हें सिद्ध केले आहे. ह्यावरून ह्या चित्रभागाचें सामान्य स्वरूप थोडेंसें लक्षात येईल एवढेंच. पण तें दृश्य काव्य असल्यामुळे त्याचें पूर्ण स्वरूप, दिलेल्या सूचनास अनुसरून तें पाहिल्यानेंच कळणार आहे.

ह्या ग्रंथाच्या अपूर्वतेबद्दल केसरी, मुमक्षु, रामदास रामदासी, व्यंकटेश समाचार, भारतधर्म, हिंदुपंच, मारवाडी वगैरे अनेक नामांकित वर्तमान-

पत्रांनीं व मासिकांनीं मुक्तकंठानें स्तुति केली आहे. ह्यावरून त्याची योग्यता किती आहे हें सहज समजण्यासारखें आहे. ह. भ. ल. रा. पांगारकर म्हणतात:—।"अर्वाचीन काळांत इतका सुंदर काव्यग्रंथ क्वचितच झाला असेल...अशा या नितांत रमणीय ग्रंथाकडे महाराष्ट्रीयांचें लक्ष्य अवश्य गेलें पाहिजे (प्रस्तावना)." "अज्ञानकंसवध" हें एक नवकल्पना प्रचुर वेदान्ती काव्य आहे. असें केसरी म्हणतो.। रामदास रामदासीनें श्री. पांगारकरांचें म्हणणें आम्हांस सर्वथैव मान्य आहे असें म्हणून त्याचा गौरव केला आहे. ह्या ग्रंथात कवीनें आपल्या अनेकविध शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग केला असल्यामुळें त्यास भारदस्तपणा आला आहे. वेदांत, योग, न्याय, व्याकरण, छंद, ज्योतिष, गणित, अलंकार वगैरे शास्त्राच्या साह्यानें ठिकठिकाणीं कवीनें आपल्या अभिनव कल्पना सजवून मांडल्या आहेत. अशा या शास्त्रीय व किंचित् क्लिष्ट अशा पद्धतीस नारदाच्या विनोदी पात्रानें थोडेशी मनोरंजकता आणली आहे. परंतु फारशींत "हश्त" (आठ) काढून दाखवणारा कंस व त्याचा ॐ करून दाखवणारा, मराठी संस्कृत उर्दू फारशी, आरबी भाषापंडित नारद पाहून वाचक स्तिमित होतो. त्याचप्रमाणें "सौरविधू अधिकरणे एकस्मिन् पारदारिको योगः।" ह्या योगसुधा फलज्योतिष ग्रंथाधारें राधेशी आपल्या झालेल्या संमीलनाचें समर्थन करणार श्रीकृष्ण व "पूर्ण योग शनिचंद्रें न होतो। सप्तमांत शुक्र स्वगृहीं येतो। मंगळ शनिचंद्रासी पाहतो। तेव्हां येतो योग हा॥ ३४९॥ असें म्हणून श्रीकृष्णावरही ज्योतिष शास्त्रांत कडी करणारी राधा; त्याचप्रमाणें अनया-राधा-संवादात, अनयाला— अकरणरुप-(व्याकरणांत); अकर्णरूप (बहिरट); व अकर्णी (विषारी-सर्प); लघुसमुदायवासी (अनया-पहिलीं दोन अक्षरं लघु म्हणून), सगणास विटलेली (अनया हा सगण होतो), असें म्हणणारी व्याकरणालंकार छंदःशास्त्रविशारद राधिका व कोटिक्रमकुशलतेनें तिला तोडीस तोड उत्तर देणारी हजरजबाबी अनया गोळी पाहून, आपण शारदामंडनमिश्र व शंकराचार्य यांच्या किंवा बाणभट्ट कादंबरीच्या वाङ्मयात वावरतो कीं काय असा भास होतो. कवीनें सर्वत्र सश्लेष कोटिक्रमानें आपली अगाध विद्वत्ता प्रगट केली आहे खरी, पण तसें करतांना पात्राचें चित्रण

अत्यंत अस्वाभाविक व कृत्रिम होत आहे ह्याचें भान त्यास राहिलें नसावेंसें वाटतें. परंतु कर्त्याने प्रत्येक शब्दावर सविस्तर सुबोध व सर्वंकष पादटीपा दिल्या असल्यामुळें क्लिष्टता व दुर्बोधता हे दोष त्याच्या माथीं मारता येत नाहींत, हें मात्र खरें आहे. नाहींतर " येनाम केचिदिह नः प्रथयंत्यवज्ञाम् । जानतु ते किमपि तान् प्रति नैष यत्नः ॥ " असेंच ह्या ग्रंथासंबंधानें म्हणण्याचा प्रसंग आला असता. नमुन्याकरिता एक दोन उतारे देऊन हें विवेचन पुरे करूं.

## अनया–राधा–संवाद.

अनयाः—मी आहे जरी वाईट। म्हणोनी येतो माझा वीट। झालीस भारी तूं गे धीट। आणि उद्धट उदंड ॥३७८॥ परि माझ्या संगलें तू चमकसी ऐसी॥ सौभाग्य मंडित दिससी त्यासी। माझ्याकडे वक्र पाहसी। यासी काय म्हणावें ॥७९

राधाः—माझ्या स्वामीचें[1] तेज अपार। त्यानेंच चमकतें मी निरंतर. तुझ्या योगें नच सुंदर। दिसतें हें त्वा जाणिजे। ८०॥ माझ्यात भरलें शुक्रतेज[2]। त्यावरी उत्कृष्ट कृष्णराज। प्रेमें सौंदर्य अर्पी मज। म्हणूनि सहज चमकतें ॥८१॥

अनयाः—तुझ्यात आहे शक्रतेज[3]। हें पूर्ण ठाऊक मज। परंतु म्हणसी शुक्रतेज। भाषा अशुद्ध बोलसी ॥८२॥ .........! अकारें जें कांहीं दिसतें। तेंही नसावें[4] तुझ्या मतें। असें करिता सार्थक कोणतें। मज लागीं तें कळेना ॥८५॥ राधे करिसी तू तिरस्कार। असें अक्षर जें अकार। परंतु लुब्ध मन तुझें त्यावर[5]। करी विचार तू याचा[6] ॥८६॥ ज्यानें झाला

१ कृष्णाचें-पक्षीं-माझ्या तूळ राशीचा स्वामी शुक्र त्याचें. २ तूळ राशीच्या स्वामीचें शुक्र तेजस्वी असतो. तारुण्यतेज असा भाव. ३ इंद्र; राधा पूर्व जन्मीं इंद्रायणी होती ह्याला उद्देशून. ४ अकारानें ( अ=नाहीं ) माझ्या नांवांतील " न " नाहींसा होतो, व " य " राहतो. तोही नसावा म्हणजे मी निर्मूळ व्हावें ? ५ अकारावर=वासुदेवावर ("अकारोवासुदेवस्य"). ६ माझा "अ" तुला नको. मग तुला तरी तो कां हवा ? तूं (आ+राधिका) आराधिका (कृष्णाची) कां होतेस ?

मज गणाश्रय[1] । झालीस त्या योगें तूं गणबाह्य[2] ॥ अकारेंच[3] बरें वाईट होय । सर्व कांहीं लोकांत ॥३८७॥ ...... संयुक्त राहसी तूं मातें । म्हणून रस[4] दिसे सर्वांतें । वियुक्त होतां अरस होते । सर्वहि सृष्टि जाणिजे ॥९०॥ राधे[5] ! सामान्या सोडून देई । विशेषातें[5] जोडुनी पाहीं । आधी तूं मग मी ही । रसाचें त्या कारण ॥९१॥ हा न्याय तुझ्या मुखें । झाला असे आराधिके । जिंकिलें; बैस आतां मुकें । नको बोलू व्यर्थ तूं ॥३९३॥

(२) लोलिंबराज चरित्र:—हें १५७ पद्यांचें त्रिमूकलें काव्य आहे. भागवताच्या दशमावर टीका लिहिणारा प्रख्यात साधु व "लोलिंबराज" आख्यानात आपल्या "कविपातशाह" म्हणून उल्लेख करणारा लोलिंबराज ह्याचा प्रस्तुत चरित्रनायकाशीं नामसादृश्याहून अधिक संबंध नाहीं. प्रस्तुत एकनाथ कालीन तर दुसरा त्याच्या नंतरच्या शिवकल्याणाचा समकालीन होता. दोन्ही कथानकांत मात्र थोडेसें सादृश्य आहे. ह्या चरित्राचा उल्लेख छापील नाथचरित्रात आढळत नाहीं. हें काव्य कवि ढोडेवाले यांनीं नाथवंशज कै. पांडुरंग माधव बोवा गोसावी यांच्या सांगण्यावरून शके १८३५ च्या (फा. कृ.) नाथषष्ठीच्या उत्सव प्रसंगीं तयार करून वाचलें. पुढे शके १८३८ त भोसें येथील हरलाल चनर्मीधर वैद्य ह्यांनीं तें छापविलें. ह्या काव्यात 'लोणीस' कोठें 'लोली' ही म्हटलें आहे. ही गफलत होती; तेव्हा तिचें नांव लोणीच असावें; परंतु मुसलमान लोकांनीं विनोदानें किंवा अन्वर्थक म्हणून "लोली" असें नाव तिला दिलें असेल. कारण फार्शींत त्या शब्दाचा अर्थ "जारिणी" असा आहे. शेवटीं नाथांनीं 'लोली' शब्द लिंब याच्या नांवास जोडल्यावर तें

१ मी "नया" मागें "अ" जोडल्यानें "मगण" (अनया हा मगण पक्षीं जनांतला). २ पण तूं त्यालाच जोडून "गणबाह्य" झालीस. कारण ("आराधिका") चार अक्षरांचा गण ठरत नाहीं; पक्षा "जनबाह्य" परपुरुषगामिनी म्हणून. ३ ह्यावरून "अ" पासूनच इष्टानिष्ट घडतें. ४ राधिका+अनया= रगण+नगण="रम". ५ र गण, स गण ह्यांतील पुढचीं दोन "गण" हीं सामान्य म्हणजे दोहींकडे आहेत तीं काढून टाक. बाकी तुझें "र" व माझें "स" हीं विशेष अक्षरें जोड म्हणजे "रस" झाला.

" लोलिंबराज " असें झालें. म्हणून हेंच नांव काव्यास दिलें आहे, असें कवीनें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. कथानक:—सुप्रसिद्ध नृपशालिवाहन यानें स्थापिलेल्या पैठण क्षेत्रीं एकनाथाच्या काळीं लिंबा, म्हणून एक पाणी-वाला होऊन गेला. हा ऋग्वेदी वसिष्ठ गोत्री ब्राम्हण होता. हा निर्विघ्न निर्धन पण बलाढ्य होता. त्यानें जन्मांतरीं वरुण देव पूजिला असल्यामुळें त्याच्या कृपेनें पाणक्याची वृत्ति त्यास लाभली. त्या धंद्यावर ।। मेळवि मुद्रा[1] नित्य शर[2], वाहुनि पाणी तुष्ट नर ।। तो रोज पांच रुपये मिळवी. बोलण्यांत मोठा मिठ्ठा व कामात मोठा कष्टा असल्यामुळें तो लोकांना फार आवडे. पण कोणी आप्तेष्ट त्यास आवरता नसल्यामुळें तो अगदीं छादिष्ट बनला होता. त्याचें प्रेम एका लोणी नावाच्या पोरक्या तरुण गवळणीवर बसलें. पुढें " उभयताही अनुरूप सुखानें तीं, जगीं स्वच्छंदें वर्तती, न भीति " अशा रीतीनें तीं दोघेजण नांदू लागलीं. सारा दिवस धावळी नेसून सर्व पैठणकरांचें पाणी भरावें व संध्याकाळीं लोणीकडे पुढें वर्णिल्याप्रमाणें नटून थटून श्रमविनोदनार्थ जावें असा त्याचा दिनक्रम असे.

टिळा कोरुनी भाळिं गंधासि लावी।। कच्याच्या सुगंधें प्रिया ती भुलावी ।। म्हणोनी सुतेला कचा मर्दुनीया, ।। म्हणे ' मारेनको मजा है दुनीया ।। पियारा हमाराहि माशूक लोणी ।। वही जानकी जान है यार जानी ।।२०।। शिरीं ऐटबाजींत मदील बांधी। जरीचा करी दिव्य पोशाख नादी।। नटाच्या परी हा नटे नित्य खासा। अशाच्या करीं ना टिके काहीं पैसा ।।२१।। विडा खाउनी तो करी ओठ लाल। तधीं मर्जि त्याची अती हो बहाल। कधीं घेइ अंगावरी हा दुशाला। बघे दर्पणीं पीळ घाली मिशांला ।। २२ ।। पदीं चर्मि घाली नवा लाल जोडा । परी त्या कुदैवीं लिहीला विजोडा ।। २३ ।। इ. लोणीचें ही वर्णन थोडक्यात पण चटकदार झालें आहे: —

१ प्र. भ. गो. तोडेवाले. मु.अ. चिं. भट, पुणें. स. १९१७ किं. ३ आणे.
२ रुपये ३ पांच.

तरुण कमलनेत्री कोमलांगी सुरामा ।
अतितर प्रियपात्रा कामुका दे विरामा ।।
बहुत करूनि ठेवी एकदा तांबुलाला ।
अधर सुगरणीचा लाजवी नित्य लाला' ।।२८।। (१ रत्न)

एकदां नेहमींप्रमाणें नटून थटून जात असतां लिंबाच्या पगडीतला तुरा मोरींत पडला; आणि दुसरा विकत घेण्यास तर जवळ कपर्दीकही नाहीं, असें पाहून तो अतिशय खिन्न झाला. अशा उदासीन स्थितींत तो असतां तेथें सहज नाथ येऊन पोंचले. त्याच्या दुःखाचें कारण त्यांना समजतांच त्यांनीं लागलीच लिंबास एक सुंदर तुरा विकत घेऊन दिला. आणि "मूर्ख छंदानुरोधेन" या न्यायानें त्यास त्यांनीं असें सांगितलें कीं लोलीचें प्रेम तुजवर सदोदीत रहावें असें वाटत असेल तर सकाळीं स्नान होतांच असें कर कीं "तिला नित्य ध्यानीं बघावें समग्र" हें त्यानें कबूल केलें. पंधरा दिवसानंतर नाथानीं त्यास पुनः गांठलें. तेव्हां त्यानें कृतज्ञतापूर्वक नाथांस सांगितलें कीं आपल्या जादूनें लोली मजवर नितांत अनुरक्त झाली आहे. त्याचें ध्यान सिद्ध होत आहे. असें पाहून नाथांनीं ध्यानविषयांत क्रमाक्रमानें पुरुष व नंतर परमेश्वर असा बदल त्याजकडून करविला. मध्यंतरीं लोलीकडे जाण्याचा त्याचा नित्य क्रम चालूच होता; परंतु परमेश्वराच्या ध्यानाच्या योगें त्याच्या ऊर्मि जागच्याजागीं जिरून गेल्या व चित्तास शांति लाभली. इकडे त्याच्या विरक्तीनें लोलीचें दुःख नित्य दुणावूं लागलें. लोकनिंदा सुरू झाली. तरीपण ।। ब्रह्माविष्णु महेश ब्रह्मन्हि मला कोणीही याला हसा ।। ९० ।। असें म्हणून त्याची सेवा तिनें सोडली नाहीं. लिंबाचें हें स्थित्यंतर पाहून नाथांस फार समाधान झालें. व तो आतां जीवन्मुक्त झाला असें जाणून त्यांनीं आपला कर्मठ पुत्र हरिपंडित याजकडून, जननिंदेस न जुमानतां.त्यास श्राद्धास आमंत्रण देवविलें. हरिपंडित बोलविण्यास गेले तों लिंबा पलंगावर बसून लोलीस विडे वाहातांना व तिचीच पूजा करतांना दिसला. तें पाहून त्यास अत्यंत खेद झाला. पण पित्राज्ञेप्रमाणें त्यानें लिंबास घरीं नेलें. देवघरांत जाऊन पाहतो तों त्याच्या देवावर अनेक विडे वाहिलेले त्यास दिसले. चौकशी करितां नाथानी उत्तर दिले ।। वैदिक पथानें देवासि पूजिसी । पंडित असशी म्हणूनिया ।। १२६ ।।......तुझा

सोंवळ्याला टिकेल न कोणी ॥ देवाच्या ठिकाणीं जातो कोण ॥ १२८ ॥ इतक्यांत कोणी विडे वाहाण्यास आला नाहीं व मीही कोणास सांगितलें नाहीं. देव भावाचा भुकेला असतो, त्याला ब्राह्मणाब्राह्मणासी काय करावयाचें आहे? माळी, साळी, कुंभार, चांभार, कोणी असो, भक्त असला म्हणजे झाले.

सुबुद्धा! कर्मज्ञा! असमि अति तूं शुद्धहि जरी।
वहामी या पुष्पा, कधि नच शिरीं हा धरि हरी ॥
महा पापी लिंवा वचमी नयनीं लोणि पुजि हा।
विडे तीच्या अगावरिल वच कीं आणि अज' हा ॥ (विष्णु')
असो नादी किंवा विषयिं जरि लिंबा मलिन हा।
प्रभू-पायीं झाला तनमनधनें लीनचि पहा ॥
बरे केलें यानें तुजहून हरी, आत्महित रे!।
जसा लिंबा, त्याची प्रियकरिण ती लोणिहि तरे ॥ १३८ ॥

असा हरिपंडितास उपदेश करून लोणिलिंबा बरोबर त्यालाही नाथानीं खरा मोक्षमार्ग दाखविला. कवीनेंही ॥ येथें जाती कोणती-पाहसि न जाति-भेद। जो जाहला स्वयंप्रकाश त्याला हर्ष खेद नसे ॥ १५३ ॥ हें सार सांगून एका गजलानें हें छोटेसें काव्य संपूर्ण केलें आहे. कथानकाचा प्रारंभ शृंगा-रात करून त्याचें पर्यवसान शांतिरसांत केलें असल्यामुळे तें मनोरंजक व उद्बोधकही झाले आहे. स्त्रीसौन्दर्यवर्णन, प्रणयीजनाचे मीलनवियोग, त्यांच्या प्रणयकेली व भोगविलास इत्यादि अनुकूल प्रसंग काव्यांत सहज आले असतांही, कवीनें उत्तम संयम राखल्यामुळे, काव्यास उत्तान शृंगार किंवा अश्लीलता ह्यांचें गालबोट कोठेंही लागलेलें नाहीं. प्रमाणबद्धता, व औचित्यपालन ह्यायोगें त्यास सौन्दर्याची जोड मिळाली आहे. नाथाची उदात्त विश्वबंधुता. युक्तिकुशलता व अंतर्दृष्टि, हरिपंडिताची वेदाभ्यासजडता, कर्मठता व बहिर्मुखदृष्टि, लिंबाची एकमार्गपरायणता व संतश्रद्धा आणि लोणीची पतिनिष्ठा व अव्यभिचारी प्रेम, ह्या त्या त्या पात्रांच्या स्वभावांतील विशिष्ट छटांचे चित्रण मोठें मार्मिक व कलापूर्ण झालें आहे. शार्दूलविक्री-डित, विद्युन्माला, आर्या, मणिबंध, भुजंगप्रयात, दिंडी. साकी, ओंव्या, अभंग, मालिनी, इंद्रवज्रा, कामदा, शुद्धकामदा, प्रहरण कलिता मंदाक्रांता,

शिखरिणी, चामर, गजल व दोहा इत्यादि संस्कृत प्राकृत अक्षरगण व मात्रागण व गायकी छंदांचा उपयोग ह्या काव्यात मोठ्या कुशलतेनें केलेला आहे. एका ठिकाणीं तर "नटत राहते नारही सदा, नरगणाचि[1] ही शुद्ध कामदा[2]॥२९॥ असा श्लेषानें लक्षणासहित वृत्तनिर्देशही केला आहे. मात्र अनेक ठिकाणीं यतिभंग, लघुगुरुविपर्यय, ह्रस्व दीर्घांची ओढताण, व्याकरणाकडे दुर्लक्ष्य, वगैरे दोष झालेले पाहून थोडेशी विरसता उत्पन्न होते. उदा:–स्थीर ( स्थिर ); सुप्रीति ( सु, प्रीनें गुरु होतो, तो नको ); ( ४३ ) म्हणुनि एकदा । ची विडे करी ॥ २९ ॥ ( यतिभंग ); रुसल ( रुसेल ); नखप्रभा ( ख–गुरु ) प्रेम माझा ( मराठींत न. लिंगी ), मनोकामना, ज्ञानडोळा व प्रेमदोरा असे समास, व २० व्या पदांत उर्दू चरण व शेवटीं हिंदी गजल यांचा उपयोग जरी कवीनें केला आहे, व मधून मधून, अजिबात, तलब ( संचय ); शिक्का, देव ( दे ); असे परकीय शब्द योजिले आहेत, तरी एकंदरींत व मागील ग्रंथाच्या मानानें ते फारच कमी आहेत. कवितेचा प्रवाह अस्खलित चालत असून सामान्यत: अक्षरगणवृत्त योजनेंत कवीचें नैपुण्य बऱ्यापैकीं होतें असें दिसतें. त्याचप्रमाणें—कंठींचा हार तिच्या हारवि मतिभान पाहता सकळ ॥ ५२ ॥ चेटकि चमत्कृतीही ॥ ५९ ॥ सखा साच खासा सुखाचा समुद्र । मदा तुष्ट मुद्रा असा हा सुभद्र ॥ ८४ ॥ अशा अनुप्रास यमकादि शब्दालंकारांच्यामुळें व प्रभुनीण कोण हात देतो; सुखाच्या सुधेचा घडा फोडला; टाहो फोडला, पंचत्वास पावला, अशा समर्पक म्हणींच्या योजनेमुळें ह्या लहानशा काव्यास चारुता आली आहे. एकंदरींत हें काव्य जरी अगदीं अल्पाकारी असलें तरी बहुगुणी खास आहे. त्याचप्रमाणें " अज्ञान कसबधातील " श्लेषप्रियतेचा मोह कवीनें ह्यांत टाळला असल्यामुळें त्यास सुभगत्व व सुबोधत्व हे अमूल्य गुण मिळाले आहेत.

( ३ ) रावण–मंदोदरी–संवाद—हें ११८ पद्यांचें वरच्याप्रमाणेंच लघु काव्य आहे. मात्र ह्यातील कथानक स्वतंत्र नसून रामायणांतील मंदोदरीच्या सुप्रसिद्ध उपदेशावर रचलें आहे. काव्य लेखनाचा हेतु कवीनें

१ पुरुष समुदायाची पक्षीं ' न ' आणि ' र ' हे गण ज्यांत येतात असें शुद्ध कामदावृत्त. २ कामप्रद; कामी पुरुषांची कामधेनु. पक्षीं शुद्ध कामदावृत्त.

पुढीलप्रमाणें सांगितला आहे:—एकदां मी एका काव्यलोलुप मित्राबरोबर एका बागेंत फिरावयास गेलों असता माझ्या मित्रानें "अठरा पडे जुग बंधे, हरी नरद दे फेर, फासा तेरे हात में, दस न पडे तो खेल" हा दोहरा म्हटला. गर्भित अर्थ हा कीं १८ पद्म वानराचा वेढा लंकेला पडला आहे. यासाठीं "हरीनरद" (सीता) परत दे. अझून सर्व गोष्टी (फासा) तुझ्या हातात आहेत, दहा शिरें पडलीं नाहीं तों काय करायचें तें कर. ह्या मंदोदरीच्या सांगण्यावर रावणानें उत्तर दिले—"दस पडे तो पडने दो मनमों राखो धीर, जिस कारण सीताबाई मुक्तकरे रघुवीर" त्याच वेळीं श्री रामाने माझ्या मनांत हा संवाद लिहिण्याची प्रेरणा केली व काव्यातील ५४ वी कविता तेथेंच मला स्फुरली:—

अयोध्या[1] नामे जी जगिं सकल विख्यात नगरी,
असे रामावासस्थल[2], दशरथाची[3] निजपुरी
वसे सीतामाता[4] बघ कुशलवाची[5] खण[6] खनी[7]
तिथे कौशल्याची[8] प्रमुख जन मानीति स्वमनीं.

नतर सवडीप्रमाणें तें पूर्ण करून प्रसिद्ध केले. मी कवि नाहीं, कवितेचा नादी आहे. तिचें रचनासौंदर्य चांगलें नाहीं....ही सर्वच तऱ्हेनें साधीसुधी आहे. तथापि—कविता असो कशी तरि, तात्पर्यावरिच सज्जनीं दृष्टि ॥ द्यावी; तेणें होवो बालकोक्ते जेविं तन्मनस्तुष्टी ॥ ह्या वचनाप्रमाणें या कवितावालिकेचे बोबडे बोल गोड करून घेणे आपणा मार्मिकाकडे आहे. कवीनें ह्या काव्यात श्लेषाचा* उपयोग मुक्तहस्ताने केला आहे. विशेषतः "रामा" (स्त्री) व "राम" अशीं पदें पाडून अनेक ठिकाणीं दोन अर्थ साधले आहेत.

१ दुसरा अर्थ:—युद्ध करण्यास अयोग्य; २ स्त्रियांचे वसतीस्थान. ३ दहाच योद्धे आहेत. ४ सीता हीच माता-पक्षी सीतेची माता-भूमी. ५ कल्याणकारक वाणी बोलणारी. पक्षीं दर्भ वाळा वगैरेनीं व्याप्त. ६ खण साडेतीन हाताची लहान. ७ खाण. ८ राममातेची. पक्षीं कुशलत्वाची.

* पद्यें ५३।५४।५९।७०।७४।७६।७७।७८।७८।८५।८६।८७। द्वर्थी आहेत.

मौलवी मजहर आलीमसाहेब सफीर, अयोध्येचे रहिवासी, यांनीं " हें काव्य अति मनोरम व अर्थपूर्ण असल्यामुळें हिंदुस्थानी भाषेंत भाषांतर करावें." अशी त्याची शिफारस केली आहे. त्याचप्रमाणें महाराष्ट्रभाषा-कोविद मौलवी हाजीकाजी तामीजोद्दीनसाहेब वकील पैठण, ह्यानींही तें फार नांवाजलें आहे. परधर्मीय विद्वानांच्या स्तुतीचा मान फारच थोड्या मराठी ग्रंथांस लाभतो. म्हणून ह्या लघु काव्याच्या उत्कृष्टतेविषयींचे त्यांचे उद्गार कोणासही कौतुकावह वाटतील.

कथानक अगदीं साधें व सरळ आहे. मुख्यत: " रामा " या पदा-वर व तदनुषगानें " अयोध्या " " दशरथ " " कौशल्या " इत्यादि कांहीं पदांवर श्लेष साधून त्याची उभारणी केली आहे. मंदोदरीस एक दिवस खिन्न बसलेली पाहून रावणानें मोठ्या लडिवाळपणानें तिला खेदाचें कारण विचारलें. तेव्हा तिनें उत्तर दिलें कीं मीमाला बळी देऊन सीतेला कपटानें चोरून आणणारे, भेकड पति मला मिळाले म्हणून दु:ख वाटत आहे. ह्यांत तुमची दुष्कीर्ति होत आहे. तेव्हां तिला परत पोंहोचती करा. रावणानें उत्तर दिलें कीं अयोध्या अयोध्य आहे. तें रामाचें निवासस्थान. तेथें जाऊन कोणाशीं लढावें व काय पुरुषार्थ दाखवावा? म्हणून मी तिकडे न जातां सीतेला आणलें. तुला माहितच आहे की मला रामाचें विलोभन फार आहे. त्यांचा केशपाश मला वेड लावतो. त्यावर मंदोदरीनें सांगितलें कीं स्त्रिया आपलें सौभाग्यरक्षण व्हावें म्हणून केशाला ( विष्णूला ) भजतात. त्यांच्या ठिकाणीं दुष्ट वासना ठेवणारे नरकास जातात. पुन: रावण म्हणाला सीता ही मदर्थंच ब्रह्मदेवानें निर्मिली आहे. तेव्हां सुरामा पाहून मोठा शूरही निकामा होतो. त्यावर तिनें पुन: विनविलें कीं राम हा सद्गुरु, त्याला शरण जा म्हणजे तो तुम्हांला तारील. ह्यानंतर मात्र रावणानें आपल्या मनांतील गूढ हेतु तिला सांगितला कीं " जानामि सीतां धरणिप्रसूता। जानामि रामं रघुनंदनंच। जानामि मृत्युं मम तस्य हस्तात्। तथापि सीतां न परित्यजामि ॥ कारण ॥ विरोधभक्ति करितां मुक्ती येउनि पडे बळेंचि गळां ॥ हें ऐकून मंदोदरीला अत्यंत समाधान झालें व कठोर व कटु भाषण केल्याबद्दल तिनें क्षमा मागितली.

या लघु काव्याची मूळ उभारणी श्लेषावरच असल्यामुळें द्व्यर्थी पद-योजना कवीस करणें भाग पडलें व त्यामुळें थोडी बहुत दुर्बोधताही टाळणें त्यास अशक्य झालें. पण हे क्लिष्ट भाग सोडून दिल्यास कवितेचा ओघ प्रसन्न असून सुंदर यमकानुप्रास, सुभाषितें, व म्हणी यांच्या योजनेनें त्यास मनोहरत्व आलें आहे. त्याचप्रमाणें श्लिष्ट पद्येंही कांहीं ठिकाणीं मोठीं अर्थ-पूर्ण व चमत्कृतिजनक झालीं आहेत. वृत्तसुखार्थ शब्दांची क्वचित ओढाताण केलेली दिसते उ. गणया ( गणरायाला, गणपतीला ); कसला ( कसाला ); त्याचप्रमाणें "लंकाद्वेष" "ऐकुनि द्विष" अशा स्थळीं "संयुक्त =ह्स्वास गुरुत्व देतें" ह्या नियमाकडे लक्ष दिलेलें दिसत नाहीं. दमुना व शुष्मा (अग्नि) हे दोनच अप्रसिद्ध संस्कृत शब्द आले आहेत. उर्दू शब्द तर अगदींच विरळा सापडतात. म्हणून एकंदरीनें हें लघुकाव्य वाचनीय झालें आहे. ह्याचा आणखी एक विशेष हा दिसतो कीं कवीनें काव्याच्या मलपृष्ठावर एक अमल प्रभुप्रार्थना जोडून आपली रामनिष्ठा तशीच राम-राज्यप्राय निजामशाहीविषयींची राजनिष्ठा, व्यक्त करण्याची संधि साधली आहे. काव्यांतील काहीं उत्तम स्थळें नमुन्यादाखल पुढें दिलीं आहेत.

## स्त्रियांचे केशकलाप.

रावणः —रामांची[1] ती सुंदर वेणी पाहुनि स्वमनीं भासे
असित[2] अहि जणूं नलिनाननिं[3] वसे सफणा स्थीर सुवासें॥६०॥
सजीव अहि असु[4] संहरि दंशें प्राणांचा अरि तो।
अजीव तो निजनयनीं बघतां तनुमनधनहि हरितो॥ ६२ ॥

मंदोदरीः—प्रमदा या पुरुषांच्या चित्ता हरवी सजवुनि वेणी।
निरस[5] कुटिल[5] कचकलाप[6] काळा बघुनि भुलति कां प्राणी॥६४॥
केश[7] वसे शिरीं, यास्तव वेणीरूप अही[8] हा झाला।
कमला[9] बनुनी सुवर्णकुसुमें[10], अर्पी मंगल त्याला॥ ६६ ॥

१ स्त्रियांची. २ काळा. ३ कमलमुखीं. ४ प्राण. ५ निरस—रुक्ष, पक्षीं अरसिक। कुटिल—कुरळ, पक्षीं कपटी. ६ केश समुदाय. ७ क+ईश=विष्णु; केश. ८ विष्णु शेषशायी आहे म्हणून. ९ लक्ष्मी. १० सुंदर फुलें.

भोगी केशव म्हणुनि युवति त्या अर्पिति सुगंधमाला[१] ।
सुगंध तैला लावुनि घालिती केतकिपत्र सुमाला[२] ॥ ६७ ॥
पुजूनि भावें अशापरी त्या आशेनें केशाला[३] ।
जणूं प्रार्थिती नित्य असे त्या रक्षी सौभाग्याला ॥ ६८ ॥
कधी भुजंगासाठीं[३] सुभगा भूषविती नच वेणी ।
दुष्ट वासनेबरोबर जाती रौरवनरकीं प्राणी ॥ ६९ ॥

## प्रभुप्रार्थना.

श्रीरामा ! जयरामा ! सीतारामा । रघूत्तमा रामा ॥
नामामृतासि पाजुनि, ने अधमा या विभूत्तमा ! धामा ॥ १ ॥
निष्पकपटी निर्मत्सर मद्देशातिल समस्तजन व्हावे ।
पाळुनि राजनीती भावें त्यांनीं विभूत्तमा ध्यावें ॥ ४ ॥
नृपकुलतरुफलभारें[४] विलसो, प्रभु प्रार्थितोंचि हें तूतें ।
सफल करि श्रीनृपवर, उस्मानाच्या[५] समग्र हेतूतें ॥ ८ ॥
दीर्घायूकर नृपवर, भूवरि या तो अम्हासि पाळाया ।
घालो माळ यशःश्री, शक्ति अनुपमा तशी कृपाळा या ॥ ९ ॥
रामराज्य हें गमतें निजामशाही आम्हां कलीमाजी ।
अन्याय दूर पळती, त्याहुनि रिपु, ऐकतांचि नामा जी ॥ १० ॥

(४) **किरकोळ पदें**:—हें एक लहानसें १७ पदाचें चोपडें आहे. यांत जाति पद्यें आणि गजले, ठुंबऱ्या, असावरी कलंगडा वगैरे गायकी चालींची पद्यें, आलीं आहेत. अर्थातच हीं सर्व परमार्थपर आहेत. यातील कांहीं राम, दत्त, शंकर वगैरे देवास अनुलक्षून आहेत, काहीं नीतिबोधपर आहेत, कांहीं श्लिष्ट तर काही रूपकात्मक, काहीं वैराग्यपर अशीं आहेत. पत्ते, सोंगटया व आयुष्याची रेल हीं परमार्थपर असून मोठीं चटकदार आहेत. कोऽहंची शिटी वाजतां आयुष्याची रेल सुटते व मृत्युलोक ह्या "जंक्शनवर" थाबते. कर्मानुरूप फर्स्ट, सेकंड व थर्डक्लास, उतारुस मिळतो, रात्रदिवसाचे मैल भराभर निघून जातात, तारमास्तर चित्रगुप्त

१ सुगंधी फुलें. २ चांगल्या माळा. ३ जारासाठीं, पक्षीं सर्प करावयाच्या हेतूनें. ४ कुलपरंपरा चालो. ५ प्रस्तुत निझाम.

हे पापपुण्याची तार करतात, स्वर्गादि लोकांची टिकिटें काढतात व सुख दुःखाच्या रुळांवरून ही गाडी चालते,वगैरे रूपक शेवटपर्यंत विस्तारिलें आहे. तसेंच ॥ सइयाई तूं खेळ खेळ गडे पत्त्याचा खेळ । पत्त्यानें या पत्ता लागेल ब्रह्माचा बाळ ॥. अशी सुरवात करून आदिमाया सीता ही राणी, राम हा राजा, हनुमान हा गुलाम, अशीं हरी अनेकरुपें घेतो पण त्या ॥ सर्वांत एक्का आहे ब्रह्मरूप जाण ॥ त्याचें ध्यान धर असें शेवटीं सांगितलें आहे. त्याचप्रमाणें ॥ नरदेहाची नरद जावी नरकी तरी हा खेळ पुरा ॥ असें सोंगटयाच्या खेळांत सांगितलें आहे. पुढील श्लिष्टार्थी पद देऊन हें अल्प प्रकरण पुरे करूं.

पद. चालः—(अखियों फरक न लागी ).

पर पुरुषाचा संग नित्य मला पर पुरुषाचा संग ॥ धृ. ॥
पर रमणासी मी रमणी जरी, रमेना तरी व्रतभंग ॥ १ ॥
परिसुनि वचना रुक्मिणी सतीच्या, नारद जाहले दंग ॥ २ ॥
भेटवि मज तो रुक्मिणी माते, प्रियकर तव श्रीरंग ॥ ३ ॥
भगवन्तोडेवाला जहाला, दर्शनविण त्या तंग ॥ ४ ॥

पदः—श्रीबाळकृष्णमहाराजांच्या शिष्या.

भो पंडरीच्या[१] लाग न मागें, नाम गाढ[२] वाचे। घे तरि पाजी[३] अमृतरसातें, साह्य हो देवाचें ॥ ध्रु. ॥ च्युति[४] या च्युति या च्युतिया नसे हो! अच्युत त्यास मिळे ॥ भेटेल सच्चिद्घनचि तयाला, संचित सर्वजळे ॥ करील मादर[५], चोदना[६] करितां मागें कार्य बळें ॥ माहर[७] मग नच ठराल कधिंही, दिसाल ना दुबळे ॥ मात्रा[८] गमनचि होता होता आयू सर्व गळे ॥ इ. इ.—

१ "ष" बद्दल "स" वाचावा, २ दृढ वाचेनें. ३ क्रियापद-पक्षीं शिवी. ४ च्युति नसे=पतन नाहीं. ५ मा ( लक्ष्मी ) आदर करील. ६ चोदनाकारितां = धर्म करतांना, " चोदना लक्षणो धर्मः ". ७ मा ( लक्ष्मी ) हरण करणारा, ८ मात्रा-चुटकी वाजवण्याइतका काळ; अगदीं थोडा काळ; घटका जाती पळें जाती इ०

ह्या पद्यांविषयीं श्रीमज्जगद्गुरु हंपी विरूपाक्ष यांनीं पुढीलप्रमाणें प्रशंसोद्गार काढले आहेत. "तुम्ही केलेल्या मालाबंधांतील कविता व इतर काव्य पाहून आपलें प्राकृत कवित्व प्रासादिक वृत्त अलंकारांनीं युक्त व सरळ अर्थाचें असें असल्याचें अनुभवास येतें. 'सद्रत्न पद्यमाला' यांतील प्रत्येक पद अनुभवसिद्ध आणि वेदांतपर, काव्यमनोरम, रसभरित, सरस व सुलभ आहे. म्हणून आम्हीं त्यास "सद्रत्नपद्यमाला हें नाव दिलें आहे." ह्या अभिप्रायातील तात्पर्यार्थाकडे लक्ष दिलें असतां भगवंतराव तोडेवाले ह्यांची योग्यता समजण्यासारखी आहे. चारीही पीठांकडून मानमान्यता मिळविण्याचें भाग्य बृहन्महाराष्ट्रांतही फारच थोडया कवींच्या वाट्यास आलें असेल.

कवीचे इतर पद्यग्रंथ कांहीं अमुद्रित व कांहीं अप्राप्य असल्यामुळें त्याविषयीं ह्या ठिकाणीं कांहींच लिहितां येत नाहीं. गद्य ग्रंथांपैकीं उपलब्ध असलेलें "संगीत चूडाला नाटक" व श्रीसाधु बाळकृष्ण महाराज यांचें चरित्र" हे जे दोन लघु ग्रंथ, त्याविषयींची माहिती गद्य विभागांत पुढें पहाण्यास मिळेल. अशा या बुद्धिवान लेखकाच्या १४।१५ ग्रंथापैकीं कांहीं अझून अमुद्रितच राहावे व कांहींचें द्रव्याभावीं पुनर्मुद्रणही होऊं नये ही मोठी शोचनीय गोष्ट आहे. ह्यामुळें त्याचे आज ४।५ ग्रंथच पहावयास मिळतात व तेही आज दुर्मिळ झाले असल्यानें कालांतरानें लुप्त होण्याची भीति वाटत आहे. तेव्हां वाङ्मयप्रेमी जनतेनें ह्या गोष्टीकडे लक्ष पुरवून त्यांचें संरक्षण होईल अशी कांहींतरी तजवीज तातडतोब केली पाहिजे.

---

# प्रकरण ९ वें

## वासुदेव पांडुरंग धोत्रीकर. (स. १८७६)

याचा जन्म सोलापूर येथें शके १७९८ मध्यें झाला. हे सोलापूरचे देशपांडे असून याच्या घराण्यांत धोत्रीचेंही कांहीं वतन चालत आहे. यांचे वडील व चुलते पुढें बिडास उद्योगधद्यास गेले. त्यामुळें वासुदेवाचें शिक्षण तेथेंच झालें. त्याच्या वडिलास वेदविद्येची फार आवड असे. आपला मुलगा चागला दशग्रथी वैदिक व्हावा अशी त्याची फार आकांक्षा होती; म्हणून त्यानीं त्यास वेद पढविण्यास एक विद्वान् वैदिक ब्राह्मण ठेविला. त्याच्याजवळ वासुदेवाचें बरेच अध्ययन झालें. परंतु तें पूर्ण व्हावयाचे आधींच त्यास इंग्रजी शिक्षणाची आवड उत्पन्न झाली. त्यामुळें तें अर्धेंच सोडून त्यास औरगाबादेस जावे लागल. तेथें चागला अभ्यास करून त्यांनीं मिडलची परीक्षा दिली. नंतर वकिलीचे परीक्षेचा अभ्यास करून तींतही ते यशस्वी झाले व बिडासच वकिलीचा धंदा त्यांनीं सुरू केला. इंग्राजी व संस्कृत या भाषाचें साधारण ज्ञान त्यानीं संपादन केलें होतें. पण मराठीचा अभ्यास मात्र त्यांचा चांगला झाला होता. त्याच्या अगीं चांगलें वक्तृत्व असल्यामुळें त्यांची वकिली बरी चालूं लागली होती. पण एकंदरींत त्या धद्यात त्याचें चित्त रमत नसे. पुढें काहीं कारणामुळें त्यास बीड सोडून जाणें भाग पडलें. त्यामुळें ते उस्मानाबाद येथें जाऊन राहिले. इ. स. १९१८ च्या इनफ्लुएंझांत त्यांचा तेथेंच अंत झाला. त्यांनीं पुढील ग्रंथ लिहिले आहेत:—

(१) कनकालय महात्म्य. (२) काल दिग्दर्शन व (३) मार्तंडाख्यान. यांपैकीं कनकालय महात्म्यच मिळालें आहे. दुसरीं दोन छोटींशीं काव्यें अप्रकाशित आहेत. त्यांपैकीं एक अनेक वृत्तात्मक असून सुधारणेविरुद्ध आहे. पण तीं पहाण्यास न मिळाल्यामुळें त्यांविषयीं काहींच लिहीतां येत नाहीं.

### कनकालय महात्म्य

**कथासूत्र:**—हें आख्यान स्कंदपुराणांतर्गत पद्मावती महात्म्यावरून

घेतल्याचें कवीनेंच सांगितलें आहे. ॥ इतिश्री पद्मावतीमहात्म्यग्रंथ । संमत पद्मपुराणांतर्गत । इ. अ. १ ॥ पूर्वी जें शंकरानें नारदास सांगितलें होते तेंच पुनः सूतानें ऋषींस सांगितलें आहे. एकदा नारद कैलासास गेले व पृथ्वीवर सर्वांत पावन तीर्थ कोणतें असें त्यांनीं शंकरास विचारलें. त्यावर शंकरानें पद्मावतीचा चारयुगांचा इतिहास सांगितला आहे. हें शहर गोदेच्या दक्षिणेस पाच योजनें वसलेलें आहे. त्या शहरास व तेथील तीर्थास चार युगांत चार नावें प्राप्त झालीं. तीं अनुक्रमें अशीं:--पद्मावती-भृगूदक; शाकरी-वायुशोधन; दुर्गावती-रामसतार; आणि बिलिनी-कनकालय. हीं नावें पडण्याचीं कारणेंही सांगितलीं आहेत. ( अ. ५।६ ) सुषेण राजाला पद्मेच्या प्रसादानें गत राज्य परत मिळाले व भृगूनें विष्णूस लत्ताप्रहार केला होता त्या पापाचें क्षालन झालें म्हणून पद्मपूर व भृगूदक अशीं नांवें पडलीं. सीताशुद्धींत रामास शंकरानें दर्शन दिलें व तेथें तो "जटा शंकर" नावें राहिला. पुढें दशार्णाचा राजा केतुमान यानें ययातिकन्या माध्वी हिचें धर्षण केलें होतें त्यामुळें शापानें तो कुष्ठी झाला होता, परंतु या तीर्थावरील वायु-स्पर्शानें कुष्ठ जाऊन पूर्ववत् सुंदर झाला म्हणून शाकरी व वायुशोधन हीं नावें मिळालीं. मार्कंडेयानें येथें दुर्गा प्रसन्न करून घेतली म्हणून शहरास दुर्गा-वती व तीर्थस्नानें परशुरामाच्या राजहत्याचा दोष गेला म्हणून रामसतार हीं नांवें चालू झालीं. रावणानें देवांस कोंडलें होतें तेंव्हा तेथें एक अघटित बीळ पडलें होतें म्हणून शहरास बिलिनी आताचें बीड ( बिलिनीचा अप-भ्रंश । श्रोतीं जाणावें बीड विशेष ॥ ) नाव पडलें व भद्रशर्मा व सुकेशी या दरिद्री दांपत्यास अपार कनक मिळाले म्हणून "कनकालय" असें नाव प्रसिद्ध झालें. मध्यंतरीं अनेक राजे, ऋषि, देव इत्यादिकांना या तीर्थापासून कसकसे लाभ झाले, विशेषत: अत्रि ऋषींनीं येथें तप केल्यामुळें तें फळास येऊन अनुसूयेच्या पोटीं त्रिमूर्ति कसे आले, ह्या कथा आल्या आहेत. शंकराचें त्यावर विशेष प्रेम जडण्याचें कारण असें सांगितलें आहे कीं शंकरपार्वतीचा प्रेमकलह तेथें मिटला. त्याचप्रमाणें तेथें स्नान केल्यानें इष्ट कामना सिद्ध होतात व त्याचें महत्त्व काशीहूनही अधिक आहे असें सांगितलें आहे. शेवटीं सातव्या अध्यायांत तेथील "बिंदुसारा" व "कर्पुरा" या नद्यांच्या

उत्पत्तीच्या पौराणिक कथा देऊन व ग्रंथपठनाचें फल सांगून ग्रंथ संप-विला आहे.

नावावरूनच हें काव्य वर्णनात्मक आहे हें सहज समजण्यासारखें आहे. ह्याचे ७ अध्याय असून एकंदर ओवी संख्या ४३५ आहे. ओंव्या नेहमीं-प्रमाणें तीन यमकाच्या असून त्यास साडेतीनचरण आहेत. ओवी अर्थाबरोबर धावती असून अगदीं सुबोध आहे. अन्वयार्थाची भानगड अगर दुसरी कसलीही क्लिष्टता या लहानशा काव्यात नाहीं. कथासरितेचा ओघ शांतपणें शेवटपर्यंत एकसारखा गेला आहे. आजूबाजूच्या सुंदर वनोपवनाचीं, पुण्य तीर्थक्षेत्राचीं, रमणीय निर्झरोदकाचीं, व भव्य नगरींची शोभा पहात पहात जाणाऱ्या वाचकास संतोष व आनंद झाल्याशिवाय रहात नाहीं. अर्था-संबधानें तर कवीनें स्वतःच आत्मविश्वासानें सांगून टाकिलें आहे कीः— ही महाराष्ट्र भाषेची कथा। परी अर्थाविषयीं नाहीं न्यूनता ॥ यथामती वर्णिली तत्त्वतां। श्रवण करा भाविकहो ॥ ७.१८ ॥ आणि तें बरेंच खरेंही आहे. याचें कारण कदाचित् कवीच्या ईश्वरश्रद्धेंतही असूं शकेल. कारण आरंभींच नमन झाल्यानंतर तो सरस्वतीस म्हणतो कीं ॥ माझ्या जिव्हाग्रीं राहून। ग्रंथ बोलीव सकल हा ॥ १-४ ॥ मधून मधून सुद्धा त्याला आपल्या असमर्थतेची जाणीव होत असलेली दिसते. कारण तो शंकरास विनवितो कीं ॥ आरंभिलें हें ग्रंथसदन। तरी उभारी तूंचि पूर्ण। हीन दीन मी सत्य पां ॥ २-२४ ॥ व पुनः ॥ तुझिया कृपेनें सहज। चालले हें ग्रंथ जहाज। तरी सत्वर पाऊनि वृषभध्वज। पैल तीरा नेई पा ॥ ६ ३ ॥ आणि शेवटीं तर आपल्या प्रार्थनेस मान देऊन परमेश्वरानें ग्रंथ आपल्याकडून बोलविला व म्हणूनच तो फार उत्कृष्ट झाला आहे अशाबद्दलचे साभिमानोद्गार कवीनें काढले आहेतः—

जैसा सूत्रधारी स्वकरें करून। नाचवी बाहुली आपण। तसेंच वासुदेव मुखातून ॥ दुर्गारमण बोलवी ॥ ७-२९ ॥ आणि ग्रंथाविषयीं तो म्हणतोः— हे सप्त अध्याय परिकर। श्रोतीं जाणावे सप्त समुद्र। माजी शिवलीला जी विचित्र। मुक्ताफळें तेंचि पै ॥ ७ २१ ॥ हीं मुक्ताफळें घेवोनी। हार करावा संतसज्जनीं। तो आपुले कंठभूषणीं। मिरवावा सदोदित ॥ २२ कीं हे सप्त खणांचे दामोदर। लखलखीत अतिसुंदर। माजी पहुडे रामेश्वर। गौरीसह

स्वानंदें ॥२३॥ ह्याबरोबरच कवीचा विनय पाहून कवीबद्दल सहानुभूति व प्रेम वाटल्यावाचून रहात नाहीं. तो म्हणतो:—संत हो ऐका प्रार्थना। करू नेणें मी ग्रंथ रचना। तथापी तुमचे अवधाना। केले मजला ये ग्रंथीं।३०। नेणों कैसें तें वृत्तदर्पण। उपरी नसे मज विभक्तिज्ञान। परी तुमचे कृपेचें लक्षण। ग्रंथ संपला सकल हा॥ येथें तुम्हा जें दिसेल न्यून। तें करावें तुम्हींच पूर्ण। जैसें सांग करिती समस्त मिळुन। भिक्षुकाचें लग्न तें ॥ ३ ॥ ह्यांतील भिक्षुकाच्या लग्नाची व्यावहारिक उपमा मोठी समर्पक व सूचक आहे. आणखी एक दोन स्थळींही कवीच्या उपमा मोठ्या अर्थसुंदर झाल्या आहेत:—

रसाळ लवती फळें सुमन। जेविं सज्जन गुणभारें॥ यातील सज्जनगुणांची उपमा किती गोड व व्यंग्यार्थ सूचक आहे हें रसिकास सागणें नलगे. त्याचप्रमाणें तपोनिष्ठ वसिष्ठ शिष्यपरिवेष्टित आलेला पाहून त्यास दिलेली पुढील उपमा अगदीं यथार्थ वाटते:—

भोवतीं वसिष्ठ तपोधन। सूर्याभोवतीं जेवीं किरण। कीं शशी वेष्टित उडुगण। तेवीं वसिष्ठ शोभतसे॥ ह्या ठिकाणीं एका मागून एक आलेल्या परस्परविरुद्ध उपमा पाहून वाचकांस सकृद्दर्शनीं बुचकळ्यांत पडल्यासारखें वाटेल खरें, परंतु थोड्या विचाराअंतीं त्याचे सहज लक्षांत येईल कीं पहिलीनें वसिष्ठाचे दुर्लेघ्य तपस्तेज व अंत:सामर्थ्य व्यक्त केलें आहे तर दुसरींत तें जनास तापदायक होणारें नसून बाह्यत: शीतल व आल्हादकारक होतें हें सुचविलें आहे. त्याचप्रमाणें आपल्या कथेविषयीं कुतूहल उत्पन्न करण्याची श्रीधरी पद्धति त्यानें मोठ्या सफाईनें उचललेली दिसते. पहा:—पुढें चालली कथा सुरस। जन्हु कुमारी ज्या परी॥ ह्या ठिकाणी नुसत्या एका जान्हवीच्या उपमेनें कवीनें आपल्या कथेचें पावनत्व, प्रसन्नत्व, माधुर्य व प्रशांतगतिमत्व हीं सुचविलीं आहेत. कवीचा रूपकाकडे किंवा इतर अलंकारांकडे विशेष ओढा दिसत नाहीं. तरी पण "एकावली" अलंकाराचें एक उदाहरण सांपडतें:—

आळो आळीं सुंदर घरें। घरोघरीं सुंदर गोपुरें। गोपुरामाजीं सुंदर वासरें। क्रीडताती स्वानंदें॥ १-३४॥ कवीनें अलंकारांचा फारसा हव्यास केला नाहीं हें एका अर्थी बरेंच झालें, नाहींतर कथेच्या सहज रम्यतेस

कांहीं अंशीं तरी कृत्रिमता आली असती. पण एखाद्या विशिष्ट व्यक्तीचें, प्रसंगाचें किंवा रागद्वेषादि भावनाचें शब्दचित्र उठावदारपणें झटकन रेखाटण्यांत कवि किती निपुण आहे हें पुढील एक दोन उदाहरणांवरून सहज स्पष्ट होईल:–(१) नारद कैलासास शंकरास भेटण्यास गेले तेव्हां त्यास शंकर कसे दिसले:—

वामांकीं विराजे दक्षबाळा। मस्तकीं शोभती रुद्राक्ष माळा। कालकूट विष गळा। नीलवर्णे शोभतसे॥ १-१९॥ भस्म चर्चिलें सर्व शरीरीं। बालचंद्रमा विलसे शिरीं। शरजन्मा मांडीवरी॥ पुढें नाचे गजानन॥१-२०॥

(२) अत्रि ऋषींच्या घोर तपश्चर्येंचें वर्णन वाचून ब्रम्हर्षि होऊं इच्छिणाऱ्या विश्वामित्राच्या उग्र तपाची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं. पहा:—

ऊर्ध्व बाहू निराहारी॥ दृष्टि ठेऊनि नासाग्री। वात ऊष्ण सोसूनि वरी। उग्र तप करीतसे॥ ३-३६॥ जव निघाल्या तपज्वाला। आहाळीत गेल्या लोकपाला। देवेंद्र मानसी दचकला। काय बोले गुरूसी॥ ३७॥ इंद्र म्हणे माझें आसन। डळमळतें का रात्रंदिन। आणि दशदिशा परिपूर्ण। धुंद वाटती सदोदित॥ भासे सर्वत्र जडीभूत। मम अपराध नसे किंचित। काय विघ्न असे उदित। नेणतसे मी गुरुवर्या॥ ३९॥

पण शंकरपार्वती द्यूत खेळत असतां शंकर हरले तरी साक्षीपुराव्याच्या जोरावर त्यांनीं बाजू पार्वतीवर उलटविली. त्यावेळचें पार्वतीप्रकोपाचें वर्णन निंतात सुंदर व रम्य झालें आहे:—

तंव बोले गौरिरत। म्या डाव जिंकिला यथार्थ। तूंच बोलसी असत्य बहुत। ऐसीच करणी तुझी गे॥ ४-१४॥ दुर्गा विचारी नंदी प्रत। असत्य साक्ष देती समस्त। म्हणती शंभूनें जिंकिले यथार्थ॥ आम्ही भोवताले पाहतसो॥ १५॥ ऐसे ऐकूनि वचन निष्ठुर। क्रोधे संतप्त खदिरांगार। नयनी आरक्तता अपार। प्राप्त झाली पार्वतीच्या॥ १६॥ काढूनि टाकिले अलंकार। मोकळे रुळती कबरीभार। खेदें विव्हळ सुकुमार। क्रोधें शरीर आर्द्र झालें॥ १७॥ नयनी चालल्या विमलांबुधारा॥ दंत ओष्ट्र चावी करकरा। वस्त्रें फाडूनि टरटरा। रुदन करी आक्रोशें॥ १८॥ फांसा

द्रीधलासे फेकूनी। चालली शंकरावरी रुसोनी। शंभू विचार करी निजमनीं। सहज विनोदें काय झालें ॥ १९ ॥

गाढ प्रेमाचा रुसवा, स्त्रीस्वभावसुलभ असत्याची चीड, आणि मान-भावी साक्षीदारांच्या लुब्रेपणाबद्दल प्रकोप, ह्या तिन्ही भावनांच्या उत्कटतेचें मिश्रण किती गोड व हृद्य झालेलें आहे हें काय रसिकांस शब्दांनीं सांगितलें पाहिजे? प्रेमिकास त्याच्या प्रेमजीवनात असा तीक्ष्णमधुर प्रसंग एकेकदां तरी अनुभवण्यास मिळावा आणि शंकराप्रमाणें "सहज विनोदें काय झालें!" असा पश्चात्तापपूर्वक सखेदाश्चर्ययुक्त प्रश्न स्वतःसच विचारण्याचा प्रसंग यावा एवढेंच!

कवीचीं स्थलवर्णनें व निसर्गवर्णनें साधारण बऱ्यापैकीं आहेत. तीं एक साच्याचीं असून जुन्या ठराविक पद्धतीचीं आहेत. मासल्या करिता ह्या प्रकरणाच्या शेवटीं पद्मावती वर्णनाचा उतारा दिला आहे तो पहावा.

कवीनें म्हटलें आहे कीं मी वृत्तदर्पण शिकलों नाहीं. पण त्यानें केवळ ओवी छंदाचाच अवलंब केला असल्यानें त्याची उणीवही त्यास भासली नसावी. पुढें विभिक्तिज्ञान म्हणजे व्याकरणशास्त्राचाही अभ्यास केला नाहीं असें जें म्हणतो तें बरेंच सत्यास धरून आहे असें वाटतें. कारण त्यानें पुढील प्रमाणें बरींच अशुद्ध रूपें योजिलीं आहेत:बुद्धिवाती; तपज्वाला; जगदोद्धरण; गृहोगृहीं; अमोल्य; ऋषेश्वर; सच्चितानद; पयाब्धीवासा; इ. पण दुसरीकडे पहावें तो मोठमोठे संस्कृत समास व अप्रसिद्ध शब्दही त्यानें उपयोजिलेले दिसतात. उ.—नमो चराचरजगत्पाला; नमो सत्कर्मादिवेषधारका; नमो सर्गस्थित्यंकारका; कर्माध्यक्षा; अहिंबुध्नी; शुनासीर; पाकशासन; बिडौजा इ. त्याचप्रमाणें कांहीं जुने शब्दही त्यानें योजिले आहेत:—आसपास, आहाळीत, रळी, अरुवार, कहाळ, पणवें, इ. ह्या सर्वांवरून जरी व्याकरण व संस्कृत या विषयाचें त्याचें सशास्त्र अध्ययन झालें नसावें, तरी ज्ञानेश्वरश्रीधरादि जुन्या संत कवींच्या काव्याचा अभ्यास त्यानें चांगला केला असला पाहिजे हें स्पष्ट दिसतें. त्यांतल्या त्यांत श्रीधराच्या पौराणिक ग्रथांचा त्याचा दृढ अभ्यास असून त्यानें त्याच्या बऱ्याच लकबी बुद्धिपुरस्सर उचललेल्या दिसून येनात. त्यापैकीं कांहींचा उल्लेख पुढें केला आहे: (१) अध्यायाच्या प्रारंभींचा कथाप्रवेश व अंतीं पुढील अध्यायाचा अवतार हे एखाद्या सुंदर

उपमारूपकानें करून, चालू कथाभागाकडे वाचकांचे अवधान खेंचावयाचें व पुढील कथेबद्दल कुतूहल जागृत करावयाचें. ( २ ) ग्रंथकर्तृत्वगर्व-परिहार. अंतस्थ देव मजकडून ग्रंथ लिहवितो. मी निमित्तमात्र आहे, अशी दोन्ही ग्रंथकाराची भावना आहे. (३) स्थल व निसर्ग यांच्या वर्णनात दोघांत बरेंच साम्य आहे. विशेषतः गंभीरप्रसगीं लांबलांब समास व कठीण संस्कृत शब्द घालून रचना भारदस्त करण्याची संवय दोघांस आहे. ( ४ ) ग्रंथपठनाचें फल मोठ्या अतिशयोक्तीनें सांगून भाविकांस सर्व कामनांचा लाभ व अभाविकांस सर्व हानि मागण्याची दोघांची परिपाठी आहे. ( ५ ) एका विशेष नामास नामांतरें देण्याचा हव्यास खास श्रीधरासच होता. किंबहुना त्यानेंच तो प्रकार सुरू केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यानें तो इतक्या पराकोटीला पोचविला कीं एकदा योजिलेलें विशेषनाम पुनः योजावयाचेंच नाहीं असा त्याचा निश्चयच झालेला होता, असें वाटतें. आणि असें करिताना अमरकोश रिता झाला कीं इष्टनाम-वाचक शब्द तो मुद्दाम बनवीत असे. हाच प्रकार ह्या काव्यात आढळतो. इंद्र व शंकर ह्या नावाबद्दल पुढील शब्द दोघानीही योजिले आहेत. ते असे:—इद्र, बिडौजा, पाकशासन, जंभभेदी, पुरंदर, सहस्रनयन, शुनासीर, इ. शंकर:—कर्पूरगौर, त्रिलोचन, ईशान, श्रीकंठ, नीळकंठ, धूर्जटी, गिरि-जानाथ, चंद्रशेखर, शूलपाणी, स्कंदतात, अंधकमर्दन, गंगाधर, त्रिपुरांतक, त्रिपुरदाह, कैलासवासी, स्मरहर, उमाधव, शंभू, गौरीरत, अपर्णापति, पंच-वदन, विरूपाक्ष, नागभूषण, पिनाकपाणी, डमरूधर, उमारमण, विश्वंभर, जगद्गुरू, इ. असें असून मोठ्या आश्चर्याची गोष्ट ही कीं, जुन्या कवीपैकीं कोणाचाही आणि श्रीधरचा सुद्धा त्यानें नामनिर्देश केला नाहीं. नमनांत त्यानें मध्वाचार्य व आपलीं पितरें पांडुरंग रुक्मिणी आणि समाप्तींत कुळ-दैवत म्हाळसाकांत व विद्यागुरु मल्हारराव यांचा आदरपूर्वक उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें आपली मिरास सोलापुरास आहे व नाम धोत्रीकर आहे, असेंही त्यानें सांगितलें आहे.

एकंदरींत ह्या ग्रंथाच्या वाचनानें जरी त्यांत भाकित केलेली फलप्राप्ति वाचकांस झाली नाहीं तरी घटकाभर करमणूक झाल्याशिवाय राहणार नाहीं हें खास.

## पद्मावती वर्णन.

नारदा सांगे धूर्जटी । गोदेच्चिया दक्षिण तटी । पद्मावती नगरी मोठी । पंच योजनें जाण पै ॥ २६ ॥ पद्मावती बाह्य प्रदेशवन । वृक्ष भेदीत गेले गगन । वासरमणीचे किरण । माजी न दिसे कदापि ॥ त्यामाजी कस्तुरी-मृग चरती । कोकिला पंचम स्वर आळविती । पक्षी सदा गायन करिती । हंस खेळती स्वानंदें ॥ २८ ॥ रहाट पाट शीतळ उदक । चातक बदक चक्रवाक । शिखी कीर शब्द सुरेख । होत असे सुस्वर ॥ २९ ॥ मलय वायू शीतल । येत अतिशय मंजुल । कृष्णागर मलयागर परिमळ । देवदार वृक्ष तेथें ॥ ३० ॥ नारीकेळ खर्जुरी अशोक, । पोफळी वट पारिजातक । अंजीर मातुलंग सुरेख । वृक्ष अनेक विलसती ॥ ३१ ॥ न्याय मीमांसा सांख्य ग्रंथ । पांतजली व्याकरण वेदात । वेदाध्ययनें अभ्दुत । गृहोगृही होताती ॥३३॥ आळो आळीं सुंदर घरें । घरोघरीं सुंदर गोपुरें । गोपुरामाजी सुंदर वासरें । क्रीडताती स्वानंदें ॥ १.३४ ॥.

# प्रकरण १० वें

## बीडकर कविद्वय.

### अनंत गोपीनाथ हिंगणीकर [ स. १८८२ ].

यांचा जन्म शके १८०४ मध्यें भाद्रपद शु० ॥ १४ स वेळंब येथें झाला. त्यांच्या वडिलांचे नांव गोपीनाथ व आईचें नाव सुंदराबाई होतें. हे मूळचे जोशी व कुलकर्णी होते. यांचें प्राथमिकशिक्षण गावठी शाळेंतच झालें, त्यामुळें त्यास व्याकरण वगैरेचें पद्धतशीर शिक्षण मिळालें नाहीं. त्यांची घरची स्थिति फार गरिबीची होती. परंतु गोविंदरावसाहेब चपळगांवकर व दत्तात्रेय नारायण ऊर्फ बापुसाहेब ह्या दोन बीडकर वकिलाचा त्यांस आश्रय मिळाल्यामुळें बीड येथें त्यांचें पुढील शिक्षण झालें व ते तेथेंच वकिलीचा धंदा करू लागले.

पुढें एकदा कार्तीक शु. ११ स त्यांना पंढरीस जाण्याचा योग आला. तेथील भजनानंदात ते इतके तल्लीन झाले कीं त्यास पुढें अंभग करून हरिविजय गाण्याची स्फूर्ति झाली. त्याप्रमाणें त्यांनीं तीन भाग प्रसिद्ध करून चौथ्या भागाची तयारी चालविली आहे. त्यांची वृत्ति हल्लीं इतकी हरिविजयमय झाली आहे कीं त्याचे लक्ष आपल्या धंद्याकडेही फारसें लागत नाहींसें झालें आहे.

हे तीन्ही भाग श्रीधराच्या ‘ हरिविजय ’ या ग्रंथाच्या आधारें केलेले आहेत. ‘ हरिविजयग्रथातें आधीं मग श्रीधरासि वंदीन ’ अशी ज्याची प्रशस्ति प्रत्यक्ष मोरोपंतासारख्या कवीनें केलीं आहे त्या ग्रंथाची महती निराळी सागण्याचें कारण नाहीं. पण तो ग्रंथ ओवीबद्ध असल्यामुळें नित्यपाठास तितकासा सुलभ नाहीं. तेव्हां त्याचा अंभगरूपानें झालेला हा नवावतार भजन-प्रेमी भक्तांस स्वागताईच वाटला ह्यांत नवल नाहीं. शिवाय ह्या नवावतारास अनुरूप असें स्वातंत्र्यही त्यांत कवीनें क्वचित् अवलंबिलें असल्यामुळें त्यास विशेष रुचि आली आहे. म्हणूनच नवाकाळ, चित्रमयजगत् वगैरे साप्ताहिकें व मासिकें यांनीं आणि श्री. बाबासाहेब खापर्डे, विष्णुपंत कन्नडकर कवि

व देविदासराव कवि इत्यादि रसिकांनींही तो नांवाजला आहे. केवळ काव्यविलास व भाषासौन्दर्य हा हेतूच कवीनें आपल्या पुढें ठेविला नसल्यामुळें हे गुण त्याच्या अंभगांत फारसे न सांपडल्यास कोणास निराश होण्याचें कारण नाहीं. पण त्यात साध्या व सरळ भाषेंत त्यास उत्तम भक्तिरसाची गोडी खास चाखावयास मिळेल. चौथा व पांचवा भाग लिहून तयार झाले असून त्यांत हरिविजय समग्र आला आहे. परतु द्रव्याभावी तो छापणें अशक्य झालें आहे, ही मोटी खेदाची गोष्ट आहे.

भाग १ लाः—ह्यात पहिले ३३ अभग प्रास्ताविक असून पुढील ७० संतपर आहेत. नंतर अध्यायवार कथेस सुरुवात झाली असून सात अध्यायातील कथाभाग ५०२ अभगात आला आहे. ह्यापैकीं शेवटचे ५।७ अभंग श्रीधरस्तुति व फलश्रुति ह्याकडे खर्चिले आहेत. हरिविजयग्रथ जाणा ब्रह्मगिरी। बंधनातें करी मुक्त सदा ॥ ४९७ ॥ व। ओवीबद्ध ग्रथ श्रीधरांचा श्रेष्ठ। त्याचे मी उच्छिष्ठ भक्षीतसें ॥ ४९९ ॥ अशी त्यानें मोठ्या आदरानें मूळ ग्रंथाची स्तुति केली आहे. कृष्णजन्म, बालक्रीडा, कृष्णाच्या खोड्या व गोपींचीं गाऱ्हाणीं ह्याचे वर्णन मोठें आकर्षक व वैचित्र्यपूर्ण झालें आहे. कल्पकता व स्वानुभव ह्याची जोड त्यास मिळाल्यामुळें त्यास जिवंतपणा आला आहे. श्रृंगारप्रिय वाचकास त्यात श्रृंगारही लुटावयास मिळेल. पुनः तो बालकृष्णाच्या संबंधीं असल्यामुळें उत्तान असला तरी वैषयिकतनें तो विटाळू शकत नाहीं, म्हणून तो सोंवळा व पवित्र असा झाला आहे. तिन्ही भागांतील अभंग शेवटीं नमुन्या दाखल दिले आहेत.

भाग २ राः—काव्यरत्नावली, स्वराज्य, हिंदु, प्रबोध, निजामविजय, लोकमित्र, प्राज्ञपाठशाळा वाई, श्री. सौ. गिरजाबाई केळकर, व गोंव्याचे खोलकर वगैरे मासिकवृत्तपत्रांचे व प्रसिद्ध सस्थाचे व व्यक्तींचे उत्तम अभिप्राय ह्या भागास मिळाले आहेत. त्यावरून ह्या भागात प्रसाद व प्रेमळपणा कसा वाढत्या प्रमाणांत आढळतो हें सहज स्पष्ट होत आहे. ह्यातही ईशस्तवन व संतपर अभगानंतर ८ ते १२ अध्यायांतील कथाभाग ६०१ अभंगात वर्णिला आहे. मध्यंतरी ५४१ ते ५६४ पर्यंतचे अभंग हिंदींत केले आहेत. छोटा गवलीका छोरा। गिरीको उंगलीपे पकरा ॥ ध्रु. ॥ अशी सुरवात करून हें सर्व आख्यान ‘कहा इंद्रको श्रीकिशनने अपने

स्थानको जाना ॥...देखो गोकुलका कान्हा, सुरेंद्र होगया दिवाना ॥ इत्यादि गोड ध्रुवपदानें संपूर्ण केलें आहे. हिंदी कवनाची प्रवृत्ति जुनीच असल्या-मुळे ह्या कवीसच तिजबद्दल नावें ठेवण्याचें कारण नाहीं. आणि आतां तर काय हिंदीचा सर्वत्र उदो उदो चालला आहे. यात गणेशव्रत, राधाविलास, यमलार्जुनोद्धार, दधिमंथन, गोवत्सपालन, गोपालकाला, गोवत्सहरण, ब्रह्म-स्तुति, कालियामर्दन, दावानल, गोवर्धनोद्धरण, व व्योमासुरादिवध वगैरे कथा आल्या आहेत. गणेशव्रतास आरंभ झाल्याबरोबर कृष्ण खोड्या टाकतो म्हणून यशोदेस झालेला आनंद, नैवेद्य समपर्णाचे वेळीं रिकाम्या झालेल्या हाऱ्याबद्दल तिचें आश्चर्य, नंतरचा तिचा क्रोध व त्या भीतीनें कृष्णाची वळलेली बोबडी, कृष्णाचें आत्मसमर्थन, शिक्षा, तोंडाची झडती व ती घेत असताना यशोदेस घडलेलें विश्वदर्शन, हीं सर्व वर्णनें मोदक लाडवाच्या प्रसादाइतकींच गोड झालीं असून,त्यांतील हास्य भयानक रौद्र व अद्भुत ह्या रसाच्या उत्तरोत्तर बदलत जाणाऱ्या छटाचें शेवटीं वत्सलात झालेलें पर्यवसान, नितान्त मधुर झालें आहे. राधाविलासात प्रेमवेडी राधा, भोळसर अनया. मत्सरी व चुगलखोर गोपी, कजाग सासू, या सर्वांस पुरा पडणारा बहुरूपी कृष्ण, यांचीं चित्रें फार आकर्षक झालीं आहेत. पुढील सासूचें रूपवर्णन पहा:—अ. १०४

राधिकेची सासू द्वाड। नित्य करी वटवड ॥ १ ॥ अती वृद्ध जीर्ण खोड। वाकुडेंच ते कुबड ॥ २ ॥ सर्वा अंगीचे ते बळ। मुखामाजींच केवळ ॥ ३ ॥ सदा हातामाजी काठी। मुलाबाळाना घोंपटी ॥ ४ ॥ इ. ह्या प्रकरणावर समोर शेसवाशे अभंग केलेले आहेत. अशाच प्रकारें सर्व प्रकरणें त्या त्या प्रसंगास अनुरूप असा रसरंग तयार करून तीं भक्तिरूप कुंचल्यानें चितारलीं आहेत. ॥तुझेच ते गुण तूच गावविता। अहंकार वृथा नको मज ॥ असें निरभिमानानें म्हणून कवीनें हा भाग संपविला आहे.

**तिसरा भाग:**—पहिले दोन भाग शके १८४७।४८ त प्रसिद्ध झाले. कवि म्हणतो, 'या भागास दोन वर्षांची अवधि माझ्या गरीबीमुळें लागली याबद्दल सज्जनाची क्षमा मागतों.' केवळ हरिप्रेमाचें मूल्य घेऊन आपले ग्रंथ वाटणाऱ्या या परोपकाररत महात्म्याची ही विनती कोणता

सहृदय मनुष्य नाकारील! ह्या ग्रंथाची अंखणी मागल्या दोहोंप्रमाणेंच केलेली आहे; व त्यांत १३ ते २० अध्यायापर्यंतची हरिकथा आली आहे. तींत गोगवेषण, शक्तिपूजन, जलासुर, अघासुर, धेनुकासुर, केशी, प्रलंब, शंखचूड वगैरेंचे वध, नारदाची कळ, कुंजविहार, गोपीवस्त्रहरण, यज्ञपत्न्योद्धार, रामक्रीडा, गोपीगीत, अक्रूरागमन, कंसवध, व रामकृष्णांचें मौजीबंधन वगैरे प्रकरणें वर्णिलीं आहेत. हा भाग जसा कवितांच्या संख्येनें (९०२) तसाच काव्यगुणानेंही श्रेष्ठ झाला आहे. पहिल्या भागापासून तिसऱ्यापर्यंत काव्यदृष्ट्या निरीक्षण केलें असतां त्यातील काव्यानंद प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत वृद्धिंगत होत जाणाऱ्या चंद्राच्या ज्योत्स्नेप्रमाणें आल्हाददायक झाला आहे. ह्यांतही मधून मधून दिंदी पदे आहेतच. पण ह्या भागाचें खरें वैशिष्ट्य म्हटले म्हणजे हें आहे कीं, ह्यांत कवीनें मूळचा संकल्प संभाळण्यास जरी प्रत्येक कवनास अभंग म्हटले आहे, तरी त्यानें कंसात निरनिराळ्या गेय वृत्तांच्या चाली उ० शारदे दास कामदे, रूप पहातां, कैसा जोग, उद्धवा शांत वन, पंढरपुरास जात्ये. जन सारे (राग तोडी), राधाधरमधु, दृष्टिभरं, कैसा जोग कमाया, गजलें व ठुंबऱ्या, अशा दिल्या आहेत. त्याचप्रमाणें आर्या, साकी, दिंडी इत्यादि मात्रावृत्तांची व मंदाक्राता, शार्दूलविक्रीडित, कामदा, भुजगप्रयात वगैरे अक्षरगणवृत्ताची योजना मधूनमधून पुष्कळ केलेली असल्यामुळें ह्या भागास वैचित्र्य आलें आहे. म्हणून तो मागच्या भागाप्रमाणें कटाळवाणा वाटत नाहीं.

(१) यज्ञपत्न्योद्धार:—हें प्रकरण उत्कट भक्तिभावानें अत्यंत उद्बोधक झालें आहे. क्षुधातृषाक्रांत गोपाळांची दीनस्थिति, कृष्णाचें ब्रह्मज्ञान, पण क्षुधेपुढें त्याची विफलता, यज्ञशाळेंतील विप्राजवळ गोपांची अन्नयाचना, तेथील त्यांचीं दांभिक यज्ञकर्में, शूद्रदर्शनामुळें आलेला व्यत्यय, तत् शुद्ध्यर्थ स्नानें, निराशेनें परत आलेल्या गोपाचें ॥ बोले जेथें जावें तेथिल द्विज ते करीत हो नन्ना ॥ हें रडगाणें, पुन: पंथ्याची समजूत व त्याची ऋषिपत्न्यांकडे रवानगी, "भवति न भवति" चा संवाद, व त्यांचा अन्न देण्याचा निश्चय, त्या अन्न घेऊन जात असता त्यास अडवणाऱ्या नवऱ्याशीं त्यांचे उडालेले जोरदार खटके (उ० कैसें देशिल अन्न तूं बघु क्षणीं देवाविना गोवाळ्या ॥ सांगे देइन मी बरें हरिपुढें जाळी

तुझ्या सोंवळ्या ), दंडनार्थ बायकाच्या मागे जाणाऱ्या पतींची धांवपळ व त्याचा क्रोध, ।। घ्यावी गोड करूनी ही दुबळीची भाजी शिळी भाकरी ।। असें शुद्ध भावाचें एकीचें अन्नसमर्पण, त्याचा उद्धार आणि ।। पढूनिया वेद आम्ही जडमूढ । स्त्रियाच त्या दृढ हरी प्रेमें ।। असे पश्चात्तापपूर्वक पस्ताव-णारे ऋषि—हीं सगळीं वर्णनें फारच चेतोहर व रसभरित झालीं आहेत.

( २ ) रासक्रीडेंतील आर्याही मोठया चांगल्या झाल्या आहेत;:—

रासाची ती वार्ता श्रवणीं पडतां अधीक बावरती ।।
कंचुकि दाटे चढली तेव्हां त्याच्या स्तनासही स्फूर्ती ।। ४८७ ।।
सहजचि मदनविकारें उकळया फुटती मनात त्या काळीं ।।
वाटे जाऊ आता भोगाया तो वनात वनमाळी ।।४८९।।
उठली घाई घाई भोजन सोडी * मुखीं मुग्रासाला ।।
हातचा हातिंच राही लोटी ताटा निघेच रासाला ।। ४९१ ।।
वाढित असता पात्री भोजन प्रेमें पतीस ती बाई ।।
गेली वेणूनादें सांडुनि कार्या तशीच त्या टाईं ।। ४९२ ।।
कोणी पाणी पीता ऐके वेणू मुखास ती झारी ।।
न मिळे अवसर गिळण्या उलटे जल तें तसेंच माघारीं ।।४९३।।

भ्रमः—— झाली एकिम घाई नाकीं बुगडी नथेस त्या कानीं ।।
घाली कर्णफुलातें चरणांगुष्ठीं सवेंच ती कोणी ।। ५०५ ।।
मटतां नेत्रकटाक्षीं बाणा पाठीं असंख्य त्या बाणा ।।
नयन मनोहर एका बाणें हरवी स्त्रियास त्या प्राणा ।। ५२० ।।

कृष्णः— आपला पतिदेव सोडून इकडे कां आला ? त्या उत्तरतातः—
धाडुनि वेणू दूता पाचारीसी अम्हांस रासाला ।।
जावें आतां म्हणशी दिसशी मोठा जगात कवसाला ।। ५२५ ।।

शेवटीं:— एकेका त्या गोपीपाशीं मूर्ती तशीच ती प्रगटे ।।
बोले झालों वश मी धरुनि हस्तां स्त्रियास तो झगटे ।।५३२।।

त्यानंतर कृष्णानें प्रत्येकीच्या हौशीआवडीप्रमाणें प्रत्येकीशीं केलेली क्रीडा, त्यावेळचे त्याचे रुसवेफुगवे, त्यांची मनधरणी, त्याची थट्टामस्करी,

* गिळी न घासाला.

कृष्णाचें एकदम गुप्त होणें, गोपींचा विरह व त्यानंतरची त्यांचीं आपापसांतील प्रेमासूयाप्रेरित झालेलीं भाडणें, पुन: कृष्णदर्शन व त्याचा परमानंद, सर्वच गोष्टी मोठया हळुवार भावनानीं रंगविल्या आहेत. पण ह्या सर्व रासक्रीडेचें पर्यवसान वेदांतात मोठया खुबीदार रीतीनें झालें असल्यामुळें वाचकांच्या कामवासना उद्दीप्त होत नाहींत, व कवि 'न देवचरित चरेत' असें म्हणतच तें प्रकरण संपवितो. शेवटचा अभंग पहा:—

अभंग ६१३ ( सुंदर तें. )

षण्मासाची कृष्णें करूनिया राती ॥ प्रेम श्रुति स्मृती भोगियेल्या ॥ १ ॥
परि हरिमाया असे ती दुर्धर ॥ पडला विसर सकळांसी ॥ २ ॥
करूनि अकर्ता घडविता रास ॥ स्मरेना कोणास कांहींच ते ॥ ३ ॥
अनंत म्हणे तेव्हा श्रुती स्मृती जाती ॥ वेगें नेती नेती म्हणतची ॥ ४ ॥

( ३ ) अक्रूरागमन:—नंदयशोदा व रोहिणी याचें पुत्रवात्सल्य व पुत्रविरह, गोपगोपी व इतर गोकुळवासी जन, यानीं कृष्णवियोगसमयीं दु:खानें केलेला आकांत, ह्या प्रसंगाच्या वर्णनातील करुणरसाच्या पुरात वाचक इतका वाहून जातो कीं त्यास 'अपिग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदय' ह्या वचनाची आठवण होऊन, हातातील ग्रंथही आपल्या आनंदाश्रूंत वाहून जाणार की काय अशी भीति वाटते ! त्या समयीं सर्व गोकुळही कसें **मंदाक्रांत** (शनीच्या साडेसातींत सापडलेलें ) झालें होतें हें पुढील **मंदाक्रांता**वृत्तानें सहज समजेल:—

हा हा प्रेमे तळमळ करी भक्त अक्रूर तेव्हा ॥
शोकाने त्या थरथर धरा होतसे कंप जेव्हा ॥
बोले आतां मजसि न गमे गोकुळीं कोण वांचे ॥
सर्वांसी ही दृढतर असे सारखे प्रेम साचे ॥ ७०७.७ ॥

अभंग ७३० ( चाल–उद्धवा शांत वन करजा. )

शोक तो नावरे तेव्हा ॥ त्या गोकुळवासि जनातें ॥ धृ. ॥ त्या नंदगृहातुनि गोपी ॥ जाताना म्हणती बाई ॥ हरिवाचुन येथें आम्हा ॥ पळभरही करमत नाहीं ॥ बहु थोर दिसे या सदना ॥ तिळतुल्य न शोभा काहीं ॥चाल॥ जीवनावीण तो मासा ॥ तळमळतो काठीं तैसा ॥ प्राणांत समय तो तैसा ॥ रोहिणी माय दोघींतें ॥ शोक तो. ॥ गोपिका तेथुनी जाती ॥ आक्रोशें दोघी रडती ॥

मूर्च्छना येउनी वेगें ॥ वेशुद्धच तेथें पडती ॥ गवळणी गृहास जाती ॥ अति दु:खित त्या ओरडती ॥ चाल ॥ गोवत्सें ठायीं ठायीं । लेकुरें तुडिती पायीं ॥ हंबरडा फोडिती गाई ॥ ना दिसे कृष्ण कवणा । ॥ २ ॥ शोक तो. ॥
शेवटीं हरिविजय ग्रंथाची स्तुति करून समारोप केला आहे:—

अभंग ८१६ ( चाल-सुंदर तें. ).

हरिविजय ग्रंथ सुखाचा सागर ॥ पूर्वार्ध तो थोर संपे आता ॥ १ ॥
याहुनि विशेष असे उत्तरार्ध ॥ होतील ते लुब्ध भक्त तेथें ॥ २ ॥
इक्षुदंडामाजी रस तो बहुत ॥ तेविं ते संस्कृत ग्रंथ जाणा ॥ ३ ॥
श्रीधरें वळिली तयाची साखर ॥ प्राकृतांत सार पूर्ण प्रेमें ॥ ४ ॥
अनंत म्हणे तीच शर्करा योजुनी ॥ वाढी अल्पज्ञानी काव्यरूपें ॥ ५ ॥

ह्या ग्रंथाचा भक्तांना कंटाळा येणार नाहीं. पण दुर्जनास व निंदक अभक्तास मात्र हा हरिविजय रुचणार नाहीं. विष्ठाभक्षक वायसाला अमृताची रुचि कोठून असणार ! ह्यांत नाना दृष्टांतांचा साठा आहे. म्हणून भक्तवाचकास ह्यानें मुक्ति मिळेल. हीं अमृतफळें गुरुकृपेनें माझ्या हातीं आलीं आहेत तीं समस्त सज्जनीं सेवावीं अशी प्रार्थना करून, कवीनें ग्रंथ समाप्त केला आहे. येथवर केलेल्या विवेचनावरून ह्या ग्रंथाचें वाङ्मयीन महत्त्वही किती आहे व त्यायोगें संतवाङ्मयाच्या भक्तिग्रंथांत ह्यानीं कशी ठळक भर पडली आहे व हें काव्य ' प्रतिसर्वरसोदय ' कसें झालें आहे, हें सहज समजेल. पुढें थोडे उतारे दिले आहेत.:–

दाढीवेणीची गांठ ( भा. १ ला ३३१ )

म्हताराची दाढी कांताच्या त्या वेण्या । सोडिता पाहुण्या मेहुण्याही ॥ १ ॥ एक म्हणे बाई सुटेना ती गांठ । दुसरीची वाट तीच होत ॥२॥ आळीचेही लोक धावूं धावूं येती ॥ बघता त्रयमूर्ती हांसताती ॥३॥ नरनारी वृद्ध शक्तिवान मोठे । सोडिता न सुटे ग्रंथी बाई ॥ ४॥ कोणी हाता माती चोळितचि येती । कोणी ते विभूत लावूनिया । काढुनिया जोर चक्रदंड घेती ॥ परी सुटेना ती दात खाती ॥ अनंत म्हणे कोणी आणा म्हणे शस्त्र । कोणी मंत्र तंत्र करिताती ॥

आत्मस्वरूपाची भूल भाग १ ला ४७८.

मृगनाभीं शुद्ध कस्तुरी ती वसे परी ती न दिसे । मृगलागीं ॥ १ ॥ दर्पणाचा समुदाय

चहूंकडे ॥ मध्यभागीं वेडें भुंके श्वान ॥ २॥ ओळखूं न शके आपुल्या स्वरूपा॥ सिंह पडे कूपामाजी जेवीं ॥ ३ ॥ तेवीं मम रूप ओळखीना कोणी ॥ षड्‌रिपूंचे ध्यानीं लागूनिया ॥ ४ ॥ ऐसे पद्मनाभ सांगे सर्वव्यापी ॥ ऐकती त्या गोपी अनंत म्हणे ॥ ५ ॥

**दधिमंथन** भाग २ रा. २६३।२६४.

मथन करितां श्रमली जननी । देखिली नयनीं श्रीहरीनें ॥ १ ॥ स्वहस्तेंच पुसी घर्म त्या मुखाचा ॥ शब्दही मुखाचा बोलतसे ॥ २ ॥ वाढवूनी माते पुरविशी लाड ॥ कोणेपरी फेड करूं याची ॥ ३ ॥ अनंत म्हणे बोले घेई तू विश्रांती ॥ करितो निश्चितीं मथन मी ॥ ४ ॥ लेंकुराचे बोल आर्धांच ते गोड ॥ तेशांत तें कोड कौतुकाचें ॥ ५ ॥ यशोदेचा कंठ सद्गदें दाटला ॥ नेत्रींही लोटला प्रेमपूर ॥ ६ ॥ बोले तुझे गुण अनंत ब्रह्मांडे ॥ वर्णितां न खडे अखंड ते ॥ ७ ॥ इ.

**नौकाक्रीडन** भाग २ रा. अ. २०९ ( चाल. कैसें जोग कमा. )

जेंवि आकाशीं चमचम चमके विद्युल्लतेचा भार । तेंवी चमकती चपलेसम त्या यमुना तीरावर ॥ संगे यशोदेचा कान्हा । जाती यमुने क्रीडना ॥ध्रु॥ कृतांतभगिनी रविकन्यका भरली दोहीं थडीं । नसेच त्या समयासी कोणीहि नावाडी ॥२॥ नाव खुंटली यमुनातीरीं सोडिती त्या चपला ॥ साडयांचा तो पचंग खोविती गोपी आपुला आपुला ॥ ३ ॥ हरिस घेऊनि आत बैसती होती त्या तारका ॥ अनंत म्हणे त्या क्रीडूं इच्छिती ॥ कृष्णासंगें नौका॥४॥

**शक्तिमंदिर** भा. ३ रा. अ. १३४

देवीची ती यात्रा भरे ओतप्रोत । गगनचुंबीत वृक्ष छाया ॥ १ ॥ नाना सरोवरे तीर्थांचे कल्होळ । मध्यें तें देऊळ विराजीत ॥ २ ॥ जाई जुई चांपा मोगरा बकूळीं । सुपुष्पांच्या वेली प्रफुल्लीत ॥ ३ ॥ महाशक्तीचें तें मनोहर वन ॥ विश्रामेल मन शक्राचेंही ॥ ४ ॥ अनंत म्हणे पूजा करूनी गोंधळ॥ घालिती प्रेमळ भक्त कोणी ॥ ५ ॥

**ऋषिपत्नी संवाद.**

देहाचा पति तूं अहेस तरि तो रक्षीं घरीं साक्षपें । जीवाचा पति तो हरीच मजला

नेईल कीं आक्षेपें । गेल्या त्या सकला म्हणून मजला देई रजा जावया ॥
नाहीं तो म्हणतां हरीस स्मरूनी लागे पुढें जावया ॥

---o---

## श्रीधरस्वामी निगडीकर यांचें चरित्र.

अनंत गोपीनाथ हिंगणीकर ह्या उदार व भजनशील गृहस्थानींच वरील सत्पुरुषाचें, गायन व कीर्तन यास उपयोगी असें पद्यमय चरित्र वर्णिलें आहे. ह्यात पदें, अभंग, ओंव्या, आर्या, साक्या, दिंड्या, शार्दूलविक्रीडित, कामदा, भुजंगप्रयात, व कटाव अशी विविध पद्यरचना आढळते. हें चरित्रपर आख्यान फारच लहान म्हणजे दहा पानांचें आहे. अभंगरूपी हरिविजयाचे तीन भाग केवळ हरिप्रेमाच्या मोबदल्यांत सर्वांस फुकट वांटून झाल्यावर 'प्रेमानें हरि एकवेळ मिळेल पण प्रकाशनास पैसा मात्र मिळत नाहीं' हें कटु सत्य कवीस कळून आलें. आणि त्याच ग्रंथाचे उर्वरित दोन भाग, चौथा व पांचवा हे द्रव्याभावीं अप्रकाशित अवस्थेंत पडलेले पाहून कवि भजनसमार्धीतून व्यवहारात उतरलेला दिसतो. कारण ह्या चिमकुल्या चरित्राची त्यानें हरिप्रेम ही किंमत न ठेवितां चार आणे किंमत ठेविली आहे. पण ह्यांतून उत्पन्न होणारा पैसा वरील अप्रकाशित भागांच्या प्रकाशनाकडे लावण्याचें आश्वासन देऊन त्यानें आपली स्वाभाविक निःस्वार्थतता प्रगट केली आहे. त्यामुळें ग्रंथकाराचा मनोरथ त्वरित सिद्धीस जावो व ते ग्रंथ भाविकास लौकर मिळोत, अशीच शुभेच्छा कोणासही करावीशी वाटेल. असो.

पंढरपुराजवळ नाझरें येथें बोपाजीपंत व बयाबायी यांचे पोटीं राजयोगी रंगनाथ स्वामी अवतरले. त्याचा चुलत बंधु दत्तोपंत, यास खंड्या म्हणून एक मुलगा होता. तो अत्यंत भाविक होता. त्यानें रंगनाथाचें शिष्यत्व पत्करलें होतें. तो भोळा खंड्या शास्त्र, विद्या, ज्ञानकळा कांहीं जाणत नसे. एकदां पंढरीस यात्रेचे समयीं सुप्रसिद्ध रामदास पंचायतन गेलें. पाळी पाळीनें सर्वांचें कीर्तन झालें. नंतर रंगनाथांची पाळी आली. परंतु त्यांना येण्यास जरा अवकाश होता. म्हणून लोकांनीं त्यांचा शिष्य खंड्या यास कीर्तन करण्यास सांगितलें. तेव्हां तो नाहीं म्हणतांच रामदासदिकांनीं त्यास हिणविलें कीः—

मग सर्व संतीं प्रेमें हिणवीलें । रामदास बोले काय तेव्हां ॥ १५.२ ॥
घेवोनियां जन्म सत्पुरुषाच्या वशीं । कैसा निवडीसी पाषाण तूं ॥ १५.३ ॥
हे शब्द त्याच्या जिव्हारीं लागले; व तो तात्काळ भीमानदींत प्राण देण्यास गेला. उडी टाकतेवेळीं तो म्हणाला:—चरण सद्गुरूचे अंतरती मातें । स्मरण करिता खंडयाचें गुरुनाथें । कोण देईल ती हाक गुरुनाथा । म्हणून खंडया ढाळीत अश्रुपाता ॥२१.१ ॥ व 'रंगनाथ गुरु माझे आई, येतों मी आता' असें म्हणत आहे तोंच रंगानाथानीं त्यास निवारिले. त्यास जीव देण्याचें कारण समजताच त्यानीं आपल्या तोंडातील तांबूल काढून त्याचे जिव्हेवर " श्री " असें अक्षर लिहिलें. तत्क्षणीं त्यास हरिकवनाची स्फूर्ति झाली. तेव्हां खंडयाचा श्रीधर झाला. रंगनाथानीं त्यास कीर्तनास उभें केलें. बृहस्पतीसारखें त्याचें वक्तृत्व । ऐकता श्रोतृसमुदाया ॥ बहु डोल मुखाचें येती ॥ ध्रु० ॥ त्या संतपंचकाला खंडयाचें नवल वाटलें. पुढें त्यानें भारत, रामायण, व भागवत हे ग्रंथ मराठींत आणिले. अशा श्रीधराच्या चरणीं अनंत दासानें ( हिंगणीकरानें ) हें कवन प्रीतीनें अर्पून त्याचें चरित्र संपविलें आहे. यांतील काहीं पद्ये फार गोड झालीं आहेत हें पुढील नमुन्यावरून समजेल.

शार्दूलवी.

संताचें घरदार तेंचि समजा श्रीक्षेत्र ती पंढरी ॥
माता रुक्मिणि ती सती, जनक तो त्राता असे श्रीहरी ॥
ऐके त्या समयीं अफाट भरली यात्रा हरीच्या घरीं ॥
चाले कीर्तनरंग तो निशिदिनीं तेव्हा हरीमंदिरीं ॥ ११ ॥

मालिनी.

अतिच चपल वेगें जातसे प्राण द्याया ॥
क्षणिकचि तनु वाटे ती सुटे मोहमाया ॥
जगुन हरि न भेटे व्यर्थ जीवित्व बोलें ॥
खचितचि मग त्यातें पूर्ण वैराग्य आलें ॥ १७ ॥

कामदा.

ज्ञानहीन मी राहिलों कसा ॥ बोलती मला सर्व हा पिसा ॥
सद्गुरुकृपा होइनाच ती ॥ भेट देइना रुक्मिणीपती ॥ १८ ॥

सकळसंत ते आमच्या कुळीं ॥ दगड जन्मलों मींच निर्वळी ॥
हरिकथा नये वर्णितां मला ॥ तरि कसा जगूं सांग विठ्ठला ॥ १९ ॥

———o———

## वासुदेव नरसिंह अपसिंगेकर (स. १८८७ ते १९३६)

ह्यांचा जन्म मुक्काम बीड येथें सन १८८७ मध्यें झाला. लक्ष्मीबाई व नरसिंहाचार्य हीं त्यांची मातापितरें होत. त्यांच्या वडिलांस नृसिंहोत्सवाप्रीत्यर्थ सरकारातून वार्षिक रु. ७५ मिळत असत. ह्यांचें शिक्षण फारसें झालें नव्हतें. त्यास मराठी इंग्रजी ऊर्दू व फारशी ह्या भाषांचें बरेंचसें ज्ञान होतें. वेदविद्या व याज्ञिकी ह्यांचा अभ्यासही त्यांनीं केला होता. कांहीं दिवस त्यांनीं शाळामास्तरची व पोलीसखात्यात कारकूनाची अशी नोकरी केली. पण पुढें अव्वल तालुकदारींत त्यास पोतदाराची कायमची जागा मिळाली व तेथें पगार रु. ५३ पर्यंत वाढला होता. त्याशिवाय अन्य मार्गानें त्यांनीं कोणापासून कधीं एक पैही मिळविली नाहीं. स्नानसंध्यादि ब्रह्मकर्म ते मोठ्या नियमितपणें करीत असत. परंपरेनें चालत आलेलीं यजमानकृत्येंही ते संभाळीत असत. फावल्यावेळीं विठ्ठलमंदिरात ते पुराण सांगत असत. पण प्रपंच करून जे कांहीं थोडें बहुत द्रव्य राही, त्याचा विनियोग परोपकारात करण्याचा त्यांचा निश्चयच झालेला होता. उद्यांची काळजी त्यांनीं कधीं केली नाहीं. व त्यासाठीं कधीं संग्रह केला नाहीं. त्यांनीं श्री भागवत, रुद्र, वगैरे स्वाहाकार केले. "हरे राम" या मंत्राचा त्यास पराकाष्टेचा छंद होता. रात्रंदिवस त्याचा उच्चार करीत व फावल्यावेळीं त्याचें लेखन ते करीत असत. अशा नामांकित कागदांत पिठाच्या गोळ्या बांधून, ते त्या माशास घालीत असत. ह्या वृत्तीचा परिपाक म्हणजेच "स्वहितादर्श" ह्या पुस्तकाचें लेखन होय.

**स्वहितादर्शः**—हें लहानसें ४७ पानांचें पुस्तक अपसिंगेकर यांनीं स. १९३० मध्यें छापवून प्रसिद्ध केलें आहे. ह्यास ह. भ. प. अनंत गोपीनाथ हिंगणीकर ह्यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. तींत हें पुस्तक नामस्मरणाचें उत्तम प्रेरक होईल असें म्हटलें आहे. ग्रंथकाराचा पेशा नोकरीचा असून त्यांचें अपघातानें उजव्या खवाटाचें हाड मोडल्यामुळें त्यास

लेखनाचें कार्य करितां येत नसे, असें आत्मनिवेदनांत त्यानें सांगितलें आहे. त्यांचें कुटुंब वारल्यापासून त्याचें संसाराकडील लक्ष अजीबात उडालें. स्वतःच्या प्रकृतीचीही त्यांनीं अनास्था केली. त्याचें पर्यवसान क्षयरोगांत होऊन ज्येष्ठ शु. ६ शके १८५८ रोजीं त्याचें देहावसान झालें.

स्वहितादर्श हें लहान पण चटकदार आणि बोधप्रद पुस्तक त्यांनीं रचिलें आहे. त्यांत प्रपंच करून परमार्थ कसा साधावा हें सांगितलें आहे. त्यात "हरे राम" ह्या मंत्रावर विशेष भर आहे. म्हणून प्रथमच 'हरे राम हरे राम' हा मंत्र १०८ वेळां दिला असून, इतरांनींही तो लिहिल्यास व जपल्यास त्यांची बुद्धि सन्मार्गाकडे वळेल असें आश्वासन ग्रंथकारानें दिलें आहे. नंतर 'स्वहितादर्शास' आरंभ केला आहे. त्यात स्वतःस सावधानता कशी प्राप्त झाली ह्याबद्दलचे एक दोन अनुभव सागून लेखकानें आनंद रामायणांतील श्रीरामचंद्राच्या जनोपदेशाचे सुमारें २६ श्लोक अर्थासह दिले आहेत. मनुष्यानें ससारांत सदा सावध असावें असें त्यांचें सार सांगितलें आहे. नंतर पुरुषाच्या शतमान आयुष्यांतील निरनिराळ्या टप्प्यांचे वर्णन देऊन, आणि तुकाराम व कबीर ह्यांचे ग्रथांतील वेंचे देऊन 'होई सावधान। नरतनु दुर्लभ लाधली दैवें ॥ हा उपदेश केला आहे. त्या नंतर नरदेहाचें महत्त्व भागवतातील व तुकराम, ज्ञानदेव ह्यांच्या ग्रंथातील उताऱ्यांनीं व कालीदासाविषयींच्या दंतकथेनें सिद्ध केलें आहे. नंतर कलियुगांत नवविधा भक्तिच श्रेष्ठ हें मत प्रतिपादिलें आहे. आणि पुढें भक्ति, योग व ज्ञान ह्या तिन्ही मार्गांत चित्ताच्या एकाग्रतेचें महत्त्व व तें प्राप्त करून घेण्याचें साधन ह्याचें विवेचन ग्रंथकारानें केले आहे. मधून मधून:–

जो या मानव लोकीं मानितसे कनक कामिनी वमन
तो सत्पुरुष म्हणावा धन्य तयाचे पदीं असो नमन ॥

किंवा:– शाल्यन्नं सघृतं पयोदधियुतं भुंजंति ये मानवा ॥
स्तेषामिंद्रियनिग्रहो यदिभवेद् विंध्यस्तरेत् सागरे ॥

अथवा:–या मनाचें एक निकें। जे देखलीया गोडीच्याठायीं सोकें ॥
यास्तव अनुभव सिद्धीचीं कौतुकें ॥ दावीत जावीं ॥

असे सुंदर उतारे दिलेले असल्यामुळें ग्रंथास बहुश्रुतता आली आहे. पुढें आनंदरामायण व अध्यात्मरामायण ह्यांतील विस्तृत उतारे अर्था-

मद्द देऊन कवीनें आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे व "कालेवर्षतु पर्जन्यः पृथिवी शस्यशालिनी" इत्यादि भरतवाक्यानें पुस्तक संपविले आहे.

ह्या पुस्तकात स्वतंत्र रचना नसून अध्यात्मज्ञान व नामसंकीर्तन ह्यांचें महत्त्व पटवून देणारे, अधिकृत ग्रंथांतील, निरनिराळे उतारे संकलित केले आहेत. ह. भ. प. पागारकरबुवाच्या भक्तिमार्गप्रदीपाप्रमाणें परमार्थ-साधकास हे नित्य स्मरणीसारखें उपयोगी पडेल, व त्याच हेतूनें लेखकानें ने प्रकाशित केलें असल्यामुळें त्याचा हेतु सफल झाला आहे असें म्हणण्यास हरकत वाटत नाहीं. वाङ्मयनिर्मिति हा त्याचा हेतुच नसल्यामुळें त्या दृष्टीनें त्याकडे पाहाणे योग्य होणार नाहीं. वरींचर्शी पद्ये ह्यांत संकलित केलीं असल्यामुळें ह्यास पद्य प्रधान स्थान दिलें आहे, एवढेंच.

---

# प्रकरण ११ वें.

## कवि कोरेकल. (स. १८८५)

काव्यकौस्तुभ, कविसम्राट्, वृत्तसम्राट्, सकलकलाकोविद् यशवतरावजी कोरेकल.

सत्यं सन्ति गृहे गृहेऽपि कवयो येषां वचश्चातुरी ।
स्वे हर्म्ये कुलकन्यकेव लभते स्वल्पैर्गुणैर्गौरवम् ॥
दुष्प्रापः सतु कोऽपि कोविदमतिर्यद्वाग्रसग्राहिणी ।
पण्यस्त्रीव कलाकलापकुशला चेतांसि हर्तुक्षमा ॥ १ ॥

यशवतरावजींचा जन्म हैद्राबाद येथे स. १८८५ मध्यें झाला. एक वर्षाच्या आत ह्यांचीं मातापितरें निवर्तलीं व हे तेव्हापासून एकनाथ व अनाथ झाले. त्यांचे पालन पोषण त्याच्या चुलत भावानें केलें. ते हैद्राबाद येथें रु. ४०० पगारावर अ. अकौन्टट जनरलच्या हुद्द्यावर होते. त्या काळमानाप्रमाणें उर्दू, फारशी, व इंग्रजी या भाषांचें थोडेसें शिक्षण त्याचे वयाच्या १२।१३ वर्षांपर्यंत झालें. नंतर त्यानीं कचेरींत उमेदवारी सुरू केली. लहानपणापासून त्यास ललित कलांचा नाद असल्यामुळे त्यानीं. गायन, वादन, कातरकाम, सूक्ष्मलेखन, वगैरे ललित कलांत प्रावीण्य मिळविलें. आत्मविश्वास, करारीपणा, व चिकाटी ह्या गुणांमुळे त्याना कोणतीही विद्या किंवा कला सहज हस्तगत करून घेता येते. ह्यांच्या कातर कामाचा नमुना औन्ध संस्थानाधिपतींनीं आपल्या दिवाणखान्यात ठेविला आहे. त्यांस कातरकाम व सूक्ष्मलेखन ह्याबद्दल सुवर्णपदकें मिळालीं आहेत. लहानपणींच ह्यांच्या उज्वल प्रतिभेचें तेज उर्दू भाषेंत चमकू लागलें व त्यांची गणना उर्दू कवींत होऊं लागली. हें पाहून भाऊसाहेब केसकर यांनीं त्यांस आपल्या मातृभाषेची सेवा करण्याचा उपदेश केला. तो त्यास पटला. व त्यांनीं लगेच मोरोपंतादि जुन्या कवींच्या व मोग्रे, टिळक, केशवसुत वगैरे नव्या कवींच्या काव्यांचा लक्षपूर्वक अभ्यास सुरू करून मराठी भाषेंतही काव्य करण्यास सुरवात केली. ह्या गोष्टींचा उल्लेख खालील-प्रमाणें त्यानीं आपल्या ‘ स्फुरद्देवते ’ ह्या कवितेंत केला आहे:—

तर्पे उगिच दोन कीं दवडिलीं असें वाटलें ।
प्रसून परकीय जें तव पदीं वलें वाहिलें ॥
जरी कवन मालिका तशि न लावली फारशी
परतु उरद्रूतुनीं म्हणती हीन जी फारशी ॥ ७ ॥
अशी धरिलि लालसा लिहिन एक दीवान[1] मी ।
जरी तपयुगीं श्रमे तरि न काहीं मानीन मी ॥ ८ ॥
असोत बहु कटके[2] नच कधींहि त्या मी नमी ॥
तदाधिगत जाहलो सवयिनें तसा मीन मी ॥ ८ ॥
कधींहि नच फारशी, अरबिही न अभ्यासिली ।
न संस्कृतहि त्यापरी कधिंहि शास्त्ररीती मुळीं ॥
तरी स्फुरणदेवते ! करिशि सव्यसाची मला ।
सदोद्यतहि दो करें नमन हे असो गे तुला ॥ १८ ॥

यांचें इग्रजी शिक्षण ' मिडल ' पर्यंत झालें आहे. हे येथील फायनान्स आफिसमध्यें रु. ८० वर अ. सुपरिटेंडंट आहेत. हार्मोनियम ( पेटी ) वाजवण्यात त्यानीं इतके प्रावीण्य मिळविलें आहे कीं इ. स. १९१९ सालीं मुंबईतील गांधर्व महाविद्यालयाच्या वार्षिक उत्सव प्रसगीं त्याचा कार्यक्रम ठेविला होता. त्यावेळीं त्याच्या वादनकौशल्याची स्तुति सांजवर्तमान व ज्ञानप्रकाश इ. वृत्तपत्रांतून फार झाली व प्रि. वि. दि. पलुस्कर ह्यांनीं त्यांना एका प्रशस्तिपत्रासह रौप्य प्याला अर्पण केला.

त्यांस एकीकडे ललितकलाचा इतका नाद आहे तरी दुसरीकडे वेदांता-सारख्या रूक्ष विषयांतही त्यानीं अवगाहन केलें आहे व ह्याचे प्रत्यंतर त्याच्या ' तत्त्वज्ञानमंदिरांतील ' लेखमालेवरून पटण्यासारखें आहे. हे ज्ञान त्यानीं रात्रंदिवस अभ्यास करून संपादन केलें आहे. त्याचा परिणाम त्यांच्या आचरणावर व कवितावरही ठळकपणें झालेला दिसतो. आठ आठ दिवस अन्न ग्रहण न करितां ते २४ तास अविश्रांत श्रम करूं शकतात. म्हणून ' Infinite capacity to take pains is genius' ही लोकोत्तर बुद्धिमत्तेची व्याख्या त्यास एकाप्रकारें लागू पडते. त्यांची वृत्ति उदासीन

१ पर्शियन वर्णाक्षर प्रासांतून क्रमानें लिहिलेल्या कवितांचा संग्रह.
२ कंटक शब्द उभयलिंगी आहे. पु. न.

व प्रसिद्धिपराङ्मुख असल्याळें ते १६ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनापर्यंत ( स. १९३१ ) येथील समाजास अपरिचितच राहिले होते. इ. स. १९२४ त ते बद्रीनारायणाची यात्रा करून आल्यापासून दर रोज प्रवचन व भजन ह्यांत रात्रीं दोन तास घालवीत असतात. ह्यास एक मुलगा व मुलगी अशी दोन अपत्यें झालीं. पण मुलगा आपल्या वयाच्या १८ व्या वर्षींच वारला. पुढें स. १९२५ मध्यें त्याच्या वयाच्या ४० व्या वर्षी त्यांची पत्नी ही निवर्तली. अशीं दुःखे त्यांजवर कोसळलीं तरी ते नेहमीं समाधान वृत्तीनें असतात. उघडच आहे:—॥ धैर्याची स्थिति बाणली, हृदिं जया, शांती वसे त्या स्थळीं ॥ ह्याचे जीवन अत्यंत पवित्र व आदरणीय आहे. सदाचार, शालीनता, सौजन्य, मार्दव व माधुर्य ह्या गुणांचा परिपाक आपणांस त्यांत पहावयास सापडतो. लहान मोठा कोणीही त्यांच्याकडे जावो, त्याचें ते आदरपूर्वक स्वागत करतात. हे उर्दू, हिंदी, व मराठी या भाषात भाषणें करतात. पुणें व नाशीक येथील वसंतव्याख्यान मालांतून त्यांचीं व्याख्यानें झालेलीं आहेत. वर उल्लेखिलेल्या सर्व पदव्यावरून त्याची सर्वांगीण श्रेष्ठता सहज घ्यानांत येण्यासारखी आहे.

मागें सांगितलेंच आहे कीं प्रथम हे उर्दू व पर्शियन भाषात काव्य करूं लागले. त्यांत त्यानीं 'दीवान' हा कष्टसाध्य काव्यप्रकार यशस्वी रीतीनें करून दाखविला. त्याच्या उर्दू काव्याचा एक संग्रह प्रसिद्ध झाला असून त्यास हिज एक्सलेन्सी महाराजा सर किसन प्रसाद बहादुर सदर आजम ( स. १९३३ ), बाबे हुकूमत सरकारे-आली, ह्याच्या प्रस्तावनेचा अपूर्व सन्मान मिळाला आहे. आणि त्यांनीं तींत काव्य कौस्तुभाविषयीं प्रशंसोद्गार काढले आहेत.

कोरेकल ह्याचा निरनिराळ्या भाषांतील विपुल व विविध कवितासंग्रह पाहून कोणीही आश्चर्यानें थक्क होऊन जाईल. ह्याच्या ग्रंथाचें पुढें टिपण दिलें आहे:—

| | कविता. | ओळी. | पृष्ठें. |
|---|---|---|---|
| १ काव्य कुसुम कलिका प्रथमोद्भव | ७५ | ३३७६ | २२३ |
| २ " " द्वितीय उद्भव पुष्पपाकळ्या. | २३६ | ६७३८ | ४३३ |

कोरेकल-राजहंस वर्ष २ रें. अंक ६.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | ” ” तृतीयोद्भव सुमनसौरभ. | ३०० | ६४०७ | ४०० |
| ४ | ” ” चतुर्थ ” छापण्यास तयार | २४ | ३८१ | ३०० |
| ५ | इतर अमुद्रित कविता. | ७४ | १०८३ | ५० |
| ६ | विरोधवैचित्र्य नाटकातील पद्यें | ३२ | | १५० |
| ७ | विचार वैभव ( गद्यगुच्छ वेदांतपर ) | | | १७५ |
| ८ | कौस्तुभकिरण ( लघुकथा निबंध ) हिंदी पद्यगुच्छ | | | १५५ |
| ९ | हिंदी गद्य ( वेदांतपर ज्ञानमार्तंड ) ग्रंथ अमुद्रित. | | | ८०० |
| १० | हिंदी कविता. | १० | ३०४ | |
| ११ | उर्दू ( दीवान ) कलामे नुमरत. | १२३ | ४९२ | १६० |
| १२ | उर्दू (संगीत नाटक अंक ३) मकसदेहयात ऊर्फ इप्तियाके-ताअलीम | ११९ | | २०० |
| १३ | करिश्मैइष्क–नाटक अमुद्रित | २८ | | १२५ |
| १४ | मराठी--उर्दू–कोश अमु. | | | २५० |

एकूण कविता ११२५ ओळी १९४०३ व पृष्ठे ३१२१

## काव्य कुसुमकलिका प्रथमोद्भव

जुने संत कवि अथवा आधुनिक कवि सतगणू यांच्याशिवाय इतका अफाट ग्रंथविस्तार कोणत्याही कवीचा दिसणार नाहीं. ईश्वरी देणगी शिवाय अशा गोष्टी साध्य होत नाहींत. सगुणचरित्रलीलाचें वर्णन व परब्रह्म-निरूपण ह्या परपरागत विषयाकडेच यशवंतरावजींचा विशेष ओढा दिसतो. हें ‘ स्फुरद्देवते ’ मधील पुढील ओळींवरूनही स्पष्ट दिसण्यासारखे आहे:— प्रभुस्तवन ही कधीं, स्वमनभावसूक्तावली। निसर्गमय वर्णनें तरिहि तीं तुला अर्पिलीं ॥ १२ ॥ अनेक विषयातुनी सकल चाळिली ही मही। सुतत्त्व-मधुसार तें म्हणुनि काहिं अध्यात्मही ॥ जसें मजशि प्रेरिलें लिहित मी, न गर्वाकुल। असें सकल काव्य हें तुझिच्च दिव्यता उज्ज्वल। तव स्फुरण तें अहा ! लव न हालतां डोलतां। कसें कवन निर्मितें त्वरित चालता बोलता!॥ स्वयें सतत जागवी हळु हळू मला टोंचुनी। अशक्त वच, होति त्या गुद-गुदल्या अशा आतुनी !॥ कधीं स्फुरणशक्ति ती मजशि सांगते कीं पहा।

'कशी मधुर कल्पना'! सरसशब्द कैसे अहा! ॥ असाच जरि राखिशीं बसुनि वृत्तिसातत्य कीं। कितीक कवनोत्पलां वर्षशि रम्य काव्योदकीं ॥१५॥

त्याचप्रमाणें भावना–कल्पना, व विचार–विकार, ह्यांचा सुंदर आविष्कार करणाऱ्या आधुनिक कवितेवरही त्यांचें प्रेम दिसून येतें. म्हणून त्यांचे काव्यात नव्या जुन्याचें एका विशिष्ट प्रकारचें मिश्रण झालेले आढळतें. प्रो. चापेकरांनीं प्रस्तावनेंत 'प्रतिभाप्रेरित व प्रज्ञाप्रेरित असे काव्याचे दोन प्रकार कल्पून प्रस्तुत संग्रहास जे दुसऱ्या प्रकारात स्थान दिलें आहे त्याबद्दल कोणाचें दुमत होण्याचा संभव दिसत नाहीं. ह्यात ७५ कविता असून त्याचें वर्गीकरण पुढील ४ विभागात करण्यास हरकत नाहीं. (१) तत्त्व-नीति-प्रतिपादक ३५ (२) निसर्ग–कवि–काव्य इ. २० (३) ईश्वरपर १२ (४) प्रासंगिक ८. ह्यात तत्त्व–नीति–प्रतिपादक कवितांचाच भरणा फार आहे असें दिसतें. कारण त्या सुमारें ३५ म्हणजे जवळ जवळ निम्मे आहेत. ह्यावरूनच त्यांची मुख्य भूमिका जुन्या संत कवींसारखी अध्यात्मपर आहे असें म्हणावेसें वाटतें. ह्यातील प्रतिपादन जरी उपनिषदें व पुराणें इत्यादि जुन्या ग्रथाच्या आधारेंच केलेलें असलें तरी त्याची पद्धति थोडेशी नवीन असल्यामुळें तें तितकें रूक्ष किंवा कंटाळवाणें वाटत नाहीं. (८) स्वानुभूतित्व अमृत स्वातंद्रष्टा कवि चाखवतो; (१६) हें जग अशाश्वत आहे, तुझें आयुष्य क्षणभंगुर आहे तर अशी श्रेयस्कर कृति कर कीं जिच्यायोगें तुझे नाव मागे अजरामर राहील. जनहितास्तवच तुझा जन्म आहे. आणि तें जर [illegible]ले नाहीं तर तुला धिक्कार असो. असा 'मनुजा' स उपदेश केला आहे. (२३) 'विषयवासनेंत' करी विषयवासना अपकृती न वैरी तशी' ह्या पालुपदानें तिच्यामुळे होणारे अनर्थ वर्णून अहेतुक घडलेले सुकृतभोग बंधनकारक होत नाहींत असें सांगितलें आहे. (२५) 'ध्येयानुसंधानामध्यें' घोडा व स्वार ह्याच्या उदाहरणानें 'ध्येयास जो का सदा लक्षितो सत्य संपूर्ण तो कार्य संपादितो' हें तत्त्व सांगितलें आहे. यांत 'सोडी न ती अश्वधाटी कधीं, जी चिकाटी धरी निश्चयें साधितो' अश्वधाटीवृत्ताचे सहजरीत्या नावही गोविलें आहे. (२७) उत्क्रांतिः—

पूर्णाधिकत्वास्तव जन्म येतो। उत्क्रांतिनें मानव पूर्ण होतो।
मृत्यू सदा उन्नतमार्ग दावी। अपूर्ण तें पूर्ण करीत राही ॥ २ ॥

निष्कामकर्मे पुरुषार्थ लाधे। पूर्णत्वही सत्वर त्यास साधे।
कर्तव्यपूर्तिस्तव जन्म येई। उत्क्रांतिनें मानव पूर्ण होई ॥ ३ ॥

वगैरे उत्क्रांतितत्त्वें अभिनव पद्धतीनें सांगितलीं आहेत. ( २८ ) मुमुक्षु बाळाचा पाळणा:—मायिक जगदाधाराला श्रुति माउलीच्या बाळाला, गाइलेला वेदान्तपर पाळणा: —बागुलबोवा तो दृश्याचा। गेला मेला लुच्चा। बाळा रडू नको, हा त्याच्या ॥ माझा बाळ गुणाचा ॥ ९ ॥ पाठीं भूत वसे भित्र्यांच्या। गोष्टी त्या मुर्खांच्या। आहे तूंच बरें सर्वांचा। द्रष्टा एकचि साचा ॥ १० ॥ मझ्या बाळाला दृष्ट कुणीं। लावियली मेल्यानीं। छकुल्या! उगी उगी का रडशीं। दुःखचि नाहीं तुजशीं ॥११॥ दृश्य मीठ करी घेऊनियां। ब्रह्मांडाच्या मोहऱ्या। बाळा दृष्ट तुझी काढाया। टाकिन ओवाळुनियां ॥ १२ ॥ बाळा जो जो रे० ॥ अशा रीतीनें अत्यंत मधुर झाला आहे. यात अगदीं सोप्या शब्दांनीं तर्ककर्कश विषयात कोमल बालभावनाचा केलेला सन्निवेश, गूढतत्वनिवेदनात भाषेची प्रसन्नता, आणि सहज सुंदर वक्रोक्तींत सुबोधता व औचित्य, ह्या परस्परविरुद्ध गोष्टींचें मीलन इतकें अद्भुतरम्य व सुंदर झाले आहे कीं 'बाळाची' दृष्ट काढण्याऐवजीं कवीचीच दृष्ट काढावीशी वाटते. अथवा हें स्थल तो म्हणतो त्याप्रमाणें 'गमे तरिहि लागते, अहह, दृष्ट माझी मला ॥ १७ स्फु. दे. ॥ त्याची दृष्ट त्याला लागण्याचें आहे. निदान रसिकाची तरी त्याला खास दृष्ट लागेल असें वाटते! ( ४३ ) 'चार चादण्या रात्रीं' साधीच गोष्ट. पण ती अपूर्वतेनें सांगून मनुष्यास सावध करून विचार करावयास लावण्याची कवीची विलक्षण हातोटी ह्यात दिसून येते. कवि म्हणतो माझा जन्म-व्रतबंध-विवाह व पुत्रलाभ ह्या चार गोष्टी ज्या दिवशीं घडल्या त्या माझ्या चार चादण्या रात्री होत. पण त्या तर निघून गेल्या, तोंच। जाण्याचेही दिवस जवळी येत गेले असे ते। आणि कांहीं सार्थक न झाल्यामुळ:— ॥ छाती फाटे बघुनी आपुल्या शोचनीय स्थितीतें! ॥ ( ४८ ) 'कोठील मी कोण मी!' ह्यात तत्त्वमस्यादि वाक्यार्थें विवरण करून मी सच्चित्-सुखानंद आहे असें उत्तर दिलें आहे. ( ६७ ) "मानव महति" मधील पुढील आर्या मोठ्या सुबोध व अर्थपूर्ण झाल्या आहेत पहा:—

नरका नारायण ही होण्याचा योग मानवांना कीं ।
आहे परंतु जाती कर्मानें यमपुरींत वा नाकीं ॥ ९ ॥
मानस सरोवराचा मानव हा राजहंस कीं आहे ॥
नित्यानित्य अशा या नीरक्षीरास निवडतो पाहे ॥ ३६ ॥
नरतनुच्या नौकेला सगुणोपासन सुकाणु लावावें ।
सज्जनसंगसमीरें सहज सुलभसे सुमार्ग साधावे ॥ ३९ ॥

( ६८ ) ‘ माया ऊर्फ कल्पनाराणी ’ विषय जुनाच, पण पद्धति नवीन स्वीकारल्यास, त्यास नाविन्य कसें येतें ह्याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे.

देहगडी कीं फिरतो जिकडे फिरवील कल्पना राणी ।
जैसे सैरा वैरा प्राणी पश्वादि फिरती कीं रानीं ॥ ५ ॥
सौभाग्यवती जैशी आहे तैशीच अष्टपुत्राही ।
त्रिगुणें पंचहि भूतें प्रसवुनि मनुजा करीतसे त्राही ॥ ६ ॥
ही अक्षय्य सुवासिनि वरिले इनें अखंड जीवातें ।
जरि तो आत्मज्ञानें मृत तरि त्याच्यासवें सती जाते ॥ ७ ॥
“ देहोऽहं ” ही बाधा बसवि उरावरि शिरीं स्वयें राहे ।
जी बारसें सुखाचें दुःखाच्या बारव्यासही पाहे ॥ ८ ॥

( ६९ ) मायेची मगरमिठी:— ही हटयोगानें किंवा शारीरिक तपानें सुटत नसून बौद्धिक तपानेंच सुटते असें ह्यात कवीनें सांगितलें आहे.

( ७० ) जीवन्मुक्तानंद लहरीत–मूळ संस्कृत श्लोक देऊन त्याचें सुरस मराठी समश्लोकी भाषांतर केलें आहे. गुरुसेवेनें गुरुकृपा झाली कीं मनुष्य जीवन्मुक्त होतो. मग ॥अशा जीवन्मुक्ता दिसत जग आनंदलहरी ॥१७॥

ह्या दिग्दर्शनावरून अध्यात्मविषयांची मांडणी हा कवि कशा आकर्षक रीतीनें करतो ह्याची ओळख पटण्यासारखी आहे. ह्यावरून ह्या सर्वच कविता अशा चांगल्या झाल्या आहेत असें आमचें म्हणणें नाहीं. (२९) तत्त्व पंचक (३०) निश्चयपंचक, ( ३९ ) भ्रमसभ्रम, (४१) व्यर्थ जगत् नाशिवंत व (५२) सेवाप्रभुत्व ह्या अगदीं नीरस व गद्यवजा झाल्या आहेत.

दुसरा भाग निसर्गपर. ह्यातही कवीच्या अंगीं मुरलेला वेदान्त बऱ्याच स्थळीं डोकावतो. नव्हे निर्भेळ निसर्गवर्णन करणें त्यास अशक्यच झालेलें दिसतें. ( ३ ) ‘ रंगवल्लिका ’ ह्या कवितेंत कोणत्याही आधुनिक कवीस

शोभतील अशा मनोज्ञ कल्पना उपःकाल व नंतरचा सूर्योदय ह्यांवर केलेल्या आढळतात. निसर्ग देवी रांगोळी काढायला लागते तों तिचें रंग-पात्रच उधळलें, व मग । कुणी म्हणो " हा रवि उदयोन्मुख अरुणराज आला " । कोणा गमले रंगावलिका । काढित महिलाला ॥८॥ अशा शंका प्रेक्षकास आल्या. (१२) कीं वेडे सगळे मिळोनि जगतीं बाजार हा मांडिती:– ह्यांत निसर्गाच्या, कोमल, मधुर, सौम्य, गंभीर, रुद्र व भयानक वगैरे सर्व स्वरूपाचें यथोचित वर्णन करून कवीनें कवितेचा शेवट तात्त्विक विवेचनांत केला असल्यामुळें पहिल्या वर्णनाची गोडी अगदीं फिकी पडली आहे. ( १४ ) ' कवींचें जग ' ह्यांत कवींचें कार्य व निसर्गवर्णन ह्याचें मिश्रण केलेलें आहे. कवींचें जग अनुपम आहे खरे, पण जो जागृति सुषुप्ति सोडून तैजस विश्वात जागत वसतो त्याचें. असें शेवटीं सांगितलें आहे. ( १५ ) पुढील " निसर्ग देवाचा भूपाळी " मधील सृष्टिवर्णन बरें आहे. ( ३६ ) सृष्टीच्या विविध स्वरूपाच्या निरीक्षणानें हृदयांत प्रसंगोचित निरनिराळ्या भावना कशा जागृत होतात, व त्यायोगें कवीची दृष्टि सौंदर्य-समीक्षणाकडे कशी वळते हें मोठ्या काव्यमय भाषेंत सांगितलें आहे. पण कथेकऱ्याच्या पाल्पदाप्रमाणें ॥ स्थिरचर व्यापुनि दशांगुलीं जो उरला हें वदलों ॥ हे बोल विरसता आणितात. ( ३७ ) षट्पदगायन मधुर झालें असून शेवटली कविता मोठी भावार्थपूर्ण झाली आहे:–पक्ष-विहिन कविभृंगहि गातो । पक्षपात नच अलिचा करितो । रसिक सुमनिं वसतो सांठवितो हृदयस्पर्शा–शब्दाच्या परागराशी ॥१५॥ ( ४४ ) सुपर्णा जाशि कसा विसरून ?॥ ' द्वासुपर्णा ' ॥ ह्या श्रुतीस अनुलक्षून सुख-दुःखांचा उपभोक्ता जीव हा शरीररूपी पिंजऱ्यात कितीही जपून ठेवला तरी पर्वा न करितां तो उडून जातो हें वर्णिलें आहे. येथें । जपनचि गेला । पिंजऱ्यातुनि पोपट नेला ॥ ह्या प्रसिद्ध पदाची आठवण होते. ( ४८ ) " वस्तुस्थिति संशोधन ":– ह्यात ही तारकांच्या माणिकाचें, दवाच्या मौक्तिकाचें, सृष्टिवर्णन सुंदर आहे. कवि म्हणतो:–दिव्य असें सौंदर्य बघावें । सुरम्य विश्वाचें । रम्य कल्पना रम्य धारणा । देणें देवाचें ॥ २१ ॥ हेंहि खरेंच आहे. ( ७३ ) ' नववत्सगाचें ' वर्णन मोठें थाटाचें झालें आहे. पण शेवटीं कवींचें तत्वज्ञान आहेच:—

अंतरीं स्वसुखःशांति न अंतरीं। ना तरी सुख मिळेल वनांतरीं।
नाचवी मन जिथें सुख ना चवी। दाखवी मुख कुठेंहि सदा कवी॥ ११६

तरी पण येथील शब्दरचना कर्णमधुर व चमत्कृतिजनक झाली आहे. (७४) स्वागतः—ह्यांतही पुनः नववत्सराचेंच स्वागत आहे. पण त्यांत गुलाबी उषा, हिरवा शालू नेसणारी मेदिनी, मधुर ताना मारणारी कोकिला, गुंजारव करणारा भ्रमर, शैल, अद्रि, गिरि, वज्र, सौध, हर्म्य, गृहें, माधवी, मधुलता, कृष्णसार, रुरूयूथ, वगैरेंचें निसर्गवर्णन मोठें बहारदार झालें असून, स्वागतावृत्तानें स्वागताची मोहनी अधिकच वाढली आहे.

एकंदरींत कवीचें निसर्गावरील प्रेम उत्कट असून त्याच्या कोमल व उदात्तरूपाचीं वर्णनें त्यानें मोठ्या तन्मयतेनें केलीं आहेत. अर्थात् तत्त्व-संशोधन ही त्याची प्रकृतिच असल्यामुळें मधून मधून येणाऱ्या त्याच्या लहरी-कडे वाचकाचेंही तिकडे लक्ष जात नाहीसे होऊन त्यास निसर्गसौन्दर्याचा आनंद लुटण्यास अडचण पडूं नये असें वाटतें. ह्याशिवाय (६) निसर्ग मधु ह्यांतील उषावर्णनांत कवीची कविता उसळून आली आहे. (१३) चंपक-माला वृत्तांतील चंपकमाला; (१८) " झोप गे लाडके रजनी " असा ध्वनि जींत येत आहे अशी ' रजनीची रात्र '. (१९) ' उषानिशा ' मधील उषा-निशेची झोंबाझोंबी, निशेची तुटून पडलेलीं भूषणें, व उषेनें केलेला त्यांचा अपहार वगैरे वर्णन फार हृदयंगम झालें आहे. ह्या कविताही ह्याच भागांत येतात.

ह्याच भागांत कवीनें कांहीं कवितांत आपल्याविषयीं, कवींविषयीं, व काव्याविषयीं कांहीं विचार प्रगट केले आहेत. ' स्फुरद्देवता ' ही एक आशांपैकीं असून, कवीनें तींत आपल्या शिक्षणाचा व काव्यस्फूर्तीचा उल्लेख केला आहे. ही पृथ्वीवृत्तांत असून हिजवर मोरोपंती ठसा पूर्णपणें पडलेला दिसतो. मोरोपंताची शरणागति, असाह्यता व एकनिष्ठा वगैरे कोमल भावनांचें प्रतिबिंब तींत स्पष्टपणें प्रतीत होत असल्यामुळें हिला मोरोपंताच्या स्तोत्रकलापाचें भक्तिमाधुर्य आलें आहे. परंतु शब्दशुद्धि, भाषाशुद्धि व व्याकरणशुद्धि ह्यांकडे कवीचें लक्ष स्वभावतःच नसल्यामुळें त्याची कविता-सुता देवींच्या वर्णानीयुक्त अशा सुंदर स्त्रीप्रमाणें, कांतियुक्त पण विरूप अशी

झाली आहे. यशवर्धिनी; तदाभिगमन; शिरांदोलिका; हृदिवासिनी; ममममनाभिध संवर्धिनी; मदीयअघहारिणी; यशोकरिणी; यशवर्णनीं; यांत शक्य तेवढे समासदोष घडले आहेत. स्वधुंनी बरोबर इवकें बसविलें आहे. कंटक शब्द प्रायः पुल्लिगांत उपयोजितात. नपुसकलिंगी तो असला तरी तसा उपयोग फार कमी आढळतो. १४ वींत 'अशक्तवच' होति त्या गुददल्या कशा आंतुनी ! " अशक्तवच गुदगुल्या म्हणजे काय ? अंतर्मानाचें आनंददायी अस्फुट स्पंदन असें कांहीं तरी कवीस म्हणावयाचें होतें, असें वाटतें. "दों करें" यांत वचनदोष उघड दिसत आहे. ह्या दोषांची कारणमीमांसा करण्यास फार लांब जावयास नको. ह्या कवितेंतच त्यांचें बीज आहे. साक्षात् सरस्वती देवीच आपणांस प्रसन्न होऊन तीच आपल्या मुखानें बोलत आहे. अहर्निश तिचे ध्यानात निमग्न असलें म्हणजे झालें. जें जें स्फुरण होईल तें तें काव्यच. मग 'नको तुजशिं वाचणें कधिहि पाणिनीयावली । परी बघ दिसेल ती कशिहि काव्यरत्नावली ।। १६ ।। अशी त्याची प्रामाणिक समजूत आहे. म्हणूनच कवि म्हणतो :—गमे, तरिहि लागते, अहह दृष्ट माझी मला ।। १७ । मदीय कवितेसही बघुनि मीच कीं हर्षतों । अवर्ण्य सुख भोगतों हंसित वृत्तिनें डोलतों ।। २१ ।। आणि यदाकदाचित मानवी शास्त्रानुसार कांहीं दोष तींत राहून गेले असले तरी त्यांकडे दिव्यप्रयोग, किंवा आर्षप्रयोग म्हणून गुणदृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. पहा कवि म्हणतो । सरस्वतिच कीं स्वयें कविमिषें जणू बोलते । कसेंहि तरि वाटतें मधुर बोबडे बोल ते ।। २८ ।। कशीहि मग ती असो—सरस, हीन—काव्यकृती । चमत्कृति तुझीच ना ? स्फुरणदेवते ! सर्व ती ।। तरीच म्हणती 'अती महति कीं कवीची जनीं । तयास बुध आदरें बघति वागवीती मनीं.' ।।२९।। आणि पुढचे कवि । म्हणोत " कविता " कुणीं अमृतदायि संजिवनी ।।३२।। हें एक मुख्य कारण. आणि दुसरें असें कीं कवीनें सांगितल्याप्रमाणें त्याचे जवळ 'सर्वस्य लोचनं शास्त्रम्' शास्त्रलोचन नसल्यामुळें दोषांची जाणीवच त्यास होत नसावी. तिसरें कारण असें कीं साधुसंताची प्रासादिक कविता अशीच असते, अशी दृढसमजूत, आणि स्तुतिपाठकांचे स्तुतिपाठ हें चवथें होय. नाहीतर ज्यानें इतक्या भाषा व कला शरीराची कोरडी करून संपादिल्या, त्याला म्हणजे व्याकरणसाहित्यादि शास्त्रांचे चारदोन नियम दुर्गम

होते असें नाहीं. पण हें कसेंही असलें तरी त्याची निरागस, वैराग्यपर, व परमार्थपरायण वृत्ति पाहून कोणीही रसिक त्याजवर रुष्ट होईल असें आम्हास वाटत नाही. तरी पण त्याची कविता। धूमेनाव्रियते वन्हिर्यथादर्शो मलेनच ॥ गी. ३.३८॥ अशी लौकिकदृष्टीला दिसते, एवढें वाचकानीं ध्यानात ठेवावें म्हणजे बस्स आहे.

( ३८ ) कवींची बैठक; (५९।६० ) एकादशीला शिवरात्र भेटे; (७१) नांवाची नवलाई व (७२) नावाचे नामधारक; ह्या कविता मोठ्या विनोदी व मजेदार झाल्या आहेत आणि अशा विरक्त पुरुषाजवळही हास्यविनोदास स्थान मिळालेलें पाहून मानंद आश्चर्य वाटतें. पहिली सोडून बाकीच्या चुटके-वजा व हास्यरसोत्पादकही झाल्या आहेत. पहिली कविता विनोदपूर्ण आहे, पण जरा लांब झाली आहे एवढेच. शार्दूलविक्रीडितांतल्या ५६ श्लोकाचे तें एक स्वतंत्र लघु काव्यच झालें आहे; व सर्वत्र पसरलेल्या उपहासयुक्त विनोदाची मजा पहाण्यास तें सर्वच वाचले पाहिजे. कवींची एकदां बैठक झाली. अर्थात् तेथें सर्वच कवि होते. उत्तम काव्य कोणतें व उत्तम कवि कोणास म्हणावें ह्याबद्दल तेथें चर्चा सुरू झाली. तेव्हा जो तो आपलीच कविता वाचून दाखवू लागला व तीच उत्तम असें म्हणू लागला. पण सामान्यतः लोकात जसे सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकारचे लोक आढळतात तसे कवींतही असतात, असें सागून कवीनें प्रत्येकाचीं लक्षणें मोठ्या मार्मिकतेनें वर्णिलीं आहेत. सात्विककवि म्हणजे संत कवि होत. राजस, स्वप्रतिष्ठा व रसिकानद हीं दोन्ही साधतो. त्या दोघाना एकीकडे सारून तामस कवि पुढें सरसावले व हास्यरसास ऐकवू लागले:—

कोणी एक कवी सदैव कविता वाची करी वा लिही ।
राही हा निज–कल्पनावरिं, जणू याची वही, ता मही ॥
पद्यावाचुनि एक अक्षर दुजा बोल न देई पहा ।
काव्यें सृष्टि जणू स्वतंत्र वसवी तेथील कीं भूप हा ॥ २४ ॥

अशा कवीस । सर्व काव्यमयं जगज्जननि वा ही काव्य देवी मही ॥२६॥ त्याचें बोलणें, चालणें, काम करणें, काम सागणें, सर्व कवितामय. एवंढच नव्हे तर । वृत्तांतूनच पूर्ण वृत्त अपुलें पत्रोत्तरीं पाठवी ॥ व । झाल्या भेट समक्ष भाव मनिंचा गावोनिया दाखवी ॥ २७ ॥इतकी त्याची मजल गेली

होती. त्याचप्रमाणें त्याचें रागलोभप्रदर्शन पिलूदुर्गादि रागदारींत होत असे. पुढें आठाठ दिवस हा एक एक वृत्ताचें व्रत घेऊं लागला. त्यामुळें स्वप्नांतही त्याची ॥ स्वप्नामाजी पहा कधीं बडबडे " चंद्राम तारा वहा। माना वा समरा जनाम समरा ताराप ताराप हा " ॥ अशीच बडबड चाले. एकदां एका आप्तानें अशा कवीस विचारिलें:—

' काहो वृत्त अलीकडे न अपुलें काहींच आम्हां कळे,
चिंता लागलि फार ऐकुनि आम्हां रोग तुम्ही पीडित '
त्यानें उत्तर हा लगेच कळवी " शार्दूल विक्रीडित ॥ ३६ ॥ "

त्याला एकानें एकदां गद्यात प्रश्न विचारला त्यावर तो म्हणाला आहो मात्रावृत्तात ह्रस्वदीर्घांची वाटेल तशी ओढताण चालत असतां ' ऐसी सोय असोनि का कवि खुळ गद्यानुनी बोलती ? ॥ ३७ ॥ नतर चर्चेत कविराजांची लक्षणें पुढीलप्रमाणें ठरलीं:—

जाणावा कविराज तोच गद्य कविंही वाची न जो लेखि तो ॥
मानावा कवि तोच तुच्छ इतरा काव्यास जो लेखितो ॥
माना वाकवितो प्रसन्न हृदये काव्यास ऐकोनियां ॥
कोठें का जगि मूढ याहुनि दुजा आहे जगिं कोण या ? ॥ ५३ ॥

ह्यातच कवीचा मान आहे. ह्यानेंच त्यास श्रेष्ठत्व येतें. एखादी गोड रम्य कविता कोणाची आढळलीच तर भुवयाना आठया घालून ती मनांत वाचावी व नाईलाज तर एकाती जाऊन हळूच हासावें.

" एव जी सहजींच मौज कविच्या त्या बैठकीं जाहली " व जशी ऐकिली तशी सुज्ञ वाचकास सादर केली आहे. आता पुढें चर्चेचा निकाल होऊन कोणाच्या गळयात माळ पडेल हें त्यांनीं संधि साधून पहाण्यास जावें, असें म्हणून कर्त्यानें हें कविब्रुवोपाख्यान सारविलें आहे.

' एकादशीला शिवरात्र भेटे ' ह्याविषयावर एक सप्तक व दुसरें अष्टक इंद्रवज्रेंत केलें आहे. पहिल्यातला विनोद जरा अधिक सरस वाटतो. पुढें एक श्लोक नमुन्याकरितां दिला आहे.

भिक्षेस भिक्षेकरि कीं निघाला। माधूकरीच्या सदनास गेला।
तेथें असा भोजनबेत थाटे। एकादशीला शिवरात्र भेटे ॥ ५ ॥

( ७१ ) नांवाची नवलाई व (७२) नांवाचे नामधारक यांतील विषय व विनोद एकच प्रकारचे आहेत. त्यांत फक्त लिंग भेदाचाच काय तो प्रकार आहे. नाव सांगे सुंदराबाई । डोळा एकच नाकहि नाहीं ॥ १ ॥ नांव सांगे अन्नपूर्णा । एक शित ही ना दे कोणा ॥ २ ॥ ७२ ॥ नाव आहे सुंदरपंत । कुबडा तिरळा वक्रंदत ॥ १ ॥ नाव ऐका राजा कर्ण । कवडी देतां येतें मरण ॥ ७२ ६ ॥ इ. यातील शब्दनिष्ठ विनोद अगदीं सामान्य आहे.

तिसऱ्या भागात ईश्वरपर कविता येतात. ( १ ) अनाद; ( २ ) तुझ्या सम कवी कधीं जन्मती, ( ५ ) एकचि तूं विश्रात; ( २१ ) वेणुस्वन; वगैरे कवितांचा ह्यांत समावेश करितां येईल. ह्यात विशेष असें काहीं सांगण्यासारखे नसल्यामुळें त्याचा केवळ नामनिर्देश केला आहे. भक्ति-प्रवण वाचकांनीं त्या अवश्य वाचाव्या. त्यास आनंद खात्रीनें लाभेल.

आतां काहीं प्रासंगिक कविता कवीनें केल्या आहेत, त्यांकडे वळूं. ह्यात विजयादशमी, देवघेव, संक्रात, प्रेमाचे बोल, संपादक, रेगारे, वगैरे पद्यांचा समावेश करिता येईल. विजयादशमीच्या निमित्तानें प्रयत्न, परोपकार इत्यादि गुण संपादन करण्याचा उपदेश करून कवि म्हणतोः—

गेहां सोडुनि देहा श्रमवा हो वर्तमान कालात ।
सीमोल्लंघन तेव्हां होतें भूतातनी भविष्यात ॥ ६२ ॥ २० ॥
कालकसोटीवर कीं कर्माची रेख कसुनि काढावी ।
त्याहुनि उज्वल होण्या पुनरपि गाळोनि झीज सोसावी ॥ २१ ॥

संक्रांतीचा तिळगूळ विरह नाहींसा करून प्रेम स्थापन करतो. तो समाजांत ऐक्यवर्धन करतोः—

प्रेमानें स्नेहानें हृदयातें गोड बोलुनी हलवा ।
प्रेमोद्भव होण्या ह्या परोपरीनें परस्परां हलवा ॥ १० ॥
तिळगुळकाव्यमिषें या सांगाया ऐक्यमहति सर्वांना ।
प्रेमी प्रेमे प्रार्थुनि यशवर्ते शब्दतिल रसज्ञांना ॥ ६६ ॥ १९ ॥

( ५४ ) रेगारेमधें गाण्याच्या समस्वराची मौज करून दाखविली आहे. ( ५३ ) ज्यास बुद्धिक्षय नाहीं असें संपादन करील तोच खरा संपादक म्हणावा, असें संपादकाचें लक्षण दिलें आहे. ( ६५ ) प्रेमाच्या

बोलांतील सिद्धांत कोणासहि पटतील असेच आहेतः–प्रेमाच्या साम्राज्यीं प्रेमाची प्रार्थना कधीं नसते ॥ विनती इच्छा आज्ञा तीहींची एकरूपता असते ॥ १ ॥ बोलावें हृदयानें, प्रेमाला भाषणें न कामाची ॥५॥ वाचस्पति जरि झाला प्रेमाचे बोल बोलता लाजे ॥

ह्या प्रथमोद्भवात सुमारें दहा वर्षें हळू हळू रचलेल्या कवितांचा संग्रह केलेला आहे. ह्यापैकीं काहीं कविता मनोरंजन, चित्रमयजगत्, अरुण, अरुणोदयमाला, माणिकप्रभु मासिक व रामकृष्ण निकेतन मासिक वगैरे नियतकालिकांतून पूर्वीच प्रसिद्ध झालेल्या आहेत.

ह्या संग्रहाचा प्रथम दर्शनींच जो एक मोठा विशेष नजरेंत भरतो तो त्याचा प्रचंड विस्तार हा होय. एक संत कवि दासगणु, सोडून दिल्यास इतकी विपुल रचना इकडील कोणत्याहीएका कवीची नाहीं. एवढेंच नव्हे तर, बागशाही, जानकीकाव्य, प्रेमांजली, पहांट तारा, फटत्कार वगैरे काव्यें एकत्र केलीं तरी त्याची एकत्र पद्यसंख्या ह्याच्या बरोबर होईल किंवा नाहीं याची शंका वाटते. म्हणूनच ह्या चिमुकल्या चोंपड्याकडून ह्या प्रचंड पुस्तकाकडे येणें म्हणजे ओहाळ, ओढे, व नद्या याजकडून भागीरथीसारख्या पयसा महाशयाकडे येण्यासारखे वाटतें. किंवा कुंड्यातील फुलझाडें, लहानशा अंगणांतील लहानशी बाग, नदीतीरावरील उपवन, किंवा सार्वजनिक उद्यान, ह्यामधून विस्तीर्ण वनात गेल्यासारखे वाटतें. तेथील विशाल तरु व विटप, दीर्घ वेली व लता आणि घन स्तंब व गुल्म, पाहून जसें सानंदाश्चर्य वाटते, तसेंच ह्याच्या काव्यविस्ताराकडे पाहिलें असतां वाटतें. दुसरें साम्य असें कीं गंगौघात कितीही अशुद्ध पदार्थ मिळाले तरी तो स्वतः अशुद्ध न होता जसें त्यासच शुचित्व देतो, तसें काहीं अशीं ह्याच्या काव्यातील अशुद्धतेबद्दलही म्हणता येईल. किंवा वनामध्यें जरी बरेंवाईट भाग असले तरी वनश्रीस ज्याप्रमाणे एक प्रकारची उदात्तरम्य व अकृत्रिम अशी शोभा येते तशीच त्यांच्या काव्याचीही गोष्ट आहे असें म्हणता येईल. तरी पण एकंदरींत त्यानीं कवीच्या निरंकुशत्वाचा हक्क अमर्याद गाजविला आहे, असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं.

त्याच्या निसर्गपर कवितापैकीं कांहीं उत्कृष्ट झाल्या असून त्याच्या खालोखाल कांहीं नीतिविषयक व त्यानंतर कांहीं प्रासंगिक असा त्यांचा अनुक्रम

लावण्यास हरकत नाहीं. विषयांच्या दृष्टीनें जरी त्यांत काहीं नाविन्य आढळलें नाहीं तरी जुनेच विषय अभिनव कल्पनांनीं नटवण्याची त्याची हातोटी मोठी वर्णनीय आहे. कोणचाही विषय त्याम द्या, त्यांवरील त्यांची विचारप्रणाली नेहमीं तयार! पुनः त्या विचारप्रणालींत असा काहीं विलक्षण लवचिकपणा आहे कीं, ती तंतुवायाच्या ततूंसारखी वाटेल तितकी पसरते. कधीं कधीं ती कवीसच इतकी अनावर होते कीं तिचें गुणस्वरूप जाऊन ती दोषास्पद होते. उ. कवींची बैठक (५६); व्यर्थ जगत् नाशिवंत (७५); तीस (३३); मानव महति (४०); ओढा पुन्हा कोरडा (२९). अर्थात् ह्या अनावर कल्पनांस मूर्त स्वरूप देण्यास शब्दसंपत्ति अफाट पाहिजे. आणि ती तर याजपाशीं रामाच्या भात्यामारखी किंवा कुबेराच्या नवनिधींसारखी नेहमीं अक्षय्य आहे. ह्या साधनसामुग्रीमुळें त्याची कल्पनाशक्ति अत्यंत शीघ्रप्रसव व बहुप्रसवही झाली आहे. परंतु ह्या दोन शक्तींचें सामर्थ्य प्रगट करण्याची कवीस भूल पडल्यामुळे, आपल्या साधनसपत्तीतून योग्यायोग्य कल्पनाची, शब्दांची व पदाची समयोचित निवड करण्याचें त्याचें भानच हरपल्यासारखें दिसतें. त्यामुळें बऱ्याच ठिकाणीं क्लिष्टता व दुर्बोधता हे दोष घुसलेले आढळतात, तर प्रदीर्घतेच्या हव्यासानें काहीं कविता कटाळवाण्या व बोजडही झालेल्या दिसतात.

ह्या ७५ कवितांत कवीनें एकूण ३७ वृत्तें व जाति ह्यांचा उपयोग केला आहे. शार्दूलविक्रीडित, शिखरणी, पृथ्वी व आर्या ह्यावर कवीचें प्रेम विशेष दिसतें. त्याच्या खालोखाल 'चद्रकात राजाची कन्या' त्यांस आवडते. ह्यांना मात्रागण वृत्तापेक्षा अक्षरगण वृत्तांत अधिक सौकर्य वाटतें. अलीकडील कवींना अक्षरगण वृत्तांचा कंटाळा वाटतो. तसा ह्यांस वाटत नाहीं. सामान्यत: जरी याची वृत्तरचना सफाईदार व निर्दोष आढळते, तरी ती वृत्तदोषापासून अगदीं अलिप्त आहे असें नाहीं. 'व्यर्थ जगत् नाशिवंत' ही कविता चंद्रकात चालींत चालत आहे. पण तीतील (७५ पदक्षेपांत) ती एकंदर ६२ वेळां अडखळून यतिभग करते. उ.—

(१) व्यर्थचि तें ला। वण्य सुरम्यहि विनयहीन स्त्रीचें ॥ ४१.१४ ॥ व्यर्थ नेत्र ते पाणिदार हरि। णाक्षी जरी गमते ॥ ४१.२३ ॥ व्यर्थ कोट पॅट। लून बूट मग व्यर्थ सर्व नटणें ॥ ४१.३४ ॥

( २ ) अंबुदोद्भव असे होउनी बिंदुनो ॥ ८.५ ॥ येथें वृत्त स्रग्विणी आहे. म्हणून ४ र गण म्हणजे "मध्यलघु" पाहिजेत. परंतु येथें दुसरा "न गण" झाला आहे. रगण नाहीं.

( ३ ) ४६.८।९ मध्यें गुरु टाळण्यासाठीं-अपटुनी, अठवुनी; आ बद्दल अ.

( ४ ) ६१.१२ मानेला नेक्टॉय कॉलर तसे शूबूटही घ्या नवा ॥ नेक्टाय येथें सगणा ऐवजीं "तगण" झाला आहे.

असो. ह्यावरील ३७ वृत्तांत पादाकुलक, मधुमाधवी, चंपकमाला, प्रियंवदा, मध्यक्षामा, अश्वधाटी, व यूथिका ह्यासारख्या मराठीस अगदीं अपरिचित अशा सहासात वृत्तांची भर कवीनें घालून आपल्या वृत्तसम्राट् ह्या पदवीची यथार्थता दर्शविली आहे. ह्या भागातील कांहीं चांगल्या कवितांचे एक दोन उतारे पुढें दिले आहेत:—

( ७ ) होणार तें होऊ दे. ( वृ. शा. वि. )

का या खंति मदेव मानिशि मना ! का दैन्यवाणा जगीं ? ।
प्राक्सिद्धा भवितव्यता न गणता सन्त्रस्त होशी उगी ॥
गेले, जाइल, त्यांत दुःख कसलें ? जाणार तें जाऊ दे ।
तू राहोनि उगा सदा बघत जा होणार तें होउ दे ॥ ३ ॥
केव्हाही नभ निर्विकार जरि ते अर्कोदयास्ता बघे ।
लाली पाहुनी हास्य कीं जरि कुणा भासे तरी तें उगें ॥
तैसें आगमनादि दृश्य सगळे कीं येउ दे जाउ दे ।
तू राहोनि उगा सदा बघत जा होणार तें होउ दे ॥१०॥

( ३३ ) स्थानभ्रष्ट पुष्पास. चतुर्दशिका

एकाएकि मदीय दृष्टि चकली दिव्यागना पाहिली
कीं वाटे क्षणएक जी विलसुनी गेलीपरी त्या स्थलीं
अंधाड्यांतील मोगरा गवसला जो भूषवी वीथिका ।
त्यातें मी झणिं तेथुनी उचलिलें, वाटे विचारूंच कां ? ॥ १ ॥
'मोठा मोहक मोगरा म्हणविशी माने न माझें मन,
तोऱ्यानें म्हणशी 'मला कितीतरी हे गौरविती जन ।'

काहीं तथ्य असेल त्यांत जरी तें खोटें असो वा खरें ॥
ऐशा त्या मग गौरवा त्यजुनियां घेशी उडी कां बरें ? ॥ २ ॥
झोकें घेत, मुदें यथेच्छ डुलतां तूझी मदोन्मत्तता ।
दृष्टोत्पत्तिस आलि कीं दुखवितां लत्ताप्रहारें लता ॥
लावण्याधिक ही सुहास्य लतिका भाग्यें जरी लाभली ॥
ती ही घालविलीस रे अरसिका ? मूर्खा ? सुमंधी भली ' ॥ ३ ॥
येतो प्रश्न अशा फुला बघुनियां तेथें पुनः येथुनि ।
स्थानापन्न करू शकेल कधि कां वृक्षच्युतातें कुणी ?

———+———

## काव्यकुसुम-कलिका-द्वितीयोद्भव-पुष्पपाकळ्या

छंद हे चरण वेदनराचे । स्तंभ जेधिं लघु थोर घराचे ॥
त्याविणें सदन सिद्ध न होतें । काव्य याविण तसेंच अहो तें ॥ छ. मं.

यशवंतरावजींच्या काव्यकुसुमाचा हा दुसरा बहर आहे. कोरेकलाच्या काव्यकलिकांची आतां कोरकावस्था जाऊन त्याचे काव्यप्रसून ' प्रफुल्ल होवोनि सुपुष्प ठेलें ' ह्या उक्तीप्रमाणें पुष्पपाकळ्यांच्या रूपानें आपल्या पुढें आले आहे. मागल्याप्रमाणेंच हीं सुमनें त्यांनीं श्रीसद्गुरु माणिक प्रभु यांचें चरणीं समर्पिलीं आहेत. व तेथून तीं उचलून त्याचें प्रकाशनही मागल्याप्रमाणेंच तेथील कार्यवाह श्री. शंकरराव दीक्षीत ह्यांनीं स. १९३४ त केलें आहे. कलिकाचे आघ्राण करून त्याच्या गोडीचें गुंजन प्रकट करण्याच्या कार्यार्थ जर सुवर्णचपकप्रणेते प्रो. चापेकर याच्यासारखे परिणत-मकरंदमार्मिक मिलिंद मिळाले होते, तर प्रस्तुत पुष्पपाकळ्यास उपोद्घात लिहिण्याचें कार्य करण्यास विद्वद्वर्य वे. शा. सं. रंगाचार्य रड्डी ( वांईकर ) लाभले आहेत. ' प्रसादबहुला मधुरभाषामयी मनोहारिणी गभीराशयान्तः सरसा सालंकारा वनितेव भवतां कविता नो नयनपदवीमलमुद्द्योतयामास । इ. असा काशीपंडितसभा सभापति महामहोपाध्याय श्रीमुकुंदजी यांचा अभिप्राय यांस मिळाला आहे. वेदशास्त्रसुधाकर आचार्यभक्त पंडित विष्णु-शास्त्री बापट यानीं यशवंतरावजींच्या अद्भुत काव्यरचनाशक्ति, प्रेमल-भाव वगैरे गुणांबद्दल मुक्तकंठानें स्तुति केली आहे. वेदांतवागीश सदाशिव

केशव श्रोत्रीय, सोलापूर, भावोपहार व भक्तिविहार ह्याचे कर्ते, ह्यांनीं 'रमवित मज काव्यकल्पना' असें म्हणून प्रसन्नतया 'काव्यकौस्तुभ' ही पदवी यशवंतरावास अर्पण केली आहे. श्रीमत् मयूरपंत कुलोद्भव भय्याशास्त्रीपत पराडकर पंढरपुराहून प्रशस्ति पाठवितात कीं:—गुरुपदरस मधु लाभे अजर यशा काव्यकुसुमकलिका ही। मधुपहि करील पाहुनि विकसित हें काव्यकुसुम कलि काहीं ॥ ह्याशिवाय अनेक बी. ए. एल. एल. बी., मोठमोठे अधिकारी यांचीं मानपत्रें पाहून भागानगरींतील कोणत्याही कवीस आजपर्यंत न मिळालेला बहुमान यशवतरावजींस मिळाला, ह्याबद्दल कोणालाही सकौतुक अभिमान वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. ह्या गुणप्रशसेचा इतका सविस्तर उल्लेख करण्याचा हेतु एवढाच कीं रा. कोरकेल यांची मान्यता किती आहे हें वाचकांस पूर्णपणें कळावें. आणि आम्हास प्रसगोपात्त जरी कोठें दोषदर्शन करावें लागले तरी तें केवळ प्रवाहपतित कर्तव्य होय असें जाणून त्यानीं आम्हास क्षमा करावी. शिवाय "छिन्नं किं वस्तदाश्यात् प्रथितगुणवता काव्यकोटीश्वराणाम्" ही कव्युक्तिही सर्वांस विदित आहेच. असो.

प्रस्तुन ग्रथ पहिल्याच्या दुप्पट आहे. ह्या ग्रंथास 'वाचना पूर्वी म्हणून कवीनें मुख्यतः छद:शास्त्रावर एक मोठा निबंध लिहिला आहे. त्यावरून ह्या शास्त्राचा किती सखोल अभ्यास त्यानें केला आहे हें व्यक्त होत आहे. व्याकरणशास्त्र, छंद:शास्त्र व साहित्यशास्त्र ह्याचे अध्ययन कवीनें अवश्य केलें पाहिजे. वृत्त हें प्रतिभेस रोधन करणारें नसून तें तिचा प्राण आहे. निर्वृत्त (मुक्तछंद) कविता करतांच यावयाची नाहीं. प्रस्तार कोशांतून तिला एखादें शास्त्रीय नांव सहज देता येईल. प्रतिभा मंदिराचें जोतें म्हणजे वृत्त होय, वगैरे विचार कवीनें वाचकापुढें मांडले आहेत. त्याच प्रमाणें छंद व वृत्त ह्यातील भेद, त्यांचा प्रस्तार, रसानुकूल व रसप्रतिकूल वृत्तें, रसमैत्री व रसविरोध, ह्याची माहितीही त्यानें दिली आहे. ती उपयुक्त असून जिज्ञासूनें अवश्य वाचावी.

उपोद्घातांत रंगाचार्यांनीं प्रतिपाद्य विषयाचें ऐतिह्य, संप्रदाय, त्या विषयाची उत्क्रांति, राजवाडे व प्रो. पटवर्धन ह्यांच्या कांहीं विधानाची चर्चा वगैरे गोष्टी आपल्या नेहमींच्या तर्कशुद्ध व विद्वत्ताप्रचुर अशा पद्धतीनें

केल्या आहेत. छंदःशास्त्रावर इतक्या विस्तृतपणें व अधिकारयुक्त वाणीनें लिहिलेला दुसरा निबंध मराठींत आढळत नाहीं. तेव्हां कारेकराच्या काव्या-बरोबर मराठी वाङ्मयास मिळालेलें हें अनुपगी फल खचित बहुमोलाचें आहे.

प्रस्तुत ग्रंथात २३६ कवितांचा संग्रह कवीनें केला असून त्यांत २३६ च वृत्तें आणिलीं आहेत. ह्यापैकीं ५० वृत्तें अशीं आहेत कीं त्यांचीं लक्षणें सारखींच असून तीं केवळ नामानें मात्र भिन्न आहेत. तीं वजा केलीं तर खरी वृत्तसंख्या १८६ च होईल. ह्याचे संस्कृत व प्राकृत असे दोन मुख्य भाग केले आहेत. संस्कृतात अक्षरगणवृत्तें व मात्रावृत्तें असे दोन विभाग करून पहिल्यात, सम, अर्धसम व विषम असे तीन प्रकार सांगितले आहेत. मात्रावृत्तात आर्या, आर्यागीति, उद्गीति, उपगीति, उपचित्रा औपच्छांदसिक, गाथा, पज्झटिका, पादाकुलक व वैतालीय असे भेद दिले आहेत. आणि प्राकृतवृत्तात—अभंग, ओवी, दिंडी, साकी व घनाक्षरी असे प्रकार सांगितले आहेत.

समवृत्तांत १९२; अर्धसमांत १९; विषमांत ४; मात्रावृत्तात १२ आणि मराठीवृत्तात ९ अशी २३६ कवितांची वाटणी केलेली आहे. वृत्तांची संख्या व कवितांची संख्या सारखी ठेवण्याकरिता कवीनें २३६ च कविता रचल्या आहेत. ह्यांत केवळ नामभेदानें निराळ्या असलेल्या वृत्तावर कविता केलेल्या नसल्यामुळें २३६ संख्या भरून काढण्याकरिता कित्येकावर पुढील प्रमाणें अधिक कविता कराव्या लागल्या आहेत. उ. स्त्री २, नारी २; सुकन्या २; सोमराजी २, समानिका २; मणिबंध ३, इंद्रवज्रा ३, माला ३, भ्रमरविलसित २, शालिनी २, मंदाकिनी २; वैश्वदेवी ३, कलहंस २, रुचिरा ३, वसंततिलका ३, चामर २, पंचचामर २, अतिशायिनी २, पृथ्वी ५, मंदाक्रांता ५, शिखरिणी ५, नाराच २, शा. वि. ७, धृतश्री २, अमृत-ध्वनि २, सवाई २, उपजाति २, माल्यभारा २, हरिणीप्लुता३, गीति २, लहान अभंग २.

कवीनें हा दीर्घ खटाटोप कां केला ह्याचें प्रयोजन आपणांस प्रकाशकानें सांगितलें आहे. त्याचा सारांश असा:—'अशा शास्त्रीय पुस्तकाचा उद्देश संस्कृतांत उपलब्ध असलेल्या समग्र वृत्तांचें मराठीकरण करून शास्त्रीय कार्यांत भर घालावी असा आहे. अशा तऱ्हेचे प्रयत्न पूर्वी मोरो-

पंत व रामजोशी ह्यानीं केले होते. परंतु ते अपूर्णच राहिले. ही अपूर्ण कृति पूर्णतेस नेऊन मराठी भाषेचें वैभव वाढवावें अशा विचारानें ह्या बिकट कामाचा पत्कर यशवंतरावजींनी हौसेनें घेतला व " निभ्रांतत्वें कृति करित जो नित्य सातत्य ठेवी " ह्या आपल्या म्हणण्याप्रमाणें सातत्य ठेवून तें काम पुरें केलें आहे.' अर्थात् हें कठिण काम तडीस नेल्यावर कवीचे मनात जे हर्षोद्गार निघाले त्याचा प्रतिध्वनि चित्रा (पृ. ५६); भद्रिका (पृ. ५९); विश्वचयता (पृ. ६३); प्रहर्षिणी (११४) व भद्रक (पृ. २११) इत्यादि कवितांत उमटलेला दिसतो:—

शक्त करोनि पूर्ण यश आधिं तत्पदरिं बांधितो, करवितो
कार्य तयाकडोनि, मग कौतुकें बघत आपणा रमवितो.
ब्रीद असेंच चालवि जगत्त्रयीं—सतत भक्तकार्य करणें।
बोलवुनी स्वभक्तवच बोबडे तरि सुधेसमान गणणें ॥ २ ॥

(६३) त्वद्वात्सल्यें माझ्या वृत्ताची पूर्ती। बव्हंशी झाली या दीनाहातीं।
हें पाहोनी विश्वाच्या तोंडी जाती। चोटें त्याचीं आश्चर्यें ओष्ठप्रांतीं ७

हा ग्रंथ वर सांगितल्याप्रमाणें शास्त्रीय असल्यामुळें त्यात सर्वत्र काव्य सौन्दर्याची अपेक्षा करणें युक्त होणार नाहीं. यद्यपि कवीनें आपल्या हृद्गतांत (पा. २७) असें म्हटले आहे कीं ' वृत्ताच्या योगानें प्रतिभा त्रुटित, बद्ध किंवा विकारी होत नाहीं, प्रतिभा स्वतंत्र आहे, ती ज्या संवेदनेनें प्रस्फुरित होईल त्या संवेदनाची लक्षणा वृत्तानें परिबद्ध झाल्यानें तिची शोभा अधिकाधिक वृद्धिंगत होते. इ.' तरी ज्या ठिकाणीं असें झालें असेल, तेथें दुधांत साखर पडल्या सारखा वाचकास आनंद होईलच. पण कांहीं वृत्ते अशीं आहेत कीं त्यात प्रतिभेच्या स्वैर संचारास अवकाशच मिळूं शकत नाहीं. अशा स्थळीं काव्यप्रसव अशक्य झाल्यामुळें त्यास गद्य स्वरूप आलें असल्यास तो कवीचा दोष नाही हेंही वाचकांनीं विसरतां कामा नये. तसें नसतें तर आजवर अशा वृत्ताचा उपयोग पूर्वकवींनीं खात्रीनें केला असता. कविवर्य मोरोपंतांनी चार यमकी आर्यागीति वृत्ताचा त्याग केल्यावरच त्यांचा ' शुचि प्रतिभा झरा ' बृहद्दशकांत वाहू लागला. एवढेंच नव्हे तर त्यांनीं ही वृत्ताची अडचण पुढीलप्रमाणें कबूलही केली आहे:— " भीष्मकृत—श्रीकांतस्तुतिच्या रीतीस वृत्त जरि तेंच। अवलंबावें तरि तें अडचण कांहीं

तरीहि करितेंच ॥ " कवीचें मुख्य लक्ष वृत्त निर्मितीकडेच आहे व तसें त्यानें स्पष्टपणें म्हटलेंही आहे. [ हृद्गत. पा. ७३ ). त्याचप्रमाणें त्यानें विषयांचें नामकरणही वृत्तद्योतकच केलें आहे. उ. स्त्री, मृगी, सती, पंक्ती इ.

ह्या संग्रहांतील विषयाची निवडही कवीनें मोठ्या विशाल व व्यापक दृष्टीनें केली आहे. तात्त्विक, उपदेशपर व निसर्गपर वगैरे मागील विषयांत सामाजिक राजकीय विषयांचीही त्यानें भर घातलेली आहे. वृत्तांत ज्याप्रमाणें त्यानें एका अक्षरापासून सुरवात करून २६ अक्षरांचें उत्कृति व २७ अक्षरी दंडक आणि ३० अक्षरी अर्णदंड ह्यांपर्यंत मजल मारिली आहे, तसें विषयातही तो–हा पासून ती–ही पर्यंत; हृत्प्रसूनापासून आत्मघातक्यापर्यंत; प्रहर्षिणीपासून वियोगिनीपर्यंत; सारंगापासून सिंहनादापर्यंत; कविरोदनापासून प्रेमगानापर्यंत; गजगतीपासून शा. विक्रीडितापर्यंत; व गिरिराजतनयेपासून तों सागरापर्यंत त्यानें विपुल वैचित्र्य साधलें आहे.

ह्याच्या पुष्कळशा कवितातून भक्ति व अध्यात्म ह्याचा सूर वाहातांना आढळतो. कोणतीही कविता पाहिली तरी तींत कांहींना कांहीं तत्त्व प्रतिपादिलेलें आढळतें. ह्यावरून कवीची वृत्ति अंतर्मुख असून तत्त्वप्रतिपादनार्थच आपल्या काव्यशक्तीचा उपयोग करावा असा त्याचा ग्रह झालेला दिसतो. असो. आंता ह्या बृहत् संग्रहाचा सागोपाग विचार करणें अशक्य असल्यामुळें कांहीं उत्तम कांहीं मध्यम व कांहीं कनिष्ठ अशा कविताचा विचार करूं:—प्रथमच 'चारुहासिनी' ही ३१ वी कविता आपल्या चारु हासानें आपणास आकर्षित करते. तिच्यांतील ज्योत्स्नेवरील कल्पना खरोखर मोठ्या रम्य आहेत. नागपंचमीचे दिवशीं जणू माहेरवाशीण वरून नागाला दूधलाह्या घालीत आहे कीं काय? छे! पण ही अमृताची नदीच वर आहे. मात्र ती खालच्या (मतास) जीववीत आहे. कोणी हिला चारुहासिनी दिव्य चादणी म्हणतात. इ. (५०) विश्वाधारा! दिसशि नच कां? ह्या कवितेंतील पुढील कल्पनाः–तारा साऱ्या नभिं पसरल्या। तेजोधारा उधळुनि दिल्या। या कुंदाच्या किति तरि कळया कोणासाठीं झणिं उमलल्या? ॥ २ ॥ अतिशय सुंदर आहे. (५७) "कीर्ति" मधील सूचक उपरोध व (५९) "मनाचे मांडे" यामधील विषयविडंबन, हीं फारच चटकदार झालीं आहेत. कवि म्हणतो–कीर्तिरोग

लागत जंव पाठी । लावि सद्गुणांवरि मग काठी ॥ २ ॥ जो नित्य कृति करण्यास्तव मरतो त्यालाच ती माळ घालते. आपल्या भक्तास मात्र ती कुचंबत ठेवते. ही व्यथा अशी विक्षिप्त आहे कीं जीवंत असता जो दुर्गुणी म्हणून त्याज्य ठरतो तो मेल्यावर त्याच्या दुर्गुणावर पांघरूण घालून त्यालाच ती वरते. । गे धये असाच पडत पाया । दुकुही नको कधि गरिबा या ॥ राहू दे कृपा दुरुनि तुझी ती । गातसे तुझी म्हणुनिच कीर्ती ॥८॥ असें कवीनें कीर्तीला बजावल्यामुळेंच कीं काय तिनें चिडून 'राजहंसावर' (मासिक अ. १-७-१९३५ ) आरोहण केलें, आणि तेथून त्याजवर " स्तुतिसुमनांजलीचा " वर्षाव करून या निरागस व भीरु कवीचा अत्यत निर्दयतेनें चांगलाच सूड घेतला ! ! 'मनाचे माडयांत ' ज्ञानेश्वरींत "आचार्योपासन" या पदावर टीका करताना ज्ञानेश्वरानीं गुरुशिष्याच्या निस्सीम प्रेमाचें व सेव्यसेवक भावाचें परोपरीनें जें अत्यत रसाळ असें वर्णन केलें आहे, तसेंच आधुनिक युवयुवतींच्या प्रेमाचें करून त्याच्या वर्णयिकतेचें विडंबन केलें आहे. हे अतिशय बहारीचें उतरलें आहे. प्रेमवेड्याला सर्व जग नारीमय दिसू लागतें. तो मांग काढू लागतो; तिच्या घरीं काहीं सेवा करण्यास याचना करतो; व मनात म्हणतो:– ती गजगती जेथून चालत जाईल तेथें मी बिछाईत होईन; अहा ! तिचा मी हातरुमाल झालो तर तिच्या चंद्रमुखाला मी कुरवाळीन; तें न साधेल तर मी टेबल, खुर्ची, कपाट, बिछाना सोफा काय वाटेल ते होण्यास तयार होईन; मग तिनें खुर्ची ओढली कीं जे हस्तस्पर्शसुख मला मिळेल तें काय वानं ! बिछान्यावर ती पहुडली कीं काय माझें भाग्य सांगू ? तें पाहून प्रत्यक्ष देव माझा हेवा करतील ! बरं मी वाटरप्रूफ ओव्हर कोट झालों तर ? मग मी प्रियेच्या मृदु शरीराला झाकीन व मग ती आपल्या सखीकडे मला घेऊन जाईल. या ब्रह्मदेवा ! एक क्षणभर तरी हें भाग्य मला दे ! किंवा सखीच्या हातातलें आवडते पुस्तक मी होईन. तें नाहीं, तर तिची लोकरीची सुईच होण्यासही मी तयार आहे. कारण मग मी सगळयाच्या डोळयांत खुपेन. तिन्ही लोक माझा हेवा करितील ! पण देवा ! मला तिची ब्याट केलेस तर ? मी तिच्या पृष्ठ, कपोल व भुजा या भागाभोवतालीं नाचत राहीन व चेंडूला टोला मारून पिटाळून दिलें कीं

मग तिला काय आनंद होईल! मी आपल्या पंचप्राणकुसुमांची तिला माळा अर्पण करून जगाला तुच्छ मानीन. मग । चंचल कीं चपलासम चालीं । चालत त्या चरणाश्रित खालीं । चप्पलधूलि तिची जरि झाल्यां । 'स्वर्ग' म्हणें चवचाल तयाला ॥ २२ ॥ असे त्यानें मनिंचे मांडे मनांत चुरलेले पाहून कोणास हास्याच्या उकळ्या फुटणार नाहींत!

( ६५ ) 'ललित' ह्या कवितेंत चित्रकला, गायनकला व काव्यकला ह्या कशा परस्पर पोषक व एकच आहेत हें फार मार्मिक रीतीनें दाखविलेलें आहे. शेवटीं कवि म्हणतो:—सौख्य लाभतें अवचनीयसे । चित्रकार तो कविच होतसे । गायनासही विसरतो क्षणीं । ध्येयरूप कीं सहज होउनी ॥ १४ ॥ ( ६९ ) "ईण" मराठींत पुल्लिंगी शब्दावरून स्त्रीलिंगीरूपें "ईण" हा प्रत्यय लावून करतात. ह्या गोष्टीस अनुलक्षून कवि म्हणतो:- कांहीं आधुनिक स्त्रिया-सुशिक्षित असल्यास मास्तरीण, डाक्टरीण होतात. पण काहीं येत नसताही इतर स्त्रिया "ईण" प्रत्ययानें तशा बनतात. काहीं कुरूप असतात तर कांही जहाबाज असतात. एकदरींत सध्या चागली अर्धांगी मिळण्यास दैवच पाहिजे. पहा:-अर्धांगी जी सद्गुणीरूपयुक्ता । लाभे त्याच्या स्वर्ग येईल हाता । तिन्ही लोकीं एक तो देवशाली । दैवाभावीं त्याजला देव वाली !॥१४॥ हें पद्य सुंदर झालें आहे. (९६) स्रग्विणी वृत्तांतील "सागरातील कल्पनासौन्दर्य प्रशंसनीय आहे :—नाम लक्ष्मीपिता साजतें ही जरी । दिव्य रत्नें तशीं फेकिशीं अंबरीं । का उगी कल्पना-तारका या किती । फेंकलेंलींच रत्नें पहा उंच तीं ! ॥ २ ॥ ( १३६ ) सुहृत्पत्नीनिधन ही पृथ्वी वृत्तांतील कविता करुणरसानें वाचनीय झाली असून तीतील पुढील निसर्गवर्णनही मोठें चागलें झालें आहे :— दिशा उजळल्या जशा उमलल्याहि आशा तशा । नसे मुळिंच ठाउकें पिकत दक्षिणीं का हंशा ! ॥ प्रभात मधु जाहला नभहि वाढता उज्वल । परी रजनिनें तिथे सघन फासलें कज्जल ॥ ३ ॥ ( १४२ ) "जगुनि मिळतो'स्वर्ग वाटेल तेव्हां" ही मंदाक्रांता वृतातील कविता उदात्त विचार, व साधी पण अर्थपूर्ण शब्दयोजना, ह्यामुळें फार उत्कृष्ट झाली आहे:—

स्वर्गेच्छा ती कसलि ? न कळे काय ? आली कुठोनी ॥
जो तो सागे सहज वरतीं अंगुली दाखवोनी ॥

‘ पुण्यात्म्याला त्वरित मिळतो, मृत्यु येईल जेव्हां ’ ॥
आम्हीं सांगू—‘ जगुनि मिळतो स्वर्ग वाटेल तेव्हा ’ ॥१॥

( १४३ ) “ धन्य ती धन्य भक्ती ” हीं तशीच आहे. तिचा पुढीलप्रमाणें केलेला शेवट स्वदेशप्रेमाच्या उल्लेखानें फार हृदयंगम झाला आहे:—

देशापायीं सुखहि त्याजिती लोककार्यार्थ अंतीं ।
प्राणज्योति निज विझविती धन्य ती धन्य भक्ती ॥ ५ ॥

( १५७ ) “ विबुधप्रिया ” पण एक उत्तमांतील कविता आहे. तींत कवि पुढील आशिर्वाद मागत आहे–माझि ही कविता पहा! नवसौख्यदा विबुधप्रिया । तूर्त द्या मज आशि ती यशदायिनी करूनी दया ! ॥ ७ ॥ तो त्यास कोणीही वाचक आनदानें देईल. (१६०) “सर्वाधिक्य अशी गमे त्रिभुवनीं माझी मराठी मला” ही कविता कवीचा मातृभाषाभिमान दर्शविते. ( १८४ ) कविरसिकांविषयींची मदिरा किंवा सवाई वृत्तातील कविता मोठी मार्मिक आहे. ज्याच्या काव्यानें रसिक भान न राहून हर्षित होतात जो व्यर्थांतून ही अर्थ काढून दाखवितो, जो मही आपल्या अंगुलीवर नाचवितो, जो नित्य नव कल्पना गोवित जातो व रसिकास आपल्याबरोबर उंच भराऱ्या मारण्यास लावतो,जे रवि पाहूं शकत नाहीं,तें जो दाखवितो तोच खरा कवि होय.

पाणबुडा जणु तज्ज्ञ बुडे तंव लाभते अतुल रत्न तयांत ।
नातरि सतत खारट वारिच वालुकानिकर सेवित नित्य ॥ ४ ॥

( २२९, २३० व २३१ ) “ दीपावली,” “ भाऊबीज ” व “ सणें लोपलीं ” ह्या लहान अभंग प्रकारातील कविता त्यातील देशभक्तीमुळें फार परिणामकारक झाल्या आहेत.

दैन्य पावलो पावलीं । सुचे कैशी दीपावली ? ॥ शुद्ध देशी वस्तूवीण, नाच व्हावा घरीं सण ॥ २ ॥ नाहीं फटाकड्या देशी । तेव्हां दिवाळीही कैशी ? ॥ ३ ॥ गेले बंधू सत्याग्रही । आनदोनी कारागृहीं ॥ ४ ॥ बद्ध ते अंधारीं । दिवे लावावे का घरीं ? ॥५॥ बद्ध कारागारीं भ्राता ॥ भाऊबीज कैशी आतां ॥ १ ॥ उचंबळे शोक सिंधू ॥ जिचा नाहीं घरीं बंधू ॥ २ ॥ होय तीच ओंवाळणी । अश्रू येती जे लोचनीं ॥ ३ ॥ देशभक्ती चित्तीं जोडा । नाद दिवाळीचा सोडा । नाहीं भाऊबीज ॥ कशी व्हावी तेव्हा

तीज ॥ ५ ॥ सोडा दिवाळी दसरा । कार्यें करा देशाचीं ॥ १ ॥ आलें जेव्हा दैन्य जिणें । आतां सणें लोपलीं ॥२ ॥ फुले वेंचिलीं जयानीं । रान-शेणी कां वेंचा ॥ ३ ॥ ह्यांवरून कवि जरी सदा परमार्थवृत्तीपर भासतो तरी त्यास देशस्थितीची काहीशी जाणीव असून त्यानें आपल्या हृदयाची तळमळ अगदीं साध्या वृत्तात, साध्या शब्दात पण अत्यंत जोरदार रीतीनें व्यक्त केली आहे. ते खरे भाग्यशाली ह्यांतही असेच विचार आहेत.

ह्याशिवाय (११०) स्वातंत्र्य; (१११) साहित्यसेवक; (१४१) विरोध (देशप्रेमावर). (१४४) ते खरे भाग्यशाली (देशोद्धारक भाग्यशाली खरे). वगैरे आणखी पुष्कळ कविता चांगल्यांपैकीं आहेत. स्थलाभावास्तव केवळ त्याचा नामनिर्देशच करावा लागत आहे. (११६) नवशिशू ही प्रहरण कलिता वृत्तातील कविता कर्णमधुरशब्दयोजनेमुळे जणू नाचत व लचकत जात आहेत असें वाटतें. एकच पद्य:—लचकति लतिका फुलवति कलिका । करि जणु अधिका स्मितमितचि पथिका । अभिनव नव तें अभिनव गमते । जग सुखि दिसतें, त्रिभुवन हसते ॥ २ ॥

(११९) अश्रु कां अनावर; (१२८) भारता व (१२९) सुबुद्धि ह्यापैकी पहिल्या दोहोंत कवीनें अनुप्रासाची कमाल केली असून तिसरींत "क" पासून "ह" अक्षरापर्यंत चित्र काव्याचा एक सुदर नमुना दिला आहे. (११९) भानूअर्ध भाग भासवीत भव्य चामर । भूमि—भाल पूर्वभाग भूषवीत भास्वर । भारतास भाग्यदायि होइ काय भास्कर ॥ १ ॥ (१२९) कळे न कीं कधीं कुणी करी कठोर कृत्य कां ? । खच्यास दुःख खेद का ? खपे खराच सारखा ॥ गणे गुणी गरीब गौण गोष्ट गर्वितागडी। घरोघरीं घमंड हीच घाण ही घडोघडी ॥ १ ॥ इ.

मोरोपंतांनीं भारत भागवतांत काहीं मंत्र साधून जशी रचना केली आहे तिच्याप्रमाणें (२२३) 'श्री प्रभुमहामंत्र आर्या' या कवितेंत प्रस्तुत कवीनेंही केली आहे. "भक्तकार्यकल्पद्रुम गुरुसार्वभौम श्रीमद्राजाधि-राज योगी महाराज त्रिभुवनानंद अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित सद्गुरु माणिकप्रभूमहाराजकी जय" हा अत्यंत प्रदीर्घमंत्र ४५ गीतींच्या ९० चरणांत प्रारंभीं एक एक अक्षर

घालून साधला असल्यामुळें मोरोपंतावरही त्यानें ताण केली आहे. ह्यांतील पहिली व शेवटली गीति ह्या नमुन्यासाठीं पुढें दिल्या आहेतः—

श्री गुरुमाणिक जयगुरु माणिक वद भक्तांनें सदा रमने ! ॥
भक्त कार्यकल्पद्रुम तो प्रभु मनिं भजुनि अतरीं रस ने ॥ १ ॥
जयजयकार प्रभूच्या ब्रीदावलिचा करोनि हित कळवी ।
यशवंतनाम सेवुनि साक्षात्कारहि समोक्ष तो मिळवी ॥ ४५ ॥

ह्यावरून कवीच्या भाषा प्रभुत्वाची व बुद्धीच्या तरतरीतपणाची साक्ष पदोपदीं पटत आहे. ह्या भागातही कवीला स्वतः हास्य-विनोद करून वाचकांसही खिजविण्याची लहर आलेली दिसते. ( ५१ ) " मौक्तिकमालेंतील विनोद पाणी व मुक्त ह्यावरील शाब्दिक कोट्यांनीं साधलेला आहे. 'कीर्ति' व मनाचे मांडे ह्याचा उल्लेख वर आलाच आहे. ( ९९ ) 'कवि रोदनानें' ही विनोद करू शकतो हे पाहून कोणालाहि आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाही. तो प्रसंग असा. एकदा कवीची वृत्ति एकाएकीं विषण्ण झाली. ती कोठें व कशानेंही रमेना. मग कवि म्हणतो—रुदनात सौख्य जरि दाटत आहे। रमवूच त्या रडुनि हा! कळला हे॥ मग सर्व पक्ष्यांना तो विनंती करीतो कीं बाबानो आजचा दिवस तुम्ही अगदीं गाऊं नका. गप्प बसा. 'रडू द्या खुशाल जगिं एक अभागी' ह्याप्रमाणें तयारी करून शेवटीं कवि पुढीलप्रमाणें रडतोः—

कवि की असे रडतही तरि गातो । कवनातला पवन सौरभ नेतो ।
म्हणि देश तो दरवळोनिच सोडी । परि पाहिजे रसिक वाचक जोडी ।१२॥

पण अशा रसिक वाचकाची जोड अझून त्यास न मिळाल्यामुळें त्याचे रडवें गायन तसेंच थांबलेलें दिसतें. ( १६२ ) व्याख्यानातही बरीच मौज पहावयास मिळते. कारण श्रोत्यांच्या गर्दीत कोणकोणतीं माणसें काय काय हेतूनें जमतात हे त्यांत मोठ्या गंमतीनें सांगितलें आहे. एकदा कवि मंडईकडे व्याख्यानास चालला होता. तिकडेच घाईघाईनें जाणारा एक इसम त्याला भेटला. व्याख्यानाचा विषय 'गद्य व काव्य' होता. कवीनें म्हटलें कीं व्याख्यात्यानें ऐतिहासिक दृष्टि ठेविली तर बरें होईल, दुसरा त्याला म्हणाला—अहो मी सांगतों सर्व इतिहास. अहो तुमचे ते शिवाजी, संभाजी व बाजीराव कोण वाटेल ते घ्या. यात भाजी भाकरी

आहे. हें एकच मी जाणतो. आणि म्हणूनच:—पाला भाजी, मुळे फळफळावळ सदा ताजीच कीं आणितो। माझी भाकरी मीच आज मिळविला भाजीत आहे जसें ॥ सांगा! एक तरी असा कुणि दुजा जो स्वावलंबी असे ॥ ३ ॥ अहो राजा झाला तरी प्रजेच्या साऱ्यावर जगणारा. आम्हीच खरे लक्ष्मीपुत्र. सगळा देश द्रव्यार्जनानें आम्हीच रक्षितो. इकडे तरी का आलो म्हणाल तर:—कादे गाजर जाणुनी—बघुनि ही गर्दी अशी सारखी। आहे येथ लिलाव काय म्हणुनी तो साधण्या धावलो। हें ऐकून कवि म्हणतो:—

येण्याचीं जवं कारणें समजलीं—ॲरिस्क्रमसा जाहला ॥ ५ ॥ पुढें त्यास हायकोर्ट वकील, डॉक्टर वगैरे मंडळी भेटली. पण तीं सर्व आपापल्या धंद्यांतील सावजे हुडकण्यास आलेलीं पाहून कवि म्हणतो 'मटकन मी बसतां मुखें वच निघे "साऱ्या कवींनों पळा" इ.

(१९३) 'गुर्जर उष्मा' या कवितेत विनोदापेक्षा अत्युक्ति व उपरोध हीं अधिक दिसतात. देहामवें ह्या स्थलि चित्त भाजे। बधोनि उष्मा जणु अग्नि लाजे। जे रोमरोमातुनि येत पाणी। नळात ही ये न तसें दिसोनि। घामाविणें ओल न या ठिकाणीं। दिसेल दूर्वा तरि पीत वर्णी ॥ ४ ॥ बाधे न शिक्षा कशिही तयाला। बघेल जो येथिल धर्मशाळा। तो वज्रदेहीच म्हणा महात्मा। न राहिली त्याहूनि कष्टसीमा ॥ ५ ॥ (१६१) व्यवहारमग्न मनुष्यास काव्यरसाचें काय होय!

काव्या ऐकुनि एकदा मुरसिका रोमाञ्च कीं दाटले।
आतां ऐकविलें परंतु दिसले काटे तिथें थाटले ॥
काव्याचा रस काय होय असल्या तो दाट कीं पातळ?।
नाहीं येथ कवे! तुझी धडगती जा! तूं न काढीं पळ! ॥ ६ ॥

(५७) शालिनी (६७) ईण (६८) माझें अश्वारोहण वगैरे आणखी हास्यरसात्मक कविता म्हणून सांगता येतील.

शृंगाराविषयीं कवि म्हणतो:—(१४४) "ते खरे भाग्यशाली"

शृंगाराचें कवन रचण्या आज नाहींच काल
ती तेव्हांची संवय कविनों! काय सोडूनि द्याल!

पहा आतां पडलि आपुली मायभू संकटांत
त्यागोनीया विदुषि मृदुना तीस देतात हात ॥ १ ॥

ह्या त्याच्या विचारसरणीमुळें आधुनिक प्रेम-काव्य या संग्रहांत नाहीं. तरी पण प्रेम व स्त्री ह्याविषयीं त्यानें जे विचार प्रगट केले आहेत ते सर्व उदात्त व पवित्र प्रेमाचे द्योतक आहेत. त्याचप्रमाणें बाह्य सौन्दर्यापेक्षां अंत: सौन्दर्यासच त्यानें विशेष मान दिलेला आढळतो. ( ३८ ) हलमुखींत (नागर मुखींत) तो म्हणतो:——लाभली जर हलमुखी। राहि त्या वधुसह सुखी ।। ३ ।। रूप सुंदर चिर नसे। सद्‍गुणींच अमृत वसे ।। बाह्य हृदय मधु दिसते। तें कचित्‌ स्थलिं फसविते ।। २ ।। आणि खरें प्रेम सर्व न्यून तें पुरतें करतें—प्रेम निर्झर सुरभिसे। सर्व काहीं पुरवितसे ।। ५ ।। ह्याखेरीज त्यानें 'कन्या' व "सती" कशा असाव्या व कशा नसाव्या ह्याचें विवेचनही बरे केले आहे. 'ईश' व 'आत्मघातकी' ह्यातून सामाजिक विषयावर कवीनें टीका केलेली आढळते.

कवीच्या पुष्कळशा कवितात, भक्ति, ज्ञान, वैराग्य व अध्यात्म ह्यांवर जें विवेचन आढळते ते मागल्या संग्रहाप्रमाणेंच सर्वसामान्य असल्यामुळें त्याचा पुढें नुसता नामनिर्देश केला आहे. विश्वाधारा, हृत्प्रसून, नामछंद, भुकेला, व धन्य भक्ति ह्या कविता भक्तिपर आहेत. चित्तस्थैर्य, आनंद, शुद्धनिगाट, जननमरण ह्या अध्यात्मपर आहेत. आयुष्य, क्षण व भरंवसा, ह्या वैराग्यपर आहेत.

पुढील कविता वाचनीय असून मध्यम प्रतीच्या आहेत. ६ मृगी; १२ वसुमती; १४ शशिवदना; २४ काल कसें आज कसें; ३५ प्रबोधन; ही सख्या अजूनही पुष्कळ वाढवितां येईल.

पुढीलमारख्या काहीं कविता दुर्बोध, क्लिष्ट, व किंचित्‌ असंबद्ध अशा वाटतात. अर्थात्‌ हें मत सर्वांसच मान्य होईल असें नाहीं. कारण "भिन्नरुचिर्हि लोक:" हें तत्त्व सर्वांस विदित आहेच. त्यामुळें ह्यांत मतभेदास पुष्कळ वाव आहे असें प्रथम सागून मग त्यांचा नामनिर्देश करतों:—— ७ सुकन्या; ८ कुकन्या; ९ सती, ११८ शशिकला ह्या गद्यवजा आहेत. ११ देही; ६८ शालिनी; १५४ फिरतीं कारजीं; २०७ केली केली ह्या क्लिष्ट आहेत; २१ गजगती; २३ अझुनि वाट चालतों; ३८ रसिक; ९८

मंजुभाषिणी, ह्या असंबद्ध आहेत; १०३ टाहो; २१९ उपचित्रा; २२० यत् स्फूर्ति; ह्या नीरस आहेत.

व्याकरण व भाषा ह्यासंबंधींच्या दोषांचा उल्लेख पूर्वीच केला आहे. येथें पुनरुक्ति करण्याचें कारण असें कीं कवीनें व्याकरण, छंद व साहित्य ह्या शास्त्राचें महत्त्व काव्यात किती आहे ह्याची जाणीव ह्या भागाच्या प्रस्तावनेंत प्रगट केली असल्यामुळें त्याचे हातून इतके विपुल दोष कसे घडतात ह्याचें पुन: पुन: आश्चर्य वाटतें. ज्यानें इतकें प्रचंड काव्य अविश्रांत परिश्रमानें तयार केलें व ज्यानें शेंकडों कठिण वृत्ताचीं बंधनें पाळून लीलया हा शास्त्रीय ग्रंथ रचिला, त्यानें व्याकरणाच्या सामान्य नियमाकडे इतकें अक्षम्य दुर्लक्ष करावें ह्याबद्दल अत्यंत खेद वाटतो. कारण कवीनें कोणत्याही प्रकारचा लहान मोठा दोष वगळला नाहीं. ह्ययतरीं, व तद्दोर्ष्टी सारखे अपसंधि; भनहरि व कैफीपति सारखे दुष्ट समास; त्याचें कळस; ती निसर्ग, ह्यासारखे लिंगदोष; दोकर सारखे वचन दोष; दिशे ( तृतीया ); विभ्रमदर्शे ( सप्तमी ) सारखीं विभक्ति रूपें; शब्द व म्हणी याचीं अप्रसिद्ध व विकृत रूपें उ. दाटादाटी; फळावळ; जी ( वीज); अंगारधानिका ( शेगडी ); भाष्ट्र ( खापर ); तो निराधार काठी लावतो, नाकानें वांगे ( वांगीं ) सोलणें इ. त्याचप्रमाणें क्रियापदाचीं व सामान्यरूपाचीं वेडीवांकडी रूपेंही पुष्कळ आहेत. उ. तरवी ( तारी ); सुखनो ( सुख पावतो ); त्यजे ( त्यजी ); रसाला ( रसेला-पृथ्वीला ) नातुवरी मन ( नातवावरी )इ. तुम्हीं शोक नका करा ( करू ); नायकें सर्व शोभावधी; असे अपप्रयोग; आणि निरर्थक शब्द व ह्रस्वदीर्घांची ओढताण ह्यास तर गणतीच नाहीं. ह्या दोष बाहुल्यामुळें काव्यास वैरूप्य आलें आहे. हें सागण्याचा हेतु एवढाच कीं होतकरू कवींनीं ह्या दोषांचें अनुकरण करूं नये.

हे भाषा व्याकरण दोष सोडून दिले, तरी ह्या वृत्तांच्या शास्त्रीय ग्रंथांत कोठें कोठें वृत्तदोषही राहून गेलेले आहेत. उ. ( ४९ ) शुद्धविराट-कविता ३ रीः-जगच्चाक्षुहि तेच जाहले ।। व ८ वीः- स्वप्ननाश घडे तदाच ती ।। ह्या वृत्ताचे गण म, स, ज, ग असे दिले आहेत पण ह्या दोन्ही स्थळीं सर्वगुरु ' मगण ' होत नाहीं. ( ५५ ) एकरूप कविता ३ रीः-सरिता, उदधि, तरंग भाव । जरि भिन्नरूप मूल तोय ।। येथें स, स, ज, ग, ग,

असे गण दिले आहेत. पण या ओळींत दुसरा ' सगण ' (अंत्यगुरु) होत नाहीं. (१५१) हरिणी वृत्तः–गण–न, स, म, र, स, ल, ग, व अक्षरें १७ पाहिजेत परंतु १।२।३ या चरणात १८ अक्षरें आलीं आहेत. शुद्धिपत्रात ह्या चुकीचा समावेश नाहीं. त्या ओळी अशा:–नयन म्हणता नेत्रीं, चित्तीं सदैव हरिणीच ये ॥ क्षण नच उभे जेव्हां तेव्हां पळेच विपिनीं भये ॥ बघुनि नयनां त्या दृष्टीनें म्हणेच ' हरिणी ' कुणी ॥ (१८६) तन्वी वृत्त: अक्षरें २४ गण:–भ, त, न, स, भ, भ, न, य, पण दुसरी ओळ:–स्वर्धनु किंवा चमकत चपला भृकुटि वक्र जणु मशरधन्वी ॥ अशी आहे. येथें ' भृकुटि " हा " भ " गण होत नाहीं नगण होतो. (१७८) काय कसें:–उमा–मदिरा वृत्त:–७ भ व ग=२२ अक्षरें. परतु कविता ७ च. १ दिव्य असें सुंदरसें किती ध्यान अहा ! नव हें दिसतें ॥ येथें २ अक्षरें कमी पडलीं आहेत. कविता २ री शेवटल्या ओळींत यतिभंग झाला आहे.

पत्रि कळे चिमु । ताइस पत्रहि का हसता उगि ? काय अम्हा ? ॥
आज पहा शिशु । वाढदिनी किति थाट उडे ! क. ३ च. १.

(पान ७६) क. ७५. वृत्त. जलधरमाला: अक्षरें १२ पण २-३ मधें ॥ या भूमीनें जनन दिले नदंभ–माला ॥ १३ अक्षरें आहेत.

आता ह्या भागातील कांहीं उतारे देऊन हें लांबलेलें विवेचन सपवू.

## गिरिराज (वृत्तः तोटक–४ स.)

बघुनी वनि साउलि आणि गिरी । गमते जणु झोंपुनि रात्रभरीं ।
पडल्या पडल्याच हळू बघतो ! करि प्राचि दिशा शिर उन्नत तो ॥१॥
रवि कोमलशीं पसरी किरणें । तरि विव्हल होउनि दीनपणें
गिरि कीं पसरी आपुल्या पदरां। प्रथमक्षणिं दु:ख न सोशि जरा ॥३॥
रवि तापचि देत पहा थकतो । क्षरता बल, तोहि तदा ढळतो ॥
किती थोर अहा ! गिरिची पदवी । इतरा निज साउलिनें सुखवी ॥७॥
करि स्वागत लागत पायधुळी । बसताच फुलें वरुनी उधळी ।
मग विंझण शीतल मंद करी । झुळकांकरवीं पदही चुरवी ॥ ११ ॥
तरुदासमिषें मधु कंद मुळें । अशनास्तव पाठवितोही फळें ।
निज निर्झरनीरहि पाजुनिया । थकल्या शिणल्यावरि ठेवि दया ॥ १२ ॥

"फिरती कारंजी" [ वृत्त-नंदन ११+७=१८ ] न, ज, भ, ज, र, र

वरि वरि पाहुनी भुरळही सदैव आशा मला।
फिरवितसे, उगीच कधिंही न जीव हा टांगला ॥
गमत असे मनास म्हणुनी तिच्यासवें जातसे ॥
पिळवटुनी मदीय ह्रदया तरीच फेकीतसे ॥ १ ॥
रवि तपताच आम्रफलही तदुष्णतेनें पिके।
अधिकचि गोडि वाढत परि मदीय होतें फिकें ॥
मजशिहि दुःख संकट करी सदैव संतप्त तें ॥
मधुर बनेल शांतिफल तें बघे समुत्कंठितें ॥ २ ॥
फिरुनि तशीच कठि बिलगे अशी निराशा मला।
अवनि तमामुळें मज गमे सदाकदा शामला ॥
सरसिं तरंगताडव तदा बघोनि त्याची तती।
गमत कधीं असे तमभये भिवोनि ते कापती ॥ ३ ॥

## काव्यकुसुमकालिका-तृतीय उद्भव सुमनसौरभ.

काव्यकौस्तुभानीं आपल्या काव्यकुसुमाच्या प्रथमोद्भवाच्या कलिका काव्यदेवीस वाहिल्या. नंतर त्यानीं दुसऱ्या उद्भवाच्या पुष्पपाकळ्या सर्वत्र विखुरल्या आणि आता तृतीयोद्भवाच्यायोगें त्याच्या काव्यसुमनाचा सौरभ सर्वत्र दरवळून राहिला आहे. हें यथोचितच झालें. कलिका व पुष्पपाकळ्या यांचें अवघ्राण त्यानीं रसज्ञ मधुकरांकरवीं करविलें होतें, तर ह्या सौरभाचें गंधवाहत्व स्वतःकडेच घेतलें आहे. त्यामुळें त्याचें हृद्गत समजण्यास वाचकास सोपें झालें आहे. त्यात त्यानीं बऱ्याच गोष्टींचा ऊहापोह केला आहे. त्यापैकीं काहींचा येथें उल्लेख करणें उचित वाटतें.

काव्यासंबंधीं ते म्हणतात कीं " काव्यनिर्मितीचें मूळ स्फुरण होय. तें जन्मजात असतें. तें प्रयत्नलभ्य नाहीं. अभ्यासानें स्फुरणाविष्कार सौकर्यानें होईल परंतु त्याचें महत्त्व विशेष नाहीं. स्फुरण स्फुरूं लागलें कीं प्रत्येक कवीजवळ त्याच्या आविष्कारार्थ उचित असें शब्दभांडारही तयार होतें. म्हणून तेंही एक प्रकारें जन्मसिद्धच असतें." हें मत जरी राजशेखर, वाग्-

भट व जगन्नाथ वगैरे शास्त्रज्ञांस मान्य असलें, तरी काव्यहेतूंत प्रतिभा, व्युत्पत्ति व अभ्यास ह्यां तिहींसही दंडी', भामह, रुद्रट व मम्मट यांनीं महत्त्वाचे स्थान दिलें आहे, व तेंच योग्य आहे असें आम्हास वाटतें. आणि त्यातही वाग्भटासारख्यानीं 'व्युत्पत्त्यभ्यासौ तस्या एव संस्कारकारकौ न तु काव्यहेतू ॥ असें म्हणून त्याच्या संस्कराचे महत्त्व प्रतिपादिलेच आहे. ह्या समजुतीचा परिणाम ह्या कवीच्या काव्यावर कसा झाला आहे हें मागे आलेच आहे.

नंतर कवीनें आपल्या तिन्ही संग्रहाचें स्वरूप वर्णन केले आहे. तो म्हणतो पहिला भाग दर्शनीय करण्यासाठीं त्यात सर्व प्रकारच्या उत्तम उत्तम कविता संकलित केल्या आहेत. दुसरा भाग मुख्यत: वृत्तप्रदर्शनार्थ असल्यामुळे त्यांत काव्यदृष्टीस गौणत्व आलें आहे तरी पण शास्त्रशुद्ध वृत्तनिबद्ध पद्धतींत काव्याची कुचंबणा होत नाहीं. कोणतीही पद्धति असली तरी तिच्यात विविधता व विपुलता आणितां येते. म्हणून कवीनें आपल्या निसर्गदत्त व जन्मसिद्ध काव्यशक्तीचा उपयोग तिच्या सामर्थ्यानुरूप करावा, असें मागून तो स्वत:विषयीं म्हणतो "पा. १९ माझी कवितानिर्मितिही ही एक श्रीशारदादेवीच्या कृपाकटाक्षप्रकाशलहरीची सहज लीला आहे." ह्या समजुतीची चर्चा पहिल्या भागात येऊन गेली असल्यामुळें येथें तिची पुनरुक्ति करावयाचें कारण नाहीं. तिसऱ्या भागात कवि म्हणतो कीं : — मी सहज स्फुरलेले विचार सहजोघी भाषेंत मोकळ्या मनानें मांडलेले आहेत. व ह्यासाठीं आवडीचीं वृत्तेंच निवडलीं आहेत. तरी ही क्वचित् काठिण्य आलेच आहे त्याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी. आधुनिक चलनी वृत्तांतही आपल्यास चांगली कविता करतां येते हें दाखविण्यासाठीं ह्या भागात त्यानें 'स्वर्गगा', 'भूपती' 'चंद्रकांत' व 'गजल' इत्यादि चालींचा उपयोग केला आहे. त्याचप्रमाणें श्लेष, अनुप्रास चित्रकाव्य ह्यांकडे जो कवीचा स्वाभाविक ओढा आहे त्यास ही त्यानें ह्यांत अवसर दिला आहे. आणि आपलें मर्मस्थान पादांगुष्टांत

१ नैसर्गिकीची प्रतिभा श्रुतंच बहुनिर्मलम् ।
अमंदश्चाभियोगोस्याः कारणं काव्यसंपदः ॥ काव्यादर्श I-103

आहे, असें प्राजळपणें सांगणाऱ्या गृध्रराज जटायुप्रमाणें, त्यानें क्लिष्टता हा आपल्या काव्याचा दोष प्राजळपणें कबूल केला आहे. असो.

प्रस्तुत विभागांत कवीनें ३०० कवितांचा संग्रह केला आहे. ह्याचें अगदीं नजरेंत भरणारें पहिलें वैशिष्ट्य म्हणजे कवितांचें पहिल्या (८ ते ३४ सोडून) लघुत्व हें होय. पहिल्या दोन भागातील कविता प्रदीर्घत्वामुळें पुष्कळ ठिकाणीं कंटाळवाण्या झाल्या आहेत. त्यामुळे हा पांचच पद्यांचा आटोपशीरपणा फारच सुखद वाटतो. विषयांचें वैचित्र्य यांत अपार आहे खरें तरी पण ते सर्व तत्त्वज्ञान, धर्म परमार्थ व उपदेश यांपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी सूत्रांत अनुस्यूत केलेले आढळतात. कवि, काव्य, प्रेम, निसर्ग समाज, देश, खादी इत्यादि विषयांसही बरच्याबरोबर स्थान मिळालें आहे. पण विषय कोणताही असो कांहींतरी तत्त्व प्रतिपादन अथवा उपदेश त्यांत ठेवलेलाच. पहा ३ शुद्ध प्रेम:– । केव्हाही जगिं प्रेम कारण असा हेतू दिसे आतला । हेतू वाचुनि प्रेम अल्पतरि हो ! सांगा कुणीं पाहिला ? ॥ ४ ॥ (५) अर्थ :–अर्थाभाव सदैव घातुक महा । त्याच्यामुळें आपदा ॥ ५ ॥ (१०) दवबिंदु :–बाजार जगाचा क्षणभरिचा भासला । तो अज्ञ जिवांना शाश्वतिचा वाटला ॥ ३ ॥ ह्यामुळे तत्त्वोपदेशरहित कविता ह्या संग्रहांत आढळणें दुरापास्त होय. ह्या तत्त्वावबोधाच्या भरीस लागल्यामुळे पुष्कळशा कविता अगदीं गद्यमय भासतात. उदाहरणार्थ पुढील कविता पहा :–२८ आवड; ६९ व्यर्थ कां अंध व्हावें; ७१ काय जातें कुणाचें; ७२ हांसती हांसणारे. आणखी किती तरी ह्या सदरांत घालण्यासारख्या सापडतील. आतां ह्यातील एक अवतरण दिलें असतां वरील विधनाची सत्यता पटेल:–

(९६) सुखास इच्छिणें :–घरींच धन ठेउनी उगिच कर्ज जें काढणें ।
न मुद्दल जरा फिटे उलट व्याज वाढे दुणें ॥
फिटे न मग व्याजही सतत कर्ज काढी जरी ।
असा मनुज या जगीं मरत व्यर्थ व्याजावरी ॥३॥

"भिन्नरुचिर्हि लोकः" हें खरें. तरी वरल्या सारख्या कवितांतून काव्याच्या कोणत्याही भिन्न व्याख्येप्रमाणें काव्य शोधून काढतां येईल. असें आम्हांस वाटत नाहीं. शिवाय, २५५ हठयोग, २५१ तत्त्वमसि, २४९ तो, २५० तों, २२२ ठोशास ठोसा वगैरे दिलेलीं विषयांचीं नावेंच अशीं

चमत्कारिक आहेत कीं त्यात काव्यकल्पनांस वावच दिसत नाही. ह्यामुळें अशा बऱ्याचशा कविता गद्यचुटक्यामारख्या वाटतात. कारण ह्यात भावनांपेक्षां बुद्धीचेंच प्राबल्य अधिक दिसते.

मागील संग्रहाप्रमाणें ह्यातही बऱ्याच विनोदी कविता आल्या आहेत. ह्यात उपरोध उपहास व परिहास ह्यांच्या मिषानें, मनुष्याच्या सामाजिक जीवनास कवीच्या दृष्टीनें अनुपकारक, अशा मानवी प्रवृत्तींवर तीव्र टीका केली आहे. ( १६ ) बाहुला बाहुलीच्या लग्नप्रसगीं केलेल्या मगलाष्टकाच्या द्वारा जगानें आपला खट्याळपणा व हट्टीपणा टाकावा, स्त्रीस्वातंत्र्य व रोमान्स याच्या गप्पा सोडून द्याव्या वगैरे सुचविलेलें दिसतें. ( ३० ) धूम्रशकटावर म्हणजे आगगाडीवर सुमारे ३० कविता केलेल्या आहेत. ही एक मोठी अन्योक्ति असून तिच्यांत लोकनायकाची व्याख्यानें, स्वार्थी लोकांची धडपड; भटजीचा दानधर्माचा आग्रह, श्रीमंताचा अर्थसचय, व त्याचेकडील पंक्तिभेद, अधिकाऱ्याचें आर्जव; दुष्कर्माचें आचरण वगैरे सर्व कृत्ये "कशासाठीं" "पोटासाठीं" असतात, असें दर्शविले आहे. मात्र हें नवीन "धुम्रशकट" वृत्त पोटासाठीं नसून उपदेशासाठीं अवतरलें आहे, असें कवीनें सांगितलें आहे. ह्यातील शब्दयोजना अशी खुबीदार झाली आहे की "कशासाठीं पोटासाठीं" म्हणणारी आगगाडीच स्टेशनांत आल्याचा भास कित्येकास होतो, असें म्हणतात. ( ३८ ) उपाध्याय—उठा बशा काढायला लावणाऱ्या क्षेत्रोपाध्यायाचें दर्शन झाले कीं यात्रेकरूस स्वर्गस्थ पितराचे दर्शन आपोआप कसें घडतें हे मोठ्या बोचक उपाहासानें वर्णिलें आहे. ( ४८ ) वकीलबंधूचें उपहासचित्र इतके भयंकर झाले आहे कीं ते एखाद्या वकिलाचे नजरेस पडल्यास तो अब्रुनुकसानीबद्दल कवीला कोर्टात खेचल्याशिवाय खास राहाणार नाहीं. मात्र एकांतात ह्या आरशातले आपलें प्रतिबिंब पाहून 'काय ? खरंच का मी हा असा!' असे हळूच उद्गारही त्याचे तोंडून निघतील! न जाणो आरोपीस मदत केल्याचा गुन्हा घडेल या भीतीनें त्यातील उताराही देण्याचे आम्हीं टाळतो. ( १०४ ) मन्याबापू हे तळीरामाच्या आर्यमदिरामंडळाचे सभासद नसून प्रत्येक कायापुरींचे हे पौरजन आहेत. ह्याचें वर्णन मोठें ठसकेबाज झालें आहे. पहा ह्याचा पराक्रमः—

" पोऱ्या द्वाड मधीं मधीं लुडबुडे कार्टा महा खाष्टही। साऱ्याशीं झगडोनि माजवि सदा तंटा, बखेडा, दुही ॥ खोटा, चोर, गुलाम, गोडहि तसा बोले कुणी वा मना। आता का उगि? काय काय अजुनी गावूं तुला? सांगाना! ॥ ५ ॥

( १२८ ) धैर्यहीन लोकांच्या ' आतां करावें कसें ' ह्या मंत्राची येथें टर उडविली आहे. ( १३५ ) बंडूनानाच्या कवितेंत ब्राम्हणाची खाणावळ व भटाची खाणावळ ह्यातील भेद मोठ्या गमतीनें वर्णिला आहे. ( २०५ ) जाहो जा! ह्या कवितेंत बोलघेवड्या लोकास " जाहो जा! अपुल्या घरात अपुले पांडित्य हें दाखवा। बोलाची कढि बोलभात सगळें बायां मुला ऐकवा! ॥ ४ ॥ असें सांगून त्याचें तोंड बंद केलें आहे. ( २१३ ) नर्तन–कर्तन ह्यात ह्या चालींची टवाळी केली आहे. नर्तनाची चाल मागें रानटी गणली जाई पण आतां ती शिष्टांची झाली आहे. " राजाही अजि खुद्द नर्तन करी बॉलांत राणिनिशीं ॥ ( स्वस्त्रीशीं कोणी नाचत नाहीं हें कवीचे लक्षात नसावें ). भजनातही ती मान्य झाली आहे. मात्र योगातील स्थिरासनाचें कोणासच ज्ञान राहिलें नाहीं, असें कवि म्हणतो. पण ' रुद्रेणेदमुमाकृतव्यतिकरे स्वाङ्गे विभक्तं द्विधा'[1] ॥ इत्यादि नर्तन महात्म्य कवीस माहीत नसावेसे दिसतें. केशकर्तन पूर्वी शुभाशुभदिन पाहून करीत. आज स्वेच्छया रात्रदिवस चालू असतें, ह्यास अनुलक्षून कवि म्हणतो—मोठ्याशा शहरीं " सलून " उघडे केव्हांहि ते राहती ॥ ३ ॥ पूर्वी ' कर्तन ' हीन कार्य ठरलें होतें अजिश्रेष्ठ तें ॥ ४ ॥ शिंपीही कापडाचें कर्तन करतो, ही आठवण कवीस झाल्यामुळें त्यानें त्यालाही त्याच्या खिसेकापूपणाच्या व गळेकापूपणाच्या कृत्याबद्दल सक्षौर प्रायश्चित दिलें आहे. पण हें अगदींच अनाठायीं वाटतें. ( २८५ ) योगायोगात अभ्यास न करिता परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांची ही इतर अनुद्योगी माणसांबरोबर कवीनें फजिती केली आहे. (२४३) " चिन्हें " मात्र फारच सुंदर-विनोदपूर्ण झालीं आहेत. त्यांचा मासला उताऱ्यात पहावयास मिळेल.

आतां कवीच्या राष्ट्रीय कवितांकडे वळ:—( १५ ) बा माझ्या भारता

१ मालविकाग्निमित्र १-४. द्विधातांडवाभ्याम्–लास्यतांडवाभ्याम्।

(१७) मावळा महाराष्ट्राचा (२०) जागा हो जागा (३३) ते पूत मायेचे (४०) तो हिंद माझा असे व खादी, अशा ७।८ कविता राष्ट्रीय म्हणून सांगतां येतील. गतवैभवाच्या बढाया मारीत भारता! निजूं नको. ऊठ. ज्या मावळ्यांनीं मराठी राज्य मिळविलें काय त्याचें दैव! दैव अनुकूल नाहीं म्हणून बिचारा भारत दुर्गतींत पडला आहे. धर्मगृहाला आग लागली आहे जागे व्हा. वाटली—तोय काय पीत बसला, प्रयत्न करा, धर्मरक्षण करा. ते बाजी शिवाजी खरे मायेचे पूत होऊन गेले. तसे तुम्हीं व्हा. माझा हिंद देश किती सुंदर, दिव्य व समर्थ आहे. सद्गुणी भारता ऊठ, निजू नको. नवे पराक्रम कर. " गत न शोचय ( शोच्यम् )". रामराजाने असावधपणाने विजयानगर घालवलें. तें जाऊं दे. पण तुझ्यांत तर राम आहे ना? तो दाखव. नवीन यश मिळव. खादीदेवीलाच भजा. चरखा हा स्वार्थाचा निधि आहे. तो चालवा म्हणजे स्वराज्य मिळेल. वगैरे विचार अनुक्रमे वरील कवितातून व्यक्त झाले आहेत, पण ते अगदीं दुर्बल, उसने व औपचारिक वाटतात.

या संग्रहात मंगले, शाश्वतस्थिति, शुद्धप्रेम, प्रेमीप्रभू, उलट कृति, बा! मधुकिती लपडाव हा, वगैरे अनेक कविता वाचनीय आहेत. त्यांतील पुढील काही चगांल्या आहेतः—(११) पूर्णचद्रः पूर्णचंद्र पौर्णिमेस पूर्ण हांसतो। नभिंचा पियूषसिंधु काय हाच तो॥ धृ. झुलतें कीं गगनकमल। खुलतें सौन्दर्यविमल। नंदनवन कल्पवृक्ष काय डोलतो!॥ ३॥ विमल म्हणूं तरि कलंक। सकल बघति राव रंक। " व्यर्थ अर्थहीन शब्द " कुणिही बोलतो॥ २॥ यातील कल्पना बऱ्या आहेत. (६२) मधुकिती लपडाव हा " अहा प्रभुवरा! तुझा मधु किती लपडाव हा। फुलामधिं बसोनि तूं म्हणशिही मला तें वहा॥ ह्यांतील प्रेमळ तर्कवाद मोठा मधुर झाला आहे. (२६७) याच रत्नाकराला—

हा जो आहे किति तरी जुना पृथ्विच्याहि अधींचा॥
वार्धक्यानें जणुं सुरकुत्या वाटती वीचिकाच्या॥ २॥
सायंकाळीं तलन्ति बघण्या घेतली जी उडी ती।
साऱ्या रात्रीं जरि धडपडे कांहिं लागेन हातीं॥

पूर्वेला तो फिरुनि वरतीं रिक्त हस्तेंच आला ॥
जातां येता बघत फिरतो "याच रत्नाकराला" ॥ ५ ॥

ह्यातील सर्वच कल्पना अत्यंत गोड व काव्यमय झाल्याआहेत. (२६८) उघडें हृदय वगैरे आणखी काहीं कवितांतही अशी कल्पनाची मौज पहावयास मिळते.

भाषेसंबंधीं ह्या भागात बरीच प्रगति झालेली दिसते. संधिसमास, लिंग-वचन इत्यादिकांचे सामान्य दोष येथेंही जरी आढळतात तरी त्यांचे प्रमाण पुष्कळच कमी झालेलें दिसतें. त्याचप्रमाणें क्लिष्टताही पुष्कळच कमी झालेली आहे. शब्दाचे अनुप्रास व नादमाधुर्य ह्याचा स्वाभाविक ओढा असल्यामुळें कवि असले प्रसंग कधींही दवडीत नाहीं. पण अशानें पुरेसें समाधान न झाल्यामुळेंच कीं काय त्यानें ( ११३ ) ही माला प्रभुला व ( ११४ ) मुरलीची माला हीं दोन चित्रकाव्यें मुद्दाम तयार करून पहिल्यात "ला" व दुसऱ्यांत "ली" हीं अक्षरें ऐशीं ऐशीं वेळां गुंफिलीं आहेत. त्याशिवाय विषयाच्या नामकरणांत तर हें अनुप्रासाचें वेड पराकोटीला गेलेलें दिसतें. निदान ह्या बाबतींत तरी गोविंदाग्रज गडकऱ्यावर त्यानें ताण केली आहे. पहिल्यानें शब्दाच्या जोड्या पहा:—नाव–गाव, देश–वेश, भजन–पूजन; कीर्तन–नर्तन, कर्तन-वर्तन, ह्या झाल्या समाहारार्थी, तर विरोधी पहा:–क्षमा–शिक्षा, देव–भक्त, जागृति–झोप, श्रेयस्–प्रेयस् , सगुण–निर्गुण, वाईट–चांगलें; आंधळा–डोळस इ. नतर विपरीतार्थाच्या पहा:—दोषांत सद्गुण, मुका बोलतो, नयन ठेवुनी आंधळा, उमलतें व करपलें फूल, सत्याचें जग खोट्याचें जग; ज्यायोगे जगतो ज्यायोगे मरतो; त्यापुढें विभक्ति विपर्ययाचीं उदाहरणें येतात:–खुणेची भाषा कीं भाषेची खूण, शब्दात शोभा नसे, शोभेत शोभा नसे. इ. नंतर दोनतीन अनुप्रास-युक्त उदाहरणें:—मावळा महाराष्ट्राचा, सांगती सांगणारे; काय जातें कुणाचें; काळ्यानीं काळें केलें; पायदळीं पडलेलें पुष्प; काय, कोठें कशाचें; सोसूंच सोसूं तसें, सौख्य सौख्यास देतसे, इ. शब्दांच्या त्रिरावृत्तिः–( १ ) माझाचि मी एकला; केव्हांहि माझाच मी; मी काय माझा असे. ( २ ) आहे तसें ना दिसे; कोणा दिसो ना दिसो; व्हावेंच व्हावें तसें; ( ३ ) ही कोण हीन स्थिति, आलोक हीन स्थिति, जिवाची स्थिति; ( ४ ) मोठें

म्हणावें कसें, एव्हांहि मोठेचना; मोठा कुणाला म्हणा. त्यानंतर प्रौढी मिरवणें; फुशारकी मारणें; येरे पुनः मागल्या; ठोंश्यास ठोंसा, खुणेचा घडा, होऊं नये तें हसें; अशा म्हणींवरही कविता केल्या आहेत. शेवटीं, कोण, काय, कसें, कोठें, जेथें, तेथें, तो, त्याचें, कोठून, कोणावांचून, वगैरे सर्वनामें व अव्ययें ह्यांशीं कांहीं शब्द जोडून त्यावरहि अनेक कविता केल्या आहेत. अशीं विषयाची विचित्र निवड केल्यावर त्यात कवि स्वतःच म्हणतो त्याप्रमाणें:—" कवित्व कसलें जणूं रसचि ढाळितो आसवें ॥३॥ कवित्व कसलें असें वचहि आज बोलूं नये ॥ ५ ॥ [ कवित्व कसलें. क. ५७ ] झालें तर नवल काय ?

पण या संग्रहांत सुंदर वाक्प्रचार, म्हणी, व सुभाषितें सर्वत्र विखुरलेलीं असल्यामुळें मागें उल्लेखिलेलीं भाषादुषणें झांकून गेल्यासारखीं वाटतातः—

भाग्याचे नर शोधिती सतत त्या जो एक प्रेमी प्रभू ॥ पा. ४ ॥
अर्धें ज्ञानचि वैपरित्य पटवी तेथेंच सारा भ्रम ॥ पा. ५ ॥
कीं सौन्दर्य शिरेच नेत्रपथिं तें बाह्यातुनी अंतरीं ॥ पा. ७ ॥
एकाएकीं सैतानाची वरात कीं वाऱ्यावरली ॥ पा. २३ ॥
पांचमुखीं परमेश्वर वदती ॥ पा. ४० ॥
केलें कां कधिं पिष्टपेषण कुणी जें होय हास्यास्पद ॥ पा. ४२ ॥
होतां काविळ विश्व पीत दिसणें आहे निसर्गस्थिति ॥ पा. ५१ ॥
निरुद्योगी सदा रोगी । सदुद्योगि सुखा भोगी ॥ पा. ५२ ॥
छातीला जो मनुज अपुला हात लावोनी बोले ॥ पा. ५४ ॥
सुगंध नच सोडिते बकुलिका सुकेही जरी ॥ पा. ६३ ॥
म्हातारा तो मृत परि जगीं बैल जीवंत आहे ॥ पा. ७३ ॥
ज्यायोगें जगिं जन्म खोड तसली जाई न मेल्यावरी ॥ पा. १२४ ॥

ही मालिका वाटेल तेवढी लांबवितां येईल. एवढेंच नव्हे, तर अशा सुभाषितांचे कोणी लक्षपूर्वक संकलन केल्यास त्याचा एक लहानसा स्वतंत्र ग्रंथच होईल असें आम्हांस वाटतें.

☞ ह्या कवीच्या कृतीचें गुणदोषात्मक विवेचन पूर्वीच पुष्कळ स्थळीं होऊन गेलें असल्यामुळें त्याजविषयीं आतां विशेष सांगण्यासारखें नाहीं. मात्र त्यास एक प्रेमाची अशी सूचना करावीशी वाटते कीं त्यानें अशाच

तन्हेचा चौथा भाग प्रसिद्ध करण्याची खटपट करण्याऐवजीं प्रसिद्ध झालेल्या भागांतूनच सुंदर, उत्कृष्ट व निर्दोष अशा शेलक्या कविता निवडून त्यांचा एक लहानसा गुच्छ प्रकाशित करावा म्हणजे त्यानें आजवर मिळालेल्या कीर्तींत अधिक चिरकालिक भर पडेल, असें आम्हांस वाटतें. (तरीपण सुभाषित म्हणतें:–)

कस्यांचिद्वाचि कैश्चिन्ननु यदि विहितं दूषणं दुर्दुरूढै-
श्छिन्नं किं वस्तदास्यात् प्रथितगुणवतां काव्यकोटीश्वराणाम् ।।
वाहाश्चेद्रन्धवाहाधिकविहितजवाः पंचशश्चाधखंजाः
का हानिः शीरशाहक्षितिपकुलमणेरश्वकोटीश्वरस्य ।। सु. भा. ।।

चिन्हें (वृ. शा. वि.)

धावे लेखन ओळ उत्सुकपणें ‘ चिन्हें ’ तिला ओढितीं ।
मागें खेंचुनि वा कधीं ढकलुनी भंडावुनी सोडितीं ।
मार्गीं थांबविती मधीं मधिं तिला तिष्ठावया लाविती ।
वाटे तोंवरि ठेविती धरुनियां वाटे तदा सोडिती ।। १ ।।
आल्या स्वल्प विराम ओळ नच ती चाले तसें चालवीं ।।
घोट्याला पिरगाळुनी लव तरी वाक्यास तो थांबवी ।।
वाटे ‘ अर्ध विराम ’ शांत न तसा संतापतो सत्वरीं ।।
घोट्यापासुनि तोडुनीच घुडगा त्या अर्धमेला करी ।। २ ।।
एखादीच चुकोनि ओळ जरिही वाचेल दोहोंतुनी ।
ठेवी “ पूर्ण विराम ” गर्त करुनी तेथें पडे जाऊनी ।।
वाक्यांचा मग कारभार सगळा संपूर्ण झाला गणा ।
शब्दांनीं चिडुनी जुटी मिळवुनी तो संप केला म्हणा ।। ३ ।।
चिन्हें बैसति कीं दबा धरुनिया तेथेंच कोठें तरी ।
संधि साधुनी वाटतें झटदिशीं घेती उडी त्यावरी ।।
प्रश्नाचा तर कोयता (?) दिसतसे कोणासही स्पष्ट तो ।
भाला घेउनियां उभाच जवळी “ उद्गार ” (!) तो वाटतो ।। ४ ।।
टिंबें ज्या स्थलिं अक्षरास मुळीं ही ना जाववे त्याकडे ।
शब्दांचें नच चालतें लवतरी या वाटमाऱ्यापुढें ।।
बैसे तत्सम “ कंस ” “ आ ” करुनियां टाकी गिळोनी असें ।
मेला शब्द तरी मरोनिहि पहा ! जीवंत नेत्रा दिसे ।। ५ ।।

# प्रकरण १२ वें

## सराफ बंधु.

### दत्तात्रय अनंत सराफ–कंधारकर (सन १८८६ जन्म).

राज्य चालवी आमुच्यावरी। प्रजापालनीं दक्षता करी।
देशिं शाति या निशिदीनीं वसो। निजाम आमुचा सुखि सदा असो।

दत्तात्रय सराफ ह्यांचा जन्म शके १८०८ अश्विन शु. ६ स कंधार येथें झाला. घरीं अठराविश्वे दारिद्र्य. त्यामुळें ह्याचें शिक्षण कंधार तालुक्यांतील मुखेड गावीं त्याच्या मामाकडे झालें. उर्दू पांचव्या यत्तेपर्यंत जेमतेम त्यांनीं मजल मारली नाहीं तोच द्रव्यार्जनासाठीं विद्यार्जनावर पाणी सोडण्याचा प्रसंग त्याजवर आला. मात्र इतक्या लहानपणीं सुद्धा त्यास त्याचे गुरु हरि नरहर मोकाशे यांजकडून काव्यस्फूर्ति मिळाली आणि वरील श्लोकरूपानें ती प्रथमच फलित झाली. ह्यापुढील त्याचा आर्थिक आत्मवृत्तान्त १९२७ च्या आगष्ट महिन्याच्या 'विद्यासेवक' मासिकात आला आहे. तो अत्यंत उद्बोधक असून त्यात दिसून येणारी त्यांची उद्यमशीलता व चिकाटी मोठी प्रशंसनीय व अनुकरणीय आहे. वयाच्या सुमारें ३२ व्या वर्षापर्यंत त्यांनीं जकात नाक्यावरील आठ रुपयाच्या कारकुनाची, पाटीलपटवारी, पोलीस व तहशिली ह्या खात्यात उमेदवाराची, शाळापंतोजीची, मक्तेदाराच्या कारकुनाची व किराणा व्यापाऱ्याच्या मुनीमाची, अशा अनेक नोकऱ्या केल्या. त्यांत त्याना अतिशय कष्ट सोसावे लागले. पण त्यांत त्यांना जो अनुभव आला व जें शिक्षण मिळालें तीं फार बहुमोलाचीं ठरलीं. कारण त्याच्याच जोरावर त्यांस कापडाचें स्वतंत्र दुकान थाटतां आलें, आणि आज ते मोठे लौकिकवान व श्रीमान् व्यापारी बनले आहेत.

अशा यातायातीच्या नोकरींत आणि वाङ्मयविकासास प्रतिकूल अशा परिस्थितींतही त्यांनीं आपला विद्याव्यासंगाकडील स्वाभाविक ओढा कायम ठेविला हें विशेष कौतुकास्पद आहे. वर्तमानपत्रें मासिकें व पुस्तकें, जीं जियें

मिळतील, तीं तिथें वाचण्याचा त्यांस जबरदस्त शोक होता. वाचनाकडून हळूहळू लेखनाकडे त्यांचें मन वळलें. आणि त्यांनीं–गुलबर्गासमाचार, लोकमित्र, ज्ञानमित्र, गोग्रास, स्वधर्म इ. नियत कालिकांत, 'श्रीक्षेत्र माहूरवर्णन' 'अशी मी कोण' 'श्रीक्षेत्र उनपेश्वर', 'शाहासाहेब नांदेडकर,' 'सावधान,' 'धूम्रपान' वगैरे विषयावर लेख लिहिण्यास सुरवात केली. गद्य लेखनास असें प्रोत्साहन मिळतांच पद्येंही लिहावीं असें त्यांस वाटलें. आणि त्याप्रमाणें 'ज्ञानाचा थोरपणा' व 'श्री विश्वेशस्तवन ह्या दोन कविता 'ज्ञानमित्र' व विश्वब्रह्मवृत्त' ह्यांकडे त्यानीं पाठविल्या व त्या त्यांत प्रसिद्ध होऊनही आल्या. ह्या यशामुळें त्यांस वाङ्मय सेवेचें पक्कें वेड लागलें. ते म्हणतात "वाङ्मयमोहिनीनें माझ्या कंठास आपल्या कोमल करांनीं घट्ट मिठी मारल्यामुळें मी सहाजिकच तिच्या मोहपशांत सांपडलों यांत नवल तें काय!" तिच्या ह्या मोहपशांत त्यांनीं पुढील वाग्विलास केले आहेत:—(१) श्री पूर्णानंद स्वामींचें चरित्र (२) म्हाळसा कृपामृत (३) श्रीशारदा स्तोत्र, श्रीतुकाराम महाराजचरित्र गद्य (४) धूम्रपाननिषेध (५) मुंबईची मौज. (६) श्रीगोदाष्टक (७) श्रीसद्गुरु भजनामृत व (८) दत्त किंकराची कविता. याशिवाय (१) श्रीमहालक्ष्मीव्रत अ. ५. (२) धूम्रपानचिकित्सा. (३) अनंत बाळाजी सराफ यांचें चरित्र हे ग्रंथ अप्रकाशित आहेत.

वाङ्मय बोधपर व ध्येयपर असावें असें त्यांचें मत आहे. ते म्हणतात:— 'वाङ्मय निर्माण करावयाचें तर त्याच्यापासून वाचकांस ज्ञान मिळून त्यांचें कल्याण झालें तरच त्याचें सार्थक होय. असें मला वाटतें. या ध्येयास अनुसरूनच मी आपल्या कविता लिहिल्या आहेत. . . . कोणत्याही लेखकानें राष्ट्राला पोषक व हितकारक असेंच एखादें ध्येय डोळ्यांसमोर ठेवून तत्प्रीत्यर्थ आपलें वाङ्मय निर्माण करावें. मग तें ध्येय राजकीय, सामाजिक, धार्मिक इ. कोणत्याही प्रकारचें असलें तरी हरकत नाहीं."

ह्यावरून बोध करण्याकरितांच मुख्यत: जन्मलेली ह्यांची कविता जुन्या वळणांतच मोडते असें म्हणण्यास हरकत नाहीं. दुर्व्यसननिषेधक वाङ्मयाची भासणारी उणीव भरून काढण्याकडे त्यांनीं आपल्या कवितेचा मोर्चा वळविला आहे. आतां वरील कवितांचा परामर्श क्रमानें घेऊं.

( १ ) श्रीपूर्णानंदस्वामींचें चरित्र अनुपलब्ध आहे. नोकरींत फिरत असतांना आदिलाबाद येथील पूर्णानंदस्वामींच्या मठांत ते एकदां उतरले होते. तेथें स्वामींचें गुणवर्णनपर पद्यमय चरित्र लिहून तें त्यानीं स्वतःच्या खर्चानें छापलें. त्यायोगें त्यांची बरीच प्रसिद्धि झाली व तेव्हांपासून लोकांस असें समजून आलें कीं हा गृहस्थ केवळ मक्तेदाराचा कारकून नसून ह्याच्यांत कवित्व गुणही आहे. तेव्हापासून त्यांची कवि म्हणून प्रसिद्धि होऊं लागली ( २ ) लोकमित्राच्या संपादकाच्या सांगण्यावरून त्यांची कुळदेवता 'श्रीम्हाळसादेवी' हिजवर एक स्तोत्र सराफ ह्यांनीं रचिलें, तें संपादकानें स्वतःच्या खर्चानें 'श्रीम्हाळसाकृपामृत' ह्या नांवानें छापलें आहे. ह्यांत वसंततिलका वृत्तात एक अष्टक, धावा, शरणागति, व ७२ ओव्यांचें स्तोत्र अशी श्रीम्हाळसेवर दत्तकिंकराची कविता आहे. पुढें एक कविता नमुन्यासाठीं दिली आहे:—

आहेत आप्त–गण बंधुसुतादिदारा ।
कामा न ये कुणिही अंति, वृथा पसारा ॥
तूं एक माउलि खरी मज बाळकास ।
श्री म्हाळसे ! नमन हें तव पादुकास ॥ ७ ॥

( ३ ) शारदा स्तोत्राच्या ५२ ओंव्या आहेत. त्यात निरनिराळे वर मागितले आहेत. त्यात मला काव्यस्फूर्ति दे, व विडी, तमाखू, धूम्रपान, गांजा, अफू, चहा, मद्य, हीं व्यसनें मला लागूं देऊं नको म्हणून कवीनें प्रार्थना केली आहे.

( ४ ) धूम्रपाननिषेधः— ह्या छोट्या पुस्तकाचीं ३० पानें असून त्यांत २५ पद्ये आहेत. ह्यास दे. ल. महाजनाची छोटीशीच प्रस्तावना आहे. हृद्गतांत कवि सांगतो कीं, " अनेक व्यसनांत गुरफटलेले तरुण मुक्त व्हावे म्हणून हस्तपत्रकें, लेख, व्याख्यानें वगैरेंनीं जे प्रयत्न चालविले आहेत, त्यांपैकींच हा पद्यरूपाचा प्रयत्न होय. " कवीनें गणपति व शारदा ह्यांस, ह्या व्यसनांतून सर्वांस मुक्त कर अशी प्रार्थना केली आहे. विडींत निकोटाइन नांवाचें प्रखर वीष असतें. बापाला व्यसन असलें तरी मुलानें तें धरूं नये, असा " शिशुबोध " त्यानें केला आहे. नंतर विडी सोडून गोरसपान करा. धूम्रपान ही पाश्चात्य संस्कृतीची टूम आहे. शेतकऱ्यांनीं

तंबाखू पेरूं नका, चघळूं नका व ओढूं नका. व्यापाऱ्यांनीं तंबाखूशिवाय इतर धंदे करा. शिक्षकांनीं प्रथम तुम्ही विडी सोडा. सुजनानीं विडींत काय मौज आहे? श्रीमतानीं डोळे उघडा, विडींत पैसा खपवूं नका. वैद्य, डॉक्टर बंधूनीं तुम्ही विडी सोडा. गरीब नोकरानीं विडींतला पैसा मुलाच्या पोषणाकडे लावा. राष्ट्र लयाला गेलें. व्यसनरिपूवर विजय मिळवा. विडीकाडीनें आग लागते. ब्राह्मणांनो धूम्रपान अयोग्य. परदेशास जाणाऱ्यांनीं विडीपासून सावध रहा–असा प्रत्येक कवितेंत साध्या, सरळ पण परिणामकारक भाषेंत कवीनें मोठ्या कळवळ्यानें उपदेश केला आहे.

( ५ ) **मुंबईची मौजः**—हें सुमारें ६-७ पानांचें एक लहानसें चोपडें आहे. खेडेगांवांतून प्रथमच मुंबई पाहाणाऱ्याच्या गोंधळलेल्या चित्तवृत्तीचें शब्दचित्र बरें साधलें आहे. स्त्रीशिक्षण, हिराबागेतील व्याख्यानें, ग्रांटरोडवरचीं नाटकें, डंकनरोडवरील वारस्त्रियांची आगारें, राणीचा बाग, ब्याकबे, बाबुलनाथ, बोरीबंदर, वगैरेचीं वर्णनें आश्चर्यपूर्ण व समपक शब्दांत झालीं आहेत. शेवटीं जातां जातां–सुधारकाचा सुकाळ झाला। स्वधर्म सारा द्विजें बुडविला। स्वछंदें जन वर्तुं लागला॥ अशी मुंबुईविरुद्ध तक्रार करून हा लांब कटाव कवीनें संपविला आहे.

( ६ ) **गोदावरी स्तवनामृतः**–प्रथमतः प्रार्थनाष्टक वसंततिलकावृत्तांत करून नंतर गोदामहात्म्य ६२ ओव्यांत वर्णिलें आहे. नांदेडकर कवींनीं गोदामहात्म्य गावें हें उचितच आहे. कारण गोदेचें तें नाभिस्थान असल्यामुळें तें एक पवित्र क्षेत्र मानलें गेलें आहे.

( ७ ) **सद्‌गुरु भजनामृतः**—कवीचे कुलगुरु रामदासपंथी श्रीगुरु मारुतिमहाराज, यांचे भजनाचीं १०।११ पदें, आरत्या, धावा व एक करुणाष्टक यांत आहे.

( ९ ) **अर्वाचीन शुकरंभा संवादः**—दत्तकिंकरांच्या सन्मार्गदर्शक पुस्तकमालेंचें हें ९ वें पुष्प आहे. विडीच्या व्यसनावर हा मोठा मनोरंजक व उद्‌बोधक संवाद कवीनें लिहीला आहे. यांत निर्व्यसनी मनुष्यास शुक कल्पून त्यास विडीरूपी रंभा आपल्या पाशांत अडकविण्याचा मोह पाडींत आहे. पण तो शुकासारखा दृढव्रत राहून विडीरंभेस युरोपांत

हाकलून देतो असें चमत्कृतिजनक कथानक यात गुंफलें आहे. शेवटचे दोन श्लोक खालीं दिले आहेत:—

विडीरंभा:—हा हा हां असले अभद्र वच हे बोलूं नको तूं उगी।
होसी सात्विक, शांत, निश्चयि खरा तूं धन्य साधू जगीं ॥
झालासी वश ना मुळीं म्हणुनि मी जातें निघोनी परी
माझी तूं अपकीर्ति ना पसरवी कोठेंही या भूवरी ॥ २७ ॥

शुकदेव:— सगें घेऊनि फयाशनेस निघुनी जा आंग्ल देशामधीं ॥
काळें तूं करि येथुनी, न भुलवी, मद्धांधवातें कधीं ॥
ना राही मम भारतीं, जरि अशा ना मानिशीं हेतुला ॥
शिक्षेतें तरि दत्त किंकर करें देईल सागें तुला ॥ २८ ॥

मात्र ह्या स्थळीं विडीरंभा व शुकदेव हीं रुपकें कितपत उचित आहेत ह्याबद्दल "सचेतसः एव अत्र प्रमाणम्"

( १० ) दत्तकिंकराची कविता:—हें सदरहू मालेचें १० वें पुष्प होय. या कवीचें ध्येय व धोरण वर सांगितलेंच आहे. शिवाय मालेच्या नांवानेंही तें स्पष्ट समजण्यासारखें आहे. आतांपर्यंत जीं लहानसहान पुस्तकें वर उल्लेखिलीं तीं संख्येत जरी पुष्कळ असलीं तरी तीं अगदींच अल्पाकृति असल्यामुळें लेखकास कवि अथवा ग्रंथकार ही पदवी प्राप्त करून देण्यास समर्थ होण्यासारखीं आहेत असें म्हणतां आलें नसतें. मात्र ह्या कवितासंग्रहाच्या प्रकाशनानें ती पदवी त्यानें मिळविली आहे, हें खास. हा संग्रह कवीनें सन १९३१ मध्यें प्रसिद्ध केला आहे, व त्यांत निरनिराळ्या विषयांवर एकंदर ४६ कविता संकलित केल्या आहेत. पैकीं कांहीं गोग्रास (४); आर्यविज्ञान (३); विहंगमाला, मंदारपुष्पमाला, लोकमित्र व स्वधर्म या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या आहेत. शुकरंभा-संवाद, धेनु आणि धूम्रपान या पूर्वीच छापलेल्या कविता पुनः ह्या संग्रहांत घातल्या आहेत; न जाणों विडीतंबाखूवर एकदम सर्व तोफा डागून त्यांचा धूर नेस्तनाबूद करण्याचा कवीचा हेतु असावा. सुशिक्षिताची डोळेझांक, विडीचें कृष्णकृत्य, विडीचा वेडा प्रणयभंग व निरोप हे नवीन आपटेबार विडीवर कवीनें फेंकले आहेत. पहिल्या कवितेंत मागील कल्पनाच पुनः आल्या आहेत. दुसरींत विडी वेश्येप्रमाणें त्याज्य आहे

असें सांगितलें आहे. तिसरींत विडी वेडयापासून दूर रहाण्याचा उपदेश आढळतो. प्रणयभंगांतील विडी प्रियेची विनवणी शेवटल्या पुढील शंकेनें 'कां बोध तुम्हां दत्तकिंकरें केला?। म्हणुनियां रंग पालटला! कां॥ फार चटकदार झाली आहे. आणि अखेरच्या निरोपांत विडी सुंदरीचा पति जेव्हां तिला धाक घालतो कीं तूं आपलें कृष्णमुख घेऊन येथून जा. आणि जर कां। पुनरपि तूं मशीं जरी कुठें भेटसी। दत्त किंकर तुशीं लावी पळुनी॥ तेव्हां या आशुक माशुकाच्या अढळ प्रेमांत मधेंच दत्त म्हणून उभा राहिलेला या दतकिंकराचा बागुलबोवा पाहून वाचकांस कींव येते, आणि ह्या प्रेमी जोडप्याचें मीलन चोरून केव्हां तरी होवो असेंच तो मनांत पुटपुटतो.

त्यानंतर सुमारें २० कविता देव धर्म नीति ह्यांवर आहेत. धूम्रपान व चहापान याच्या निषेधाबरोबरच गोवधनिषेधाचें व्रत ह्यांच्या कवितेनें घेतलेलें दिसतें. गोवध थांबावा म्हणून शंकरास दिलेली 'धोक्याची सूचना' जशी अभिनव तशीच चमत्कृतिजनक आहे. कवि म्हणतोः—॥ वधतील शंकरा! खचित तुझ्या नंदिसी॥ मातले गुंड हे, सावध हो झटदिशीं॥ तूं दुष्टच्छेदन करुनि रक्षि धेनुसी। दत्तकिंकरें, काव्यशृंखला ओढुनि ही सूचना। दिली, करी मान्य भाललोचना!॥ पण शंकराचा गोमातेशीं संबंध नंदीपुरता अप्रत्यक्ष, हें एक, आणि दुसरें असें कीं गाईंचा डबा कैलास पर्वतावर फार दूरवर असल्यामुळें कवीची सांखळी–खेंच तेथवर पोंचेल किंवा नाहीं ही शंका येऊनच कीं काय त्यानें सरतेशेवटीं गोपाळ कृष्णाकडेच अभययाचनेसाठीं धांव मारली आहे. आणि हें उचितच आहे. त्यास मात्र कवींची कींव येऊनच की काय त्यानें गोवर्धन ( सिमला ) पर्वताधिष्ठित लाट साहेबांकरवीं गोसंवर्धनाचे हुकूम जारी करविले आहेत.

शिवप्रशस्ति, अहिल्यादेवी, खंदा धर्मवीर, बळी तो कानपिळी, यत्न महति श्रेष्ठत्वाचा मान, इत्यादि कवितांत राष्ट्रियत्वाची झुळूक दिसते खरी, पण या सर्वांचें अधिष्ठान 'स्वातंत्र्यप्रीति' नसून 'धर्मप्रीति'च आहे. शिवाजीची प्रशस्ति गोब्राह्मण प्रतिपालक म्हणून. अहल्यावंदन ती दानशूर व मंदिरांचा जीर्णोद्धार करणारी व धर्मपालक म्हणून. बाजी, शिवाजी, संभाजी वगैरे 'धर्मात्मे, परका न धर्म वरिती स्वप्राणही गेलिया' असे

धर्मात्मे म्हणून. बळ पाहिजे तें धेनु संरक्षणार्थ. परधन परकामिनीकडे न धांवणाराच श्रेष्ठ ठरतो. टिळक, रानड्यादिनीं प्रयत्नानें थोर भाग्य मिळविलें; वगैरे तत्त्वावरून कवीच्या मनावर धार्मिक भावनांचाच पगडा अधिक दिसतो. ' मोठा कोण ' या कवितेंत " मोठा तो जगिं' दत्तकिंकर' वदे जो राष्ट्रसेवा करी ॥ ह्या ओळींत मात्र कवीनें आपली निर्भेळ राष्ट्रप्रीति दाखविलेली दिसते.

प्रेमविषयक कवितेविषयीं कवि म्हणतो–' आजकाल इतर कोणत्याही विषयांपेक्षां शृंगारविषयक काव्याकडेच नूतन मंडळीचा ओघ जास्त दिसून येत आहे.......पण नैसर्गिक दृष्ट्या मनुष्यमात्राचा ओढा विषयासक्त होण्याकडेच असल्यामुळें त्यांत भर घालणाऱ्या कविता लिहिणें म्हणजे राष्ट्राला खड्यांत ढकलण्यासारखेंच आहे. ! " असें कवीचें मत असल्यामुळें या संग्रहांत प्रेमगीतें आढळणें शक्य नाहीं. तरी पण ' मार्गप्रतीक्षेंतील साधेंभोळें गोड व अकृत्रिम असें थोडेसें प्रेम वाचकाचें मनास रिझविल्यावांचून राहाणारा नाहीं. मात्र ' भाग्यशाली कोण ' आणि ' आर्यगृहिणी ' या कवितांतील पतिदेव मानणाऱ्या सावित्रीसिंधूचें ध्येय आजकाल कोणास रुचेलसें वाटत नाहीं. प्लेगोबास बळी पडलेल्या भगिनीवरील शोकगीत जसें करुणरसानें सांद्र, तसेंच शेवटच्या व्यापक भावनेनें उदात्त झालें आहे. कवि म्हणतोः—कळले देवा ! दुःख कशास्तव भगिनीचें दिधलें । दृष्टि व्यापक मी ठेवावी ऐसें त्वां कथिलें ॥ २७ ॥ एका कामिनीवांचुनि जगतींअवघ्या युवतींसीं ॥ भगिनीसम त्यां मानि म्हणोनि दिलें दुःख मजशीं॥ २८ ॥' ' भिकारीण ' ह्या कवितेंतील पापी श्रीमंताशीं झालेला तिचा संवाद मोठा उद्बोधक, व पाणीदार झाला आहे. मात्र इतक्या सुशिक्षित, वेदांती व नीत्युपदेशक विधवेस, आपली अब्रू रक्षण करण्यास कपाळमोक्ष करून घेण्याशिवाय दुसरा कांहीं उपाय सुचत नाहीं, हें पाहून सखेदाश्चर्य वाटतें ! कवि सांगतो—थाप देउनि तया अधमाला । घेतसे धडक ती दगडला । रक्त वाहत फुटे मुख–खंड । जाहली पतिव्रता तंव थंड ॥

येथवर केलेल्या विवेचनावरून ह्या कवीच्या कवितेंचे स्वरूप लक्षांत येण्यासारखें आहे. शार्दूल विक्रीडित, स्वागता, वसंततिलका, विबुधप्रिया इत्यादि अक्षरगणवृत्तें, अभंग, ओंवीं, साकी, दिंडी, आर्या इ. मात्रागण-

वृत्तें व भलाजन्म हा, राधाधर मधु, हटातटानें, फटके, पाळणे, म्हातारा इतुका, जरी कुणा, डोळे हे जुलमी, चंद्रकांतराजाची, व अजि अक्रुर हा इत्यादि गेय चालींचीं पदें कवीनें उपयोजिल्यामुळें कवितेच्या बाह्यांगास वैचित्र्य आलें आहे. भाषा अगदीं साधी, व सोपी असून व्याकरणशुद्ध, सुबोध व ओघवती आहे. कवींचें अल्प शिक्षण, त्याचा खडतर जीवनकलह, व काव्याननुकूल वातावरण ह्या गोष्टी लक्षात घेता कवीचा वाङ्मय हव्यास व त्यांत त्यानें संपादिलेलें यश हीं प्रशंसनीय आहेत, असेंच कोणास वाटेल. पुढें दोन उतारे दिले आहेत:—

भाग्यशाली कोण ? ( शा. वि. )

बाधा नाजुक ठेंगणी तरुणशी सच्छील जी देखणी ।
वर्णें गौर सुलोचना मधुवचें संतोष देते मनीं ॥
ऐसी सद्गुणि कामिनी, पतिनंता, ज्या लाभलीसे नरा ।
संसारीं बहु दत्तकिंकर वदे तो ' भाग्यशाली ' खरा ॥

मार्गप्रतीक्षा. पद ( चाल–डोळे हे जुलमी )

आलि आलि ' आगगाडि ' येतिल का ? आज गडे ! ॥
वाट बघत दारिं उभी, नित्य नेत्र गाडीकडे ॥
' आज उद्यां ' ' आज उद्या ' दिवस असे जाति किती ! ॥
रात्रंदिन चैन नसे, काय करूं कैसि गति
गुंतलेत कवण कार्यि, कळत बाइ, मुळिं न मशीं
काय दुःख ओढवलें, तें तरि मीं जाणुं कशीं ॥
' पाहिन ते चरण कधीं ' लागे मनिं ध्यास सदा ।
राहति ना सोडुनि मज गृहिं असल्या पळहि कदा ।
' दिपवाळिस आवश्यक येतों गे ' म्हणुनि असें ।
मज कथिलें, उलट परि वागति ते आज कसे ? ।
' खाऊ देइं खाउ देइं ' म्हणुनि बाबु रडत तया । V. L. (पोर)
काय देऊं आणुनिया वस्तु बाइ ! कोठुनियां ? ।
पों पों पों करुं नित्य मोटर ये दारिं जरी ! ।
प्राणनाथ नसति त्यांत, शोधुं कुठें काय तरी ! !

———

## गणपत अनंत सराफ ऊर्फ (बाळ गणू. नांदेड) स. १८८९.

गणपतराव याचा जन्म जि. नांदेड ता. कंधार येथें शके १८११ विरोधी नाम संवत्सरात झाला. ह्यांचे शिक्षण जुन्या पद्धतीनें मुक्काम मुखेड येथे ' मिडलच्या ' परीक्षेपर्यंत झालें. पुढील शिक्षणास अनुकुलता नसल्यामुळें तें सोडून त्यांस एका व्यापाऱ्याकडे नोकरी धरणें भाग पडलें. पुढें काहीं दिवस त्यानीं शाळामास्तरकी केली. नोकरींत असतानाच कांहीं तरी स्वतंत्र धंदा काढून गुलामगिरींतून मुक्त होण्याचे विचार त्याचे चालू होतेच. अनुकूल संधि येतांच त्यांनीं परदास्यशृंखला तोडून नांदेड येथें श्रीदत्तप्रिंटिंग प्रेस ' नांवाचा स्वत:च्या मालकीचा एक छापखाना काढला. आजतागायत तो उत्तम चालत असून त्यायोगें त्याचे, त्यांच्या मनोवृत्तीप्रमाणें, प्रपंच व परमार्थ दोन्ही सुरळीतपणें चालले आहेत.

लहानपणापासून ह्याचा संतवाङ्मयाकडे ओढा होता. त्यामुळें २०।२१ व्या वर्षांपासूनच आपण कांहींतरी लिहावें अशी त्यास स्फुर्ति झाली. त्यानीं खालील लहानसहान पुस्तकें लिहिलीं आहेतः—

( १ ) वासुदेवानंदस्तवनमाला–( रामतत्त्व प्रकाश छापखाना, बेळगाव)

( २ ) साता वाराचें भजन — ,, ,, ,,

(३) वासुदेवानंदभजन लहरी (प्र. दे. लं. महाजन, नांदेड स १९२१)

(४) वासुदेवानंद पवाडा. (५) दत्तमानस पूजा ( ६ ) गोदामहात्म्य. (ओवीबद्ध) ( ७ ) दत्तस्तोत्र ( ८ ) येसादेवीस्तोत्र ( ९ ) श्रीदतप्रार्थना ( १० ) श्रीपाद चरित्र.

ह्याशिवाय त्यानीं मधून मधून कांहीं किरकोळ लेख व स्फुट कविता हीं नियतकालिकांतून प्रसिद्ध केलीं आहेत. त्यात ' शिर्डीकर साईमहाराजांचें चरित्र ' ' एका स्त्रीचें अदृश्य होणें ' ' सत् पुरुष अनंत सराफ ' वगैरे मुमुक्षूंत व इतर काहीं लेख ' निझाम विजयांत ' प्रसिद्ध झाले आहेत. वरील पुस्तकापैकीं नं. १, ९ व १० शिवाय सर्व, अवलोकनार्थ उपलब्ध झालीं आहेत. त्यांचा यथाक्रम विचार करूं:— ( १ ) साता वारांचे भजनः— यांत रविवारापासून सुरवात केली आहे. त्यांत सूर्य व मल्हारी यांचें स्तवन आहे. पुढें शंकराचे भजनांत शिवाजी त्याचा अवतार म्हणून त्यास व

रामदासास नमन केलें आहे. महाराष्ट्रीं राज्य केलें । क्षात्र ब्रीद रक्षियलें । असें त्याचें वर्णन केलें आहे. मंगळवारीं देवीचें, बुधवारीं विठोबाचें, गुरुवारीं दत्तात्रयाचें, शुक्रवारीं विष्णूचें आणि शनिवारीं हनुमंताचें अशीं वारपरत्वें स्तोत्रें केलीं आहेत. शेवटीं संतांच्या भजनानें हें भजन संपविलें आहे.

( ३ ) भजनलहरीः— ह्या सुमारें ३६ पानांच्या पुस्तकांत श्री वासुदेवानंद सरस्वती स्वामी यांचें ४ शा. विक्रीडीतांत संक्षिप्त चरित्र दिलें आहे. नंतर एक करूणापंचक देऊन पुढें १०८ प्रार्थनापर अभंग दिले आहेत. वासुदेवानंद ह्यांचीं रमा व गणेश हीं मातापितरें होतीं. निर्मलेच्या तीरावरील माणगांवीं ते राहात असत. उपनांव टेंब्ये असून गोत्र अत्री होतें. गोविंद यति हे त्यांचे गुरु होत. पुढें वासुदेवानंदानीहीं संन्यास घेऊन धर्मोपदेश केला, व शेवटीं रेवातटीं गरुडेश्वरात देह ठेवला, असें त्यांचें चरित्र आहे. स्वामींच्या भजनांत बाळ गणूची उत्कट भक्ति व दर्शनार्थ खरी तळमळ दिसून येते. उ.:—

भेटीसाठीं कासावीस । होतें स्वामी हें मानस ॥ १ ॥ येईं येईं झटपट । देईंदेईं वेगें भेट ॥ २ ॥ माझ्या जीवींच्या जीवना । पाय पाहूं ही वासना ॥ ३ ॥ दावी दयाळा चरण । घालीतसें तुज आण । गणू बाळा होतां भेटी । तुझ्या पायीं पडे मिठी ॥ ५ ॥ ह्या भजनांत सर्वत्र भक्तीचा जिव्हाळा दिसून येतो. भजन साधें, सरळ व सुबोध झालें आहे. शेवटीं आत्मतृप्तीचे ढेंकरही दिलेले दिसतातः— अभंग ११५ पहाः—

ऐसा झाला माझा भाव । पाहूं तेथें वासुदेव ॥ १ ॥ ध्यान गेलें भान गेलें । मन तेहि लीन झालें ॥ दृष्टि स्वरूपीं वेधली । तेणें वृत्ति सुखावली ॥ ३ ॥ गणू बाळाचा आनंद । स्वामी वासुदेवानंद ॥ पुढें । योगियांचा राजा । मज सांपडला । तेणें लाभ झाला बहू थोर ॥ १ ॥ त्रैलोक्य नायक । वासुदेव भोळा ॥ प्रत्यक्ष पाहिला प्रेमभरें ॥ २ ॥

( ४ ) पोवाडाही स्वामींच्या चरित्रावर असून त्यांत त्यांचें धर्मोद्धाराचें कार्य, चमत्कार व ग्रंथकर्तृत्व वगैरे गोष्टी वर्णिलेल्या आहेत. शके १७७६ हा स्वामींचा जन्म शक व १८३६ हा समाधि शक सांगून । कृपाकटाक्षें लोक आंधळे तसे पांगळे कुष्टींला । मुके बधिर किती बरवे केले । संख्या

गणवे कोणाला ॥ वासुदेव गुरु करूनी गेले । यापरी सारी निज लीला । तत्पद नमुनी बाळगणूनें पोवाडा हा संपविला ॥ ७ ॥

(५ व ७) हीं सुमारें ४०।४२ ओंव्यांचीं दत्तस्तोत्रें आहेत. व ८ वें येसादादेवी स्तोत्र हें केवळ ६ शा. विक्रीडितें व १ भुजंगप्रयात ह्यांत संपविलें आहे. शेवटचा श्लोकः— सदा आइ अंबे दया पूर्ण ठेवी । असे प्रार्थना शाकरी माय देवी ॥ तुझें गाऊनी स्तोत्र बाई दयाळे । गणू बाळकानें तुला अर्पियलें ॥ ६ ॥ इ.

( ६ ) गोदामहात्म्यः—ह्यात कवीनें गोदावरीच्या प्रवाहाचें, उगमापासून बंगालचे उपसागरास ती ' सप्तगोदावरी ' नावानें मिळेतों, वर्णन केलें आहे. नांदेड हें तिचें नाभिस्थान आहे असें सांगून मोंगलाईतील तिच्या तीरावर असलेल्या ' बासर ' क्षेत्राचें वर्णन केलें आहे. नंतर फलश्रुति सांगून सुमारें २०० ओंव्यात हें संपविलें आहे.

धार्मिक व परमार्थिक वाङ्मयाचा जो पुरातन प्रवाह ह्या मराठवाड्यात चालत आला आहे त्यास मिळणारे हे बालनिर्झर बाळगणूच्या वाणीनें प्रगट झाले आहेत. भाविकांस त्यांत स्नान संध्याचमनादि विधींस निर्मल, शुद्ध व पावन भक्तिजल खास मिळेल.

---

# प्रकरण १३ वें. जोशी कविद्वय.

## काव्यालंकारभूषण विष्णु बाळकृष्ण जोशी सन १८८९

'कवि म्हणति वाणि ! वर्णुनि देवा, कीं सुज्ञ मानवा वेंच'

औरंगबाद जिल्ह्यांत तालुका कन्नड येथें यांचा जन्म शके १८११ त झाला. हे माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण. यांचें घराणें ज्योतिषांचें होतें. वाडवडिल गुणाढ्य होते पण धनाढ्य नव्हते. बालपणींच वडिल निवर्तल्यामुळें त्यांच्या शिक्षणाची आबाळ झाली. प्राथमिक शिक्षण व ब्रह्मकर्म ह्यांचा अभ्यास मामाकडे झाला. लहानपणापासून ह्यांस चित्रकलेची आवड होती; परंतु तीस योग्य प्रोत्साहन मिळालें नाहीं. मात्र ह्यांच्या मातोश्रींनीं त्यांचेकडून पांडवप्रताप, रामविजय, दासबोध, ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथ वाचवून घेतले. त्यामुळें त्यांच्या मनावर उत्तम संस्कार घडून कथा, पुराणें, स्तोत्रें, व देवपूजा, ह्या गोष्टींची त्यांस आवड लागली. ते स्वतःच अभंग व स्तोत्रें करून तीं स्वतःशींच गुणगुणत असत; परंतु ह्याही प्रवृत्तीस कोणाकडून उत्तेजन मिळालें नाहीं. एकदां पूजा करितांना त्यानीं स्वकृत अभंग म्हटला. तो असाः—देवा ! मला बोलाविसी । तरि येइन पायापाशीं । आईलाही मी आणीन । तिला आहे फार शीण ॥ २ ॥ पण तो ऐकताच सर्वांनीं त्यांवर रागाचा कहर केला. पुढें १६ वर्षांच्या सुमारास त्यास त्यांच्या प्रल्हाद मामांच्या सहवासांत रहाण्याचा योग आला. ते चांगले शास्त्री, गवई व हरिदास होते. त्यामुळें त्यांची काव्यस्फूर्ति पुनः पल्लवित झाली, आणि त्यांनीं 'दामाजी', 'सुदामजी' ह्यांवर आख्यानें रचलीं व संतांवर पदें केलीं. जेव्हां तीं बाळ ब्रह्मचारी विनायकबोवा टोपरे ह्याच्या पहाण्यांत आलीं तेव्हां त्यांनीं ह्या बाळकवीचें मोठें कौतुक केलें. हे केवळ स्फूर्तीनें काव्यरचना करीत; परंतु ती छंदशास्त्रास धरून आपोआप निपजे. पुढें त्यांनीं पंचमहाकाव्यें, साहित्यशास्त्र, संतकवींचीं कविता, व पुराणें ह्यांचा चांगला अभ्यास केला. त्यायोगें स्वभावतःच परमार्थाकडे असलेला त्यांचा ओढा आतां चांगलाच बळावला. आणि त्यांनीं आपल्या कीर्तनकार मामांस बरींच आख्यानें व स्फूट प्रकरणें रचून दिलीं. संतवाङ्मय व मोरोपंतांच्या

आर्या ह्यांची छाप विष्णुपंतांच्या कवितेवर स्पष्टपणें पडलेली दिसते. निर्यमक कविता त्यांस आवडत नाहीं. काव्य चिरकालिक होण्यास त्याचे विषय देश, धर्म व ईश्वरनिष्ठा हेच असले पाहिजेत. इतर क्षुद्र विषयां–वरील कविता काव्यपदवीस योग्य नसून त्या क्षणिक महत्त्वाच्याच होत, असें त्याचे मत आहे. त्यांनीं पुढील ग्रंथ लिहिले आहेत: —( १ ) कीचक-निधन—एक संगीत नाटक. ( २ ) संगीत सचित्र बंधकाव्यें. ( ३ ) श्रीकृष्ण वृत्तालंकार ह्यात १ ते २४ अक्षरपर्यंतच्या वृत्ताचा विचार केला आहे. ( ४ ) ‘ जनार्दन स्वामींचें चरित्र ’ लेखन चालू आहे. तत्कालीन वस्तूंच्या चित्रप्रतिमाही त्यानीं तयार केल्या आहेत. ह्याचें एक *अत्यल्प चरित्र त्यांच्या एका कन्नडकर कविमित्रानें लिहिलें आहे. त्यावरूनच ही माहिती दिली आहे.

ते म्हणतात विष्णुपंतांनीं आजपर्यंत जी विविध विषयावर कविता लिहिली आहे ती पुस्तक रूपानें प्रसिद्ध करावी असा त्यांचा मानस आहे. पण ह्या कार्यास लागणाऱ्या द्रव्याची अनुकूलता होईल तेंव्हां खरें ! यांची रचना भावना व प्रसाद ह्यांनीं परिपूर्ण आहे. त्यांचीं काव्यें पाहून सकेश्वर मठाधिपति जगद्गुरु शंकराचार्य यानीं त्यांस ‘ काव्यालंकार भूषण ’ ही पदवी दिली. ते प्रशस्तिपत्रांत म्हणतात “ आपलीं काव्यें ईशनिष्ठापरायण व भावनायुक्त आहेत. मोरोपंतादि कवींप्रमाणें प्रौढ व प्रासादिक आहेत. तुमची काव्यकृति पाहून साश्चर्य झालों आहे.”

सध्यां छापून प्रसिद्ध झालेले पुढील ग्रंथ रा. विष्णुपतांकडून मिळाले आहेत. त्याचा विचार क्रमशः करूं:—

( १ ) संस्थान अंमळनेर निवासी श्रीसाधु सखाराम महाराज—परंपरागत सद्वृंदाष्टक:—हे शके १८४० आषाढ शु. ११ जुलई सन १९१८ रोजीं प्रकाशित झालें आहे.

हें एक चिमुकलें चित्रकाव्य आहे. त्यांत द्वात्रिंशदक्षरबंधात्मक सन्नाम माला, शार्दूलविक्रीडितांतील आठ श्लोकांच्या चरणामधील तिसऱ्या अक्षरांतून क्रमशः साधून पुनः त्या त्या साधूचें पूर्ण नाव एकेका श्लोकांत आणिलें आहे. चित्रकाव्य म्हणजे अत्यंत दुर्बोध, हा जो सामान्य समज

---

* ना. न. फडणीस ह्यांच्या ‘ काव्य रत्नावलींत ’ चरित्र आलें आहे.

तो या ठिकाणीं खोटा ठरतो, इतकें सुबोध हें अष्टक झालें आहे. 'सद्वृंदाष्टक बालकृष्ण तनुजें हें विष्णुनें अर्पण' याप्रमाणें नवव्यांत पहिल्या ओळींत कवीनें आपलें नांव घालून 'स्वीकारोत हिला रसज्ञ रसिक-प्रेमें सुखा लाभली' अशी विनंति रसिकांस चवथ्या चरणात केली आहे. श्रीसंत सखाराम, साधु गोविंद, बाळकृण, श्री. प्रल्हाद, संत तुकाराम, कृष्ण, बाळकृष्ण असे ते सात संत होत. नमुन्याकरतां ४ था श्लोक खालीं दिला आहे:—

आहे बाहिर आंत पूर्ण सकल व्यापूनि लोकांतरीं।
ठेवी लक्ष तयावरी बहु धरी सद्भावना अंतरीं।
जो सत्कृत्य करीत पूजुनि हरी प्रल्हाद जो सज्जन ॥
शीतोष्णक्षम, शांत. त्या अमलनेरस्थां असो वंदन ॥ ४ ॥

ह्या अष्टकाच्या शेवटीं श्रीपांडुरंग ध्यानात्मक चतुर्गुच्छ मालाबंध सचित्र स्रग्धरा वृत्तांत दिला आहे. चित्रांत डाव्या बाजूस एकाखालीं एक पहिले दोन पदर, मध्यें विठोबा व उजवीकडे दुसरे दोन पदर दाखवून 'माला' विठोबाच्या गळ्यांत घातली आहे:—

माता त्राता पिता तूं अघभय हरिता ताप संत्रासहंता।
ताता गातां प्रतापा तव पदनिरता तारिसी त्या अनंता ॥
लीना दीना जनाची मति चरणयुगीं गीतसी लुब्ध व्हावी।
देवा पावा भवा या परिहरुनि कृपा पाडुरंगा करावी ॥ ९ ॥

नमुन्याकरितां बाजूस पहिला चरण माळेच्या पहिल्या पदरांत घालून दाखविला आहे. त्याप्रमाणें इतर करून पहावे. मधील अक्षरें संबंधानुसार पुन्हा घ्यावयाचीं आहेत. उ. वरील 'ती' हें 'माता' 'त्राता' 'पिता' असें तीनदां व खालील 'ता' 'हरिता' व 'ताप' असें दोनदां. या अष्टकांचें मूल्य 'संतसेवा' हें आहे.



( २ ) सत्यनारायण कथामृतः– ( शके १८४५ मूल्य धर्मसेवा ). हें सर्वपरिचित व लोकप्रिय व्रत स्कंदपुराणांतर्गत रेवाखंडांतलें आहे. त्या कथेचें सार थोडक्यांत मराठी पद्यात मोठया सुबोध रीतीनें दिलें आहे. लेखन शक 'निधिरामत्रसूभू' म्हणजे १८३९ असा दिला आहे. ह्यात कवीनें आपल्या याज्ञवल्क्य कुलाचा भारद्वाज गोत्राचा व त्रयोदशग्रामज्योतिषवृत्तीचा उल्लेख केला असून शेवटीं शार्दूल विक्रीडीतांत श्री सत्यनारायणाष्टक, त्याच्याच दोन आरत्या, व श्रीकृष्ण आणि पंचायतन आरत्या अशीं पद्यें जोडलीं आहेत. सत्यनारायण व्रताची कथा वाचणारे बहुतेक भिक्षुक अलीकडे संस्कृतानभिज्ञ आढळतात. त्यास हें 'कथामृत' जसें श्रीप्रद तसेंच श्रोत्यांस श्रवणमंगल होईल.

( ३ ) श्रीकृष्ण सहस्रनाम:—( शके १८५३ मूल्य हरिप्रेम ). हें ५४ वसंततिलका पद्यांत रचलें असून शेंवटीं पाठमहात्म्य संस्कृतांत दिलें आहे. ह्यास वारकरी संतमंडळीचा भक्तिहरिपाठ असें म्हटलें आहे. तुलसी सहस्रनामार्थ ह्याचा उपयोग केल्यास तें सध्यांच्या रुक्ष नामावलीपेक्षां अधिक मनोरंजक होईल.

( ४ ) वार्षिक व्रतपूजाविधि:—( शके १८५७ मूल्य १४ आणे ). प्रापंचिकापासून संतांपर्यंत लागणाऱ्या बहुतेक वार्षिक पूजा, आरत्या, स्तोत्रे, नामावळ्या, शास्त्राधार, पूजासंभार वगैरेची संपूर्ण माहिती ह्यात दिली आहे. पण काळ आता इतका बदलला आहे कीं हे विधि आस्थेनें करणारा सापडणेंच विरळा !

वरील तिन्ही ग्रंथ केवळ धार्मिक आचारांचे असल्यामुळें त्यांचें वाङ्मयीन मूल्यमापन करण्याचें कारण नाहीं. कवीच्या मन:प्रवृत्तीचा परिचय व्हावा म्हणून त्याचा नामनिर्देश केला आहे. त्यांचें मूल्य 'धर्मसेवा' 'हरिप्रेम' असें ठेऊन कवीनें ही आपली मोठी समयज्ञता दर्शविली आहे.

( ५ ) स्फुट कविता व बंधः—( अ ) ह्यांत तपोवन वर्णनात्मक एक १५।२० ओळींचा सुश्लिष्टशब्दयुक्त कटिबंध आहे. त्याचा आरंभ—
परमरम्य अतिपावन शीतल। विशाल तरूंची छाया निर्मल।... ... ...
मंद मंद गति मारुत विचरे हृद्य वन्य उद्यान सुशोभित। पुष्पभारयुत लता फलानें विनम्र तरुवर! कोकिल पंचमरवें निकुजित॥ असा करून शेवटः—

स्थितप्रज्ञ चिर वास करूनी लोकोन्नितितें दक्ष अक्षयीं ॥ सुविवेकें जिज्ञासु जनांनीं। आणुनि ध्यानीं एकनिष्ठपणें–दर्शन घ्यावें, अनुभवें सुखा पावावें" असा केला आहे.

( ब ) श्रीविश्वकर्माभिवादनक आर्याष्टकांत, द्वारका रचना, देवगिरी, धृष्णेश्वर, वेरुळचीं लेणीं वगैरेंवर पद्यरचना केल्याचा उल्लेख आहे. यावरच संस्कृत व हिंदी आरत्याही रचल्या आहेत.

( क ) कालप्रभावः—सुधारणेचा परिणाम !!! ह्यावर कवीनें एक कटाव रचला आहे. तो चटकदार असल्यामुळें थोडा मासल्यासाठीं पुढें दिला आहे.

... ... ... सूट बूट आणि गंजिफ्राकें, विविधवेष्टनें पाय कर्षिले, विजारभारी पाटलोन वरि, शर्ट ऐट वास्कोट कोट जरि ... ... ... ... लेडी फ्याशन वॉच मनगटीं ठाई'ठाई बंध बाधिले, नेकटाय आणि कॉलर वेढुनि, विदेशि ऐशा स्वच्छ रुमालें गळयांभोंवतीं फास घेतले ! ... ... स्वकरें करुनी श्मश्रूकर्मा, शिरावरिल नित राखी लोमा ! वासित तैलें भांग पाडिले, शिरोभूषणा भिरकावीलें, युरोपिअन् टोपीस घालुनी, विडी सिगारेट मुखीं पेटवुनि, चहा, बिस्किटें ब्राडी, अंडीं, अपेयपाना घडि घडि घेउनी, भक्ष्याभक्ष्यहि सर्व सेवुनि ! प्रौढ मिश्र गतधवा विवाहा, निज-मत संमत पतिपत्नींची निवड कराया, वैवाहिक पति सोडुनि भलता, पुनः वराया, सर्व जगाचें ऐक्य कराया। स्पर्शास्पर्शहि खूळ हराया,— — स्त्रीजनशिक्षणमताभिमानी, समान हक्कातें प्रतिपादुनि, सुधारणेचा गौरव वानी, संगति घेऊनि निजस्त्रियेला नेउनि दावी परकीयाला, हस्तां-दोलन करावयाला, स्वैरवृत्तिनें वरावयाला स्वतंत्रता दे विविधमतांला.॥इ.

( ड ) मूल व फूल यांवर ७ आर्या आहेतः—त्यांच्या आदि अंतींच्या आर्या अशा आहेत.

सुंदर मृदुल मनोहर शोभान्वित रम्य फूल अणि मूल।
निज सौन्दर्यें घालिती, नारीनर नयनमानसां भूल ॥
हांसुनि डुलुनि स्वगुणोत्कर्षें निज सौरभां पसरितात।
पर कार्यीं रत राहुनि, निजपीडा तापही विसरतात।

( इ ) स्त्री स्वातंत्र्यावर ही वरच्याप्रमाणेंच विडंबनात्मक कटाव रचला

आहेः—... ... ... ... ... करीं एकचि सुवर्ण बांगडी, टाईम पीसही पाहि. घडि घडी, निढळिं गळयामधिं खूण दिसेना, सौभाग्याची, भिंवयांच्यामधिं चमके टिकली.... ... सुगंध तैलें कुरळ केश बाजूस भांगुनी उलटुनि अंबाडयासि बांधले ! प्रफुल्ल गजरातळपे त्यावरी, फूल गुलाबी, गालावरिली कांति गुलाबी रंगें आणिली ! नेत्रावरतीं आरशी लाविली ! करीं वरी सोनेरी छत्री, ऐशा परिनें बरोबरीनें । मिरवत साजत गाजत फिरती । दांपत्याचा डौल दाविती, नवी संस्कृती । कोणाच्याही भया न धरिती, धर्म बापुडा, ' समाज उन्नति ' पाहुनि ऐसी विस्मित झाला ! ॥

———

आतांपर्यंत त्याच्या किरकोळ काव्यरचनेचे नमुने दाखविले. हेतु एवढाच कीं पंडित विष्णुपंताची रचना किती विविध आहे व त्याचें भाषाप्रभुत्व किती मोठें आहे ह्याची कल्पना यावी. आतां त्यांचें ' हंस सत्कार ' या नावाचें एक श्लिष्टरूपकात्मक १२५ आर्यांचें स्वतंत्र प्रकरण छापून प्रसिद्ध झालें आहे त्याचा विचार करूं. हें शके १८५७ मध्यें प्रसिद्ध झालें आहे.

## हंस–सत्कार

ह्या आर्याबद्ध अभिनव काव्यात प्रतिस्थळीं श्लेष व रूपक ह्या अलंकाराच्या साहाय्यानें प्रत्येक प्राणिमात्राचा वर्णाश्रमधर्म हा ईश्वरनिर्मित व अपरिवर्तनीय आहे, आणि ' स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभेत नरः ' हीं तत्त्वें प्रतिपादिलीं आहेत. अर्थात् समतावाद, अस्पृश्यतानिवारण, मंदिर-प्रवेश, रोटी–बेटी–जाति वगैरे बंधनांचा विच्छेद, इत्यादि साप्रतच्या नवनीति तत्त्वांवर ही उपहासगर्भ सनातनी टीका आहे. इंग्रजींतल्या ' सटायर ' ( उपहासात्मक काव्य ) सारखा हा काव्यप्रकार दिसतो.

ह्या लहानशा काव्यांत श्लिष्टरूपकानें तिहेरी अर्थ साधला आहे. पहिला वाच्यार्थ. हा अगदीं उघड आहे. हंस पक्षी ब्रह्मदेवाकडे जाऊन वर घेऊन यशस्वी रीतीनें आल्याबद्दल सर्व पक्षांनीं तदभिनंदनार्थ गरुडाच्या अध्यक्षतेखालीं सभा भरविली. सभेंत काहीं लब्धप्रतिष्ठित काक, पिक, बक, खद्योत, दिवाभीत वगैरेनीं विरोध करून आपलीं स्वतंत्र नवीन मतें मांडलीं. पक्षिणींनींही समतेच्या तत्त्वावर प्रसूतिकार्य पक्षानीं घेऊन निर्भेळ स्वातंत्र्य

द्यावें अशी मागणी केली. मयूर-भारद्वाजांनीं सर्व मताचा समन्वय केला. समतावाद अग्राह्य आहे, जातिधर्म ईश्वरनिर्मित आहेत, तेव्हां त्यांचा त्याग अशक्य आहे, असें शुकानें प्रतिपादन केलें. सरतेशेवटीं गरुडानें समारोपांत भविष्यकालाचें भेसूर भाकीत केलें व त्यांत असें सांगितलें कीं पुढें धर्म नीति व सद्गुण ह्यांचा लोप होऊन नवनीतीचा उदय होईल व काल्पनिक स्वराज्यसुखें मिळतील. खरें सुख मिळणार नाहीं. तेव्हां सर्वांनीं सत्कार्यप्रवण होऊन स्वधर्मनीतिरक्षण करावें असा उपदेश करून त्यानें सभा बरखास्त केली.

अर्थात् कवीचा हा कांहीं अभिप्रेतार्थ नव्हे. लक्षणेनें त्यानें सद्य प्रवृत्ति अनिष्ट असून त्यांचे भावी परिणाम समाजास घातुक होतील व अनवस्था प्रसंग येईल, तरी वेळींच सावध व्हावें, असें सुचविलें आहे. द्विज म्हणजे पक्षी व ब्राम्हण, ब्रम्हसभा-ब्रम्हदेवाची सभा व ब्राम्हणांची सभा, महात्मा बगळा म्हणजे दांभिक, कोकिळ म्हणजे कपटी, काक म्हणजे अस्पृश्य, खद्योत म्हणजे काजवा व किरकोळ वक्ते; मयूर-भारद्वाज पक्षी व मोरोपंत-भारद्वाजऋषींसारखे भारदस्त भाषण करणारे; द्विजतिलक-लोकमान्य पोपट व लोकमान्य शुकासारखे निस्पृह पंडित. अशा प्रकारचे श्लेष साधून वरील इष्टार्थ सांगितला आहे.

ह्या काव्यांतील श्लिष्ट पदांनीं तिसरा वेदांतपरही अर्थ ध्वनित केला आहे. तो थोडक्यांत कवीनेंच दिल्याप्रमाणें असा आहे. ह्यांत मूळ काव्यांतील शब्द कंसांत दाखवले आहेत.

ब्रम्हचिंतनांत असणारा [ब्रह्मसरोवर तीरावर] विवेक [हंस] हा आपल्या गती (हंसी) सह अंतःकरण प्रदेशावर (हिमालयावर) गेला. तेथें अंतःकरण विलास (सृष्ट चमत्कार) अनुभवून ब्रम्हावस्थेंत (सत्य लोकांत) जाण्यासाठीं त्यानें हृदयां (आकाश) त भ्रमण केलें (उड्डाण) तो ब्रह्मस्वरूपाशीं (ब्रह्मदेव सभेंत) तल्लीन (शरण) झाला. तेथें त्यास वर मिळाले. मग ब्रह्मस्वरूपानुभव (ब्रह्मदेव दर्शन) घेऊन विचारगती-सह परत स्वस्थळीं आला. प्रसन्नत्व सद्भावादि गुणसमुदायानें (द्विजगण) विवेकाला मान्यता (सत्कार) देण्यासाठीं महद्विचार प्रवर्तन (मोठी

सभा) करण्याचें ठरविलें. तदर्थं मनुष्यदेहस्थित सर्व मनोविकार (द्विजगण) उपस्थित झाले ! इ.

पुढील भाग दिलेल्या शब्दार्थांवरून सहज लक्षांत येईल:–क्रोध=(काक); मोह=(कोकिल); भय=(दिवाभीत); आलस्य=(गिधाड); कामादि अहंकार=इतर पक्षी; मनोविकारांच्या अवस्था=पक्षिणीसंघ; दंभ-बक (नामधारी महात्मा); सुविचार=शुक; सद्भाव=मयूर; भयनाशकज्ञान =भारद्वाज; धैर्य=गरुड; देवमदिर प्रवेश=ब्रह्मपद प्रवेश; अहंकारादि सर्व द्विजातींना पात्रता (प्राणीमात्राना) आहे. वगैरे.

तात्पर्यः–सध्या विवेकाचा (हंसाचा) सन्मान करून धैर्यानें (गरुड) आत्मज्ञानसंपन्न (विष्णुभक्ति) व्हा असा उपदेश करून उपसंहार केला आहे.

ह्या दिग्दर्शनावरून काव्याची कल्पना वाचकांस थोडीबहुत यावी. खरी मौज तें समग्र वाचल्यावरच कळणारी आहे. चित्रकाव्याची आवड कवीस किती आहे ह्याची खात्री मागील मालाबंधावरून होण्यासारखी आहे. ह्या अभिनव काव्यपद्धतींतही त्यानें आपल्या श्लेषवेदातप्रियतेची हौस पुरवून घेतली आहे. अशा प्रकारास काव्यशक्ति, भाषाप्रभुत्व, व समयोचित श्लिष्टशब्दयोजना ह्या गुणाची फार आवश्यकता असते; व ते कवींत उत्कटत्वानें वसत असल्यामुळें त्यानें हें काव्य मोठें सफाईदार सुबोध व मार्मिक असें केलें आहे. अर्थात् त्याची पुरणप्रियता जरी सर्वांस आजकाल पटण्यासारखी नसली तरी कुशाग्रबुद्धि व तरल कल्पना ह्याबद्दल त्याचें कोणीही कौतुकच करील. कांहीं काहीं वर्णनें मोठीं खोंचदार व चटकदार झालीं आहेत. पाहा:–(१) दांभिक पुढारीः–

जो तो कथी पुढारी मींच महात्मा खरेच मम बोल ! ॥
तोल न परि साभाळी !! धर्म रहस्यासि मानुनी फोल ॥ १४ ॥

(२) द्विज सभासदः–

पिक, बक, काक, कपोते शुक भारद्वाज पिंगळे गरुड ॥
चिमणि ससाणे चातक, कारंडव चक्रवाकगण वरुड ॥ ४९ ॥
हंसा कुमारि डॉक्टर मैना नर्सेस इंदु मिस्–सरला ॥
कवयित्री–साळुंका एम्. ए. सौदामिनी शुका–तरला ॥ ५१ ॥
प्रोफेसर ब्यारिस्टर टीचर सर उतरले धुरंधरसे ॥

आर बहादुर, मेजर डॉक्टर तर पसरले ढगासरिसे ॥ ५५ ॥
एवंविध पदवीधर पुच्छाग्रीं लाऊनी स्वपदवीला ॥
अग्रेसरत्व मिरविति; लेखुनियां तुच्छ ते स्वधर्माला ॥ ५७ ॥

विरोधक बक महात्मा:— थोर महात्मा[१](?) त्यागी[२] समतावादी[३] पुढें सरे बगळा[४] ॥
बोले 'उपवासी[५] मी' !! न कळत मासा[६] गिळी जरी सगळा ॥६५॥
स्मृतिशास्त्रें मानीना ईश्वरि[७] आदेश[९] त्या कसा होतो ? ॥
क्षणभंगुर[८] मत मांडी ! व्याख्यानें निजमतें द्विजा दे तो ॥६६॥
जितुके पक्षी असती तितुक्यांना नसति काय हे पंख ॥
हंसचि काय सनातन ? वर्णाश्रमधर्म बोलका शंख !! ॥६८॥

विरोधक अस्पृश्य काक:— कर्कश शब्द दुराग्रहि बोले-अस्पृश्य मानिती आम्हां
परि धर्मबंधु तुमचे येतों आम्हीच शेवटीं[१०] कामा ॥७३॥
अस्पृश्यता हरूनी द्विजसंमुदायांत पूर्ण मिळवावें ॥
विटाळ कल्पित आहे !! शुद्ध मतीनें जगांत कळवावें ॥७४॥

समानहक्कवादी स्त्रिया:— महिलासमाजतर्फे पुष्पा कमला सभेमधीं आल्या ॥
सर्वस्त्रियोपकारक संशयहारक खगांपुढें वदल्या ॥८७॥
संततिला नांव नको बापाचें, आइचेंच शोभावें ॥
इष्टेट मालकीची स्त्रीच्या आज्ञेंत गेह चालावें ॥८८॥
पुरुषांत रजोदर्शनपाळी हे पाळिनेंचि पाळावी ! ॥
तैसें गरोदरपण, प्रेमानें रीति हेहि चालावी ॥८९॥
कारण बरोबरीचे तुमच्या हे हक्क आमुतें सकल ॥
पूर्वी तुम्हींच दिले आतां ते चालवा न व्हा विकल ॥९०॥

लोकमान्य शुकभाई:— संपत्तीमधिं आहे लोकिं विषमता जगांत तो भेद ॥
इष्टेटीनें घडती नीचोच्चादीक वर्गही खेद ॥१०६॥
सर्वांना संपत्ती सारखि देऊनि ऐक्य करवावें ॥
मग जातिबंधनादि धर्माचारार्थ भेद नुरवावे ॥१०७॥

---

१. ईश्वरांश. २ कौपीनधारक. ३ समता पुरस्कारी. ४ दांभिक. ५ वारंवार उपास करणारा. ६ पेये मांसही खाणारा. ७ परमेश्वरी प्रेरणा. ८ चंचल. ९ स्वतर्कानें. १० पिंडस्पर्शावेळीं; अंत्यविधीला.

ईश्वरनिर्मित असती नैसर्गिक जातिधर्म गुणभेद ॥
कृतिरूपवर्णयोगें व्हावा कां आपणांसि मग खेद ॥१०९॥
अध्यक्षसमारोपः– गरुड वदे द्विजगण हो ! शांत रहावें कथासमारोप ॥
होवो सभा विसर्जन राखावा अंतरीं न तो कोप ॥११४॥

'सर्वसंग्रह' ह्या नांवाचा ५०० पृष्ठांचा एक ग्रंथ द. गो. खडेकर खानापूरकर ह्यांनीं प्रकाशित केला होता. परंतु आज तो ग्रंथ प्रकाशक व लेखक या उभयतांजवळही नाहीं; व दुसऱ्या कोणाजवळ असला तरी द्रव्याभावीं त्याचें पुनर्मुद्रण अशक्य झालें आहे. अशाप्रकारें वाङ्मयाची मोठी हानि होत आहे.

पंडित विष्णुपंतांचा लेखनव्यवसाय किती दांडगा आहे व तो निरपेक्षपणें कसा अव्याहत चालू आहे हें त्यांच्या पुढील गद्य-पद्य लेखांवरून सहज समजेल. पद्यः— (१) निसर्गांचा कायदेभंग-आर्या, (२) गुलाबकुसुमा–श्लोक, (३) भारतसम्राटप्रशस्ति–श्लोक, (४) श्रीकान्हा मुरलीवाला–पोवाडा, (५) मातृभूमिवंदन, (६) राधागान, (७) हरिहराभेदस्तोत्र–आर्या, (८) गोपीविरह, (९) श्रीसयाजीरावप्रशस्ति–आर्याबंध, (१०) लो. तिलकस्मृति–श्लोक-ज्ञानमंदिर, (११) श्रीकेळकरषष्ठ्यब्दिपूर्ति–प्रशस्ति–आर्याष्टक, (१२) माझी जन्मभूमि–श्लोक १३, (१३) ॐनमो वासुदेवाय–श्लोकबंध. (१४) सुभाषितमराठीप्रशस्ति–आर्याबंध. (१५) श्रीदुर्गा तोफ–दौलताबाद—पोंवाडा, (१६) राष्ट्राला भूषण झालें–पोंवाडा, (१७) खादी हें भूषण ठरवा–पोंवाडा. (१८) श्रीएकनाथ रणधीर–पोंवाडा. (१९) निजधर्म लयाला गेला–पोंवाडा. (२०) द्वादशमासवर्णन–श्लोक, (२१) प्रभुकरुणाकेका–पृथ्वी वृत्त. (२२) जैनधर्मसारवर्णन-पोंवाडा. (२३) कविता वनिता–श्लिष्ट–श्लोक, (२४) आर्यमहिलादेवी, (२५) एक काळ येइल ऐसा–पोंवाडा, (२६) श्रीराधाकृष्णानुरागः–संस्कृत पोंवाडा. इ. इ.

ह्या सर्व कविता वेळोवेळीं ज्ञानमित्र-पुणें; ज्ञानमंदिर–मुंबई; विश्ववृत्त–पुणे; काव्यरत्नावलि–जळगांव; अरुणोदय–औरंगाबाद इत्यादि मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. ह्याशिवाय आरत्या, स्तोत्रें, स्फुट प्रकरणें, विनोदी प्रकरणें स्वतंत्र आहेतच.

पंडितजी कवि असून पटाईत गद्य लेखकही आहेत. पुढील लेख वेळो-

वेळीं मासिकांतून आले आहेत:— (१) स्वार्थी जंबुक, (२) धर्माधर्मविवेक, (३) श्रीसयाजीराव ज्योतिषयोग, (४) नव्या सुधारणेचा नवा ईश्वर ! (५) धर्मोरक्षति रक्षितः, (६) श्रीनाथषष्ठी-पैठण, (७) श्रीयोगेश्वरी अंबा जोगाई, (८) विषमताविध्वंसक विद्वन्मंडल, (९) शारदा बिलाचा प्रताप, (१०) यज्ञाद्भवतिपर्ज्यन्यो, (११) ऐतिहासिक संत, (१२) संततिनियमनचर्चा, (१३) कालप्रभाव, (१४) शिवाजीमहाराजांची धार्मिकता, (१५) ब्राह्मण्य-रक्षण, (१६) शनीच्या दृष्टीचा प्रसंग, (१७) देवसेवा हीच देशसेवा.

मराठी संस्कृताप्रमाणें हिंदी भाषाही पंडितजींस अवगत आहे. 'कल्याण' मासिकांत 'शिवांक', 'योगांक', 'वेदांतांक' या विशिष्टअंकांत त्यांचे लेख आले आहेत. इतकें विविध व विस्तीर्ण गद्य पद्य वाङ्मय स्वतंत्र ग्रंथरूपानें आज जनतेपुढें असतें तर पंडितजींची गणना इकडेच नव्हे तर बृहन्महा-राष्ट्रांतही मोठ्या नामांकित कवींत व ग्रंथकारांत खात्रीने झाली असती. पण केवळ द्रव्याभावीं हें सर्व वाङ्मय दृष्टिआड होत चालल्यामुळें पंडित-जींचें नांवही तिकडेच नव्हे तर इकडेही स्मृतिआड होत आहे, ही मोठी खेदाची गोष्ट होय !

---

## गोविंद विष्णु जोशी (स. १८८९)

हे शांडिल्यगोत्री कोंकणस्थ ब्राह्मण. ह्यांचा जन्म अश्विन शुा ६ शके १८२१ मध्यें झाला. ह्याचें शिक्षण पुणें येथें न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालें. स. १९१० सालीं म्याट्रिक परीक्षा देऊन ते गुलबर्गा येथील नूतन विद्यालयांत शिक्षकाचे नोकरीवर आले. स. १९११ त त्यांस निझाम सर-कारच्या पी. डब्ल्यू. डी. कचेरींत नोकरी मिळाली. सध्या मेदक येथें ते ११० रु. वर हेडक्लार्कचें काम करीत आहेत. ह्यांस पहिल्यापासून मराठी, इंग्रजी वाङ्मय वाचण्याचा बराच नाद होता. पुढें वेदांताचा अभ्यास केल्यावर त्यांस कीर्तनाचीही गोडी लागली. स. १९३२ मध्यें दिवाळींत आध्यात्मिक करमणुकीसाठीं म्हणून त्यांनीं 'नामदेवाची दिवाळी' हें लहानसें आख्यान लिहून प्रसिद्ध केलें. ह्यास मराठी, इंग्रजी, उर्दू आणि हिंदी ह्या चारी भाषा चांगल्या अवगत असून त्यांत त्यांचें लेखन चालतें.

शिवाय कानडी व तेलगू ह्या भाषा त्यांस बोलतां येतात. ह्यांनीं निरनिराळ्या धर्मांचा तुलनात्मक अभ्यास केला असून जुन्या-नव्यांतून चांगलें असेल तेवढें ग्रहण करण्याकडे त्यांची प्रवृत्ति आहे. कीर्तनावर शास्त्र आणि कला या दृष्टीनें एक व कीर्तनसाहित्याचें एक अशीं दोन पुस्तकें सध्यां ते लिहीत आहेत. ह्यांनीं वेळोवेळीं खालीलप्रमाणें अनेक लेख लिहिले आहेत:—

(१) तूं माझा यजमान । रामा । पूर्वरंग—आख्यानरत्नमाला, नांदेड, शके १८५२
(२) 'हरिकथा'— टीकात्मक लेख—महाराष्ट्र-नागपूर, स. १९३२
(३) कीर्तनकारांवर अरोप, राजहंस—हैद्राबाद, स. १९३४
(४) कीर्तनांतील चरित्रें—मौज—दिवाळीचा अंक १९३४
(५) मराठ्यांचा गनिमी कावा—पुरुषार्थ— जून १९३५

आणखीही ४।५ लेख कीर्तनाच्या निरनिराळया अंगांवर त्यांनीं लिहिले आहेत. कारकुनाची नोकरी संभाळून जोशी ह्यांनीं वाचनलेखनाचा सतत अभ्यास चालू ठेविला आहे हें त्यांस भूषणावह आहे. तूर्त जरी त्यांचे नांवावर एखादा मोठासा ग्रंथ नसला तरी वरील संकल्पित ग्रंथ प्रकाशित झाल्यावर त्यांस ग्रंथकारांच्या मालिकेंत खास स्थान मिळेल अशी अपेक्षा करणें गैरवाजवी होणार नाहीं.

त्यांच्या 'नामदेवाच्या दिवाळी'ची रूपरेषा पुढें थोडक्यांत दिली आहे:—

## नामदेवाची दिवाळी.

हें लहानसें २२ पानांचें गद्यपद्यात्मक पुस्तक गोविंद विष्णु जोशी यांनीं लिहिलें असून तें आर्यभूषण छापखान्यांत स. १९३२ मध्यें छापलेलें आहे. शिमग्यांतील बीभत्स प्रकार जसे बंद पडत जाऊन लोकांचीं मनें सत्प्रवृत्तींकडे वळत आहेत त्याचप्रमाणें दिवाळींतील फाजील चैनीस आळा घालण्याच्या व त्या सणांतील कांहीं अनिष्ट प्रकार बंद पाडण्याच्या हेतूनें हें पुस्तक ग्रंथकारानें लिहिलें आहे. दीपावलींत इतर उपयुक्त कार्यक्रमांबरोबर कीर्तनाचाही कार्यक्रम ठेवल्यास ह्या आख्यानाचा उपयोग व्हावा अशी त्यांची आकांक्षा आहे आणि ती पुष्कळ अंशीं सफलही झाली आहे असें वाचकांस वाचनान्तीं वाटेल.

देव सगुणरूप धारण करून भक्ताचे लळे पुरवतो असें एकदां प्रारंभीं गृहीत धरून चालल्यावर ह्या आख्यानांतील पुढील गोष्टी सेव्यसेवकांमध्यें लौकिक व्यवहारांत आढळून येणाऱ्या गोष्टींप्रमाणें दिसतील. मात्र नामदेवानें विठोबा परत येईतों त्याच्या विटेवरील मूर्तीची जागा कशी घेतली हें समजण्यास बऱ्याचशा भोळया भावानें कल्पनेस ताण दिला म्हणजे झालें. त्यानंतर एखाद्या सन्मान्य सुहृद्मित्राला दिवाळसणास बोलवावें त्याप्रमाणेंच सर्व आख्यान सुरळीत सांगितलें आहे. मधून मधून प्रसंगोचित नामदेव, जनाबाई, ज्ञानदेव ह्यांचे अभंग, रागदारीचीं पदें, एक दोन आर्या वगैरेंनीं गद्य आख्यानास गोडी आली आहे. नामदेव व विठोबा ह्यांतील आमत्रणप्रंसगींचा संवाद कोटिबाजपणा व मृदु उपरोध ह्यांनीं चुरचरीत झाला आहे. तरी पण त्याची उभारणी देवभक्ताच्या प्रेमळपणाच्या पायावर झाली असल्यामुळें त्यांत बोंचकपणा नाहीं. हें आख्यान वाचून मनाला कशा सुखसंवेदना होतात हें ह. भ. प. व संतवाङ्मयाचार्य पांगरकरबोवा ह्यांच्याच शब्दांत सांगणें बरें म्हणून त्यांच्याच अभिप्रायांतील थोडासा उतारा पुढें दिला आहेः— "देवभक्तांचा अंतरंग· प्रेमा देवभक्तच जाणतात; पण सामान्य जीवांसही असल्या प्रेमकथेपासून भक्तीचा उपदेश अनायासें मिळतो. 'देव तो भक्त; व भक्त तो देव' असा देवभक्तांत अभेदभाव आहे. आपल्याला आवडणारे सुखसोहळे आपल्या परमप्रिय देवास अर्पण करावे हा भक्तांचा स्वभावच असतो. नाम आणि देव हे दोघे जेथें नांदतात तेथेंच दिवाळी सुखाची असते. नाम नाहीं आणि देव नाहीं ती खरी दिवाळी नसून होळीच असते. देव भक्तिवश आहे हें या कथेचें वर्म आहे. तें ध्यानीं ठेवल्यास व भक्तीनें देवाला भजल्यास साऱ्या आयुष्यभर दिवाळीचाच आनंद भोगतां येतो" हें आख्यान मुळांत वाचून तसा आनंद वाचकांनींही लुटावा.

---

# प्रकरण १४ वें.

## दत्तात्रेय बापूजी पद्माकर

### (स. १८९५ एप्रील ता. २३).

कशास कविता हवी कविवरा ! तुझी सांप्रतीं ? ।
अचेतन शवास जी न नवजीवना देइ ती ।
मृतापरि जगीं जिणें जरि न जाइ तें भालिचें ।
न मोल कवडीहुनी अधिक ये तुझ्या वाणिचें ॥

[प्र. पद्माकर पा. ३७]

हे औरंगाबाद येथील राहणारे असून ह्यांचा जन्मही (सन १८९५ मध्यें ता. २३ एप्रिल रोजीं) तथेंच झाला. ह्याचें प्राथमिक शिक्षण व पुढील म्याट्रिकपर्यंतचें इंग्रजी शिक्षण सरकारी शाळेंत व हायस्कुलांत झालें. नंतर त्यानीं काहीं दिवस सरकारी शाळेंत शिक्षकाची नोकरी केली. पण सेवावृत्तीचा त्यास स्वभावतःच तिट्कारा असल्यामुळें तींतून ते लवकरच मुक्त झाले. लहानपणापासून त्यास चित्रकला व गायनकला ह्याचा फार नाद होता. चित्रकलेच्या त्यानीं दोन तीन परीक्षाही दिल्या आहेत. गायनकलेंतही त्यांनीं उत्कृष्ट प्रावीण्य संपादन केलें. त्यांचे वडील भाविक वृत्तीचे असल्यामुळें त्यानीं आपल्या मुलास कीर्तनकार होण्यास प्रोत्साहन दिलें, व गायनाची बाजू तयार असल्यामुळे त्यांची ही वृत्ति साहजिक तिकडेच वळली. त्यासाठीं त्यांनीं रामायण, भारत, भागवत इत्यादि संस्कृत ग्रंथांचें त्याचप्रमाणें मराठींतील संतवाङ्मयाचें लक्षपूर्वक अध्ययन केलें. अनेक काव्यें, नाटकें व चरित्रें ह्यांचा अभ्यास करितां करितां त्यांसही काव्यस्फूर्ति झाली व ते आपल्या कविता हळू हळू मासिकां-कडे प्रसिद्धीसाठीं पाठवूं लागले. सन १९१८ पासून त्यांच्या कवितांस मनो-रंजन, विविधज्ञानविस्तार, धर्मजागृति, तरुण भारत, तत्त्वज्ञानमंदिर, उदय, अरुणोदयमाला, राजहंस, विहंगमाला, आख्यानरत्नमाला व काव्यरत्ना-वली इत्यादि नामांकित मासिकांत नेहमीं स्थान मिळूं लागलें. ह्याशिवाय

वेळोवेळीं प्रसिद्ध होणाऱ्या कांहीं विशिष्ट ग्रंथांतूनही त्यांच्या कविता येऊं लागल्या उ. विविध काव्यमाला, विस्ताराचा ज्युबिलो अंक, काव्यकौमुदी, विदर्भवीणा वगैरे. शेवटच्या दोहोत 'तन्मय राधा' व 'माझी कन्या' या त्यांच्या दोन कविता उद्धृत केलेल्या आढळतात. ह्यावरून त्यांचा काव्य-व्यासंग कसा जोरानें वाढत जात होता व त्यांच्या कवितांस सर्वत्र कशी मान्यता मिळत होती हें स्पष्ट होत आहे. ह्यानंतर सन १९२८ मध्यें 'प्रफुल्ल पद्माकर' ह्या नामाभिधानानें त्यांचा कवितासंग्रह स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध झाला. ह्या 'प्रफुल्ल पद्माकराचा' सुगंध अनेक रसिक भ्रमरांनीं विविध स्थळीं विखरून टाकल्यामुळें त्याची सर्वत्र चहा झाली. प्रो. खापर्डे, प्रो. पंगू व रा. र. मू. जोशी ह्यांचीं लहानमोठीं परीक्षणें प्रसिद्ध झालीं. प्रो. श्री. नी. चाफेकरांनीं त्यांच्या परागपरिमलाचा प्रस्ताव केला तर कविवर्य अनंततनय आणि साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकर ह्यांनीं आपली त्यास प्रशस्ति जोडली. शाळाखात्यानें तें पुस्तक बक्षिसासाठीं मंजूर केलें तर पुण्याच्या डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीनें त्यास बक्षीस दिलें. अशी सौभाग्याची समृद्ध परंपरा फारच थोड्या कवितासंग्रहांस लाभली असेल. तेव्हां हा अपूर्व सन्मान केवळ पद्माकर कवीसच व्यक्तिशः भूषणावह नसून तो औरंगाबादेस व सर्व मराठ-वाड्यासही भूषणावह आहे.

ह्याशिवाय पुण्याच्या रविकिरणमंडाळाच्या 'काव्यचर्चा' ह्या पुस्त-कांत त्यांच्या काव्यासंबधीं 'स्फुट विचार' ह्या लेखास स्थान मिळालें आहे. आणि ही गोष्टही कांहीं कमी अभिमानाची नाहीं. त्यांचा अप्रकाशित कवितासंग्रह प्रकाशिताहून किती तरी मोठा आहे. ह्यावरून त्यांच्या अवि-रत काव्यलेखनाची कल्पना येईल. मात्र अद्यापि त्यांनीं एखादें स्वतंत्र 'खंडकाव्य' अथवा 'महाकाव्य' लिहून प्रसिद्ध केलें नाहीं ह्याचें मोठें नवल वाटतें !

कीर्तनव्यवसायामुळें त्यांनीं बहुतेक सर्व बृहन्महाराष्ट्रांत प्रवास केला आहे. त्यांच्या कीर्तनाप्रमाणें त्यांचे गायनाचे जलसेही फार लोकप्रिय झाले आहेत. आणि आतां हेंच त्यांच्या चरितार्थाचें मुख्य साधन झालें आहे. ते कवि आणि गायक असल्यामुळें डेक्कन कॉलेज, न्यू पूना

कॉलेज, विवेकवर्धिनी यांसारख्या संस्थांच्या स्नेहसंमेलनप्रसंगीं त्यांस काव्यगायनाचीं आमत्रणें येतात. मात्र आज दहा वर्षे एकाच पहिल्या पाकळीशिवाय इतर नव्या पाकळ्या लोकांच्या दृष्टिपथांत येत नाहींशा झाल्यामुळें "पद्मास प्रफुल्ल करणारा पद्माकरांचा दिनकर एकाएकीं अस्तंगत झाला कीं काय अशी त्यांस शंका वाटूं लागली आहे. तेव्हां इतर पाकळ्यांच्या प्रकाशमानानें ती लौकरच ते दूर करतील अशी आशा आहे."

आतां पद्माकर कवींकडून त्यांच्या 'प्रफुल्ल पद्मकरा'कडे वळूं.

मनुष्यस्वभावाचें प्रतिबिंब त्याच्या कृतींत पाहावयास मिळतें असें म्हणतात तें रा. पद्माकरांच्या बाबतींत तरी आम्हांस तंतोतंत अनुभवास येतें. साधेपणा, ऋजुता, विद्याविनयसंपन्नता, कोमलता, सौम्य गांभीर्य व सौजन्य इत्यादि गुणांनीं ते जसे सकृद्दर्शनींच आदरणीय वाटतात तशी त्याची 'साजिरी गोजिरी' कवितासुताही या सर्व पैत्रिक गुणांनीं स्पृहणीय वाटते. काव्याच्या व्याख्या भिन्न भिन्न, कवींचे काव्यहेतु भिन्न, रसिकांच्या अभिरुचिही भिन्न; तेव्हां काव्याचें ठराविक लक्षण बांधणें मोठें कठीण आहे. अशा परिस्थितींत कवीनें स्वतःच दिलेल्या काव्याच्या व्याख्येनुसार त्याच्या कृतीचें परीक्षण केल्यास वावगें होणार नाहीं असें वाटतें. 'कवित्वासंबधीं कांहीं स्फुट विचार' या लेखांत रा. पद्माकर असें म्हणतात कीं:— 'मानवसृष्टींतील अपूर्णता भरून काढून जग सर्वांगसुंदर करण्याची उत्कट इच्छा कविहृदयांत असते...म्हणून मानवसृष्टि आणि सृष्टपदार्थ यांनीं होणारे आघात व त्यांनीं एकतानता करण्याचे विशेष धर्म ज्यांत आधिक्यानें वास करितात तो कवि'. या विचारात आणखी कांहीं भर कोणास कदाचित् घालावीशी वाटेल, परंतु या लक्षणांत कांहीं आक्षेपार्ह आहे असें कोणास वाटण्याचा संभव दिसत नाहीं. तेव्हां जग सर्वांगसुंदर करण्यास कवीनें काय योजना केली आहे व तींत त्याची भावनोत्कटता किती दिसून येते हें त्याच्या कवितासंग्रहाकडे विहंगमदृष्टि टाकून पाहूं या. कवि म्हणतो:— या अमृतमय व विषमय संसारांत तीव्र विषमता भरलेली दिसते. विषय मोहतात; विकार बळावतात; नीतीवर संकटें ओढवतात; अनीति सुखांत लोळते; त्यांत दैवाची प्रतिकूलता झाल्यास

'न चले सद्‌बुद्धि कांहीं तिथें' पुंप्रयत्न दुर्बल होतो; उदासीनतेनें 'मति चंचला' होते; तेव्हां 'धन्य एकादशीव्रत आचरीतां, पांडुरंग हाता येतो सत्य' अशा व्रतनियमांनीं तीस स्थिर करून मनास शुद्धता आणावी व तें भक्तिप्रवण करावें. भक्तिमार्गाशिवाय 'इतर मार्ग न सोपा' त्याचाच अवलंब करावा म्हणजे तो भक्तवत्सल 'नाशितो सकलही भवपाश' असें सांगून व्यक्तिगत सुधारणेची दिशा दाखविली आहे. व्यक्ती-नंतर समाजसुधारणेकडे कवि वळला आहे. संन्यासाचा पुरस्कार त्यानें कोठेंही केलेला दिसत नाहीं. तेव्हां गृहस्थाश्रमच त्यास अभिप्रेत दिसतो. सुगृहिणी, सुमाता, सात्त्विक प्रेम, मातृप्रेम, मातृवात्सल्य यांचे कवीनें गोडवे गाईले आहेत. 'बालक म्हणजे नव्हे मजा' असें म्हणून पितरांहातीं व शिक्षकांकडून त्यांची जी हेळसांड होत आहे ती न होऊं देण्याबद्दल बजा-वून भावी पिढी सुधारण्याचा मार्ग त्यानें दाखविला आहे; हुंड्यासारख्या घातुक रूढीचा निषेध करून समाज सुधारण्यास प्रयत्न कसे करावे हें सुचविलें आहे; सहनशीलता, परोपकाररतता, विश्वबंधुता, समता इत्यादि गुणांचा परिपोष राष्ट्रोन्नतीस अवश्य असून प्रसंगीं आत्मार्पणही कसें केलें पाहिजे हें अन्योक्तिद्वारा ध्वनित केलें आहे. परक्यांनीं सर्व नेलें, दारिद्य, दीनता, अन्नान्नदशा सर्व राष्ट्रभर पसरली आहे अशा वेळीं कवींनीं प्रेमाचे पोवाडे गात न बसतां जागृति करून दास्यविमोचनार्थ काव्यशक्तीचा उपयोग केला पाहिजे. राष्ट्राचे पुढारी थोर मनाचे व निःस्वार्थी असले पाहिजेत. 'श्रेष्ठता नसे वर्णाला। परि तत्कृतिला' हें समतेचें उदात्त ध्येय पुढें ठेविलें आहे. अज्ञान नाहींसें करून जनता सज्ञान करावी, उद्यम करावा कारण कीं 'उद्यमें भाग्य ये हाता.' स्वदेशीव्रत आचारावें सूत कांतावें; आणि अशा उपयांनीं देशोद्धार करावा, मग 'चिरसौख्या विलंब कुठला' असें कवि म्हणतो. या रूपरेखेवरून मानवजातीपुढें ठेवलेलें ध्येय व तत्प्राप्त्यर्थ सुचविलेले उपाय अगदीं निरपवाद आहेत असेंच कोणास-ही कबूल केलें पाहिजे. या विचारांच्या मांडणींत कवीचें कल्पनाचातुर्य, कळकळ, अनुभव, रसिकता, सूक्ष्म निरीक्षण इत्यादि गुण चांगले प्रतीत होतात. त्याचप्रमाणें विषयानुरूप शब्दयोजना, सरळ अन्वय, सुबोधता व व्याकरणशुद्धता हे गुणही सामान्येंकरून या संग्रहांत आढळतात.

तेव्हां रा. पद्माकरांचें काव्य 'वरील कसास चांगलें उतरतें असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं.

आतां दुसरी एखादी कसोटी यास लावून पाहूं या. कविवर्य व नाट्याचार्य श्री. कोल्हटकर एका ठिकाणीं काव्यासंबंधीं म्हणतात:— 'काव्याचा आत्मा वैचित्र्य, चमत्कृति अथवा अपूर्वता. त्याचा रोख रसिकांस आनंद देण्याकडे व सौंदर्याकडे असला पाहिजे.' या लक्षणांत निर्दिष्ट केलेले गुण जर आपण प्रस्तुत कवितासंग्रहांत शोधूं लागलों तर ते सृष्टिसुंदरीस, मेघ, शिशुहास्य, कृतार्थ राधा, तन्मयराधा व वसंतस्वागत यांत प्रामुख्यानें दिसून येतात. 'वसंतस्वागतां'त तर शब्दसौंदर्य, कल्पनासौंदर्य व अर्थसौंदर्य या तिहींचा मनोरम मिलाफ झालेला दिसतो. आनंद हेंच जरी काव्याचें उद्दिष्ट मानलें तरी तो प्रतीत होण्यास कल्पनांची सुसंगतता, सुश्लिष्ट रचना व प्रसाद हे गुणही अवश्य पाहिजेत. याचें प्रत्यन्तर 'मेघ', 'शिशुहास्य', 'मेघाची अकृतज्ञता' वगैरे कवितात पाहण्यास सांपडतें. 'रसात्मकं काव्यं' हें जरी अगदी खरें असलें तरी अलंकारांनीं काव्याची अपूर्वता वाढते हेंही तितकेंच खरें आहे. आतां अलंकाराचें जीवित क्षणभगुर म्हणूनच त्यांचें आनंददायी सामर्थ्यही क्षणिकच असते हें नाकबूल करतां येत नाहीं. तेव्हां यमकानुप्रासांनीं काव्यास जसें श्रुतिमनोहरत्व येतें तसें उपमारूपकादिकांनीं त्यास अर्थमनोहरत्व येतें. आम्हीं प्रारंभींच सुचविलें आहे कीं रा. पद्माकरांची कविता फारशी 'अलंकृतिमती' नाहीं; तरी पण ती अगदींच 'कनकमणिभूषाविरहिता'ही नाहीं. सणावारीं व प्रसंगोचित एखादी मोहनमाळ अथवा कंठा घालणारी विचक्षण रूपवती जशी रम्य दिसते तशी मधून मधून रसानुकूल यमकानुप्रास, उपमा, रूपक, उत्प्रेक्षा वगैरे अलंकार धारण करणारी त्यांची कविता अधिकच खुलते. तिचें सहजरम्यत्व ह्यामुळें कोठेंही विकृत झालेलें दिसत नाहीं. अपन्हुति, श्लेष, विरोधाभास, परिकर, आक्षेप, अन्योक्ति वगैरे इतर भूषणाचाही स्वीकार तिनें क्वचित् पण मार्मिकतेनें केला असल्यामुळें तेथें तेथें वैचित्र्यवृद्धिच झालेली आहे. भाषाशुद्धि व असंदिग्धता या गुणांनींही ही कविता प्रसादयुक्त झाली आहे. तेव्हां या कसोटीस ही कविता उतरते व हे कवि चांगल्या कविमालेंत बसण्यास योग्य आहेत असें आम्हांस वाटतें.

आतां या संग्रहाच्या विशिष्ट स्वरूपाकडे वळूं. त्यांत एकंदर ५१ कविता ७२ पृष्ठांत छापल्या आहेत. सरासरी दीड पानास एक कविता आहे असें म्हणतां येईल. तेव्हां सामान्यतः कविताही लघु व एकंदर संग्रहही लघुच असें म्हटलें पाहिजे. सर्वांत मोठी कविता तीन पानांची असून तींत साठ ओळी आहेत. आणि सर्वांत लहान म्हणजे चार ओळींच्या अशा तीनच आहेत. बाकीच्या आठ ते चाळीस ओळींच्या दरम्यान आहेत. यावरून कवीचा कल निरनिराळ्या विषयांवर लघुकाव्यें अगर चुटके लिहिण्याकडे दिसतो.

या संग्रहांतील कविता लघु असण्याचें मुख्य कारण त्या गीतकांच्या (Lyrics) अगर स्वनीतकांच्या (Sonnets) स्वरूपाच्या आहेत हें होय; व ह्यांचें वैशिष्ट्य संक्षिप्ततेंतच आहे. स्वनीतकांच्या तर चवदा ओळी ठरलेल्याच आहेत. आणि भावगीतें लघुत्वानेंच अधिक खुलतात. बृहत् अथवा दीर्घ काव्यासंबंधीं E. Allen Poe नें एका ठिकाणीं म्हटलें आहे:–"I hold that a long poem does not exist. I maintain that the phrase 'a long poem' is a flat contradiction in terms......on the other hand, a poem may be improperly brief. A very short poem, while now and then producing a brilliant or vivid, never produces a profound or enduring effect. There must be steady pressing down of the stamp upon the wax." तेव्हां अशा रीतीनेंही लघु कवितांचेंही समर्थन करितां येतें. परंतु 'सर्वमतिमात्रं दोषाय' या म्हणीप्रमाणें कवितेचेंही अतिसंक्षिप्तरूप विषयाची अपूर्णता व विचारांचा तुटकपणा या दोषांस पात्र होण्याचा संभव आहे. म्हणूनच (१) एक शिक्षक, (२) खरी विश्रांति व (३) त्याच्या न सौख्या सरी या तीन लघुतम कवितांवर हे दोष साहजिकपणें येण्याचा संभव आहे असें आम्हांस वाटतें.

आपण आतां सुनीतांकडे वळूं या. जरी चतुर्दशओळींच्या एकंदर कविता या संग्रहांत सात आहेत तरी कवीनें 'आत्मनिवेदनांत' सांगितल्याप्रमाणें त्यांत चतुर्दशपद्या तीनच आहेत. 'तो ईश कोठें वसे', 'तें प्रेम कोणीकडे'

व ‘ विमलेची निद्रा ’ हींच तीं तीन स्वनीतकें असा आमचा तर्क आहे. तो खरा आहे असें धरून जर आपण त्यांचें निरीक्षण केलें तर पार्श्वभाग-दर्शन, भावनेची उभारणी-तिचा विकास, विपर्यासरूपानें तिला दिलेली कलाटणी हीं स्वनीतकाचीं सर्व अंगें त्यांत उत्तम साधलीं आहेत. आणि भावनोत्कटता व परिणामकारकता हीं पण जोरदार झालीं असल्यामुळें त्यांस अद्‌भुतरम्यता आली आहे. पहिलें आनंदपर्यवसायी तर दुसरीं दोन शोकपर्यवसायी आहेत. पहिल्यांत इष्टफलप्राप्तीऐवजीं अनिष्टफलप्राप्ति दाखवून विषमालंकारानें निराशेची भावना कळसास नेली आहे. परंतु तीस एकदम कलाटणी मिळते व ‘ चामीकरं कंठगतं यथाज्ञा: ’ यांतील दृष्टान्ताप्रमाणें हरपलेलें श्रेय एकदम सापडतें; आणि तिचें आनंदांत पर्यवसान होतें. हें सर्व वर्णन फार बहारीचें झाले आहे. पण ‘ स्थिरच्चर व्यापुनि अवघें तो जगदात्मा दशांगुलें उरला ’ असें ज्याचें वर्णन आहे तो परमात्मा सर्व सृष्टि धुंडाळूनही कवीला कां सांपडूं नये याचें आश्चर्य वाटतें. परंतु त्यांत आश्चर्य तरी कसलें ? कवीची दृष्टि तूर्त स्वनीतकांतील कल्पनांचा चढउतार जुळविण्याकडे गुंतली असल्यामुळें पितृसेवेत गुंतलेल्या पुंडलीकाप्रमाणें ईश्वर इतरत्र ओळखण्याची त्याची लहर लागत नाहीं असें म्हणावें म्हणजे झालें ! दुसऱ्यात अपत्यप्रेम व वत्सलरस यांची पराकाष्ठा करून कवीनें एकदम मातृविरहदु:खात व चटका लावणाऱ्या करुणरसांत त्याचें पर्यवसान केलें आहे. तिसऱ्यांत ‘ देवा ! दावि तुझेंचि धाम विमला बोलूनि ऐसें निजे ’ या ओळीनें हुंड्याच्या राक्षसी रूढीचे घातुक परिणाम अत्यंत हृदयद्रावक रीतीनें दाखविले आहेत. होय. विमला निजते ! पण ती झोंप म्हणजे The sleep that knows no waking अशांतलीच झोंप ! ! हें स्वनीत फार परिणामकारक झालें आहे. परन्तु “ हुंडा पांच हजार द्या वदति गे ! जातां तुला द्यावया। आणूं कोठुनि ! केसही न इतुके डोईवरी माझिया ! । ” यांतील दुसऱ्या ओळीनें या सुंदर सुनीतास थोडेंसें ग्राम्यत्वाचें गालबोट लागलें आहे असें आम्हांस वाटतें.

आतां या संग्रहाचें विषयवारीनें वर्गीकरण करून प्रत्येक गटाचें क्रमाक्रमानें निरीक्षण करूं. हें वर्गीकरण स्थूल मानानें असें होईल:—(१) ईश्वर-विषयक, (२) सृष्टिविषयक, (३) प्रेम, (४) कवि व काव्य, (५) सद्य-

स्थितिपर व (६) वैयक्तिक. (१) ईश्वरविषयकः— कवीनें प्रारब्ध ग्रंथाच्या निर्विघ्न परिसमाप्तीसाठीं गजानन व शारदा यांचे स्तवनांनीं मंगलाचरण केलें आहे. साहित्यदर्पण, काव्यप्रकाश, काव्यादर्श, अलंकारसर्वस्व वगैरे अलंकारग्रंथांत केवळ वाग्देवता जी शारदा तिलाच नमन केलेलें आढळतें. परंतु जुन्या मराठी कवींच्या सांप्रदायाप्रमाणें कवीनें दोहोंस नमन केलें असावें. गजाननानें आपल्या 'शूर्पकर्णांनीं' हालविलेल्या वातापासून आपणांस काव्यस्फूर्ति व्हावी अशी याचना कवीनें केली आहे. शूर्पवत् दोषत्याग व गुणग्रहण करण्याचें सामर्थ्य आपणांस यावें असें जें कवीनें ' शूर्पकर्णा ' या साभिप्राय विशेषणानें सुचविलें आहे तें हृद्य आहे. आणि ईशगुणवर्णन आणि जनताजनार्दनसेवा हा जो कवीचा काव्यहेतु त्यास हें अत्यंत आवश्यक व उचित आहे. दोन शारदास्तवनें केवळ भिन्न भिन्न रागांत गातां यावीं म्हणूनच दिलेलीं दिसतात. म्हणून त्यांत अर्थापेक्षां गायनानुकूल कोमल वर्णरचनाच अधिक गोड व चित्ताकर्षक झाली आहे. या गटांतली ईशप्रशस्ति व दलार्पण अशीं दोन व कवीस, संसारांतील विषमता, आणि टिळकगुणस्मरण अशीं पुढील तीन यांत पृथ्वी वृत्ताची योजना केली असून त्या सर्वांवर मोरोपंती वळणाची पूर्ण छाप पडलेली दिसते. विचार, कल्पना, कोटिक्रम, शब्द व पदें यांच्या उपयोगांत संस्कृताची प्रचुरता, हालाहलविषप्राशन, रामनामग्रहणानें विषदाहशमन, नक्र, ध्रुव इत्यादि पौराणिक कथासंदर्भ, कां अंधता धरि, सुजनरक्षणीं इत्यादिकांनीं केलेली ईश्वराशीं सलगी वगैरे गोष्टींमुळे आपण केकावलिच वाचतों आहों कीं काय असें वाटतें.

या मोरोपंतांच्या अनुकरणांत गुणग्रहण आणि दोषत्याग केला असल्यामुळें तें सर्वथा स्तुत्य झालें आहे. 'अवतारकारण' (क. ९ वी) ही कविता सर्वांत मोठी म्हणजे साठ ओळींची असून 'भूपती खरे ते' या चालीवर गावयाची आहे. यांत कंसानें सुरवृंदांस बंदींत ठेवल्याचें सांगितलें आहे. परंतु याला भागवत, हरिवंश या ग्रंथांत आम्हांस कोठें आधार आढळला नाहीं. पुराणांतरी असल्यास न कळे. मात्र जरासंधानें २२००० धर्मिष्ट राजे बंदीशाळेंत ठेविल्याचा उल्लेख आहे. 'किति हळहळते अन्नहि पोटा नाहीं•••••• धड अन्नवस्त्रही कां न मिळावें तिजला' असें कंसाच्या

प्रजेचें वर्णन केलें आहे. परंतु तें सद्य:स्थितीचेंच आहे असें म्हणणें अधिक सुसंगत वाटतें. या सर्व कवितेंत असाच प्रयत्न दिसतो. पण तो चांगला-यशस्वी झाला आहे असें म्हणतां येत नाहीं. पुढें 'फेड तूं करुनि घे प्रभो! सांग लवलाही' यांत ध्वनित केलेली उसनें फेडण्याची अगर सूड घेण्याची कल्पना वैषम्यनैघृण्यातीत परमेश्वराशीं विसंगत दिसते. 'कंसाला मृत्यु पूर्वसंचितानें आला....हे नराधिपा ! स्वत:च्या कर्मशेषानें तुझ्या पुत्रास मरण आलें. मीं त्याला मारिलें नाहीं....मी निमित्तमात्र झालों···इ." असे शब्द हारिवंशांत कृष्णाचे तोंडीं घातलेले आढळतात. त्यांनीं ह्याच म्हणण्यास पुष्टि येते. पुढें देववृंदांच्या प्रार्थनेनें संतुष्ट झालेला विष्णु एकदम देवकीला 'माते' म्हणून हाक मारितो. तेव्हां ही सर्व मंडळी एकाच बंदिशाळेंत होती कीं काय ? कल्पनांच्या माडणींत येथें बराच गोंधळ झाल्यासरखा वाटतो. कांहीं भाषाव्याकरणादिकासंबंधीं व्यंगेंही आढळतात. 'सर्पानें गिळिलीं बाळें'—बाळें अजगर गिळूं शकतो, सर्प गिळीत नाहीं, तो दंश करतो. 'घाव मस्तकीं केला' घाव घालणें किंवा मारणें असा प्रयोग रूढ आहे. घाव केला हा कादाचित् प्रांतिक प्रचार असेल. 'ते दीन बापडे लागतात तव पायीं'—तीं दीनबापुडीं असें पाहिजे. कारण संबंध 'वसुदेवदेवकी' या शब्दाशीं आहे. एकंदरींत ही कविता अगदीं विस्कळीत व कमी प्रतीची दिसते. यावरून दीर्घ कवितांपेक्षां लघु कविताच कवीस अधिक सफाईनें करितां येतात असें अनुमान काढल्यास तें चुकीचें होईल असें वाटत नाहीं. भक्तिमार्ग यांत (कविता ११) वामन पंडिताचें व एकादशी (कविता १३) मध्यें तुकारामाचें अनुकरण चांगलें साधलें आहे. सारांश, या गटातील कवितांत प्रकट केलेले विचार जुन्या संतवाङ्मयास धरून आहेत. विशिष्ट मतप्रतिपादनाचा हेतु त्यांत दिसत नाहीं.

(२) सृष्टिविषयक:— यांत 'सृष्टिसुंदरीस', 'निसर्गाची असहकारिता', 'वसंतस्वागत', 'मेघ', 'मेघाची अकृतज्ञता', 'धन्यसुमन' व 'सहजसौंदर्य' असें कवितासप्तक येतें. यांत कवीची कल्पना स्वतंत्रतेनें संचार करतांना दिसते. म्हणूनच तिचें मुग्ध सौंदर्य पदोपदीं दृग्गोचर होतें. यांतील उत्कृष्ट स्थलें रसज्ञ चापेकरांनीं आपल्या प्रस्तावनेंत दाखविलींच आहेत. त्यांची पुनरुक्ति

येथें करण्यास स्थलावकाश नाहीं. परन्तु इतर कांहीं स्थळें नमुन्यादाखल खालीं दिलीं आहेत:—

(१) जलबिंदू जे तृणांकुरावरि ।
शालु बुट्यांचा हरित रंगि जरि ॥
(२) मधुकर उडतां कर्णफुलांवरी ।
सुखवाया तिज मधुर रव करी ॥
गानें मोहुनि त्याच्या मुखिं भरि ।
त्यांतिल मकरंदाची धारा ॥

पहिलींतील रूपक व दुसरींतील "परिवृत्ति" या अलंकारांनीं या ओळींस फार रम्यत्व आलें आहे.

(३) नद्या सागरसंगमीं शुष्क झाल्या ।
नाहि आलिंगन सागरास गेल्या ॥
दूरदेशीं त्या लागती वहाती ।
असहकारित्वें मुग्धता वरीती ॥

यांतील नायिकेची प्रणयकलहातील असहकारिता मोठ्या खुबीनें ध्वनित केली आहे. एकंदरींत असहकारिता या कवितेंतील शब्दयोजना मोठी समर्पक असून कल्पनाही अत्यंत मनोहर आहे. परंतु या प्रकरणांतील असहकारितेचा मूळ कार्यकारणभाव प्रतीत होत नाहीं. एका जलदानें ती केल्यामुळें आपोआप ती सृष्टींत सर्वत्र दिसत आहे हें ठीक आहे. परंतु जलदानेंच ती एकदम कां आरंभिली ह्याचें गूढ कळत नाहीं. म. गांधींची ही चळवळ सन १९२१ मध्यें सुरू झाली होती. ही कविता त्यावेळीं लिहिली गेली होती कीं काय हे समजत नाहीं. सन १९२८ सालीं या चळवळीस उतार झाला होता. नव्हे ती थंडावलीही होती. मग प्रस्तावनेंत प्रो. चापेकरांनीं ती सद्यस्थितिदर्शक आहे असें म्हटलें आहे तें कोणत्या गोष्टीस अनुलक्षून आहे हें समजत नाहीं. त्यावर कवीनें अगर प्रस्तावनालेखकानें अधिक प्रकाश पाडला असता तर सामान्य वाचकांस मोठा लाभ झाला असता. 'वसंतस्वागत' अपूर्व झालें आहे. स्वागताची तयारी फार मार्मिकतेनें वर्णिली आहे.

(१) अरुणोदय नच ती सती ।
मळवट भरि भालीं रति ॥
(२) रंगवल्लि पथिं रंगवि ।
दिसती त्या न सुमलता ॥

यांतील 'अपन्हुति' कोणाला मोहणार नाहींत ? ही कविता सर्वच मधुर आहे. आणि 'प्रिये पहा रात्रीचा' या मधुरतर चालीनें तर ती संपूर्ण हृदयाचे आंदोलन करिते. 'मेघ' ही कविताही सर्वांगसुंदर असून तींत एक कल्पना दुसरीस कशी सहज प्रसवते व कवि तीस रमणीय मूर्त स्वरूप कसें देतो हें पाहाण्याची मोठी मौज आहे. 'कासवाकृति । जणु गमे ती।' ही अगदीं नितांत रमणीय नवीन कल्पना खुद्द कवीच्या मालकीची म्हणून रसिकजनांत दीर्घकालपर्यंत कौतुकास्पद होईल. 'धन्यसुमनांत' कितीही अपमान सहनकरून स्वार्थी जगावर उपकार केले तरी त्यांचें कधीं चीज होत नाहीं, तेव्हा प्रभुसेवेस शरीर लावून धन्यत्व मिळवावें असें अन्योक्ति-द्वारा कवीनें सुचविलें आहे. परंतु फलापेक्षाविरहित नैष्कर्म्ययोगानें कर्तव्य करीत राहणें यांत धन्यत्व नाहीं काय ?

(३) प्रेमविषयकः— यांत दांपत्यप्रेम, मातृप्रेम व राधाप्रेम असे तीन पोटविभाग करिता येतील. पहिल्या दोहोंत संसारातील शुद्ध प्रेम व तिसऱ्यांत शुद्ध सात्विक प्रेम याचे नमुने आपले पुढें ठेविलेले दिसतात. पहिल्यांत सुगृहिणी, विरहिणी व खरी विश्रांति; दुसऱ्यांत सुपुत्र इ. शिशुहास्य, तें प्रेम कोणीकडे व माता आणि कविता, आणि तिसऱ्यांत तन्मयराधा, कृतार्थराधा व वेणुनाद यांचा अंतर्भाव होतो. पतिपत्नीसबंध हल्लीं पूर्वीच्या ध्येयापासून पुष्कळच दुरावत चालला आहे अशा वेळीं 'धन्यो गृहस्थाश्रमः' अथवा 'धन्यं तस्य सुमानुषस्य कथमप्येक हि तत् प्राप्यते' यातील पुरातन उच्च ध्येयाची नवीन पिढीस कवीनें आठवण देऊन तिजवर उपकारच केले आहेत असें वाटतें. 'शिशुहास्यांत' मातृवात्सल्याचें निर्हेतुक प्रेम फार बहारीचें वठलें आहे. परंतु हें शिशुहास्य 'अनियतरुदितस्मितं विराजत्' अगर 'आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्त हासैः' अशा प्रकारचें निरागस नसून 'किती रे धूर्त ! शिशुपणीं बाळा' यांत सांगितल्याप्रमाणें धूर्ततेचें आहे असें जेव्हां कळतें तेव्हां वाचकाची कौतुकाविष्टदृष्टि माता व बालक

यांच्यावरून उडून त्यांच्यामागून डोकावणाऱ्या कवीकडे वळते! पुढील विभागांतील राधेची अनन्यभक्ति व सात्त्विक प्रेम हीं फार सरसतेनें वर्णिलीं आहेत. 'निर्लज्ज चित्त हरि हें तुजला वरीतें' अशा प्रकारची पहिल्या कवितेंतली स्थिति, दुसरींतला नाट्यसंवादानें दाखविलेला विषयातीत संभोगशृंगार, 'बनले वेडी, पुरी तरी बाई' ही वेणुनादातली जीवनमुक्त स्थिति, म्हणजे सात्विक प्रेमाच्या कळसास उत्तरोत्तर क्रमानें येणारी सोपानपंक्तिच भासते. परंतु कृष्णाला इकडे तिकडे वेड्यापरी हुडकणारी साधी भोळी राधा जेव्हां शुकसनकादिक योग्याना 'जो गवसे ना श्रीहरि' असे म्हणून एकदम सुशिक्षिताचा वेदान्त सांगू लागते तेव्हा मात्र वाचक थोडासा चमकल्याशिवाय राहत नाहीं.

(४) कवि व रसिकः— यात चार कविता येतात व त्यांवर केशवसुती वळणाची व विचारांची बरीच छाप पडलेली दिसते. उ.

(१) अचेतन शवास जी नवजीवना देई.
(२) स्वदेश दारिद्र्यें शिणला।
(३) युवयुवतींच्या प्रेमाचीं।
सुंदर गाणीं गायाचीं।
संधि असे का कविराया।

परंतु 'कवितेचें प्रयोजन', 'स्फूर्ति', 'तुतारी', 'नवा शिपाई', 'गोफण' यांतील तडफ, आवेश, रोखठोकपणा या केशवसुती गुणांचा केवळ अस्फुटच ध्वनि येथें प्रतीत होतो. उघडच आहे, प्रचड तुतारीपुढें कोमल अलगुज काय ऐकूं येणार? 'कवीस विनंति' या कवितेंत कवि व यशःश्री यांचें लग्न लावून तिचें खालील प्रमाणें वर्णन केलें आहे.

निज पतीस सुखवावया कर जुळुनियां फिरते निशिदिनिं मागं।
तया राखिते प्रसन्न मधु वदुनियां।
ज्या प्रासादीं उपवनीं पर्वतीं जनीं करितो विहार त्यामागुनि।
धावते ती सती दिनयामिनी॥

हें यशःश्री वधूचें वर्णन अनुभवाच्या व कविजनसांप्रदायाच्या अगदीं विरुद्ध भासतें. कारण कोठेंही केव्हांही थोर विभूतीच्या संचारापूर्वी त्या

विभूतीची कीर्ति पुढें संचार करिते असाच अनुभव आहे. व यावरून रूढ झालेला कविसंकेत असाच सर्वत्र आढळतो. पाहा:—

(१) दूरेऽपि श्रुत्वा भवदीय कीर्तिं कर्णौहि तृप्तौ नच चक्षुषी मे ॥

(२) राखीं नळा निज यशोमय हंसराया ।
आलों महीवर फिराद अशी कराया ।

यावरून ही यशःश्री वधू पतीच्या मागून मागून हात जोडून जाणारी लाजरी स्त्री नसून पुरोगामी व स्वैरसंचार करणारी आहे हे स्पष्ट दिसतें. शेवटल्या उदाहरणात हंसाचें रूपक असलें तरी तो यशोहंस नळाच्या मागें मागें चालत नसून पुढें पुढेंच स्वैर भराऱ्या मारीत गेला आहे. आणि म्हणून 'फिराद' करण्याचें कारण घडलें आहे. तेव्हां कवीच्या वर्णनांत औचित्यहानि झाली आहे असें आम्हांस वाटतें.

(३) सद्यःस्थितिपरः—यांत 'चिरसौख्या विलंब कुठला ?' 'सन्मित्रसुमन' 'सुपथसंदेश,' 'उद्यमें भाग्य ये हाता', 'वानीन त्याच आर्या', 'क्षत्रियास', व 'वकील' अशा सात कवितांचा समावेश होतो. दुर्गुणांचा त्याग करून व सद्गुणांचा स्वीकार करून उद्यमानें गतवैभव संपादावें असा केलेला उपदेश कोणासही आदरणीयच वाटण्यासारखा आहे. क्षत्रिय व वकील यांस केलेला उपदेश थोडासा झणझणीत आहे खरा पण सद्यःस्थितींत तो आवश्यक नाहीं असें कोण म्हणेल ! या प्रकरणावरही जागोजाग केशवसुतांच्या विचाराची छाप पडलेली दिसते.'

(६) वैयक्तिकः—गायन, अभिनय व सौंदर्य इत्यादि गुणालंकृत असे नटसम्राट बालगंधर्व आणि नाट्याचार्य श्री. खाडीलकर यांचा योग्य शब्दांनीं केलेला गौरव सर्वांस मान्य होण्यासारखाच आहे. त्याचप्रमाणें 'टिळकगुणस्मरणां'त लोकमान्यांचें गुणवैशिष्ट्य सांगून त्यांच्या गुणांच्या अनुकरणानें "या परी स्मारका करा सविनयें जनां विनविं मी न मानाल का ?" त्यांचें स्मारक करण्यास केलेली ही विनंति कोण मान्य करणार नाहीं ? गुरु म्हणून केशवसुतांकडे कवीचा ओढा अधिक असणें स्वाभा-

टीपः— १ न माना नीच कोणाला. २ पाजळुनी शान मशाले.
३ तरी ना आन्हेरीं सजिवपणीं तूं उद्यम जरा.

षिक आहे. त्यांजवर त्यांनीं दोन कविता लिहिल्या आहेत. पहिलींत त्यांच्या अवर्णनीय काव्यप्रवाहाचा व विशेषतः ‘तुतारी’ व ‘झपुर्झा’ या कवितांचा उल्लेख करून ‘तुतारीं’तील तीन पद्यांचा सारांश थोडेसे शब्द बदलून “तुतारीच्या नादें खडबडुनि जागे जन करी’ या एकाच कवितेंत कवीनें सांगितला आहे. परंतु ‘तुतारी गर्जोनि कळवळुनियां सांगत सुधी !’ यांतील ‘कळवळुनियां’ हा शब्द अगदींच सौम्य व मवाळ भासतो. कारण ‘धिक्कार अशा मूर्खा लागुनि ! । भ्याड बनुनियां रडतां ।...... रडतील रडोत रांडा पोरें ।......स्त्रैण न व्हा तर वीरांनो ! तर पुढें सरा-रे । आवेशानें गर्जत हर हर !’ । हे कळवळुन सांगणें आहे का ही आवेशाची मर्मभेदक गर्जना आहे हें सहज समजण्यासारखें आहे. व कवितेच्या शेवटीं ‘केशवसुताचे सच्चे चेले’ गोविंदाग्रज यांचा आदरपूर्वक उल्लेख, केलेला आहे. आणि त्यांच्या वळणाचें थोडेसें अनुकरण ‘दुर्मुखलेला’, ‘कविता आणि कवि’, ‘आम्ही कोण’, ‘सतारीचे बोल’ स्फूर्ति, वगैरे कवितांचा नामनिर्देश करितांना केलेलें दिसतें. ‘केशवसुत गेले’ इ. पाळण्याची चाल करुणरसानुकूल आहे; परंतु गोविंदाग्रजांची ‘केशवसुत मेले’ ही कविता अधिक ठसकेदार भासते. निरनिराळ्या कवितांचे साभिप्राय शब्दांनीं गोविंदाग्रजानें केलेले उल्लेख अधिक मार्मिक व उठावदार दिसतात. एकच नमुना पाहा:– मारुनियां ‘गोफण’ काळा निज ‘निशाण नभिं फडकाविलें । ऐकतांचि विजयी तुतारी । हो चिरंजीव ‘म्हातारी’ । मग वाजवितां सतारीं’ । सर्वत्र ‘झपुर्झा’ झालें । केशवसुत गाऊनि गेले ॥ हें अर्थसौंदर्य व हा चटकदारपणा खरोखर अप्रतिम वाटतो. “कालाय तस्मै नमः” सारख्या राहिलेल्या एखाद दुसऱ्या कवितेसंबंधीं विशेष सांगण्यासारखें दिसत नाहीं.

आतां आमच्या समजुतीप्रमाणें कांहीं दोषस्थलें दाखवून हें प्रकरण आटोपतें घेऊं.

(पान २) तवयशसरितौघजलीं (त्वद्यशः सरितौघजलीं), (पा ३) अमरगण नमित (अमरगणनत (?), कमलवदन बिंबाधरे (कमलवदने बिंबाधरे), नटे (‘नटा’ याचें संबोधन दिसतें; परंतु नट याचें (स्त्री. लिं.) नटी असें होतें.) (४) न वर्णवें (न वर्णवे), शेषहि श्रमित जाहला (श्रांत) चरण पद्म चुरित

(चरण चुरणें ठीक, पण चरणपद्म चुरणें चमत्कारिक.) कष्ट मावळे (चांगल्या गोष्टींकडे प्रायः उपयोग), (७) सौंदर्यातिषयें (सौंदर्यातिशयें)

(१६) सत्संगा भुलुनी रमा न गणिली धावे पुढें मागुनी...श्रीविष्णु... श्रीविष्णु हा कर्ता धावे व करितसे यांचा; पण 'गणिली' याचा कर्ता कोण ? अध्याहृत ?

(२१ क.) कमलपंक्ती विकसती या अनेकवचनी नामाबद्दल पुढें "ती" एकवचनी सर्वनाम आहे. (कमलपंक्ती विकसते असें घालावें.)

(२० क. ४) वृक्षशाखाची आर्द्रता गळोनी...त्या शुष्ककाष्ठ झाल्या: आर्द्रता म्हणजे आंगाबरोबरचा ओलसरपणा हा टप टप गळून जाण्याजोगा जलप्रचुर नसतो.

(३५) मंगलधामा पुरविसि कामा, विसरला ब्रीद न आपुलें कदा. 'पुरविसि' द्वि. पु. नंतर लागलेंच 'विसरला' तृ. पु. रूप अयुक्त. विसरती घालावें.

(४३) अनयवर्तनी जन पेक्षां 'अनयवर्ती जन' बरें. किती जन वसे क्रियापद अ. व. पाहिजे.

(४२) जोमें आश्रया देती; ७० कुजट कर्दमीं. जोमें व कुजट ग्राम्य.

या ठिकाणीं प्रो. चाफेकरानीं प्रस्तावना पान १६।१७ मध्यें दाखविलेल्या दोषस्थलांची पुनरुक्ति केलेली नाहीं. सर्व जमेस धरलीं तरी तीं फारशीं नसून वैगुण्य आणणारीं नाहींत. यांत कांहीं तर केवळ छपाईचे दोष आहेत, तर कांहीं प्रांतभेदामुळें घडले आहेत. कवीनें जरा अधिक काळजीपूर्वक नजर फिरविली असती तर त्याच्या कवितांत एकही दोष राहिला नसता असें आमचें मत आहे. आपल्या काव्याच्या सौंदर्यास दृष्ट लागूं नये म्हणूनच कवीनें तिकडे दुर्लक्ष केलें कीं काय न कळे !

असो. येथपर्यंत मानवसृष्टींतील अपूर्णता भरून काढून जग सर्वांगसुंदर करण्याचा प्रयत्न कवीनें कसा केला आहे व तसें करितांना आपले विचार व कल्पना हीं भिन्न रुचींच्या मनुष्यांस पटविण्यासाठीं त्यानें तीं निरनिराळ्या रंगांत कशीं रंगविलीं आहेत व त्यांत अपूर्वता व मनोरमता हीं कशीं साधलीं आहेत हें दाखविलें. तसेंच येथें जुनी, नवी व गायमानुकूल अशा तिन्ही प्रकारच्या कवितासरितांचा संगम त्रिवेणीसंगमा-

प्रमाणें कसा चेतोहर व पावन झाला आहे हेंही दाखविलें. नंतर विषयवार वर्गीकरण करून यथामति त्यांचें पर्यालोचन केलें. सुभाषितें, उत्तम स्थळें, वाक्प्रचार, म्हणी, मित पण सुंदर अलंकार यांचा निर्देश करून छोट्याशा संग्रहास वैदग्ध्य कसें लाभलें आहे हें व्यक्त केलें. आणि सरतेशेवटीं क्वचित् आढळून येणारीं कांहीं दोषस्थळेंही दाखविलीं. या सर्व गोष्टींवरून कवि बऱ्याच वरच्या स्थानास योग्य आहे, व तो वाढत्या व्यासंगाबरोबर अधिक अधिक योग्यतेस निःसंशय चढेल असें आम्हांस वाटतें. यांत प्रतिभेच्या उच्च भराऱ्या, उच्छृंखल विनोद, अचाट कल्पना अथवा निसर्गाशीं होणारें समरसत्व प्रतीत होत नाहीं हें खरें; तरी पण संगीतानुकूलता, श्रुतिमनोहरत्व, पदलालित्य, कोमलत्व व अर्थसूचकता इत्यादि गुणात या कवितांचें वैशिष्ट्य खास राहील, व ही कवितासुता 'कांतासम्मितयोपदेश-युजे' यांत सांगितल्याप्रमाणें आपल्या मंजुजात्सितानें रसिकांस रिझवील व आपल्या पित्यास व वाचकांसही 'चतुर्वर्गफलप्राप्ति' करून देईल अशी आम्हांस उमेद आहे. सारांश, या सत्काव्यकोकिलाच्या पंचमालापाचें मधुर कूजित असेंच आम्हांस वारंवार ऐकण्याचा लाभ मिळो अशी आशा प्रदर्शित करून हें फार लांबलेलें विवेचन समाप्त करितों.

थोडेसे उतारे पुढें दिले आहेतः–

## उतारे

**सृष्टिसुंदरीस** (पान १९) [चाल– मज गमे ऐसा जनक तो.]

मन रमे बघतां ही धरा, सलिलपूर्णा ॥ध्रु०॥ जलौघ नच परि दिसे पदर जरि । लहरी झळकती विविधशा परी ॥ हरितांबरिं कीं सृष्टिसुंदरी । नटली यापरि सुंदर दारा ! जलबिंदू जे तृणांकुरांवरि । शालुबुट्यांचा हरित रंगि जरि— शोभवितो, जन हृदयातें हरि । होई बघतां सुख सकल नरां !

**वकील** (चाल– वीर शिरोमणि सकल...)

प्रतिष्ठितपणें मिरवायातें मिळेल धंदा असा । वकिलीविण न दुजा योग्यसा । जगीं सांठल्या अवघ्या जेणें ज्ञानाचा लाभ हो । असा हा नामी धंदा अहो !। प्रयत्न नलगे नेतेपण तें आपोआपच मिळे । पाठिशीं जन-

समुदायहि वळे!। अंध बिचारे विश्वासानें देति गळे त्या करीं। परि हा वकील फिरवी सुरी!। रावाचा रंक बनवितो रंकहि रावापरी। असा हा रावा बडबड करी!। किती आजवरि धुळीं मिळाले याच्या पायीं तरी। देति जन शिव्याशाप अंतरीं!। चाड न सत्यासत्याची त्या पापपुण्यही तसें। गणी नच, निर्भिड म्हणवीतसे!। निर्भिडपण तें जाई कळसा दूत यमाचा जसा। गळी गळफांस लावितो तसा!। बंधुप्रेमामधीं कालवी खरविष मधु बोलुनी। स्वार्थ का साधे यांवाचुनी?। पतिपत्नींच्या कलहीं पटवी वाक्‌पटुता ती किती। सोडवी पतिपाशांतूनि सती!। दोषनिदर्शन करूं कोठवरि पुरे फाटलें जिथे। ठिगळ तरि लावावें किती तिथें?।

## रसिकांस (पान ४२)

कुसुमनवविकासें मानसें सज्जनांचीं। प्रमुदित अति होतीं पाहुनी श्री सुमांची। मधुर मधु तयाचा सेवुनी गंध तेवीं। भ्रमरसम रसज्ञ प्राज्ञ होती न केवीं?॥ अभिनव कलिकांच्या घालुनी कंठिं माला। करिति अलि सुवेषें नृत्य गुंजारवाला। विहरति वनिं पक्षी मोहिती सन्मतीला। लवहि रुचि तयाची येइ का ती दुजाला?॥ रसिक रसिक कोणी गाजती जे अमूप। कळुनि वळुनि केवीं झाकिती सौख्यरूप॥ स्थिरचर जगतीं जो दिव्य आनंद नादे। विशद करुनि लोकीं त्यांस द्यावा सुशब्दें॥

गगना! कां न म्हणूं तुज सांब। शुंभ तुझ्यापरि जो॥ध्रु०॥ स्वर्गंगेची चिलीम भरुनी। उषा निखारे वरी ठेवुनी॥ आणि वादळी दम मारुनी। पीशि धुक्याची भांग! १॥ दे. ल. महाजनांच्या त्याच कवितेचें विडंबन.

## कवीस.

कशास कविता हवी कविवरा! तुझी संप्रति? अचेतन शवास जी न नव जीवना देइ ती॥ मृतापरि जगीं जिणें जरि न जाइ तें भालिंचें। न मोल कवडीहुनी अधिक ये तुझ्या वाणिचें॥ समर्थ मुळिं ना गिरा जरि गमे तुझी बा! तुला। कसा सुखद दाविशी पथ जनां तरी तू भला॥ जलाशयिं न राहिलें जल जरी स्वयें शुष्क तो। कुठूनि तरि पात्रिं ये बुडवितां वृथा शीण तो॥

# प्रकरण १५ वें

## दे. ल. महाजन

(जन्म सन १८९५)

प्रेमलतेची लीला मूर्ति । प्रसन्नतेची वा संपूर्ति । स्नेहलतेची सुंदर ज्योती । केवळ विशुद्धात्मा रसिकवर देवीदास । नांदेडचा कविताविलास ॥"

(अनंततनय तिलकविजय अ.६)

देवीदासराव यांचा जन्म ज्येष्ठ शु ५ मी शके १८१७ मध्यें नांदेड येथें झाला. श्रीनिवास भीमराव कोंडलवाडीकर हे त्याचे जन्मदाते पिता होत. हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण होते. देवीदासराव बारशाच्याच दिवशीं मातृविहीन झाले. तेव्हां त्यांच्या संगोपनाचें मोठ्या कष्टाचें कार्य त्यांचे वडिलावर पडलें. पण तें त्यांच्यानें निभेना म्हणून त्यांनीं त्यांस लक्ष्मण कृष्णराव महाजन यांस दत्तक दिलें, व त्याची पत्नी अंबाबाई हिनें त्यांस फार प्रेमानें लहानाचें मोठें केलें. कृष्णराव महाजन हे मोठे प्रतिष्ठित गृहस्थ होते. त्यांनीं नांदेड बसमतच्या तालुकदारीचें मोठ्या जबाबदारीचें काम उत्तम रीतीनें करून चांगला लौकिक मिळविला होता. पुढें उपजीविकेच्या साधनार्थ यांना एका गांवचा मक्ता मिळाला होता. देवीदासरावांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण नांदेड येथें झालें. इंग्रजी पांच यत्तांपर्यंत ते शिकले. त्यांना भाषाविषयाची पहिल्यापासून फार आवड असल्यामुळें त्यानीं मराठी, उर्दू, इंग्रजी, संस्कृत व फारशी या भाषांचें चांगलें ज्ञान संपादन केलें. पण लहानपणापासूनच संत दासगणु यांशीं त्यांचा परिचय झाल्यामुळें त्यांस कथाकीर्तनें ऐकण्याचा नाद लागला. तदनुषंगानेंच मुमुक्षु, आचार्य वगैरे नियतकालिकांच्या वाचनानें त्यांची प्रवृत्ति धार्मिक विषयांकडे वळली. हळूहळू काव्यरचना सुरू करून स्वतंत्र आख्यानें रचण्यापर्यंत त्यानीं मजल मारिली. त्यांचें प्रसिद्ध व अप्रसिद्ध गद्य व पद्य वाङ्मय खालीलप्रमाणें आहेः—

**प्रसिद्ध गद्यः**— हें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें नसून निरनिराळ्या मासिकांत, नियतकालिकांत व वर्तमानपत्रांत प्रसंगानुरूप आलेलें आहे.

बंध व मोक्ष (मुमुक्षु); व्यावहारिक वेदान्त (धर्मजागृति); केशवसुतांची कविता (ज्ञानप्रकाश); निजामविजय व नागरिकांत स्फुट लेख; तुलसीदासांचें उपमावैशिष्टय (विहंगमाला); गजलावर निबंध (काव्यचर्चा); मराठी वाङ्मयाची उत्क्रांति (वारकरींत लेखमाला); सुदरविलासदीपिकेची प्रस्तावना, आणि आख्यानरत्नमाला, मंदारपुष्पमाला, (नादेड), गोग्रास व राजहंस यात स्फुट लेख वगैरे.

**प्रसिद्ध पद्य**— (१) महाजनांची कविता, (२) महाराष्ट्र गीतांजली, (३) मातृहृदय, (४) श्रीनामदेवाचें काव्यमय चरित्र, (५) श्रीसिद्धारूढस्तोत्र, (६) श्रीदाजीमहाराज पंचपदी, (७) श्रीदेवीदासमहाराजांचे अष्टक, (८) श्री तुकोजी स्तोत्र, (९) मातृदास्यविमोचन, महासाध्वी गाधारी, सीताहरण, दत्तजन्म वगैरे आख्यानें, (१०) काव्यरत्नावलि, राजहंस, ज्ञानमित्र, आख्यामाला, कीर्तन वगैरेंत स्फुट कविता.

पण ह्यांचें अप्रसिद्ध लिखाण ह्याहूनही विपुल आणि विविध आहे. (१) मोत्याची मागणी ७०० आर्या, (२) मानसविहार—श्रीतुलसीरामायणावरील ओवीबद्ध टीका सुमारें १५०००, (३) कीचकवध—गद्यपद्य, (४) कृष्णजन्म, जयदेव, भानुदास, शिवजन्म, पतितपरावर्तन वगैरे अठरा आख्यानें, (५) स्तोत्रें, अष्टकें, पदें वगैरे स्फुट कविता.

(१) श्रीमद्देवी भागवतटीका (२००० ओंव्या), (२) चैतन्यचरितामृत (७०० ओंव्या) व (३) शिवभारतसार, ह्या ग्रंथाचें लिखाण सध्या चालू आहे. ह्यावरून महाजनांचा दृढ व्यासंग व अखंड लेखनव्यवसाय ह्यांची कल्पना येण्यासारखी आहे. त्याचप्रमाणें त्यांस नवयुगाची जाणीव झाली असली तरी त्यांचा मुख्य ओढा जुन्या वळणाकडेच कसा आहे हें-ही समजेल. आणि म्हणूनच आम्ही त्यास जुन्यानव्याच्या संधिकालांतले कवि असें म्हणतों.

काव्य, गायन व वक्तृत्व ह्या कलांचा जरी त्यांनीं शास्त्रोक्त अभ्यास केला नसला तरी श्रवण, निरीक्षण व अनुकरण ह्यायोगें त्यांवर त्यांनीं चांगलेंच प्रभुत्व मिळविलें आहे. समयसूचकता, रसिकता व वाङ्माधुर्य ह्या गुणांनीं त्यांचें भाषण हजारों श्रोत्यांस डोलवावयास लावतें. कीर्तनकाराचा धंदा ते उपजीविकेसाठीं करीत नसून जन्या परंपरेचें रक्षण व्हावें-

तत्पोषक वाङ्मय निर्माण करावें व लोकांत नामसंकीर्तनाची गोडी उत्पन्न करावी अशा निरपेक्ष व उदात्त हेतूनेंच करीत असतात. त्यांच्या काव्य-ग्रथनाचाही हाच हेतु आहे. ह्यांच्या अंगीं इतका गुणसमुच्चय असून व ते नांदेडचे एक प्रमुख नेते असूनही त्यांचा विनय मोठा वाखाणण्यासारखा आहे. ते म्हणतातः– व्युत्पत्तिचा मजसि अल्पहि गंध नाहीं ॥ वक्तृत्व काय असतें, नच कल्पना ही । वाणींत अल्प रस ना; रसनाच नांव ॥ येती न फार नकला; न कलांत भाव ॥ १ ॥ मात्र त्यांचें कीर्तन किंवा व्याख्यान ज्यानें एकदां एकिलें असेल, त्याचा विश्वास त्यांच्या कीर्तनारंभींच्या ह्या प्रार्थनेवर खास बसणार नाहीं व हें एक विपरीत लक्षणेचें उत्तम उदाहरण म्हणून ते समजतील. ह्यांच्या ह्या अष्टपैलूपणामुळें ह्याची प्रसिद्धि इकडेच नव्हे तर बाहेरही झाली असून निरनिराळ्या उत्सवसंमेलनप्रसंगीं त्यांस अगत्याचीं आमंत्रणें येतात व तेही हौशीनें जाऊन सर्वांचें समाराधन करितात. म्हणूनच प्रारंभीं दिलेले अनंततनयांचे त्यांच्याविषयींचें उद्गार किती सार्थ आहेत ह्याची खात्री पटेल. पुढें त्यांच्या कांहीं ग्रंथांचें विवेचन केलें आहे.

काव्याचा जणुं मूर्तिमंत पुतळा आला असे भूवरी ।
देवीदास महाजनास नमुनी शिष्यत्व त्याचें वरी ॥

(दत्तकिंकर–थोडा फरक करून)

(१) श्रीनामदेवमहाराजांचें काव्यमय चरित्रः— (शके १८४६ स. १९२४). 'मदल्प कृति अर्पितों म्हणुनि मी मुदें त्यास ही' असें म्हणून कवीनें संतकवि दासगणूमहाराजांस हें पुस्तक अर्पण केलें आहे. ह्या ग्रंथाच्या प्रकाशनास सुमारें २५ जणांनीं 'शेअर' घेऊन तर ५।६ जणांनीं देणग्या देऊन मदत केली आहे. प्रारंभीं प्रकाशक विठ्ठल लक्ष्मण सुबंध यांनीं मोरोपंतकृत 'नामदेवआर्या' देऊन मोठें औचित्य दाखविलें आहे.

हें एक कीर्तनोपयोगी आख्यान म्हणून लिहिलेलें आहे. ह्याचे तीन खंड केलेले आहेत. (१) पूर्वखंडात दिंड्या, साक्या, आर्या, अभंग, पदें, गज्जल, श्लोक मिळून ५२ पद्यें आहेत. ह्यांत नामदेवकरीचें नैवेद्य-प्राशन, तीर्थयात्रागमन, हस्तिनापुरास मृत गाईचें पुनरुज्जीवन वगैरे

कथाभाग आला आहे. ह्यांत दोन कटाव असून त्यांतील दुसऱ्यांत 'कटाव' वृत्त चालू करणारा जो अमृतराय ह्याचा मोरोपंताच्या आर्येसह केलेला उल्लेख मोठा हृद्य झाला आहे. त्याचप्रमाणें नामदेवाच्या धाव्यांतील 'हे दीनानाथ कृपाला ! धावुनि ये श्रीगोपाला ॥ ४० ॥ आणि "धांव ! धांव ! गोपाला ! ४४ ॥ हीं पदें फारच करुणापूर्ण झालीं आहेत.

(२) मध्यमखंडः— ह्यांत मागल्याप्रमाणेंच निरनिराळ्या प्रकारचीं साठ पद्यें आहेत. ह्यांत गोरोबास हात येणें, त्याचें मृत मूल जीवंत होणें, नामदेवाचें गोरोबाकडून परीक्षण करवणें व नामदेवानें गुरु करणें इतका भाग आला आहे. ह्यांत स्त्रिया नदीवर स्नान करीत असतांना जे दुर्जन दुष्टबुद्धीनें तेथें जातात त्यांजवर कठोर कोरडे ओढले आहेत. त्याचप्रमाणें नामदेवास कच्चें मडकें म्हणून जेव्हां गोरोबानें म्हटलें त्या वेळीं त्याच्या बायकोच्या तोंडीं घातलेलें पद खोंचदार झालें आहे. पदः— (चाल हटातटानें):— काय तुम्हांला हौस वाटली हिणवायाची अशी ॥ मूढ मी बोलूं तरि हो कशी ? ॥ धृ. ॥ कीर्तनिं ज्याच्या प्रभुरायानें हात तुम्हांला दिले । काय हें ऋण त्याचें फेडिलें ॥ १ ॥ तसेंच विसोबाखेचराचे पाय शिवपिंडीवरून नामदेव काढूं लागला तेव्हांचें वर्णनही मोठें चटकदार झालें आहेः—

मालिनी.

स्वरुप गणुनि ज्याचें पातला ईश्वराचें ।
फर फर फर ओढी पाय त्या खेचराचे ॥
उचलुनि पद ठेवी भूमि मानूनि जेथें ॥
प्रगटाचे शिवपिंडीं होइ तत्काल तेथें ॥५७॥

(३) उत्तरखंड :— ह्यांत एकंदर ७६ पद्यें असून पहिल्या दोन आर्यांनंतर जवळ जवळ २॥—३ पानांचा एक लांबलचक कटाव आला आहे. कीर्तनांत शृंगार आणूं नये असें समर्थांचें सांगणें असल्यामुळें कवीनें एका तरुण सुंदरीचें रूप वर्णन करून ह्यांपैकीं एकही सौंदर्य परिसा भागवताच्या स्त्रींत नव्हतें असें म्हणून, पुढें तिच्या कुरूपतेचें लांबलचक विडंबनात्मक वर्णन केलें आहे. तें हास्यरसोत्पादक न होतां हास्यास्पद व अतिरंजित झालें आहेसें वाटतें. पुढें परिसाचा चमत्कार व देऊळ फिरण्याचा चम-

त्कार असे दोन चमत्कार वर्णून नामदेवानें समाधि घेतल्याचें सांगितलें आहे. ह्यांत ‘परिसा’ ह्या पदानें साधलेले शब्दालंकार चमत्कृतिजनक झाले आहेत. पहा:—

(१) परिसा भागवताची कांता पतिला वदे, तदा, ‘परिसा
परि साहुनि क्षमावा मंतु, दिलें मी पराप्रति परिसा’ ॥ २८ ॥
आर्या (गीति)

(२) परिसा भागवता! परिस एकदां ‘भागवता’ ॥ ३९ ॥ साकी

(३) तूं परिस भागवत तूं, आहे लोकांत नामधारक मी ॥
मग मानूं सांग कसा, सद्‌गुरुपेक्षां तवाधिकार कमी ॥ ४७ ॥
आर्या (गीत)

असो. एकंदरींत हें आख्यान कथेकऱ्यांनीं रुचिपरत्वें पदांची निवड करून लाविलें असतां त्यांस श्रोत्यांची घटकाभर चांगली करमणूक करितां येऊन तें ज्ञान देण्यासही उपयोगी पडेल.

(२) मातृहृदय— (शके १८४९, स. १८२७). हें पुस्तक कै. गणेश गोपाळ गोळेगांवकर, बी. ए. एलएल. बी. ह्यांच्या स्मरणार्थ महाजनांनीं लिहिलें आहे. हृद्रतांत बालविवाह, बालविधवा व बालहत्या ह्या सामाजिक संकटांचे परिणाम मोठ्या परिणामकारक पद्धतीनें दाखविले आहेत. पण ‘हृद्रताची, भाषा निष्कारण नाटकी केली आहे. ह्या कवितेच्या पहिल्या भागांत "Mother's Love" ह्या इंग्रजी कवितेच्या आधारानें नैसर्गिक मातृहृदयाचें उत्तम शब्दचित्र सुमारें ६० ओळींत काढलेलें आहे.

हें रूपांतर चांगलें साधलें आहे. ह्याचें कथानक असें आहे कीं, एक अनाथ विधवा रात्रीं आपल्या दोन वर्षांच्या अर्भकासह प्रवास करीत असतां बर्फाच्या वादळांत सांपडली. बर्फाचा वर्षाव भयंकर होऊं लागला. शेवटीं एक थोडासा आश्रय तिला सांपडला. तेथें तिनें आपल्या मुलास ठेविलें. आणि देवास म्हणाली– बुडो व्यसनिं शेवटीं जननि मी बुडाल्यें जरी। परंतु मम लाडक्या छबकड्यास रक्षीं तरी॥ नंतर आपलें वस्त्र सोडून तें तिनें मुलावर घातलें आणि आपल्या उघड्या शरीराचें छत्र त्याजवर धरिलें. सकाळीं उजाडल्यावर पांथस्थांना काय दिसलें!— झाली प्रभात नभ निर्मल पूर्ण झालं। पांथस्थ ते सहज त्या स्थलिं सर्व आले

प्रेतासमीप बघतांच तदीय पुत्र । पाही [illegible] सहास्यवदनें उघडून नेत्र ।। हा देखावा अत्यंत हृदयद्रावक असून मातृप्रेमाची परिसीमा दर्शविणारा आहे खरा; परंतु 'पडे धडधडा शिरीं वरुनि बर्फ तो (पु. ?) सारखा' अशा वर्षावांत प्रवास करणाऱ्या मातेचें वस्त्र कोरडें राहणें शक्य वाटत नाहीं. आणि म्हणूनच तें सोडून मुलावर आच्छादनार्थ घालण्याची कल्पना असंभाव्य व विपरीत भासते.

भाग २ राः—"आवश्यक अशा सामाजिक बंधनातील निष्ठुरपणाचा अतिरेक झाल्यामुळें बनलेल्या कृत्रिम मातृहृदयाचें शब्दचित्र चंद्रभागेच्या वाळवंट'तील प्रत्यक्ष घडत असलेल्या दृश्याधारें रेखाटण्याचा प्रयत्न ह्या उत्तरार्धांत केला आहे." ह्या भागांतील हृद्गत कवीच्या ह्या शब्दांवरून समजण्यासारखें आहे. ह्यांत सुमारें ४०।४५ कविता आहेत. प्रथमतः सृष्टिराक्षसी पोटच्या मुलांची (ग्रहांची) हत्या कशी करीत आहे ह्याचें अन्योक्तीनें वर्णन केलेलें आहे पण तें, प्रस्तुत विषयाशीं नीटसें जुळलेलें दिसत नाहीं. शिवाय पुढीलप्रमाणें कांहीं कल्पनाही वर्ण्य प्रसंगाशीं विसंगत वाटतात. (१) सूर्यास्तीं सृष्टिसति–बनुनि विधवा ती शुभ्र वस्त्र नेसे। पुसट कुंकुम शशि--तिलक गोल भासे ।। विधवेचा[1] हा पुसट कुंकमतिलक थोडासा चमत्कारिकच वाटतो. खरें म्हटलें तर विधवेला कुंकवाची उठाठेव हवी कशाला ? पण नवमतवादाप्रमाणें हा त्याचा जन्मसिद्ध हक्क आहे असें घटकाभर मानिलें तरी पण कुंकम मिळमिळीत कशाला ? चांगलं ढळढळीत कां नाहीं ? (२) बरें, पहिल्या कवितेंत पौर्णिमेचा गोल शशि-तिलक सृष्टिविधवेस शुभ्र वस्त्र नेसवण्याइतका प्रकाशत असतां 'अंधकारें व्यभिचारकर्म केलें' आणि त्या कृष्णकर्मातून 'प्रसवि सृष्टि पुढें एक एक तारा' हें कसें संभवतें ? असो. अशा प्रकारें सृष्टीच्या कृष्ण-कर्माचें वर्णन करून कवि मनुष्याच्या कृष्णकर्माकडे वळला आहे. आणि तेंही त्यानें पौर्णिमेच्या पिठासारख्या चांदण्यांत वाळवंटीं चंद्रभागेच्या कांठीं 'रतिडाव मांडला' असें आमच्यामतें असंभाव्य वर्णन केलें आहे ! नंतर त्यानें बालहत्या करण्यास उद्युक्त झालेल्या एका ब्राह्मण

१. उलट, या वेळी कुंकुमचि चर्चुनि भालदेशीं । राहे पतीस निरखू युवतीच जैशी ।। इ. अशीं वर्णन आढळतात. वा. वा. खेर, चंद्रोदय.

बालविधवेचा, तिच्या नुकत्याच जन्मलेल्या अर्भकाशीं झालेला संवाद चंद्रभागेच्या वाळवंटावर बसलेल्या एका जिज्ञासूच्या कानांवर घातला आहे. त्या संवादांत तें बालक तुझें मातृहृदय असें क्रूर कां असें तिला विचारतें. तेव्हां ती म्हणते "मी काय उत्तर देऊं? तूं धर्मालाच विचार. मी तुझी जन्मकथा अगदीं थोडक्यांत सांगतें ऐक: एका दुष्ट कथेकरी बोवानें मला फसविलें. मी तुला कसेंबसें कांहीं महिने वाढविलें. पुढें मात्र मला तोंड दाखवण्यास जागा नाहींशी झाली. पण तो बोवा मात्र 'नष्ट मेला तो फिरे राजरोस' म्हणून आज तुझा जन्माचा आणि मृत्यूचा एकच दिवस आला" असें म्हणून तिनें त्याच्या नरडीला नख लावून त्यास नदींत टाकून दिलें.[1] जिज्ञासू निमूटपणें व गुप्तपणें हें सर्व पाहत होतो. तो म्हणतो– 'धर्म बाळाचा कसा बळी घेतो। दया नाहीं तो धर्म कसा होता ? ॥ आणि 'करी जिज्ञासू बेत निश्चयाचा। 'बालहत्याप्रतिबंध करायाचा ॥' अशा रीतीनें विधवांच्या अनेक प्रश्नांपैकीं एका जिव्हाळ्याच्या प्रश्नाचा परिस्फोट जनतेपुढें करून त्यासंबंधीं ज्या अनेक बाजू आहेत त्यांचा विचार करण्यास तिला लावलें आहे, ह्याबद्दल कवीची कोणीही प्रसंशाच करील. पण ह्या महत्त्वाच्या प्रश्नाचा येथें केलेला ऊहपोह अगदींच अपुरा वाटतो.

(३) महाराष्ट्र गीतांजलि (स. १९३०). :— वंग कविवर्य रवींद्रनाथ टागोर ह्याच्या सर्वमान्य 'गीताजली'चा हा मराठी पद्यानुवाद आहे त्याला वाङ्मयविशारद रामचंद्र गोविंद कानडे ह्यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. कै. गोळेगांवकर व अनंततनय (द. अ. आपटे, पुणे) ह्यांच्या प्रोत्साहनानें हें रूपान्तर कवीनें तयार केलें आहे. ह्यापूर्वी गीताजलीचे उणेपुरे गद्यपद्य अवतार अनेक झाले आहेत. हरिभाऊ आपटे, गोविंद वा. कानिटकर ह्यांचीं भाषांतरें, माधवानुजाचें कविताबद्ध अपूर्ण भाषांतर; पोहनेरकरांचें बागशाहींतील अल्प भाषांतर, समवृत्तातील ऋग्वेदी याचें आणि डॉ. शारंगपाणी यांचें अशीं दोन पूर्ण पद्य भाषांतरें हीं सर्व जनतेच्या परिचयाचीं आहेतच. महाजनांनीं प्रस्तुत 'महाराष्ट्र गीतांजलि' हें भाषांतर साकी वृत्तांत करून त्यांत आणखी एका भाषांतराची भर घातली आहे. हें भाषांतर

१. ह्या ठिकाणीं गडकऱ्यांच्या 'प्रेमसंन्यासा'तील द्रुमनच्या प्रवेशाची आठवण होते.

सुबोध व प्रसन्न झालें असून त्यांत मुळांतील गोडी बरीच प्रत्ययास येते. ह्याच्या एकूण ७३० साक्या झाल्या आहेत.

तात्त्विकदृष्ट्या परमेश्वर निर्गुणनिराकार आहे. तोच उत्पत्ति-स्थिति-लय-कर्ता सर्व श्रेय व प्रेय तोच. सौंदर्य, कला आणि ज्ञान हीं सर्व त्याच्या ठिकाणीं सामावलीं आहेत. ह्या स्थिरचर विश्वास परमेश्वराचेंच अधिष्ठान आहे. हीच कल्पना ह्या काव्यांत मोठ्या अभिनव रीतीनें मांडली आहे. दुसरी गोष्ट म्हणजे परमेश्वर व भक्त ह्याचे अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध ह्या गीतांजलींत दिसतात. केव्हां त्राता, केव्हां धनी, केव्हां मित्र अशीं अनेक नातीं ह्यांत कल्पिलीं आहेत. त्यामुळें कोठें अत्यंत लीनता तर कोठें सलगी आपणास दिसते. मराठी संतवाङ्मय वाचणारांस ह्यांतील बऱ्याच गोष्टी परिचयाच्या वाटतील. श्री. टागोराच्या भावनाची उत्कटता, परमेश्वरदर्शनाची त्यांची तळमळ, मनाचा हळुवारपणा व विश्वबंधुता हे त्यांच्या काव्याचे विशेष ह्या भाषांतरांतही प्रत्ययास येतात. ह्या अलौकिक ग्रंथाचें खरें रहस्य तो समग्र लक्षपूर्वक वाचल्याशिवाय कळणें शक्य नाहीं. पुढील कांहीं अवतरणें केवळ दिग्दर्शनार्थ दिली आहेत:—

(१) देव कोठें भेटेल? माळेचा जप, भजन, गान दे सोडुनि नांवहि याचे। देवद्वारें लावुनि करिसी ध्यान तरी कोणाचें!॥५४॥ मजूर तो बघ रस्त्यासाठीं खडी फोडितो जेथें। देव पहाया जीवा! सत्वर ऊठ ऊट जा तेथें ॥५७॥ उन्हांत तैसा पावसात तो असे सदा त्यांच्यांत। मळलीं वस्त्रे त्याचीं हीं बघ त्यांसह धूलिकणांत ॥५८॥

(२) मुक्तिः—मुक्ति मिळाया कुणी सांगती त्यागाची ती युक्ती॥ त्यागानें जी प्राप्त होतसे नको मला ती मुक्ति ॥५२९॥ आनंदाच्या सहस्र-पाशीं बद्ध जाहलों असता आलिंगन मज मुक्तिच देते। अनुभवितों हें आतां ॥५३०॥

(३) मृत्युः— हे मृत्यो! या जीवदशेचें अंतिमफल तूं असती॥ यास्तव येऊनि करीं एकदा कानगोष्ट माझ्याशीं ॥६४७॥ सुखदुःख तीं केलीं सारीं सहन आजपर्यंत। प्रतिदिवशीं मी बसलों आहें तुझीच वाट पहात ॥६४८॥ हे यमराजन्! कटाक्ष अंतिम दे मजवरि फेंकून। झालें माझें अखंड जीवन समज तुझ्या आधीन ६५० सर्व ग्रंथच मधुर सुगंधित पुष्पांनीं खच्चून भरला

आहे. जीवभ्रमरास जें पुष्प दिसतें तेथेंच तो अडकून पडतो. अशा नितान्त सुंदर काव्याची भर मराठी संतवाङ्मयांत घालून महाजनांनीं वाचकांस कायमचें ऋणी करून ठेविलें आहे.

## कविसंमेलन भाग २ रा

हैदराबाद येथील १९३१ तल्या मराठी साहित्य संमेलनाच्या निमित्तानें दे. ल. महाजन यांनीं हें कविसंमेलन भरून व त्याचें कार्य पुस्तकरूपानें प्रसिद्ध करून मराठवाड्यांतील आधुनिक काव्यासंबंधानें अपूर्व कामगिरी केली आहे ह्यांत संशय नाहीं. मागे परशुरामतात्यांनीं 'काव्यामृताचा नवनीत भेला। तो गोड लागो तुमच्या जिभेला' अशा विनंतीसह रसिकांस अर्पण केला. महाजनानीं मोंगलाईतील काव्यदधीचें मंथन करून त्यांच्या नवनीताप्रमाणें हें मख्खन वाचकांपुढें माडलें आहे, तेंही त्यास रुचकर व तेजोबलदायी होवो.

ह्यांत एकंदर ५५ कवींच्या कवितांचे—कांहींचे एक एक, दोन दोन व कांहींचे अधिक—उतारे सुमारें १२७ पानांत दिलेले आहेत. उताऱ्यावर कवीचें नांव व क्वचित् चरित्रविषयक फारच अल्प माहिती दिलेली आहे. ती अधिक विस्तृत रीतीनें देण्याचा प्रयत्न केला असता तर ह्या संमेलनाच्या दुधांत साखर पडली असती! कोणाचें नाव तर कोणाचें गांव, आणि कोणाचा जन्मशक तर कोणाचा जीवनव्यवसाय असें सध्यां झालें असल्यामुळें वाचकाची जिज्ञासा अतृप्त राहते व त्यास पूर्णानंद प्राप्त होत नाहीं. अनुक्रमणिकेंत प्रांतपरत्वें केलेल्या विभागणीवरून ह्या ५५ कवींत उस्मानाबादचे २, गुलबर्ग्याचें ३, बीडचे ५, हैदराबाद शहरचे ६, औरंगाबादचे १० व नांदेडचे २९ असे समाविष्ट झालेले आढळतात. ह्यावरून पैठणचें जुनें केंद्र नांदेडला येऊन स्थिर झाल्यासारखें दिसतें. आणि तेथील वाङ्मयीन चळवळींवरून व ग्रंथोत्पादनावरून हें योग्यच वाटतें. आतां कोणकोणत्या धंद्यांतील लोकांचें लक्ष कवितासुंदरीनें वेधून घेतलें आहे असें पाहूं लागलों तर, ह्यांत शिक्षक १२, वकील ५, कीर्तनकार ५, वैद्य डाक्टर ३, कारकून ३ व बाकीच्यांत कांहीं साधुसंत, कांहीं सुखवस्तु लोक व कांहीं इतर धंद्यांतील माणसें दिसतात. त्यांत केवळ काव्यलेखन व ग्रंथलेखन करून उपजीविका करणारे मात्र कोणीच

नाहींत. कवितांच्या विषयांकडे व वृत्तांकडे पाहिलें तर ह्यांत नव्या-जुन्याचें समुचित संमिश्रण केलेलें आढळतें. ओंव्या, अभंग, दिंड्या ह्यांसारखीं मराठी वृत्तें, शार्दूलविक्रीडित, मालिनी, द्रुतविलंबित, पृथ्वी यांसारखीं अक्षरगणवृत्तें, पदें, गज्जल, केशवकरणी, चंद्रकात, भूपती खरे ते, जरी कुणा श्रीमंताची, अजि अकुर हा वगैरेसारखे गेय छंद, इंदुकला, अवनी, प्रणयप्रभा, मनमोहन वगैरे जातिवृत्तें आणि सुनीतें, चतुर्दशकें असें सर्व कांहीं ह्यांत आहे. आता विषयाकडे पाहिलें तरी असेंच वैचित्र्य आढळतें. (१) प्रथमतः जुनें वळण घेतलें तर श्रीमाणिकप्रभु महाराजांचा अद्वैत-बोध, मुरलीधर घाणेकराचे सगुण कीं निर्गुण, लातुरकर, जेरे, गाडगीळ याचे ईशस्तवन व अनंताच्या कृष्णलीला, दत्त किंकराचें अभयदान वगैरे विषय आपणास दिसतात 'धर्मावांचुनि व्यक्ति मात्र जगतीं पावेल सौख्यास न' अशी वरुडकराची घोषणा आपणास ऐकू येते. तिकडे कवीश्वर (लक्ष्मण शंकर) 'विनत पदिं नमो मोहिनी रम्यवेषा' म्हणून 'मोहिनीस्तव' करीत आहेत तर विनायकबोवा टोपरे बजावतात— 'सिद्धिविनायक भजनाचें तुज नाहिं राहिलें भान' आणि विष्णु गोविंद कर्वे 'तें प्रेम लाभो मज विश्वकाया!' असें म्हणून उच्च भक्ति मागतांना दिसतात. त्याचप्रमाणें विठ्ठल, राम वगैरेंचीं भरपूर भजनें जुन्या वळणाच्या लोकास ह्यात मिळतील.

(२) कवि, कविता, प्रतिभा, शारदा ह्यांसंबंधींही बरेंच काव्य ह्यांत दृष्टीस पडेल. दासबोधांतील कवींचे प्रासादिक धीटपाठादि भेद, दासगणूंच्या 'प्रभूचें कविप्रेम' या कवितेंत दिसतील. कृष्णकिशोर 'सत्कवींस' सांगत आहेत कीं, विश्व मोकळें सगळें तुज हें उंच घे भरारी। स्वैर सोड मग खुल्या दिलें मनमुराद लल्कारी ॥ (पा. ९२)॥ पद्माकर 'प्रतिभे'स म्हणतातः—'देवी तुझ्या आगमीं मन्मती हो विशुद्धा सुधासाम्य येई तिला॥ स्वर्लोक-भूलोकपातालिंचीही निगूढें पुढें ठाकती दृष्टीला॥ पोहनेरकर शारदेस विनवितातः— होउनि स्फूर्ते। स्फूर्ति काव्याची। नाचूं दे रसवंती माझी॥ उसळुनि प्रतिभा॥ प्रतिभा स्वर्गींची॥ गाऊं दे गाणीं प्रेमाचीं॥ शारदे उठ. ॥ध्रु॥ गवयाचें पोर म्हणे रडलें तरी तें तालासुरात रडतें त्याप्रमाणेंच शेवटीं गायनविशारद कवि कोरेकल आपल्या 'कविरोदनां'त काव्य

दाखवीत आहेतः– वृत्तः–नवनंदिनी—कवि कीं बसे, रडतही, तरी गातो। कवनांतला पवन सौरभ नेतो। झणिं देश दरवळोनिच सोडी। परि पाहिजे रसिक वाचक जोडी॥ १२॥ (पा. १२१).

(३) निसर्गः—निशा निमाली दिशा उजळली लपती नभिं तारका। पडे हा निशिनाथही फिका॥ असें चिंचोलीकरांचें 'प्रभातवर्णन'; गुलाबाच्या पाकळ्या गळालेल्या। भूमिभागीं पाहिल्या विखुरलेल्या। कुसुमवृक्षीं परि एक गुलाबाचें करित होतें सानंदनृत्य साचें॥ असें श्रीधर कृष्ण देवाचें 'गुलाबा'चें गायन व मालतीमाधवाचें 'वर्षाकाला'चें वर्णन आपण ऐकितों. फुलामुलांचे कवि डॉ. पुरवार म्हणतातः— कवीची उज्ज्वला वाणी लिखाणें थोर ओजस्वी। मधुरा लेखणी नृत्य, फुलांसाठीं मुलांसाठीं॥ नसे लोकीं असे ना जें फुलांसाठीं मुलांसाठीं। सुराचा स्वर्गही सारा फुलांसाठीं मुलांसाठीं॥

(४) प्रेमः—घरांत मूल, झाडावर फूल, आणि कवितेवर प्रेमाची झूल तरच तीं शोभतात. प्रेमाच्या निरनिराळ्या छटा ह्यात पाहावयास मिळतात. 'शिवदास मुखेडकर 'राही नम्र जनां प्रिये! कधिं कुणा दुःशब्द बोलूं नको!' असे आपल्या प्रियेस बोधामृताचे घुटके देत आहेत तर, श्रीकृष्ण गाडगीळ म्हणतातः— 'कंटकमय संसारपथीं तूं माझी प्रियकरणी। तव सहवासीं काव्यलता गे! फुलते मधु सुमनीं॥" ही झाली प्रियासहवासांतील मौज. पण प्रेमाला खरा रंग चढतो तो विरहांतच. म्हणूनंच नांदापुरकरांची (जाति–इंदुकला)—'गवाक्ष अनुलक्षी कितीदां दारांतुनि बघती। किती जिवा करिसी क्षणामधिं ऊठ बैस नुसती॥ असें म्हणणारी 'विरहोत्कंठिता' अधिक आकर्षक वाटते. त्याच्यापुढील विरहावस्था नागोराव कल्लूरकरांच्या पुढील ओळींत दिसतेः— प्रेमावीण तुझ्या उदास बनुनी मी हा वनीं हिंडतों। एखाद्या सुकल्या सुमास बघुनी प्रेमें असें चुंबितों॥ तर त्याच्यापुढें मनाठकरांच्या 'विधुरविलापांनीं' पुढील निवापांजलि दिलेली आढळतेः—

काय राहिलें जीवा अजुनी रेंगाळसि रे! काय म्हणोनि। सुगी संपली कळलें ना का कधींच होउनि गेली संवगणी॥ जीवनगंगा यमुना होती

रात्रंदिनही तूझी कंथा, । अजुनिहि घेली तसाच परि तूं, भानु न राहे प्रभा लोपतां । महिने चारहि होउन गेले, नामशेषही यमुना झाली । लोभ तनूचा परि न सोडवे कृतघ्नता ही कोण राक्षसी । आपुल्या हातें दिवा चित्कला चिताग्निधूमें धूसर करुनी । कसें न झालें दुष्टा तूझें लोहाचेंही होतें पाणी । विश्वाणूंसी प्रेम सांधणी, दिव्यप्रेमें रसे चांदणी ॥...चांद लोपतां कुमुदें मिटती यमुना जातां जग लोपावें । अजुनिहि जीवा ! आहे वेळा, वारुळ नाग निघुनी जावें ॥

ह्यावरून हें कविसंमेलन जसें "भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधकं" झालें आहे तसेंच चालू पिढीच्या कवींनीं आपली उज्वल पूर्वपरंपरा राखण्याचें कार्य कसें मोठ्या नेटानें चालविलें आहे ह्याचेंही तें निदर्शक झालें आहे. म्हणूनच हें महनीय संमेलनकार्य निरपेक्षतेनें घडवून आणिल्याबद्दलचें श्रेय महाजनांसच दिलें पाहिजे.

## महाजनांची कविता

भरला पूर्ण निराशावाद जरी त्यामधें प्रसंगानें
होउनि रसपरिपोषहि चाले अर्थौघ फार वेगानें
प्रेम, प्रसाद, तैसी प्रतिभा, उत्कृष्ट काव्यगुण जे हे.
सहज प्रसाद त्यांतुन या तव काव्यास लाभला आहे ॥

महाजन पा.९९.

आतांपर्यंत जे महाजनांचे ग्रंथ वर्णिले तेवढीच कृति जरी त्यांचे हातून झाली असती तरी त्यांस सामान्य कविजनांत स्थान सहज मिळालें असतें. पण ह्या त्यांच्या स्वतंत्र काव्यसंग्रहानें त्यांची गणना आज कविवर्यांत होत आहे एवढेंच नव्हे तर ते मराठवाड्यांतील एक प्रमुख कवि म्हणून मान्यता पावले असून, त्यांच्यापासून स्फूर्ति मिळालेल्या यादवसुत, कृष्णाकुमार, दत्तकिंकर वगैरेंसारख्या त्यांच्या होतकरू कविशिष्यांनीं त्यांचा सांप्रदाय मोठ्या नेटानें पुढें चालविला आहे. महाजन स्वतः दासगणूंच्याच परंपरेमधील दिसतात. हें त्यांच्या पुढील उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. 'परि मत्कृतिजलकणिका युष्मत्काव्योदधींतली खचित' ॥ पा.७५ ॥ दासगणूंसारखाच त्यांचा कीर्तनकाराचा पेशा, आख्यानरत्नमालेचें संपादन व प्रकाशन, देव, धर्म, वेदान्त व पौराणिक कथा ह्या विषयांचें त्यांच्या

संग्रहांतील बाहुल्य व पंडिती थाटाची रचना ह्या गोष्टींवरून त्यांची कविता बव्हंशीं जुन्या वळणाचीच आहे असें कोणासही म्हणावेंसें वाटेल. पण सामाजिक, आर्थिक व राष्ट्रीय विषयांचा समावेश त्यांनीं केलेला पाहून त्यांस नवीनांत गणावें असेंही त्यांस वाटल्याशिवाय राहणार नाहीं. अशा त्यांच्या ह्या द्विविध दर्शनावरून आम्हीं त्यांस नव्याजुन्यामधील संधिकालाचे कवि असें म्हणतों.

प्रस्तुत संग्रहांत त्यांच्या एकंदर ५८ कविता संकलित केलेल्या आहेत. ह्यांपैकीं सुमारें २४ जुन्या वळणाच्या आहेत. त्यांत 'जयतिशांकरि'सारख्या देवदेवतांवरील भक्तिप्रचुर, खरा साक्षी, एकान्तवास वगैरेंसारख्या आध्यात्मिक तर 'कांचनमृग', 'सीतेचा निरोप', 'श्रीकृष्णसंशोधन' वगैरे पौराणिक आहेत. ह्या जरी बाह्यतः जुन्या छापाच्या भासल्या तरी त्यांत नवकल्पनांची चमक मधून मधून चमकतांना दिसते. उ. अरुण तो मंनिं लाजुनि पांगळा। तव पदाश्रित हा जणुं जाहला पा.२.५ पण 'सौंदर्योपासने' सारख्या विषयांतही कवीला वेदान्तच सुचतो. तो म्हणतो:— सृष्टिसुंदरी नटेल किति ती विश्वजननिच्या पुढें । तिचें सौंदर्य किती बापुडें । या सदुपायें विषयकर्दमीं वृत्ति कदापि न बुडे । भवाचा वृक्ष समूळचि खुडे ॥ येथें हा जो कवीनें भेद केला आहे तो मान्य होण्यासारखा दिसत नाहीं. कारण विश्वजननी जी चित्छक्ति ती काय "सृष्टिसुंदरी"हून भिन्न आहे ? जगद्रूपानें सर्वत्र चित्‌शक्तिच विलसत नाहीं काय ? दुसरें असें कीं आधुनिक कविता स्त्रीपुरुषप्रेमानें अगदीं फुललेली असावयाची, तर महाजनांच्या कवितेस ईश्वरी प्रेमाशिवाय इतर प्रेमाचें अगदीं वावडें आहे. पहाः—

'स्त्रीमुखाकडे जी दृष्टि एकदां वळली ! ती पुन्हांही वळली म्हणजे पुरती चळली ।' इतकी त्यांना शृंगाराची भीति वाटते ! पुनः 'साशंकित शारदें'त ते शारदेच्या तोंडीं पुढील विचार घालतात :—

'सांप्रत मजभोंवतिं ही माझी जी भक्तमंडळी जमली ॥
शृंगाररसीं ह्यांची वाणीसह वृत्ति सर्वदा रमली ॥
मन्मंदिर जें होतें गजबजलें थोर थोर संतांनीं ।
गेलें भरूनि आतां प्रेमाच्या वैषयीक गीतांनीं ॥ पा. ७६ ॥

ह्यावरून 'जेणें परमार्थ वाढे । अंगीं अनुताप चढे । भक्ति साधन आवडे ॥ इत्यादि समर्थांची सद्ग्रंथाची व्याख्या ह्यांच्या कवितेस बरोबर लागू पडते असें वाटतें. आणि ह्या गुणवैलक्षण्यामुळेंही ती नवीन कवितेपासून थोडीशी अलग राहते. असो.

(२) भाषांतरितः— वरील एक गोष्ट बाजूस ठेविल्यास जुन्या कवींत कधीं न आढळणारा एक गुण महाजनांत आढळतो. तो हा कीं त्यांनीं आंग्लभाषेंतील सुंदर विचारांचें सुंदर लेणें आपल्या मायभाषेवर चढविलें आहे. ह्या संग्रहांत त्याचीं सहा भाषान्तरें आहेत तीं अशीं:-(१) Pope's Ode on Solitude एकान्तगीत. (२) जनसेवा हीच ईश्वरसेवा L. Hunt's Abu Ben Adhem, (3) C. Mackay's Sympathy सहानुभूति (४) Sir Walter Scott's Lullaby अंगाईगीत. (५) Mother's Love मातृहृदय, (६) Tagore's गीतांजलि आणि तुळसीरामायणावरील विहारिणी टीकेंतील 'श्रीरामचरितमानस' हीं भाषांतरें मधुर, अर्थपूर्ण व अगदीं मराठी वळणाचीं झालीं आहेत, हें गीतांजलीचे जें विवेचन मागे केलें आहे त्यावरून सहज समजण्यासारखे आहे.

(३) सृष्टिविषयकः— हा त्यांच्या कवितांचा तिसरा गट होय. सृष्टिकाव्य, वर्षर्तूतील उषःकाल, चेंडुफळी, तेजोभंग, गगनास व उषारविविवाह अशा कविता ह्या गटांत घालतां येतील. पण शेवटच्या कवितेशिवाय कवीचें लक्ष निसर्गाच्या निर्भेळ वर्णनापेक्षां अध्यात्म, वेदान्त व पौराणिक कथा यांकडेच अधिक झुकलेले व रमलेलें दिसतें. उषारविविवाहांत मात्र निसर्गवर्णन बरें झालें असून कांहीं हृद्य कल्पनाही त्यांत दिसतात:—

नभःपात्रीं तारका ठेविलेल्या । लग्नकालीं त्या पीतवर्ण झाल्या ॥
प्रभातानें अक्षता करूनि त्यांच्या । दिल्या वांटुनिया करीं प्रेक्षकांच्या ॥पा.४१॥

त्याचप्रमाणें:—

होतो सांग विवाह जेथ निवसे प्रेमामृताचा झरा ।
त्याचें दिव्य चरित्र फोडित सदा पाषाणिंही पाझरा ।
नाहीं लौकिक; त्यां रुचे निरुपमा प्रेमान्विता सत्यता ।
दांपत्यास अशा जगत्पतिहि तो कुर्यात् सदा मंगलम् ।४२।

असें सुलग्न सावधान झालें आहे.

(४) चवथ्या गटांत सामाजिक, आर्थिक, व राष्ट्रीयभावना व्यक्त करणाऱ्या कविता येतात. जागृति' (पा.३८) ह्या कवितेंत कवि हिंदमातेस हाक मारतो. 'ऊठ ऊठ 'जागृत हो त्वरित हिंदमाते' असें म्हणून रूढिरूपी-शवसमवसन तूं पांघरतेस तें टाक, चारी वर्ण स्वकर्मच्युत झाले आहेत त्यांस शुद्ध व समर्थ करून समत्वानें वागव, असें त्यानें तिला सांगितलें आहे. पण ह्यांतही 'पुरुषसूक्तांतील' ब्राह्मणोऽस्य इत्यादीची आठवण व 'सर्वं खल्विदं ब्रह्म' वगैरे वेदान्त ह्या योगें मूळ कल्पनेस गौणत्वच आलें आहे. त्याचप्रमाणें 'केवढें आश्चर्य हें !' ह्यांत अंत्यज आर्यधर्मांत अस्पृश्य राहतो पण धर्मांतरानें स्पृश्य होतो ह्या गोष्टीकडे 'आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनं'-सारख्या वृत्तीनेंच कवि पाहतांना दिसतो. "भांडवलशाहीबद्दलचे" विचार पंचमहाभूतांच्या रूपकानें, राष्ट्रजागृतीचा उपदेश अमेरिकेच्या दृष्टान्तानें व पारतंत्र्यमुक्तता पोपटाच्या अन्योक्तीनें सांगितल्यामुळें त्यांच्यांतील तेज व सामर्थ्य पुष्कळच मिळमिळीत झालेलें दिसतें. मात्र मधून मधून ॥ राष्ट्र-भावना मरून गेली किति शतकांपासुनी। चाटिता काय वर्ण घेऊनी ?' अशी एखादी ओळ जळजळीत आढळते खरी. पण वरच्यासारख्या भस्मनांचया-मध्यें ती केव्हांच लुप्त होते. आतां कुठें, भारतभूमाय, सिंहगड, विटंबना, ऐसें जिणें कशाला, व नशिबाचा खेळ ह्या ऐतिहासिक कवितांत पूर्ववैभवाच्या अभिमानानें उत्पन्न होणारी वीरश्री त्यांतील निराशेच्या सुरानें व रडगाण्यानें अगदीं गलितोत्साह झालेली दिसते. ह्या प्रकरणाच्या आरंभी उद्धृत केलेल्या कवितेंतील निराशावादाचा सूर स्वतः कवीच्या कवितेंतच ह्याप्रमाणें ऐक-ण्यास मिळतो. सांगावयाचें तात्पर्य एवढेंच कीं, ज्या सामाजिक, आर्थिक व राष्ट्रीय संकटाचा व दुःखांचा नुसता नामनिर्देशही कधी जुन्या कवि-तेंत चुकून आढळावयाचा नाहीं, त्यांची जाणीव प्रस्तुत कवीस आहे खास. त्यांचा विचारही त्यास डाचतो, पण एखाद्या दडपणाखालीं गुदमरून गेलेल्या माणासाप्रमाणें त्यांचा उच्चार मात्र त्यांजकडून प्रस्फुटतेनें होत नाहीं, आणि त्यांतून तरून जाण्यास कोणते मार्ग आचरावे हें सांगण्याचें ही त्यांस सुचत नाहीं. 'मातृहृदयांत' त्यानें 'बालविधवा व बालहत्या' या सामाजिक संकटांचा ऊहापोह करण्याचें मोठें धैर्य दाखविलेलें दिसतें खरें तरी पण त्यांतील चर्चा अगदीं भीत भीत व वर वर अशी केलेली दिसते.

आणि ह्यावर उपाय कोणता तर 'करी जिज्ञासू बेत निश्चयाचा । बालहत्या प्रतिबंध करायाचा ।। आस्तिकांनो ! जा पंढरीस आतां । पहा प्रत्यंतर राउळास जातां ।। इ. इ. ।। पा. ९८ ।। हा उपाय कितपत पुरेसा आहे हें सांगावयास पाहिजे असे नाहीं.

(५) ह्या गटांत 'दासगणूंचें सांत्वन' तर गोळेगावकरांचें अभिनंदन, आणि केशवसुत, श्रीपाद कृष्ण व गडकरी ह्यांची प्रशस्ति अशा व्यक्तिविषयक कवितांचा, वाचनालय व नरवानर ह्यासारख्या किंचित् विनोदी कवितांचा, आणि 'अन्यदर्शना'सारख्या बोधपर कवितांचा समावेश करितां येईल. दामोदर वामन आठवले ह्या दासगणूंच्या प्रियशिष्याच्या निधनानंतर त्यास अर्पण केलेल्या सहानुभूतिपर आर्या फार सुबोध व विनयपूर्ण झाल्या आहेत. संस्कृतशब्दप्रचुरता व दीर्घसमासबाहुल्य ह्या दोषांनीं विवर्जित असें मारोपंती आर्येचें गुणसर्वस्व त्यांत पाहावयास मिळतें. 'वेडें पोर म्हणा मज परि माझा शब्द हा नका मोडूं !।। सेवा सरस्वतीची कांहीं झालें तरी नका सोडूं ! ।। ही लडिवाळपणाची गोड विनवणी दासगणूंसारख्या विरक्त संतासही अमान्य करणें अशक्य झालें, ह्यावरूनच तिचा प्रभाव समजण्यासारखा आहे. कविप्रशस्तींत शिवाजी, तान्हाजी व कृष्णार्जुन ह्यांच्या केशवसुत, कोल्हटकर व गडकरी यांस दिलेल्या उपमा 'हरवन्नीलकंठोऽयं विराजति शिखावलः'प्रमाणें अगदीं अनुचित व दोषयुक्त भासतात. महाजनांची कविता सामान्यतः गभीर स्वरूपाची असल्यामुळें तींत क्वचितच विनोद आढळतो. 'आधुनिक काळ व कवि' ह्या कवितेंत तो उपहासगर्भ आहे तर 'वाचनालय' आणि 'नरवानर' ह्यांत तो विहासयुक्त आहे.

सामग्र्यानें विचार करिता जरी महाजनांच्या कवितेंत तात्त्विक प्रमेयें नाहींत, गूढ संशोधन नाहीं, सृष्टिवर्णनें नाहींत, स्त्रीस्वरूपवर्णनें नाहींत, शृंगारवर्णनें नाहींत व तिच्यांत कल्पनांच्या भराऱ्याही नाहींत तरी पण तींत परमार्थसाधन व नीतिबोध हीं ठळकपणें आहेत. त्याचप्रमाणें देशाभिमान, राष्ट्रप्रेम, समता, बंधुता, सामाजिक व आर्थिक दुःखें कमी करण्याविषयींची तळमळ ह्या गोष्टीही अंशतः तिच्यांत दिसतात. पण सर्वांत श्रेष्ठ गुण म्हटले म्हणजे ती स्वरूपानें सुंदर असून नीटनेटकी, ठाकठिकीची व

अत्यंत मनोरम व आकर्षक आहे. उपमारूपकोत्प्रेक्षादि साध्या अलंकारांनीं ती वाचकाचे मनास खुलविते व नादमधुर अनुप्रासयमकादींनीं ती त्यास भुलविते. तिच्यांत माधुर्य आणि प्रसाद हे गुण उत्कटत्वानें दिसतात. भाषा सर्वत्र शुद्ध, सुबोध व सरळ असून ओघवती आहे. समर्पक शब्दयोजनेंत त्यांचा हातखंडा आहे. ह्या गुणसमुच्चयामुळें त्यांस नांदेडच्या कविवृंदांत अढळ उच्च स्थान प्राप्त झालें आहे. संतश्रेष्ठ दासगणू व कविश्रेष्ठ राजकवि चंद्रशेखर ह्यांच्यासारख्यांनीं त्यांच्या कवितेला प्रशंसापत्रें दिलीं आहेत तर प्रो. लेलेशास्त्र्यांसारख्या पंडित रसज्ञानें तिला प्रस्तावना लिहिली आहे. तेव्हां 'महजनांची कविता ही महाजनांची कविता आहे' ह्या त्यांच्या उद्गारांचा पुनः अनुवाद करून व महाजन प्रार्थितात त्याप्रमाणें 'स्वीकारीं रसिका प्रेमभावें' अशी प्रार्थना करून हें प्रकरण संपवितों.

पुढील श्रुतिमधुर यमक रसिकांच्या कानांत नेहमीं रुणझुण करीत राहील व स्मृति सदैव जागृत ठेवील:—

अभय दे वरदे वरदायिनी । हृदय-मंदिर-मंचकशायिनी ।
नत सदा तव दास पदा नति । नच कदा वरतों वरदान मी ॥पृ.९॥

---

## मानसविहारांतील उतारा

### धनुर्भंगप्रसंगीं सीतेची मनःस्थिति.

पुनः पुनः राघवातें । पाहुनी स्तवी देवातें । जानकी निजमनातें । धीर देई ॥ पा.१२५. तरीहि तैं प्रेमाश्रूंनीं । येती नेत्र डबडबुनी । तनु सारी रोमांचांनीं । कंपाकुल ॥ रूप पाही डोळे भरून । स्मरतांच पित्याचा पण । पुनः जानकीचें मन । कासावीस ॥ "हा ! हा ! ताता आपण । पण मांडिला दारुण । निज कल्याण अकल्याण । कळे न कसें ? ॥ सचिवहि दिसती भ्याड । सांगती न बुद्धि प्रौढ । पंडितसभेंत उघड । अन्याय हा ॥ वज्राहून कठोर । कोठें हें चाप दुर्धर । ही सांवळी सुकुमार । मूर्ति कोठें ? ॥ कोणत्या प्रकारें दैवा ! । मी मनीं धीर धरावा । हिऱ्याचा वेध व्हावा । शिरीषें कसा ? ॥ सभेची गुंगली मति । बा ! शिवचापा मजप्रति । आतां तूंच एक गति । निर्वाणीची ॥ रामातें पाहून तरी । जडता टाकी सभेवरी । सूक्ष्म हो या अवसरीं । तूंच बापा"

## ऐसें जिणें कशाला ! (पा.५६)
(वृत्त-गजल)

ना स्वाभिमान अंगीं ऐसें जिणं कशाला ? । प्रेतापरी जळो हें प्राणाविणें कशाला ? धृ०॥ स्वार्था ! खुशाल आतां थैमान घाल येथें । पाश ! तुझें फुकाचें आतां भिणें कशाला ? ॥ या शत्रुनीं लुबाडा सर्वस्व आमुचें हें । शक्तिप्रयुक्ति साऱ्या या योजिणें कशाला ? ॥ गेली स्वधर्मसत्ता, गेली समस्त मत्ता । आम्ही मनुष्य आहों हें सांगणें कशाला ? ॥

## दोषाविष्करण (पा. १६)
(शार्दूल विक्रीडित)

जो जो दोष अतीव गर्ह्य म्हणूनी अन्यास मी देतसें ।
तो तो आत्मनिरीक्षणांत मजला माझ्याच ठायीं दिसे ॥
देतो ताप म्हणून फेंकुनि दिला पाषाण सूर्यावरी ।
गेला कोठवरो म्हणून बघतां माझ्याच येतो शिरीं ॥

---

# प्रकरण १६ वें

## श्रीकृष्ण वामन गाडगीळ

(सन १८९८)

साऱ्या विश्वीं काव्य वसे । परि तें कवि-रसिकांचि दिसे ! ॥ श्री. गा.

यांचे आजोबा वे. शा. पारंगत दामोदरपंत गाडगीळ हे मोठे सदाचार-संपन्न होऊन गेले. स्नानसंध्या, यमनियम व वेदान्तप्रतिपादन वगैरे गोष्टी त्यांनीं आमरण चालू ठेविल्या होत्या. ह्यांचे वडील डॉ. वामनराव गाडगीळ हेही मोठे सुविद्य व सुस्वभावी गृहस्थ आहेत. एवढेंच नव्हे तर ते एक मोठे गद्य लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. अशा नांमांकित सुवंशांत प्रस्तुत कवीस जन्म लाभला. जिल्हा नादेड मधील देगलूर मुक्कामीं कार्तिक वा। १० शके १८२० मध्ये तो जन्मला. ह्यानीं प्राथमिक व दुय्यम शिक्षण संपादन करून इंटरमीजिएटपर्यंत उच्च शिक्षणही पुरें केलें आहे. आजोबांच्या शिक्षेंत त्यांस वेदान्ताची आवड लागली. वाचन व लेखन ह्यांचा हव्यास त्यांनीं वडिलांपासून उचलला. तर वृत्तींतील ध्येय-निष्ठा व तत्त्वनिष्ठा हीं त्यांनीं आपल्या पितृव्यांपासून (रा. महादेवराव, बी. ए., एल्. सी. ई.) घेतलीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे उत्कृष्ट आनुवंशिक संस्कार यांजवर जन्मतःच घडले आहेत. ह्यामुळें ह्यांचा स्वभाव मूलग्राही व तत्त्वजिज्ञासु झाला आहे. त्यांत भावनांचें प्राधान्य असलें तरी कल्पनांचा विकास फारसा झालेला दिसत नाहीं. मन अत्यंत हळुवार आत्मनिष्ठ व अंतर्मुख असल्यामुळें भावगीतांकडेच त्याचा ओढा विशेष आहे. त्यांचे ठिकाणीं अभिमान व महत्त्वाकांक्षा हीं जरी आहेत तरी एकंदरींत ते स्थितिनिष्ठ, एककल्ली मितभाषी व एकान्तप्रिय आहेत. त्या-मुळें पुढें पुढें येऊन प्रसिद्धि मिळवावी हें त्यांस रुचत नाहीं. उलट इच्छा-शक्ति किंचित् दुबळी असल्यामुळें त्यांच्यांत एक प्रकारचा न्यूनगंडच उत्पन्न झाला आहे. ह्या वृत्तीमुळें त्यांचा व्हावा तेवढा लौकिक झालेला नाहीं. हे इंजिनियर खात्यांत हिशोबी कारकुनाचें काम करीत असतात.

प्रस्तुत संग्रह जानेवारी स. १९२८ मध्यें हैद्राबाद (दक्षिण) येथील महाराष्ट्र वाङ्मयाचें पहिलें पुस्तक म्हणून प्रकाशित झाला आहे. ह्यांत कवीनें विनयशीलतेनें आपलें काव्यसुमन सदाफुलीच्या फुलाप्रमाणें आहे असें सांगून तें परमेश्वरास वाहिलें आहे. हें उचितच आहे:—

सदाफुलीच्या सम काव्य माझें । सुगंध ना त्या फुलण्यास लाजे ! ।
ईशातरी त्वत्पदिं वाहताहें । तेणें तया सार्थक लाभताहे ! ॥

हें पुस्तक भावगीताचें आहे, व त्याची रचना कांहीं छंदोबद्ध व कांहीं जातिबद्ध आहे. आजपर्यंत कवीची पद्यरचना सुमारें ७६०० ओळींची झाली आहे. ह्यांत खंडकाव्य किंवा महाकाव्य नसून स्फुट विषयांवर सुमारें १६५ काव्यें केलेलीं आहेत. ह्याशिवाय १०।१२ इंग्रजी कविताही त्यानें केल्या आहेत. 'माझीं फुलें' गुच्छ पहिला, ह्यांत त्यानें एकंदर ५१ कविता संगृहीत केल्या आहेत. सन १९२० पासून तों १९२७ पर्यंत-तच्या कालात 'न्यू पूना कॉलेज म्यागझीन', 'काव्यरत्नावली', 'शालापत्रक', 'स्वधर्म', 'अरुणोदयमाला,' व 'सहविचार' वगैरे नियतकालिकातून ह्या पूर्वीच प्रसिद्ध झालेल्या आहेत. दुसरा गुच्छही तयार असून त्यांत ७५ कविता यावयाच्या आहेत. त्याची सुमारें ४० पानांची प्रस्तावना 'फुलें वाहण्यापूर्वी' ह्या नांवानें छापून प्रसिद्ध झाली आहे. तीत त्यांनीं आपली मनोभूमिका फार उत्कृष्ट रीतीनें स्पष्ट केली असल्यामुळें त्यांच्या काव्याचें सामान्य स्वरूप व रहस्य हीं झटकन ध्यानांत येण्यास तें एक मोठेंच साधन झालें आहे. अशा साधनाच्या अभावीं टीकाकारांस आपलेच तर्कवितर्क लढवावे लागतात. व इतकें करूनही कवीचें खरें हृद्गत त्यांस उमगतेंच असें नाहीं. म्हणून वरील प्रस्तावनेंतील कांहीं महत्त्वाचे उतारे व त्यानें स्वतः लिहून धाडलेले विचार खालीं दिले आहेत. हेतु एवढाच कीं कवीच्या काव्याचे अंतर्बाह्यस्वरूप वाचकांस त्याचेच तोंडून समजावें. कवि म्हणतोः— "माझ्या मनाचा कल सध्यां ईन्स्टीनचा आपेक्षावाद व मनोविश्लेषणशास्त्र हे विषय आत्मसात् करण्याकडे आहे... काव्य, तत्त्वज्ञान व शास्त्र ह्यांविषयींची माझी आवड एकसारखी वाढत आहे. त्यामुळें लिहिण्यापेक्षां शिकण्याकडेच माझें मन अधिक ओढ घेत आहे. स्वतःचा मनोविकास करून घेणें मला अधिक महत्त्वाचें वाटतें. म्हणजे

कलेपेक्षां मी जीवनासच अधिक महत्त्व देतों. उच्च सारस्वताच्या अभ्यासानें आपलें जीवितही उच्च होऊं शकतें. तसेंच लेखकाच्या जीविताचा परिणामही त्याच्या काव्यावर होत असतो. माझ्याविषयीं सांगावयाचें तर समाज-विषयक प्रश्नांपेक्षां मला स्वतःच्या उन्नतीचें महत्त्व अधिक वाटतें. व्यक्तींची उन्नति झाली कीं समाजाचीही उन्नति आपोआप होते. ह्या माझ्या स्वभावामुळें माझें लिखाण प्रामुख्यानें (Subjective) आत्मनिष्ठ बनलें आहे. तें वस्तुनिष्ठ किंवा समाजविषयक उहापोह करणारें नाहीं, म्हणून माझ्या कवितांतून समाजविषयक प्रश्नापेक्षा अंतर्मनाचे उमाळेच विशेष आढळून येतात. कविता म्हणजे जर ससृतिटीका आहे तर आत्मनिष्ठ काव्य म्हणजे लेखकाची स्वतःवरील टीका म्हणतां येईल.

माझ्या व्यवसायांतील रेखींवपणा माझ्या कवितांतही दिसून येईल. मी जर डॉक्टर झालों असतों तर माझें लिखाण समाजविषयकच Objective झालें असतें.

स्वतांच्या प्रबळ व क्षुब्ध मनोवृत्तींचे स्वयंस्फूर्तीनें वाहूं लागणारे ओघ माझे कवितांत ठिकठिकाणीं दिसून येतात. माझ्या आयुष्यांत भावनांचे प्रमाथी झंझावात अनेक वेळां सुटले आहेत. मनाच्या अशा अवस्थेंत सहज स्फुरलेल्या कवितांनीं मला पुष्कळ शांती व सुख दिलें आहे. कलेसाठीं कला असला अभिनिवेश मजजवळ नाहीं. मायबोलीची सेवा करावी इतकी योग्यताही नाहीं. मनाची तळमळ शांत व्हावी हाच मूळ हेतु असला तरी, माझ्या कविता सहज स्फूर्त आहेत. परिस्थितीवर विजय मिळविण्यासाठीं चाललेल्या माझ्या निष्फळ धडपडींच्या पोटींच ह्या साऱ्या कवितांचा उगम आहे. या कविता स्फुरत असतांना, तरळ, शुद्ध, सात्विक, उच्च निरतिशय व निरपेक्ष असा आनंद मला वेळोवेळीं झालेला आहे. अशा-वेळीं मी सविकल्प समाधीचा आनंद भोगला आहे. ध्येय प्राप्तीची धडपड पण दूरदूर धांवणारें ध्येय आणि त्यामुळें होणाऱ्या दुःखाची प्रचीति, ह्यामुळें हळुवार अंतःकरणांत कवितेचे निष्यंद पाझरतात आणि मग दुःखाचा उपशम होतो, असा मला अनुभव आहे.·········संसृति व नियति यांमध्यें नियमबद्धता आहे असें मी मानतों. परंतु निसर्गात

विकासास व उत्क्रांतिक्षमतेस देखील पुष्कळ क्षेत्र आहे. स्फूर्तीचे क्षण केव्हां येतील हें सांगतां येत नाहीं. ते आले म्हणजे आनंदच आनंद !"

ही सर्वच प्रस्तावना मोठी वाचनीय झाली आहे. तिची भाषाशैली तशीच विषयोपन्यासपद्धति मोठी आकर्षक व भारदस्त झाली आहे. ती जिज्ञासूंनीं मुळांतून अवश्य वाचावी एवढें सांगून पुनः प्रस्तुत संग्रहा-कडे वळणें इष्ट वाटतें. ह्या पुस्तकास दक्षिणा प्राईझ कमिटी, पुणें, व ग्रंथो-त्तेजक मंडळ, इंदूर, या संस्थांनीं बक्षिसें दिलीं असून मुंबई व मध्यप्रांत आहे, वऱ्हाड येथील शाळाखात्यांनीं वाचनालयासाठीं तें मंजूर केलें आहे शिवाय न्या. मू. केशवराव, प्रो. चिं. नी. जोशी, राजकवि चंद्रशेखर (बडोदें). बा. अं. भिडे, टेंभुणीकर, डॉ. केतकर, श्री. कृ. कोल्हटकर, ह. प. पांगारकर वगैरे तज्ज्ञांचें आणि केसरी, नवाकाळ, महाराष्ट्र, सहविचार, रत्नाकर वगैरे नियतकालिकांचे उत्तम अभिप्राय ह्या पुस्तकास मिळाले आहेत. प्रि. प्र. के. अत्रे ह्यांनीं संपादिलेल्या "महाराष्ट्रशारदा" ह्या पुस्तकांत 'बापूची खाणावळ' व 'मर्मकथन' ह्या दोन कवितास स्थान मिळालें आहे. 'हृदयाचा पांवा' ह्या कवितेंतील उतारा मोने ह्यांनीं आपल्या 'मराठी साहित्य व व्याकरण' ह्या पुस्तकांत दिला आहे. ह्याचप्रमाणें प्रो. माटे ह्यांच्या 'महाराष्ट्र सांवत्सरिकातही' ह्या कवीस स्थान मिळालें आहे. ह्या सर्व गोष्टींवरून ह्या कवीची योग्यता ध्यानांत येण्यासारखी आहे.

प्रेमापासून परमार्थापर्यंतच्या विविध विषयांवरील कविता ह्यांत आल्या आहेत. कवितेचें वळण सर्वस्वी जुनें अथवा सर्वस्वीं नवें नसून तें संमिश्र स्वरूपाचें आहे. भाषा, व्याकरण व वृत्त ह्या दृष्टींनीं पाहतां ही रचना सामान्यतः शुद्ध आहे असें म्हणतां येईल. संग्रहातील एकतृतीयां-शाहून अधिक कविता वेदान्त, देव, धर्म, मोक्ष, स्तोत्रें, अष्टकें, नाममहिमा व नीत्युपेदश ह्यांवर आहेत. अर्थात् ह्या स्वर्वस्वी जुन्या वळणाच्या असून त्यांत क्वचित् मोरोपंतांची छाप दृष्टीस पडते. कर्मफल, संन्यास व मोक्ष, जिवाची तडफड, एका उन्मनस्काचे उद्गार, हृदयाचा पांवा, उन्मनस्कालाप, प्राकृतांस, भवार्णव, प्रभुपदीं, निर्वाणीची हांक, गतगोष्टी, प्रभुसपर्या, हरिं स्तवनाष्टक, नाममहिमा ह्यांचा धार्मिक व वेदान्तिक म्हणून उल्लेख करित-येईल तर एकच चूक, चुकल्या तरुणांस बोध, उपदेशाचें औषध, गगनबोध,

एकाकी निर्झरणी, व सुविचार ह्या उपदेशपर म्हणून संबोधितां येतील. हे विषय मराठी कवितेच्या नित्य परिचयाचे असल्यामुळें व त्यांत विचारांचें नाविन्यही नसल्यामुळें त्यांची विशेष चर्चा करण्याचें कारण नाहीं. मासल्यादाखल कांहीं उतारे पुढें दिले आहेतः—

मला अति अमोल ही नरवपू असे लाभली। मला द्विज; तसाचि सत्कुलज संसृती पाहिली. । अती भयद, कीं मुमुक्षु बनलों; तरी वासना। मला कळविती ! तुझ्याविण अहा, जगीं यातना !॥ प्रभुपदीं पा. ७ ॥ ह्या ठिकाणीं पंतांच्या 'पटुत्व सकलेंद्रियीं मनुजता सुवर्शी जनी ॥ इ. केकेची व इतरत्रही दाट छाया पडलेली दिसते. केकावलीसारखेंच हें गीत गोड व ठसकेबाज झालें आहे. 'हृदयाचा पांवा' असाच नितान्तमधुर झाला असून त्याच्या स्वरवर्णनाच्या मिषानें आपल्या कवितेचेच कधीं, मंजुळ, कधीं बेसूर, कधीं शांतीचे, प्रीतीचे व वीर्याचे सौम्य, मधुर व गंभीर असे सूर कवीनें गायिले आंहेत कीं काय असें भासतें. त्याचप्रमाणें गगनबोधांतील 'ये प्राक्तनें तुज जधीं कुदशा जगांत । तूं सोस ती धृति बहू धरुनी मनांत' ॥ व 'उपदेशाचे औषधांतील 'कटु परि हित वचनांतें मानावें, सांगतो अतां सकलां' हा उपदेश कोणासही मननीय व ग्राह्यच वाटेल. 'सुख पळतें, हुरहुरतें, हितवच त्यांचें क्षणोक्षणीं स्मरतें' इत्यादि रचनाही मोरोपंती थाटाची झाली आहे.

कवि, काव्य व कीर्ति ह्यांसंबंधीं, १ रुष्ट कवितासुंदरीस, २ निराश झालेल्या नूतन कवीस, ३ आमची इच्छा, ४ कवीचें स्तोम कां ? ५ मर्मकथन, ६ कवि, व ७ कीर्तिवनिता अशा सात कविता आहेत. पहिलींत हे कविते चाले ! मजवर रुसलीस कां ? तुझ्या अवकृपेनें सर्व विश्व मला शून्य भासतें, 'स्फूर्तीची मम वीणा झाली मूक गडे हाय ! । तुझ्या कृपेविण आतां म्हणुनी मृत्यु प्रिय वाटे । प्रसन्न होउनि सखे, काढगे हृदयांतील कांटे ॥ इत्यादि विचार आले आहेत. दुसरींत 'मधुर गान तुज निसर्ग शिकविल गा रे मग तूं मुक्तरवें । अरसिक जगही भजेल तुज मग थोर मानुनी खचित कवे ॥ असा निराश कवीस धीर दिला आहे. 'बोल बोलुनियां सत्य, मधु, स्निग्ध । करूं लोकांतें जगीं सदा मुग्ध ! । मधुर काव्याची घालुं मोहनी ती । जगीं संपादूं बहुत जनप्रीति !॥' वगैरे विचार 'आमची इच्छा' या कवितेंत

व्यक्त केले आहेत. तर 'व्यवहाराच्या रुक्ष जीवनीं कठोरता अनिवार; । कविहृदयाच्या सुमार्दवाचें स्तोम तरिच हो फार ! अशा रीतीनें जीवनांत कवीचें प्रयोजन काय हें सांगितलें आहे.

'मर्मकथनां'त शिकोनीच आलों । उदरीं मातेच्या । गावें हा आमुचा स्वभावचि ! । हें तत्त्व ग्रथित केलें आहे. 'माधुर्य हुडकुनी चरचरांतिल सारें । शब्दांच्या रूपें मूर्त जगीं करणारे । भवपंथकंटकां मार्दव बहु देणारे । सौंदर्य सत्यता अढळ पदा नेणारे ! ॥ असें कवींचें वर्णन किंचित् पुनरुक्तीनें पुनः केलेलें 'कवि' ह्या कवितेंत आढळतें. 'कीर्तिवनितें'त कीर्तीचा लहरीपणा मोठ्या मार्मिकतेनें वर्णिला असून कवि आपल्यासंबंधीं म्हणतोः—, 'हो ती कीर्ति दिगंति, वा मुळें न हो, 'कृष्णास' पर्वा नसे ॥

प्रेमाच्या निरनिराळ्या छटांवरही कवीच्या सात कविता असून त्यांत केवळ सात्त्विक व वैवाहिक प्रेमाचेच गोडवे त्यानें गाईले आहेत. त्यामुळें ह्या कविता प्रशांत व गंभीर झाल्या आहेत. त्यांत आधुनिक प्रेमाचा चटोरपणा किंवा अश्लीलपणा नाहीं. 'गृहविरहां'त' गृहसौख्याची थोरवी वर्णून कवि म्हणतोः—प्रीतीचें विरहेंच वर्धन घडे; तेणें कळे योग्यता । गेहाची, जगिं त्या मुळींहि तुलना ना आढळे तत्त्वता ॥ संसारांत ऐक्यानें वागलें असतां—भवाब्धिच्या मग पैलतिरीं । नेइल आम्हां तोचि हरि ! ॥ असा दृढविश्वास कविनें 'प्रेमगीतां'त प्रकट केला आहे. त्याचप्रमाणें एक निराश स्त्री म्हणते— देवावरि यास्तव भार । घालुनी आता मी बसतें । दावील दिवस सोन्याचे । कष्टेंच थोरपण येतें ॥ 'प्रियेस' ह्या कवितेंत कवीचें आपल्या भार्येवरील निरतिशिय प्रेम आपणास पहाण्यास सांपडतें :— तुझें भाबडें प्रेम मला वेडावून टाकतें; तुझें ऋजुत्व अलौकिक आहे. ह्या कंटकमय संसारपथीं तूं माझी प्रियकरणी (आहेस) । तव सहवासीं काव्यलता गे फुलते मधुसुमनीं । प्राणाहुनि तूं प्रियतर असशी भाजन मोदाचें । सहवासाचें प्रिये लाभुं दे सौख्य सदा साचें ! ॥ ह्या कवीच्या अभ्यर्थनेस कोणीही 'तथास्तु'च म्हणेल. 'स्वतःला पहा तरी दर्पणीं' ह्या कवितेंत गरीब पति डागिने मागणाऱ्या पत्नीची समजूत करतो कीं— नकोत सखये ! खरेंच तुजशीं सुवर्णमौक्तिक मणी । स्वतांला पहा तरी दर्पणीं ! ॥ असें हें

दांपत्य भावडेंच म्हटलें पाहिजे ! 'चंद्र—कांता' ह्यांतील पत्नीचें तुलनात्मक वर्णन आल्हादप्रद झालें आहे. शेवटल्या 'विरहगीतांतील' ज्वाला फारच दाहक झाली आहे. कवि सांगतो :-- दाहती तनूला ज्वाला विरहाग्नीच्या। मी मुकलों सुखकर तव सहवासा साच्या !

'माझें बालपण' व 'बाळपण' ह्यांतील 'सुलभसौख्यं हि बाल्यं' ही कल्पना फार गोड रंगली आहे व 'गेलें शैशव हाय ! आज पुढतीं येणार कां केधवां ! । असें प्रत्येक वाचक कवीबरोबर म्हणून हळहळल्याशिवाय राहणार नाहीं. 'काव्यीं शैशव आठवोनि रमणें हेंची उरे हो अतां ! कमलकेलींत वात्सल्यरस बऱ्यापैकीं उतरला असून तिच्या निरागस केलि — ॥ बघुनि मोह पडे मतिला अती ॥ असें वाचकासही वाटतें.

सदाफूल व लाजाळू ह्या कवितांत निसर्गवर्णन नसून कवीनें त्या विषयींचे आपले तात्त्विक विचार प्रकट केले आहेत पण 'वर्षाकालां'त मात्र निसर्ग-वर्णन थोडेंबहुत आढळतें. ह्यांतील 'पर्जन्यस्वागतार्थ दर्दुर गायन करिते झाले ॥ ही कल्पना दर्दुरांच्या गायनासारखीच कर्णकटु भासते. ह्यावरून शुद्ध निसर्गवर्णनांकडे कवीचा ओढा फारसा दिसत नाहीं.

'आम्ही मावळ जरी भावडे; आम्हां लेखणी परकी । स्वदेशयश तें स्वधर्मयशाही पसरू साऱ्या लोकीं ।' असें म्हणणारे 'शिवबाचे मावळे' आधनिक काळांतले हताश व निर्वीर्य असे मराठे भासतात. साकी वृत्तानें ह्यांतील वीररस अगदींच मिळमिळीत झाला आहे. रणबाजी, गाफिलगिरी, शिकस्त, नेस्तनाबूद व आबाद वगैरे परकी शब्दांची खैरात ही येथें पुष्कळ झालेली दिसते. त्याचप्रमाणें 'दुर्दैवी हिंदभू'तलें दुर्दैवाचें रडगाणें वाच-कास अधिकच रडकें बनवितें. कारण त्यात ह्या दास्यगर्तेतून वर येण्याचा मार्ग सुचविलेला नाहीं. कवि सांगतो:— स्वातंत्र्यहीन झाली ही माय हिंद-भूमी । झालों मलूल सारे आम्ही पुरे निकामी !। स्वायत्तता कुठें हो गेली अतां सुखाची । ही वेळ आज आली पंकांत लोळण्याची !। आणि शेवटीं 'जावी कशी स्थिति ही दास्यांत लोळण्याची !। हे ईल हिंदभू का स्वायत्त पूर्ण साची ? ॥ असे प्रश्नोद्गार काढून कवि स्तब्ध बसतो !

त्याचप्रमाणें सामाजिक बाबतींतही कवि केवळ शाब्दिक दुःखप्रदर्शना-पलीकडे जात नाहीं. विधवेविषयीं तो म्हणतो— कां उद्विग्न बरें ललाम

ललना रात्रंदिनीं ही असे ! । हा ! हा ! कुंकुमहीन दीन वितता तीच्या ललाटीं वसे ! ॥

एकंदरींत ह्या आत्मनिष्ठ कवीचें मन सामाजिक व राष्ट्रीय दुःखांनीं पिळवटत नसल्यामुळें ह्या एक दोन कवितांत आकस्मिकपणें आलेले त्याचे विचार अगदीं निर्जीव व वरवरचे भासतात.

'बापूंची खानावळ' ही एकच विनोदी कविता ह्या संग्रहांत दिसते. ह्यावरून वरील विषयांप्रमाणें विनोदाचीही कवीस फारशी आवड दिसत नाहीं. ह्या कवितेंतील विनोद साधारणपैकीं बरा साधला आहे. हें पुढील उताऱ्यावरून सहज समजेल.

केशवसुत, गोविंदाग्रज, माधवानुज वगैरे आधुनिक कवींचा नामनिर्देश कवीनें मोठ्या आदरानें केलेला आढळतो, एवढेंच नव्हे तर त्यांची छापही ह्या काव्यावर जागोजाग स्पष्टपणें उमटलेली दिसतो. एकंदरींत ह्या कवीच्या कवितेचें स्वरूप ह्या कवीनेंच केलेल्या 'लाजाळू'च्या वर्णनाप्रमाणें शब्दशः आहे असें म्हणतां येईलः—

(शिखरिणी)

तुझ्या अंगाची गे, मृदुल मधुता ये न तुलतां ।
तुझ्या अंगालागीं वसन हिरवें दे रुचिरता
जरी अंकीं तूझ्या मधुर सुमनें तीं न रमतीं,
तरी तूझ्या ठाईं खचित जडली गे ! मम रति ।
तुझी वृत्ती आहे बहु सरळ साधी सुलतिके ।
तुझ्या भोळ्या भावा मुळिं न नखरा तो रुचुं शके ॥
तुझ्या शालिन्याची अमित महती मी कथुं किती ।
तुझ्या ठाईं बाई बहुत रमते गे ! मम मति ॥ २ ॥
नसे अंगीं तूझ्या अणुभरहि औद्धत्य लतिके ।
तुझे सारे बाई मज रमविती भावहि मुके ! ॥ इत्यादि.

बापूंची खानावळ (विद्युन्माला)

ताज्या खबरा अष्टदिशांच्या । कानीं पडती येथें साऱ्या ! । वाङ्मय-चर्चा संतत चाले । राजकारणहि येथें उसळे ! । व्यापारांतिल तेजी मंदी । येथें येई वादविवादीं ॥ नाट्यकला ती चित्रकला ही । येती साऱ्या ललित-

कलाही । मानवतेचे अजब मासले । अवलोकनि हो येती सगळे । धन्य धन्य ही भोजनसंस्था । अल्पलाभ तरि तिचा गृहस्था । (कारण, गृहस्थास खाणावळींचा प्रसंग क्वचितच येतो.)

एकाकी निर्झरिणी (वसंततिलका)

"कोणीं मला मिळुं नये । न च मीहि कोणा । मार्गी मिळेन परिसा मम हाच बाणा." गर्वें असे वदुनि धांवत एकटी ती । चाले पुढें; तिज कुणी मिळनी न जाती । ती ही कुणा न कधिंही पुढती मिळाली । या कारणें तिजसि विस्तृतता न आली ॥ तो वालुकामय पुढें पथ रुक्ष आला । आला तिच्यावरि खरा अति घोर घाला । क्षीणत्व तीस सिकतेमधिं फार आलें । वाहूं बघे परि मुळीं नच नेट चाले ! । सारे तिचे विफलचि मग यत्न होती; । हा, हाय ! तेथचि लया झणि पावली ती ! । "रत्नाकराप्रति मिळूं" असली सदाशा । वाटे पदोपदिंच निर्झरिणीस खाशा । त्या वाळुनें तिज परी गिळलेंच पार । होता पुढेंच अजुनी किती अब्धि दूर ।

जीवाची तरफड (शार्दूल.)

माझ्या बुद्धिस कार्य लौकिक कदा गोडी न देतें खरो ।
मोदावें करुनी अलौकिक जनीं इच्छा अशी अंतरीं ।
देहांतूनि उलावयास बघते चिच्छक्ति माझ्यांतली ।
जेवीं पोपट पंजरीं तरफडे मुक्ती मिळाया भली !

---

# प्रकरण १७ वें.

## नारायणराव नांदापूरकर

### (सन १९०१)

नारायणरावांचा जन्म सन १९०१ मध्यें मुक्काम नांदापूर, ता. कळमनूरी, जि. परभणी, येथें झाला. ह्यांच्या घराण्यांत देशपांडेपणाची वृत्ति चालू आहे. यांचें प्राथमिक शिक्षण नांदापूर येथें झाल्यावर दुय्यमशिक्षणार्थ कांहीं दिवस ते हैद्राबाद येथें राहिले होते. परंतु उस्मानिया म्याट्रिकची परीक्षा त्यांनीं परभणी हायस्कूलांतूनच दिली. नंतर उच्च शिक्षणासाठीं ते पुनः हैद्राबादेस आले व उस्मानिया कॉलेजांत प्रविष्ट झाले. तेथें संस्कृत व मराठी हे विषय घेऊन ते बी. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गांत उत्तीर्ण झाले. त्यानंतर त्यांनीं तीन चार वर्षें उस्मानिया कॉलेज, औरंगबाद, येथें मराठी शिकविण्याचें काम केलें. हें काम चालू असतांच खाजगी रीतीनें अभ्यास करून त्यांनीं अलीगड युनिव्हर्सिटीची संस्कृत ह्या विषयांत सन १९२८ त एम. ए. ची पदवी मिळविली. पुढें त्यांची औरंगाबाद येथें हायस्कूल शाखेत कायमची नेमणूक झाली. गुदस्त सालापासून ते उस्मानिया कॉलेज, हैद्राबाद, येथें मराठीचे ज्यूनीअर लेक्चरर म्हणून काम करीत आहेत. हे मोठे विनयशील व मनमिळाऊ असल्यामुळें विद्यार्थीस व वरिष्ठांस सारखेच प्रिय झाले आहेत. ह्यांच्या अंगांतील दुसरा मोठा गुण म्हटला म्हणजे अभ्यासप्रियता हा होय. त्यानीं आपल्या विषयाचें सतत वाचन ठेविलें असून मुक्तेश्वर व मोरोपंत ह्यांच्या भारतांवर एक तुलनात्मक लेख लिहिला आहे. तो लौकरच प्रकाशित झाल्यावर वाचकांस त्यांच्या खोल अभ्यासाची व सूक्ष्म निरीक्षणाची ओळख पटल्याशिवाय राहणार नाहीं. इंटरमीजिएटमध्यें शिकत असल्यापासूनच त्यांस कविता करण्याचा नाद लागला आहे. त्या वेळीं मोरोपंतांचीं कचदेवयानी व सावित्री हीं आख्यानें परीक्षेसाठीं वाचीत असतां वर्गांत रोजच्यारोज होणारे भाग आपल्या स्वतःच्या आर्यांत करून त्या आर्या आपल्या

प्राध्यापकांस दाखविण्याचा त्यांचा क्रम असे. ह्यामुळें त्यांची मोरोपंतांवर फार भक्ति जडली. त्यामुळें त्यांच्या कवितांवर मोरोपंती वळणाची छाप चांगलीच दृग्गोचर होते. जुन्या कवितेप्रमाणेंच नवीन कवितेचाही त्यांनीं अभ्यास केला असल्यामुळें त्यांच्या कवितेवर ह्या कवितेचेही इष्ट असेच परिणाम झाले आहेत. म्हणून त्यांच्या कवितेंत जुन्यानव्याचें मोठें मधुर संमीलन झालेलें दृष्टीस पडतें.

'वाग्विलास' ह्या नांवानें त्यांचा एक कवितासंग्रह सन १९२८ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. ह्याचीं ६५ पानें असून त्यांत एकंदर ३६ प्रकरणें आहेत. ह्यांतील कवितांची संख्या ३३६ असून त्यांच्या ओळी सुमारें १३०० असाव्या. पण ह्यांचा काव्यव्यासंग फार दांडगा असून त्यांनीं पुष्कळच काव्यनिर्मिति केली आहे. परंतु प्रकाशक किंवा पैसा ह्याच्या अभावीं ती तूर्त धूळ खात पडली आहे. मराठवाड्यातील आधुनिक कवींचीं ही एक सर्व सामान्य अडचण आहे. त्यावरून पदोपदीं जी एक महत्त्वाची गोष्ट सिद्ध होत आहे ती ही की येथें कवींची वाण नसून प्रकाशकांची वाण आहे. कविता गवतासारखी उदंड आहे. असें विनोदानें म्हणा किंवा परमार्थानें म्हणा, तिचा पुरस्कर्ता इकडे आज कोणी नाहीं. 'जीर्णमंगे सुभाषितम्' अशी स्थिति प्राप्त झाली आहे. ह्या कवीच्या अप्रकाशित कृतीचा नामनिर्देश पुढें यथास्थल पाहावयास मिळेलच; तूर्त त्याच्या प्रकाशित झालेल्या 'वाग्विलासाकडे' वळूं.

ह्यांत एकंदर ३६ विषयांवर कविता आहेत म्हणून वर सांगितलेंच आहे. निसर्ग, प्रेम, राष्ट्रीय व स्फुट असें त्यांचें ठळक वर्गीकरण करता येईल.

(१) **निसर्गपर** कवितांवर बालकवि ठोमरे ह्यांच्या वळणाचा बराचसा ठसा उमटलेला दिसतो. उपमा, रूपक, उत्प्रेक्षा इत्यादि अर्थालंकारांची व अनुप्रासयमकादि शब्दालंकारांची गर्दी कवीनें सर्वत्र उडवून दिली आहे. बालकवीसारखेंच या कवीचेंही निसर्गाशीं खेळकरपणाचें नातें दिसून येतें. निसर्ग आनंदानें व सुखानें ओतप्रत भरला आहे, मनुष्यानें तो डोळसपणें हुडकावा व यथेच्छपणें लुटावा, ही कवीची इच्छा दिसते. परंतु सर्वांनाच अशी दृष्टि असणें शक्य नसल्यामुळें कवीनें ती

कामगिरी करून काव्यरूपानें आपल्यापुढें ठेविली आहे. हेंच धोरण अशा प्रकारच्या कवितांत दिसून येतें. ह्यांपैकीं कांही कविता पाहूं:—

'हीं फुलें मुलें वेलींचीं' ही कविता फुलांमुलांच्या टिळक कवीची आठवण करून देते. तीं—॥ डुलतात । निजानंदांत । जशीं काव्यांत । मनें रसिकाचीं । हीं फुलें मुलें वेलींचीं ॥ 'निसर्ग संगीत' हें एक नितान्तमधुर निसर्गगीत आहे. त्यांत ॥ निसर्गासवें जडमूढांना । संगीताच्या असंख्य ताना । उठती कविहृदयांत बुडाला निसर्ग संगीतांत ॥ १ ० ॥ हें निसर्गाचें शांत स्वरूप दुःखी-कष्टीं माणसास क्षणभर खात्रीनें रिझवील असें वाटतें ! पुढें 'गुलाब' ह्या कवितेंत युवतींच्या हृदयांत वसे । प्रेम बोलती तया पिसें । तोच कपोलीं पहा ठसा । गुलाब फुलला हंसत कसा ॥ इ. इत्यादि ओळींनीं 'गुलाबी कोड्या'ची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं. निसर्गपर कविता-तील आनंदमय वातावरण, खेळकर शब्दयोजना व अभिनव कल्पना या योगानें अत्यंत सुखसंवेदनात्मक झालेलें अनुभवास येतें. पुढील कल्पना पहा:— पदर धुक्याच्या मुखावरी । अपसारुनि रवि चिबुक धरी । सृष्टि सती चिबुकस्पर्शें । लाजुनिया दंवमिषें हसे ॥. . .दिशादिशांची कळी खुले । निसर्गदेवी मुदें डुले॥ ३॥ (दिशादिशाची कळी खुले). 'अमावास्येच्या रात्रीं'त विरहोत्सुक तारा आपला प्रियकर शशांक यास शोधून शोधून दमल्यावर रागानें लाल कशा झाल्या, मग निरनिराळे पुंज करून त्यांनीं सर्व कुंज कसे धुंडले, नतर असंख्य दिवट्या बनून आकाशाचें पटल फाडण्याचा निकर त्यांनीं कसा केला व सरते शेवटीं क्षितिजप्रांतिं चिता भडकली आत्म-यज्ञ त्यांत । सर्वही तारा बघतां बघतां प्रेमें करितात ! ! ॥ आत्मयज्ञ कसा केला हें वर्णन मोठें चटका लावणार झालें आहे. त्यामुळें ह्या अमावा-स्येच्या रात्रींत सुद्धां पौर्णिमेचें चांदणें पडल्यासारखं भासतें. पुढील 'काळोख' ह्या कवितेंत "कृष्ण कन्हया कृष्ण् कांबळी विश्वावर पसरी ॥" अशा अनुप्रासांत ठुमकत येणारी ही मुक्तेश्वरी कल्पना मोठी गमतीदार आहे, तर पुढील लपंडावाची कल्पना पुराणपुरुष प्रकृतिसवें कीं लंपडाव खेळे । तम पसरे विश्वांत, झांकितां चंद्र-सूर्य-डोळे ॥ ५ ॥ तितकीच अचाट आहे. आणि रसचि भयानक पसरे पाहुनि भयानका रुद्रा । ही कल्पना अशीच भयानक वाटते. आणि सरते शेवटीं ह्या आपल्या नव

नव उत्प्रेक्षांना दृष्ट लागूं नये म्हणूनच कवीनें पुढीलप्रमाणें दृष्ट काढून हें प्रकरण संपविलें आहे असें दिसतें. सृष्टिसतीला दृष्ट न व्हावी म्हणुनि गालबोट। काळोखाचें प्रभुरायानें लावियलें ठीट ॥१३॥ पण ह्या तीटीनें किंवा गालबोटानें सृष्टीसुंदरीचें व उत्प्रेक्षांचें सर्वच तोंड काळें झालें ह्याचें भान कवीस राहिलें नाहींसें वाटतें! पुढील 'मृत पुष्पास' ह्या कवितेंत कवीनें आपलें निसर्गप्रेम 'तुजविणें खुलें। हृदय मम झालें। जड जगत्, सकल चैतन्य तुजसवें गेलें ॥ ८ ॥ व्यक्त केलें आहे. ह्या संग्रहांतील सृष्टिवर्णनेंच मोठीं मोहक झालीं आहेत.

(२) पुढील गट प्रेमविषयक कवितांचा होय. त्यांत 'प्रेमासाठीं' व्यर्थ जगणे, मुरली, मी जाईजुईची कळी, हरवलेली प्रीत, हिरवळींत लाली वगैरे कवितांचा संमावेश करितां येईल. त्यांत निसर्ग व प्रेम ह्यांचें सुंदर मिश्रण केलेलें आहे. म्हणजे निसर्गवर्णनाच्या पार्श्वभूमीवरच प्रेमाचें आलेखन केलेलें आहे. त्यामुळें त्याचें स्वरूप सर्वत्र सात्त्विक व निर्विषयिक असें झालें आहे. शृंगाराला त्यांत प्रकट स्थान नाहीं. कित्येक ठिकाणीं तर निसर्गाशीं इतकें बेमालूम मिसळलेलं आहे कीं कवि कोणतें वर्णन प्रामुख्यानें करीत आहे हें समजणें कठीण झालें आहे. पण त्यामुळें शृंगारराजाचें कोमल मार्दव व मधुर मादक वैभव हीं ह्या प्रेमकवितात आढळत नाहींत. 'प्रेमासाठीं' या कवितेतील चंद्रकुमुदिनी, सूर्यउषा, रात्रदिन, भृंगकलिका, वृक्षवल्लरी ह्यांच्या प्रेमाचा ओघ वर्णीत वर्णीत कवि जेव्हां हिमनगबाळा व शिव, ब्रह्मयोनि (!) ऊर्वशी, व पुरुरवा, व अर्जुन-सुभद्रा ह्या पौराणिक कथांकडे वळतो तेव्हां उत्तरोत्तर मौज कमी होत जाऊन शेवटल्या— विश्ववेदिका व्यापुनि उरला प्रेमाचा विस्तार। प्रेमासाठीं विश्व निर्मितो ईशहि वारंवार ॥ ह्या तत्वज्ञानानें तर ती अगदींच अदृश्य होते. उपभुक्तपरित्यक्त कलिकेचा शोक 'व्यर्थ हें जगीं या जगणें' ह्या कवितेंत बरा वर्णिलेला आहे. 'मुरली'मधील प्रेम राधेच्या एकांतिक भक्तिसरांत विलीन झालें असल्या-मुळें त्यांत दिव्यत्वच अधिक आहे. 'मी जाईजुईची कळी' ह्या कवितेंतील प्रेमी स्त्रीपुरुषांच्या शाब्दिक कोट्या किंवा पकडी मोठ्या चटकदार झाल्या आहेत. 'हरवलेली प्रीत' एकदां गेली कीं काय-

मची, हें तत्त्व एका विरही जनास समजावून देण्यासाठीं कवीनें निसर्गांतील सर्व उदाहरणें त्याच्यापुढें ठेवून शेवटीं असें सांगितलें आहे कीं— हृदयकपाटीं प्रीत कोंदली–दुर्विधिनें परि जाय उडुन। ती कुणीं आणावी तिथें फिरुन !॥ पण ह्या पांडित्यानें त्याची तर समजूत पटावयाची नाहींच पण वाचकांचीही पटेल कीं नाहीं ह्याबद्दल शंका वाटते. 'हिरवळींत लाली' हें गीत मात्र फार गोड झालें आहे. ह्यांत पतिपत्नींचा संवाद मोठ्या मार्मिकतेनें गुंफिला आहे. हिरवळींत लाली कशानें आली ह्या पत्नीच्या प्रश्नास पुढील उत्तरें पतीनें दिलीं आहेतः–

कोणी गंधर्व प्रीतीचें पर्व अभाळांत लुटीत असेल किंवा रविकिरणांनीं सृष्टिसुंदरी न्हाली असेल; किंवा उषा नटून पतीची वाट पाहात असेल; किंवा अपरेस (पश्चिमेस किंवा दुसऱ्या स्त्रीस) तिचा हृदयेश (सूर्य वा प्रियकर) गालीं चुंबितो आहे म्हणून हा भोंवतालीं त्यांच्या प्रणयाचा रक्तिमा पसरला आहे; पण तें दुसऱ्यांचें कशाला ? हे लाजरे ! तूंच मला जीं चुंबनावर चुंबनें दिलींस तीं लालीलाल ह्या हिरवळींत लपलीं आहेत; किंवा तुझ्या नवतीची लालीच ह्या हिरवळींत भरली आहे. बरं का ! हा संवाद येथेंच ऐन मधुर प्रसंगीं कवीनें त्रुटित करून जरी आपली शालीन शिष्टता राखली असली तरी आपल्या नाजूक नर्मविनोदाचें पारितोषिक न मिळाल्याबद्दल त्या प्रियकराचे शाप व हिरमोड झाल्याबद्दल होशी वाचकांचा रोष त्याला सहन करण्यास तयार राहिल्याशिवाय गत्यंतर नाहीं. सर्व गीतांत हेंच एक खरें प्रेमगीत आहे असें म्हणतां येईल. एकंदरींत हा कवि निसर्गवर्णनांत जसा खुलतो तसा प्रेमरसांत रंगत नाहीं हेंच खरें !

(३) तिसऱ्या गटांत 'राघोबाची भरारी', 'कर्तव्यानंतर', 'भवानी समशेर' ह्या ऐतिहासिक; व 'लक्ष्मीपूजन' व 'अस्पृश्याचा टाहो' ह्या अनुक्रमें आर्थिक व सामाजिक कवितांचा समावेश करितां येईल.

'राघोबाच्या भरारीं'तील पुढील वर्णन वक्रोक्तीनें मजेदार झालें आहे. गड किल्ले आडवे येतां–उडवोनि तयांना द्यावें। पर्वत करितां मध्यस्थी– तुडवोनि तयांना जावें। जरी त्यांच्या नेत्रांवाटे सरितांचे पूरही यावे ॥ शेवटीं शेवटीं ह्या वर्णनास पोवाड्याचा थाट आला आहे. पण संताजी, धनाजी, तानाजी, बाजी यांचेबरोबर राघोबाही निर्माण कर ही देवाजी

जवळची मागणी मात्र रुचण्यासारखी नाहीं. राघोबा एकदां होऊन गेले तेवढे पुरे असेंच जो तो म्हणेल! शिवाजीची कामगिरी अलौकिक. ती 'कर्तव्या'च्या आकुंचित मापानें कशी मापतां येईल? आणि मरणसमयीं 'ये गोड नीज; दिसतें सुस्वप्न येतों' ही मनःस्थिति त्यास लाभली असण्याचा संभवही कमीच दिसतो. 'भवानी समशेर'मधील संवादांत येसूबाई व बालराजे शिवछत्रपति हीं बोलत नसून त्यांत खुद्द कवीच आपले पांडित्या-सह आविर्भूत झाला आहे असें वाटतें. पाहाः—

घनदाट धुळीच्या मेघीं—चमकते चपल चपला ही। उडविते अरिशिरें गगनीं—भट्टींत जशी कां लाही। तारकांसवें हितगुज तीं—परतती करुनि लाव-लाहीं। ह्या ठिकाणची भट्टींतल्या लाहीची उपमा समर्पक वाटत नाहीं व हितगुजानें सूचित केलेला विनोद वीररसाची हानि करणारा भासतो. येथील रूपकानुप्रास सुंदर आहेत पण ते येसूबाईच्या तोंडीं शोभत नाहींत. पुढील रूपकानें तर ही अस्वाभाविकता कळसास गेलेली दिसते. येसूबाईच पुढें म्हणतेः— अरिशरीर समिधा लागे प्राणाहुति रण-मखि मागे। घृतधारा रुधिरहि सांगे। रणदेवी वदती हिजला—समशेर भवानी बाळा॥४॥ रिपुसेनासागर मथुनी। जयरत्न घेउनी येते। पर-काया-कारा-मधुनी-असु विहग उडवुनी देते। स्वातंत्र्य जिव शिवा—देई—ज्योतींत ज्योत मिळवीते ॥ इ. हीं रूपकें—हा वेदान्त—घटकाभर येसूबाई बोलली असें मानलें तरी तो बाल-राजांना काय होय? पण कवि मात्र खात्रीनें सांगतो कीं—परिसतां मातृवच-नाला—निज ठेवा त्यास कळाला। झणिं उतरे अंकावरुनी बाळपणा पार पळाला। इ. एकदरींत ह्या ऐतिहासिक कवितांत उत्तरोत्तर उत्कर्ष होण्या-ऐवजीं अपकर्षच झालेला आढळतो. लक्ष्मीपूजनांत भारतभूचें दारिद्य प्रकट केलें असून देशोद्धार खरा, न मोक्ष दुसरा, त्यां ना दुजी उन्मनी। आम्ही तत्कुलदीप! हा! बुडविलें स्वातंत्र्य! कैसे तरूं॥ लक्ष्मीची दिसते न आज वसती पूजा कशाची करूं॥४॥ असा शेवट केला आहे तो ठीक आहे. पण ह्या ठिकाणींही वेदांत नसता तर बरें झालें असतें असें म्हणावेंसें वाटतें. 'अस्पृश्याचा टाहो'मधील बुद्धिवाद बिनतोड आहे पण त्यांत जिव्हाळा दिसत नाहीं. एकंदरींत कांहीं राष्ट्रीय कविता असल्याशिवाय संग्रहास विविधता व पूर्णता येत नाहीं अशी जी समजूत आजकाल रूढ झाली आहे त्या सम-

जुनीनेंच ह्या कवितांस ह्या संग्रहांत स्थान दिलें असावेसें वाटतें. तें कसेंही असो पण कवीची वृत्ति ह्या विषयांत स्वभावतः रमते असें वाटत नाहीं.

(४) चवथ्या गटांत अनेक स्फुट विषयाचा समावेश केला आहे. त्यांत 'प्रिया माझी कळि लाल गुलाबाची' व 'प्रणयपराग' ह्या दोन रूपांतरित कविता येतात. पहिली रॉबर्टबर्नसच्या एका कवितेवरून तर दुसरी टागोर ह्यांच्या एका कवितेवरून केलेली आहे. दोहींस मराठी पेहराव फार सुंदर चढविला गेला असल्यामुळें कवीचें भाषांतरांतलें नैपुण्य-ही व्यक्त होत आहे. 'ही कोण' व 'पूर्णाकांठीं' ह्या दोन कवितांत कवीनें स्त्रीसौंदर्यवर्णनाचा एक नवीन नमुना दाखविला आहे. पहिलींत उत्प्रे-क्षानुप्रासांची व पदलालित्याची त्यानें गर्दी उडवून दिली आहे. पण शंकर–पार्वती; राम–सीता; कृष्ण–राधिका, ब्रह्म–माया याच्या बरोबरच रंभा, यक्ष–गंधर्व-सुंदरींचा उल्लेख; त्याचप्रमाणें माघ–बाण सुबंधु-कालि-दास-भवभूति यांच्या प्रतिभेबरोबरच बसवलेली मोरोपंती आर्या; किंवा दुष्यंत शकुंतला, शिवाजी स्वराज्यश्री याची प्रियकराची चुकलेली प्रीत व दौलतरावाची दौलत यांशीं घातलेली सांगड पाणिनीच्या प्रसिद्ध सूत्रांत एकत्र गुंफलेल्या शब्दांसारखी विचित्र वाटत नाहीं काय? पुनः कमल-मुख, पद्मवदन, चंद्रमुखी, स्तनौ क्षितिधरोपमौ वगैरे जुनी ठराविक वर्णन-पद्धति फारसा आल्हाद देत नाहीं.

दुसरींत कवीनें एका वनकन्यकेचें शब्दचित्र चितारलें आहे. ह्यांतच सृष्टिसौंदर्याचें वर्णन इतकें मिसळलें आहे कीं वर्ण्य विषय स्त्री कीं सृष्टि ह्याची शंका उत्पन्न होते. ती रमणी दवबिंदु धारण करणाऱ्या प्रभात-रमणीहून अधिक सुंदर आहे; जाईजुईच्या फुलांप्रमाणें वनांत तिचा परिमल पसरतो; दृष्टि वसंतऋतूप्रमाणें आहे; तिचे केस धुक्यासारखे कुरळ आहेत; श्रावणमासांतील आकाशस्थ इंद्रधनूप्रमाणें विशाल भाल; गुलाबासारखे गुबगुबीत गाल; गायन सारिकेसारखें गोड वगैरे वर्णन अभिनव आहे। आंत झाकिती दंतपंक्ति कीं दर्शन न घडो वाऱ्याचें। चुंबन मोह अनावर करिती, दृष्टिहि हरि ती त्याच परी। ...शिवें जाळिला वदती खोटें! काम तर हिच्या स्मितांतरीं ॥ वगैरे ओळी मोठ्या हृद्य आहेत.. पण असें सुमारें ४९ ओळींत शारीरिक सौंद-

यांचें वर्णन करून शेवटल्या ओळींत कवीस हृदयाची आठवण झालेली दिसते व तो म्हणतो:—

रूप जगीं तव यापरि सुंदर परि न लोभवी मना सये ! । हृदय तुझें जगतास लोभवी लावण्यीं त्याचीच भरी ॥ इ. १३. परंतु त्याचे गुण जरी कवीस ज्ञात असले तरी ते जगतास अज्ञातच ठेवले गेले असल्यामुळें ते जगास लोभवतात हें म्हणणें थोडेसें विसंगत वाटत नाहीं काय ? ह्या ठिकाणींही कवीनें शब्दार्थालंकारांची बरीच खैरात केली आहे.

'भोंवरा' 'अस्तास जाणाऱ्या सूर्याची दुर्दशा', 'का हो परंतु मनुजागति हीन झाली' ह्या तीन बोधपर तर 'उपरति' व 'परमेश्वरास' ह्या दोन परमार्थपर आहेत. 'मानवा, बोध हा नवा नसे तुज कांहीं' असें कवीनेंच भोंवऱ्यांत सांगितलें आहे. 'उपरती वरती मज दे, रती' ह्या कवितेंतील कर्णमधुर यमकानुप्रास कवीबरोबरच वाचकासही भक्तिप्रवण करतात, तर 'परमेश्वरस्तवात' कवि सर्वतोपरी प्रतिमोरोपंत बनलेला दिसतो. ह्याची प्रतिमा—पण कमी संस्कृतप्रचुर— दे. ल. महाजनांच्या काव्यांत आढळते. खालीं नमुन्याकरिता एक एक ओळ दिली आहे:—

प्रभु ! तव पदारविंदीं अरविंदीं मधुपसें मना स्थापी ॥३॥
नलिनिजसंभवताता ! मन्मानस—नलिनिशीं विहर हंसा ॥
वरदा ! वरवर दे हा कीं त्या पावो पाहा परमहंसा ॥२॥
तरणिकुलालंकारा ! लंकाराते ! सुरां वरिष्ठ-तमा ! ।
देवा दे ! वाचाया वाचा तव गुण पयोधवल महिमा ।
वांचाया भवसागरिं योग्य तरी; मज न मानवे महि मा ॥१०॥

'तेव्हां आणि आतां' ह्या भूतवर्तमानांतील विरोध दाखवून कवि म्हणतो "आतां जीवन जीवनक्षम नसे लाजेल या जी ! वन ॥६॥ शार्दूल-विक्रीडांत चार श्लोकांत कवीनें हत्ती, व्याघ्र व सिंह ह्यांच्या पराक्रमाचें वर्णन मोठें ठसकेदार रीतीनें केलें आहे. तेंही मोरोपंती थाटाचेंच पण थोडेसें क्लिष्ट झालें आहे.

सामग्र्यानें ह्या कवीविषयीं बोलावयाचें तर त्याची योग्यता आधुनिक कवींत बऱ्याच वरच्या दर्जाची लागेल असें म्हणण्यास हरकत वाटत नाहीं. मोरोपंतादि पुराणकवींच्या दृढ अभ्यासानें त्यानें उत्तम भाषा-

प्रभुत्व मिळविलें आहे. त्यामुळें त्याची भाषा सुपरिष्कृत व अत्यंत शुद्ध अशी झाली आहे. अलीकडे रांगडी भाषा मुद्दाम योजण्यांत व व्याकरणाकडे दुर्लक्ष करण्यांतच कांहीं कवि धन्यता मानूं लागले आहेत. त्यांस शुद्ध नागरभाषेंतही चांगलें काव्य करतां येतें हें ह्या कवीपासून शिकतां येईल. दुसरा मोठा ठळक गुण म्हणजे सुबोधता होय. हा कांहीं अपवादखेरीज करून ह्या कवीच्या सर्व कवितांत दिसून येतो. आपले विचार विकार योग्य शब्दात पूर्णपणें प्रकट करण्याची कला अलीकडे फारच कमी कमी दिसूं लागली आहे. उलट आपली कविता गूढ मानली जावी म्हणून कांहीं कवि विचार त्रुटित करून तिच्यात मुद्दाम दुर्बोधत्व आणितात अशांसही ह्या काव्यावरून बराच बोध घेतां येईल. कल्पनांचें वैचित्र्य हा त्याचा तिसरा गुण होय. निरनिराळ्या कल्पनांवर सुंदर पोषाक चढवून त्या वाचकापुढें मांडण्यात त्याचा हातखंडा आहे. त्यांतच शब्दार्थालंकारांची विपुल सामग्री त्याजवळ सदैव तयार असल्यामुळें त्यांचें सादर्य अधिकच खुलून दिसतें. त्यातल्या त्यांत तो निसर्गाशीं बराच समरस होत असल्यामुळें त्याचीं निसर्गवर्णनें अत्यंत बहारीचीं झालीं आहेत. नव्हे इतर कोणत्याही कवितापेक्षां त्याच्या निसर्गपर कविताच अधिक चांगल्या झाल्या आहेत. सौंदर्यदृष्टि, व्यवस्थितपणा, टापटीप, व प्रमाणबद्धता वगैरे कलावंताच्या ठायीं असणारे गुणही ह्याचे ठिकाणीं आढळतात. पण त्याच्या काव्यांत भावनांची खळबळ तितकी प्रत्ययास येत नाहीं. त्यामुळें एखाद्या रसाचा परिपोष करून वाचकास तल्लीन करून टाकण्याचें सामर्थ्य त्यांत अनुभवास येत नाहीं, असें म्हणावेंसें वाटतें. मोरोपंताच्या व्यासंगानें त्याच्या गुणाबरोबर त्याचे कांहीं दोष व इतरही दोष ह्या कवीस चिकटले आहेत. ते टाकण्याचा त्यानें प्रयत्न केल्यास त्याचे काव्यांतील प्रसादगुण अधिक वाढेल. उ. खलाश्मकंटक गडबडती; नवनीताहुनि कोमलहृदया (समास पाहिजे); सुनें सुनें त्वद्विहिनशशांका ! विहाय दिसताहे ॥ पा. १७. १ ॥ येथें अनुप्रासासाठीं विहिन—विहाय...विहीन पाहिजे सुनें सुनें शब्द संस्कृतरचनेंत ग्राम्य दिसतात वैपरित्य वैभवीं विलोकुनी (अनुप्रासासाठीं काठिन्य.) तमपुटें (तम, पुटें) इ. 'सर्वं अतिमत्रं दोषाय ह्या न्यायानें ह्या काव्यांत कांहीं लकबींचा अतिरेक झालेला दिसतो. त्यामुळें

त्या कंटाळवाण्या वाटतात; निदान त्याची मौज उडून जाते. पाहा:— "वीप्सायां द्विरुक्तिः" हें म्हणणें कोणासही मान्य होईल. परंतु तीच पदोपदीं होऊं लागली तर कंटाळवाणी होते. आणि तिची हीच गत ह्या काव्यांत आढळते. उ. गुजगुज गोष्टी करीत; नाचत—नाचत; मंद मंद पद; गान—समाधि-गानध्वनि; घुमघुमतो; (निसर्गसंगीतांत); नाचत, नाचत, नभांत। जल जलदाली। हिरवी हिरवळ बघतां बघतां। धो धो वाहोत। सर सर येते। सुनें सुनें। ग्रहा ग्रहावर। शोधशोधिती। रडुनी रडुनी। फिरते फिरती फुल-बाग फुलवंती फुलते।

(पा.५०)मावळच्या मावळियांना —घाटांतील घांटोळयाना। हंसरी हिर-बळ। मधुर मधुर मधुमास नवा॥ (पा.५४) हसत हंसत रसिकाची चित्तें हृदयांतुन हरलीं। (काय अर्थ आहे याचा ?)

तेव्हां प्रयत्नपूर्वक हे दोष टाळून व सतत अभ्यासानें आपली काव्य शक्ति वाढवून हा होतकरू कवि लौकरच कविश्रेष्ठांच्या मालिकेंत झळ-केल अशी आशा करून हें विवेचन संपवितों.

पुढें थोडे उतारे दिले आहेत.

## आम्ही कवि

उद्यानीं फिरतों, वनीं विचारतों वेळां फुलां बोलतों
आनंदी रमतों, जगा विसरतों, काव्यासवें खेळतों
शृंगारीं नटतों, दयेंत विरतों, भक्तींतही मज्जतों
आम्ही सोडवितों, जगा अडवितों जो प्रश्न 'मी कोण' तो॥

## मुरली

श्रीरंगा ! वाजीव मुरली—मधुनाद हृदयीं भरली॥धृ०॥
आलाप जिचे मृदु येती—दशदिशा भरुनिया जाती॥
अणुरेणुहि गाणीं गाती—विश्वांत मोद दरळवती॥
उल्हासपूर्ण ये चित्तीं—आनंदमय बने वृत्ती॥
अवतरे स्वर्ग कीं जगतीं ?। मोक्षही तुच्छ या पुढतीं।
फिटतसे भवाची भ्रांती।
अन्तीची मच मनि खन्ती—मुरलीनें सर्वहि हरिली॥ १॥

## जाशिल का विसरून ?

(व्यंकटराव बोरकर या मित्रास अनुलक्षून).

जाशिल का विसरून ?—राजसा ! जाशिल का विसरून ? धृ० ॥
आजवरी जी परस्परांवर। माया ममता केली बहुतर। खेळ खेळलों कधीं कधीं तर। धरिलें मौन रुसून—राजसा ! जाशिल का विसरून ? ॥३
जीवित-नौका कालसागरीं। सवें घेउनी प्रेमशिदोरी। लोटियली कर्णधार तूं वरी। टाकिशि का बुडवून ?—राजसा ! जाशिल का विसरून ? ॥७

## रसिकांस

सत्कार मत्कृतीचा—रसिका मुदें करा या ॥धृ०॥ उद्यान छे ! कशाचें-वनिं गुल्म कीं लतांचे। परि हो विहार तुमचा—मधुमास या फुलाया ॥१॥ श्रीसद्म पद्म कसलें ? मद्दोषपंकिं रुतलें परि व्हा गजेंद्र, शुंडें–ईशार्थ त्या खुडाया ॥२॥ चांफा सुवर्ण नोहे—साधी जुईच आहे। व्हा भृंग गाच गाणीं, विकसो मुद डुलाया ॥ ३ ॥ गंगा प्रशांत नोहे—ओढा उनाड वाहे ॥ वनराजि होउनीया—अंकींच खेळावा या ॥ ४ ॥.................. नच रत्नसानु गा ! हे—विधुची शिलाच आहे ! । पूर्णेंदु व्हा करांनीं लावा हिला द्रवाया। श्रीही न रुक्मिणी न—कुब्जाच हीन दीन। व्हा कृष्णजी तुम्हींच—कर द्याच उद्धराया ॥७॥ गुरुचें न सूक्त साचें वच बोबडें मुलाचें। परि माय व्हाचें रसिका ! —कुतुकें विलोल व्हाया ॥९॥

# अप्रसिद्ध काव्यें

## १ अगंळची राणी (एतिहासिक खंडकाव्य)

मुसलमानाचा प्रवेश हिंदुस्थानात नुकताच झाला होता. आयोध्येच्या नबाबास अगंळ प्रांत घेण्याची इच्छा झाली. युद्ध पुकारलें. अपयश आलें. अगंळची राणी गच्चीवर बसली असता अपशकून झाला, म्हणून गंगास्नानार्थ गेली. नबाबाची छावणी लगत होती त्यास ती आल्याचें समजलें. तिला धरण्यास सैन्य पाठविलें. राणी त्याशीं शौर्यानें लढली; व लढत लढत चार कोस चालत चालत तिनें अगंळ गांठलें. इतक्यांत राजाचें साह्य मिळालें व शत्रु पळाला.

## २ कलावती (ऐतिहासिक)

अल्लाउद्दीन खिलजी चितोडहून परत येत असतां त्यास कलावतीच्या सौंदर्याची हकीगत कळते, तो तिचेकरतां मागणी करतो. लढाई होते. राजास विषारी बाण लागतो. पण राणी शौर्यानें लढून शत्रूस पळविते. राजाच्या जखमेंतील विष राणी मुखानें चोखून घेते व तो जगतो. पण राणी मरते. तें पाहून राजा जीव देतो.

## ३ तारा (ऐतिहासिक)

ही टंक संस्थानचा राजा सुरतान ह्याची कन्या. संस्थान मुसलमानांनीं घेतलें. राजा वनांत गेला. त्यानें मुलीस युद्धशिक्षण दिलें. बापाचें राज्य परत मिळवून देईल त्यास वरीन असा तिनें पण केला. चितोडच्या राजाचे दोन मुलगे. १ जयमल्लानें पण पुरा न करतांच लग्नाची लगट केली त्यास तिनें मारलें. २ दुसरा पृथ्वीराज. यानें पण पुरा केला. त्यास वरलें.

४ सरिता. निसर्गवर्णनपर. सर्वरसपरिपूर्ण व उत्कृष्ट आहे.

५ भाषांतरित खंडकाव्य. टागोरच्या–गार्डनरचें (Gardner) भाषांतर उत्कृष्ट झालें आहे.

६ एन्शंट मरिनरचें भाषांतर– ठसठशीत उतरलें आहे.

७ तुळसीरामायणाचें समवृत्त भाषांतर चालू आहे.

८ बरीच स्फुट कविता.

९ कांहीं कविता खालील मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

विहंगममाला:— विहंगमालेस; आवाहन.

राजहंस:—'राजहंस' 'चल ये माझ्या तळ्यास हरणें' इ. विरहोत्कंठिता; माझें प्रेम.

# प्रकरण १८ वें.

## विठ्ठलराव केशवराव कोरटकर, एलूएलू. बी (वेल्स)

(ज. स. १९०२)

ज्या थोर व चिरस्मरणीय व्यक्तीनें हैद्राबादच्या सर्वांगीण प्रगतीसाठीं विशेषतः वाङ्मयीन प्रगतीसाठीं, आजीव परिश्रम केले अशा विख्यात विभूतींचे म्हणजे कै. न्या. मू. केशवरावजींचे हे कनिष्ठ चिरंजीव होत. ह्यांचा जन्म ता. ३ फेब्रुवारी रोजीं सन १९०२ मध्यें मराठवाड्यांतील कळब या गांवीं झाला. त्यांचें प्राथमिक शिक्षण हैद्राबाद येथील विवेकवर्धिनी पाठशाळेंत झालें. पण इंग्रजी शिक्षणासाठीं ते पुण्यास गेले. न्यू इंग्लिश स्कूलमधून म्याट्रिकची परीक्षा देऊन ते फर्ग्यूसन कॉलेजमध्यें उच्च शिक्षणार्थ दाखल झाले. तेथें 'इंटर'च्या वर्गांत असतांनाच त्यांनीं विलायतेस प्रयाण केलें. तेथें कायद्याचा अभ्यास करून वेल्स युनिव्हर्सिटीची एलूएलू. बी. पदवी मिळवून ते स. १९३२ मध्यें इकडे परत आले. ते हायकोर्टमध्यें वकिली करीत असत. मधून मधून त्यास मुनसफाचे कामावरही नेमलें जात असे. अलीकडे त्या जागेवर ते कायम झाले आहेत.

हैद्राबाद येथील वाग्विलास' मंडळाच्या संस्थापकांपैकीं हे एक असून त्यांनीं आपली वाचनलेखनाची आवड अद्यापि कायम ठेविली आहे. गायन व चित्रकला ह्यांचाहि त्यांनीं चागला अभ्यास केला आहे. ह्यांचा स्वभाव मोठा विनयशील, विनोदी व मनमिळाऊ आहे. हे उत्तम नकलकारही आहेत. ह्याचे कांहीं स्फुट लेख 'संस्थानी स्वराज्य' व 'निझाम विजय' यांत आले आहेत.

पुण्यांत असतांना प्रो. माधवराव पटवर्धन ऊर्फ माधव-ज्यूलियन ह्यांच्या सहवासानें काव्यवाचनाचा व कविता करण्याचा नाद त्यांस लागला. काव्यांत हळू हळू त्यांची प्रगति इतकी झाली कीं बालवयांतच त्यांनीं आपल्या 'बालकाव्यलहरी' एका लहानशा पुस्तकरूपानें प्रसिद्ध केल्या, पण दुर्दैवानें त्या कालाच्या काव्यसमुद्रांत विरून गेल्यामुळें त्यांचा आतां

मागमूसही उरला नाहीं. नाहीं तर त्यांच्या बालमनाचें प्रतिबिंब आपणांस त्यांत पाहावयास सांपडलें असतें. त्यानंतर त्यानीं आपल्या समव्यवसायी रसिक मित्रांचें एक 'भ्रमरमंडळ' स्थापलें. अर्थात् त्यांत हे अभिनव-काव्यमधुलोलुप भ्रमर काव्यमधूचा आस्वाद घेत व त्यांतील उत्तमोत्तम मधुबिंदूंचा संग्रह करून ठेवीत. तोच आज 'कुंदांच्या *कळयां'त सांठविलेला आपणांस दिसत आहे. ह्या 'भ्रमरमंडळांत' रघुनाथसुत, गो. रा. हिंगणेकर, चंद्रकांत, मिलिंद, भीमराव बा. मो., मकरंद, कविसखा, मनमोहन, गो. ल. आपटे, व विठ्ठल के. कोरटकर, असे दहा भ्रमर काव्य-गुंजन करीत असत. ह्यांपैकीं नऊ भ्रमर पुण्यपत्तनस्थ दिसत असून एकच भ्रमर–विठ्ठलराव–हे आपल्याकडले व आपल्या परिचयाचे दिसतात. तेव्हां त्यांच्याच कलिकाचें येथें अवघ्राण करूं या. ह्या ३२ पानांच्या लहानशा पुस्तकांत विठ्ठलराव यांच्या स्वनामाक्षरमित पांचच कळया दृष्टिपथांत येतात. त्यांतील पहिली 'दृष्टि विलास' ही होय. कोणा एका सुंदर नव-युवतीच्या दृष्टिला युवकाची दृष्टि भिडली नाहीं तोंच–परिचयाभावामुळें व लज्जासंमिश्रित भीतीमुळें–त्या चकित हरिणप्रेक्षणेचें वीक्षण पुढील दोन अभिनव उपमांनीं फार मार्मिकतेनें वर्णिलें आहे. कुरणावरची रंगित चिमणी। चाहुल लागत पार उडाली ! ॥ लाल लाल जे सुंदर मासे। खडा टाकितां पळती खासे ! ॥ गालावरचें तसेंच हांसें। कुठें पळालें दृष्टि–विलासे ! ॥ दुसरींत कवीनें 'तक्रार' केली आहे. पूर्वप्रेम विसरून अन्यसंक्रांतहृदय अशा प्रेयसीविरुद्ध ही एका प्रियकराची तक्रार ह्या चतुर्दशकांत केलेली आहे. ह्यावर माधव ज्यूलियनच्या विचारविकाराची व भाषेची पूर्ण छाप पडलेली दिसते. ही प्रिया माझी होणार का नाहीं या संशयाच्या हिंदोळ्यावर प्रियकर झोंके खातो आहे तोंच त्याला पुढील दृश्य दिसलें:—

अन् आतां तुज पाहतों सुमधुरे अन्यासवें चालतां ! ॥ त्याच्याशीं हितगूज गोष्टि सदये प्रेमें सदा बोलतां ॥ गोष्टी गुल्गुल् बोलशी जणु अतां बुल्बुल् गुलाबानिशीं ॥......मी होई वद कां अपात्र सखये दानास

---

* शके १८४८ त प्रसिद्धि. कि. ५ आणे, आनंद छापखाना, पुणें. प्रकाशक गो. ल. आपटे.

प्रीतीचिया ?॥ आणि शेवटीं निराशेनें विचारतो कीं ॥ काळाच्या दरडींत कां मुरडिला इकार तो पूर्वींचा ॥ जावीं पार लया अभंग वचनें हा न्याय का प्रीतिचा ? ॥ पण प्रीतीचा न्याय उलटाच असतो हें आतां कवीस उमजलें असावें. तिसरींत कवीनें स्वोद्गाराच्या मिषानें कुकवींस आपला कर्कश काव्याक्रोश बंद करण्यास सांगितलें आहे. तो म्हणतो. पुरे तुझी कविता विठ्ठला पुरे तुझी कविता ॥ धृ० ॥ काव्याचें जें वेड लागलें सोडुनि दे आतां ॥...... ॥ नवीन कांहीं असेल काव्यीं दाखवि तें न भितां ॥ वृथा गाउनी असा छातिचा फोंडु नको भाता ॥ प्रिय सुंदरीच्या निधनामुळे "दुःखाश्रू" चौथ्या कवितेंत ओघळलेले दिसतात. ह्या सुनीतकांतील शेवटची विचारांची कलाटणी, चमत्कृतिजनक रूपकानें, मोठी जोरदार झाली आहे: —

हें जगत् कशाचें फंस रिठयांचा फेस। हा खेळ यमाचा मृत्यूची ही वेस.। पांचवींत ध्येयभ्रांतास 'इषारा' दिला आहे कीं "ठरीव वेळीं अपूर कामें पडून द्यावा खंड। वाट चुके ही येइल हातीं दुःखाची उतरंड ॥

संतवाङ्मयांत अखंड गढून गेलेल्या मराठवाड्यांत कवितेच्या नवयुगाच्या वसंताचें मंगलागमनसूचक म्हणून ह्या कोमल, मृदु, कलिकापचकाचें आम्हीं मनःपूर्वक स्वागत करून दुसऱ्या जोरदार बहाराची मार्गप्रतीक्षा करीत आहों. कारण रा. विठ्ठलराव आपल्या नव्या जुन्या कवितांचें 'स्मृतिरेखा' नांवाचें पुस्तक लौकरच प्रसिद्ध करण्याच्या उद्योगांत असल्यांच समजतें.

# प्रकरण १९ वें.

## सीताराम गणपतराव मनाठकर

(१७ फेब्रुवारी १९०२?)

मौजे मनाठ, तालुका हदगांव, जिल्हा नांदेड, येथील हे राहणारे. हे नांदेड येथील हायस्कूलमधून म्याट्रिक होऊन उच्च शिक्षणासाठीं हैद्राबाद येथें आले. तेथें उस्मानिया कॉलेजांत प्रविष्ट होऊन ते स. १९२५ त बी.ए. झाले. बी.ए.ला त्यांनीं मराठी व संस्कृत हे विषय घेतले होते. त्या परीक्षेंत ते दुसऱ्या वर्गांत पास होऊन आपल्या ऐच्छिक विषयांत पहिले आले व त्यांस स्कॉलरशिप मिळाली. पुढें एम्. ए. साठीं ते कलकत्त्यास गेले व त्या युनिव्हर्सिटींत दोन वर्षे संस्कृताचा अभ्यास करून स. १९२७ सालीं त्यांनीं एम. ए.ची पदवी मिळविली. ह्या परीक्षेंतही ते दुसऱ्या वर्गांत आले. मराठी काव्याचा अभ्यास त्यांचा चालूच होता. पुढें स. १९२९ मध्यें त्यांनीं आपलें 'जानकीकाव्य' प्रसिद्ध केलें. हें दक्षिण हैद्राबाद येथील महाराष्ट्र वाङ्मय मंडळाचें दुसरें प्रकाशन होय. हल्लीं ते येथील सिटी हायस्कूलमध्यें संस्कृत विषयाचे शिक्षक म्हणून काम करीत असतात. त्यांचीं जीवापांजलि, मग्नतरी, अभिमन्यु, विरहगुंजन, अंधता इत्यादि खंडकाव्यें पूर्ण झालीं असून तीं प्रकाशनाची वाट पाहात आहेत.

**+जानकी काव्य**– स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध झालेलें असें हें पहिलेंच खंडकाव्य होय. हें प्रसिद्ध झाल्यावर 'निजामविजय'[1] व 'विहंगमाला'[2] ह्यांत ह्या काव्याच्या गुणावगुणाबद्दल बरीच चर्चा झाली. ती पुष्कळ उद्बोधक असून वाचनीय आहे. रामजानकीच्या चारित्र्याशीं अत्यंत विसदृश अशा केशवजानकीचें चारित्र्य पाहून ह्या काव्याच्या नामकरणानें वाचकाची फसगत होते. त्याचप्रमाणें जातपात तोडण्यास सिद्ध झालेल्य

---

+ प्र. सी. ग. मनाठकर. मु. ग. अ. सराफ नांदेड. किं. ८ आ.

१ रा. विठ्ठलराव देशपांडे वकील. २ रा. वा. रा. कांत, नांदेड. पुस्तक २ रें.

तात्याराव सावरकरांस 'धर्मसिंधु' हें समर्पणांतील विशेषण जितकें अनुचित तितकेंच 'स्वातंत्र्यदेवळीं' जाण्याच्या पोकळ गप्पा मारणाऱ्या केशवाच्या भ्रष्टचरिताची समर्पणमाला स्वातंत्र्यवीर सावरकर यांस घालणें हेंही अनुचित वाटतें. मात्र विनायकरावांच्या आवडत्या अनुष्टुभ् छंदाचें, त्यांच्या खड-बडीत भाषापद्धतीचें व क्वचित् स्थळीं त्यांच्या कमलाकाव्याचें अनुकरण जानकी काव्यांत झालें असल्यामुळें तितक्यापुरतें समर्पण उचित आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ह्या काव्याचें कथासूत्र अगदीं सरळ व अल्प आहे. त्यांत गुंतागुंत नाहीं, कारस्थान नाहीं, व कसलीही भानगड नाहीं. कथेचा काळ सन १९२५ तला आहे. त्याच वर्षी कवि कलकत्त्यास एम. ए. च्या अभ्यासास गेला होता. तालंग गांवचे कुळकर्णी नाना यांची पत्नी रमाई हिनें आपल्या लहानशा गौरीची धोंड त्यांच्या गळ्यांत बांधून व त्यांस विरहार्णवांत लोटून परलोकगमन केलें.

लौकरच मुलीच्या बाललीलांनीं पत्नीवियोगाचा विसर नानांस पाडला. ते आजारी पडले व त्यांतच त्यांनीं राम म्हटला. मृत्युसमयीं त्यांनीं गौरीला वानप्रस्थ झालेल्या आपल्या सांब नांवाच्या मित्राच्या हवालीं केलें. केदार-वनांत सांब व माई ह्यांच्या (ही एक विरक्त विधवा होती) प्रेमळ सह-वासांत गौरी पितृवियोगाचें दुःख विसरली. व त्या उभयतांनाही तिचा फार लळा लागला. ती १३।१४ वर्षांची झाल्यावर सांबानें तिचें मावणी गांवांतील एका गरीब पण कुलीन, विद्वान व सुंदर अशा केशवाशीं लग्न लावून दिलें. सासरच्या मंडळींनीं तिचें नांव जानकी ठेवलें. लग्नानंतर ती सासरीं राहाण्यास गेली. कांहीं दिवसांनीं केशव पुण्यास अभ्यासाकरितां जाण्यास निघाला. तेव्हां जानकी भावी विरहाच्या भीतीनें व गृहकलहाच्या त्रासानें जीव देण्यास तयार झाली. परंतु त्यानें तिची समजाविशी करून पुण्यास प्रयाण केलें. पुण्यास कडाक्याच्या थंडींत एका रात्रीं केशव आपल्या खोलींत मंद दिवा करून निजला असतां त्यास आपल्या एकनिष्ठ व प्रेमळ पत्नीचें व मुलाचें गोड स्वप्न पडलें. तिला तो स्पर्शावयास जातो तो त्याचा हात खालीं जमिनीवर पडला व स्वप्न भंगलें. जागा होऊन पाहतो, तों त्यास पायगतीं घरवाल्याची तरुण विधवा मुलगी निज-

केली आढळली. तिला त्यानें पुष्कळ हाका मारून जागें केलें, नीतीचा उपदेश केला व खालीं जाण्यास सांगितलें. पण तिनें मोहानें एकदम त्याच्या कंठीं मिठी मारली व प्रेमयाचना केली. हें प्रेम कसलें, हा पापी काम आहे. तो पुरविण्यास पाहिजे तर कोणाशीं रीतसर पुनः लग्न कर असें त्यानें तिला सांगितलें. 'माझें प्रेम पावन आहे. तें तुम्हांला नको असेल तर तुम्ही मला विष द्या. नाहीं तर ही बघा माझी सुरी. माझें काम करील' असें तिचें निर्वाणीचें उत्तर ऐकतांच केशवाच्या मनाचा तोल गेला आणि त्याबरोबर त्याच्या खोलींतला दिवा पण गेला.

सुट्टींत केशव घरीं गेला. मनाची टोंचणी सुरू झाली. बायको प्रेमाचे बोल बोले पण तो ती विटाळेल म्हणून तिला टाळूं लागला. एक दिवस दुपारीं वामकुक्षी करीत असतां शेजारच्या गांवगोदी अंबिकेचें जानकीशीं चाललेलें भांडण त्यानें ऐकलें. त्यांत अंबिकेनें जानकीच्या शीलभ्रष्टतेचा उल्लेख केलेला त्याच्या कानीं पडला. त्याबरोबर त्याचें पित्त इतकें खवळलें कीं तो तिचा खून करण्यास तयार झाला; परंतु विचारानें त्यानें आपलें मन आवरलें. पण तेव्हांपासून तो उदासीन झाला. त्याची वृत्ति पार पालटली. असे कांहीं दिवस लोटल्यावर एके दिवशीं दुपारीं केशव निजलेला असतांना जानकी त्याजवळ गेली. अंगास हात लावून पाहते तों त्यास भयंकर ताप आल्याचें तिला आढळलें. त्या वेळीं गांवांत प्लेग चालू होता, म्हणून ती जास्तच घाबरली. तिनें सासूसासऱ्यांस हें वर्तमान सांगितलें. त्यांनीं गांवठी वैद्याचें औषध सुरू केलें. पण गुण नाहीं. तीन रात्री तिनें जागून काढल्या. आपला अंत जवळ आला असें जाणून केशवानें पत्नीस जवळ बोलाविलें. आणि "एकदां तुझें पाऊल वांकडें पडलें तें जाऊं दे. पण पुनः असें करूं नको. मुलास संभाळ. मीही तुझा अन्यायी आहें. मला क्षमा कर" असें म्हणाला. तों तिनें पुजेचें ताट आणलें व पतीस ओवाळिलें, आपल्यास सौभाग्यकुंकुम लावलें आणि तुमची शंका खोटी आहे, तुम्हींच मुलास संभाळा, असें म्हणून ती एकदम अदृश्य झाली. आणि केशवाच्या आक्रोश मात्र त्या घरांतून रात्रभर लोकांस ऐकूं येत होता. झालें. हेंच ह्या छोट्या काव्याचें कथानक. ह्याचे लहान मोठे दहा प्रसंग कल्पिलेले असून श्लोकांची एकंदर संख्या ४७९ आहे. दहा विभागांचे आरंभ व

शेवट काव्यांतील ठळक व विशिष्ट गोष्टींनीं साधले असल्यामुळें ते समुचित झाले आहेत. काव्याचें प्रयोजन सद्यःपरनिर्वृति म्हणजे आल्हाद देणें हें होय. शब्दार्थ, त्याचें शरीर, त्या शरीराचे शोभावर्धक धर्म म्हणजे अलंकार आणि रस हा त्याचा आत्मा होय, वगैरे गोष्टी आज सामान्यतः मान्य झालेल्या आहेत. त्याचप्रमाणें काव्याची योग्यता त्याच्या बहिरंगाच्या व अंतरंगाच्या अशा उभयविध सौंदर्यावरूनच ठरत असते, हेंही मान्य झालेलें आहे. आतां जेथें काव्य पद्यांत अवतरतें तेथें त्याच्या छंदांचाही विचार बाह्यांगाबरोबर करावा लागतो. तेव्हां प्रस्तुत काव्याच्या छंदाकडे प्रथम वळणें इष्ट आहे. आद्य कविप्रणीत अनुष्टभ् छंद अत्यंत साधा व सोपा आहे. प्रस्तुत कवीनें त्याची निवड केली असल्यामुळें वृत्तासंबंधीं अडचणी आपोआपच दूर झाल्या आहेत. आणि सामान्यतः श्लोक बरेच धांवते व वृत्तदोष रहित झाले आहेत. ॥ मनाचा पक्षि गेलासे ॥ ३।१४ ॥ ह्याप्रमाणें 'सर्वत्र लघु पंचमम्' हा किंवा दुसरे असेच नियम पाळण्यासाठीं दीर्घाचें ऱ्हस्व किंवा ऱ्हस्वाचें दीर्घ करावें लागलें असलें तरी अशीं स्थळें बहुतेक आढळत नाहींत. मात्र वृत्तसुखार्थ आवश्यकता नसतांही असे प्रकार अनेक स्थळीं केलेले असल्यामुळें हें काव्य लेखनशैथिल्याच्या* दोषास पात्र झालें आहे. पुनः अनुष्टुभ् छंद मराठींत रसपरिपोषास अनुकूल नसल्यामुळें त्याची निवड चांगली झाली आहे असें म्हणवत नाहीं. दुसरा ठळक दोष म्हणजे अशुद्धतेचा होय. ह्यामुळें वाचकाची सहानुभूति कमी होते. कारण त्यास अर्थ समजण्यास अडथळा उत्पन्न होतो व काव्याचें श्रुतिसुभगत्वही नष्ट होतें. शब्दांचीं चुकीचीं रूपें, अशुद्ध समास, लिंगवचनादिकांचा घोटाळा, प्रयोजक रूपाचा अनावश्यक उपयोग, अप्रयुक्त विशेषणें व नामधातु; प्रांतिक किंवा अरूढ वाक्प्रचार, नवे संकेत वगैरे सर्व प्रकारचे दोष ह्या काव्यांत आढळतात. ह्यांचीं कांहीं उदाहरणें खालीं टीपेंत दिलीं आहेत.

---

* उ. तूसें (८·२२·२४), रात्रिच्या (७/१९) मृत्युनें ४.२.

**१. अप्रसिद्धार्थ व आरूढरूपें**

(१) पकाकी :– एकदम या अर्थी. याचा अर्थ एकटा आहे. ७/४; ६/१५; ९/६।१२. (२) सान्या दिशीं = दिशांत. ३/१६; ३/१८; ६/८; ८/१५. (३) दिनानाथ=दीननाथ; दिन=दिवस. (४) दिनोदिनीं ८/५३ अरूढ रूप.

(५) नाविका १/४ लहान नांव या अर्थी अरूढ; नाविक=नावाडी. (६) जनकांतीं दुखावल्या बाळा रडे ३ २/१७. जनकाच्या अंतानें दुःखित बाला रडे;क्लिष्ट व अयुक्त. (७) पुण्यांतीं थंडी=पुण्यांतली कडक थंडी ८/२. (८) मयान- ण ३/२७.

२. घेडगुज ी समास. प्रेमडोहीं ६/८; माळमार्ग ३/१३; विषप्याला ६/४०; स्वातंत्र्यदेउळ ६/३३; पशुकोटी ७/२१; एकचाके ७/३०.

३. लिंगवचनदोष : ३/७ आंतल्या अंतराचीं तीं दारें लोचन आंतलीं; लोचन एकवचन. ६/८ उघडी, फांकूदे ही एकवचनी तर पुढें 'करूंया हो' अ. वचनीं. ९/४६ तेंच आवास. आवास शब्द पुंल्लिंगी आहे.

४. अस्थानीं प्रयोजक रूपें : १/२३; ४/४०; ७/१३; ७/१०; ८/३६; पाजवील, हांकालली; वाहावी इ.

५. अप्रयुक्त विशेषणें : १/१८ कोंडेली भाकरी ? ४/१ ढगाळ अंबर; ४/९ तेजाळ चंद्रमा; ५/६८ तान्हाळू, कपिला; ५/४८ आशाळू मन ६/१४; डोळसी दृष्टी (डोळस=सुंदर दृ ' चा). ५/७३ हर्षवर्धिनी पिवळाई; ५/७२ राघवी बाळ; ५/७६ मोहना हांक (मोहक ; ५/६८ महती काव्यकामूळ काळजी; ६/२० ग्याली ग्योड=ग्यालीस मीठ; ४/३३ कारुण्य जन्मदा स्थिति; ६/१६ निर्दयी खाटिकामार्गी १०/३ रम्यतावास खेडें.

६. नामधातु व विशेषणें : ५/३५ हात फोडावतील; ८/१२ रात्र फळली; ८/४४ काळोखल्या चित्ता; ९/३६ अंबराई फुलावली; ९/३७ पोंसलेल्या फुलावरी ५/७२ विमलांबु क्षरावलें.

७. वाक्प्रचार व म्हणी : ३/९ कर्तव्य अस्तास जाणें; ५/८ जाईवर मवा पडला; ५/३८ चारा खाण्यांत गुंगे; ६/२ चाहुला पडोनी (चाहूल लागून); ९/३९ बाकूस बनणें; ६/१४ झोंप हाकणें (घालवणें); ३/२० घोडीघावरी बने (होई); ३/९ जीन घोडीस लावून (घोडीवर) घालणें आणि लगाम लावणें; ५/४३ कळींतून गं डोकावूं लागला; ९/३ ९ झाकलें भोंवतीं वाटे जीवा=जिवाभोंवतीं.

८ नव संकत : ७/१६ होई कल्पांत सृष्टीसी सृष्टि त्याची (भुताची) चिरावधि ॥ (कल्पांतीं भुतें कोठें राहतात ?) ५/५९ जननी भानुची रम्या स्तवावी हो कशी उषा ! ८/५४ उषेचें भानुचें लग्न: उषा एकदां जननी व पत्नी हें कसें ? ऋ. मं. १ सू. ११५.२ सूर्यो देवीमुषसं रोचमानां मर्योनयोषामेभ्यतिपश्चात्॥ ६/१ उषेचा लाल बुरखा (बुरखा सामान्यत: काळा व पांढरा असतो); ७/१४ किनारी पैठणीची गे विलसे लाल रात्रिच्या : काळया पैठणीस लाल किनार; ६/५ मोराचा टाहो मंजु ?

प्राकृतसंस्कृतभाषापंडितानें भाषाव्याकरणाकडे इतकें दुर्लक्ष केलेलें पाहून मोठा विषाद वाटतो. हें दोषदर्शन थोडेसें लांबलें खरें पण कवीच्या दृष्टांतानें सांगावयाचें तर राख चाळून टाकिली कीं सुवर्णांची चकाकी चटकन नजरेंत भरते. असो. आतां संविधानक, सृष्टिवर्णनें, स्वभाववर्णनें, व काव्यसौंदर्य ह्यासंबधीं क्रमानें विचार करूं.

संविधानक अगदीं साधें असल्याचें पूर्वीच सांगितलें आहे. त्यांत रचनाचातुर्यास फारसा अवकाशच नाहीं. नानांचें तनयाप्रेम, सांबाचें कृतकतनयाप्रेम, ' गौरीचें पितृप्रेम, जानकीकेशवांचें दांपत्यप्रेम, पुरुषप्रेमाची अनित्यता व स्त्रीप्रेमाची नित्यता, ह्या प्रेमाच्या निरनिराळ्या अंगांवर संविधानकाची उभारणी झाली आहे. कवीनें त्यांत जानकीचें पातिव्रत्यप्रेम हें मुख्यांग कल्पिलें असून इतर गोष्टींची योजना उपांगांचे ठिकाणीं केलेली दिसते. अंगोपांगांच्या प्रमाणबद्धतेकडे पाहतां पहिल्या पांच प्रसंगांच्या मानानें साहवा व सातवा हे प्रसंग बरेचसे अपुरे भासतात. आणि आठवा तर अगदींच तुटक वाटतो. त्याचप्रमाणें दहाव्यांतही थोड्याबहुत अधिक दुव्यांची भर पाहिजे होती असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. एकंदरींत कथानकाचें उत्तरार्ध झटपट आवरतें घेऊन तें एकदां संपवून टाकावें अशी कवीला घाई झालेली दिसते. ह्यामुळें वाचकाला पुष्कळ गोष्टींचे संबंध तर्कानें जुळवून घ्यावे लागतात. तसें नसतें तर बरें झालें असतें.

**सृष्टिवर्णनः—** खंडकाव्यात कवि वस्तुचित्र उठावदार करण्याकरितां पार्श्वभूमी म्हणून सृष्टिवर्णनें घालीत असतात. तशींच येथेंही घातलेलीं आढळतात.

(१) रात्रीचें सौम्य, भयानक, रुद्र स्वरूप व तुफानांतील अंधार वगैरेंचीं वर्णनें अनुरूप शब्दयोजनेमुळें प्रसंगांस साजेशीं व परिणामकारक झालीं आहेत. नाना परत येतांना झालेलें वादळ:—-काळाच्याच मुखीं घोर विश्व सारें पडे गभे। तारका न त्या, दाढांचीं शुभ्र टोकें चकाकती ३।१७. फिरे ऐसा कुठें शब्द भालु भुंके कुठें कधीं। घोर शांती दिशीं कोठें

फुरि ऐसे ध्वनी कधीं १८ गडगडाट उठे तेव्हां भंगली पश्चिमा गमे। कल्पांतींचा तशा डंका घाबरे विश्व ऐकुनी २१.

(२) मृत्युशय्येवर पडलेल्या नानांची खोली:–

विद्युल्लतामिषें रात्र दांत खाऊनिया गमे।
येई धांवूनियां क्रुद्धा कज्जलागा जगावरी ॥४।२१
नानांच्या घोर खोलींत घोर विक्राळ काळिमा।
दिव्या खाया टपे घोर शांती संगें मिळोनिया ॥ ४।२१

(३) सूर्यास्तसमयीं चंदिमेची गौरी वाट बघत आहे त्या वेळच्या पुढील दोन्ही कल्पना मोठ्या हृद्य आहेत:— पोहाया फेंकिली सूर्यें उडी पश्चिमसागरीं। झोंपलेला उठे तेव्हां देई अंधार जांभई ॥ ५।४०

सूर्योदयवर्णनें:–(१) सहाव्या प्रसगांत केशव जानकीस झोपेंतून उठवीत आहे. हें सर्वच वर्णन मोठें हळुवार हातानें चित्रिलेलें आहे, म्हणून पुढें उताऱ्यांत तें दिलें आहे. चवथ्या प्रसंगारंभींच। निशा गेली पळोनिया भानू ढगाळ अंबरीं। चढे पाडीत काडोरीं जीवितांचीं जगाचिया (४). अंबराईवर्णन ९।३६-३८ माळाच्या पायथीं दाट आंबराई फुलावली। पळसीं रक्तिमा सांठे। माथ्यावरी उषेपरी ॥ ३६ ॥ गळत्या मोहरीं तेवीं घोंसलेल्या फुलावरी। चालल्या गुंजनें गेल्या दिशा साऱ्या निनादुनी ॥३७ राईची शीतलाई ती मधुगधांत माखली। रमवू ना शके त्यातें। स्वर्ग पृथ्वी-सुमीलन ॥ ३८ ॥

सृष्टिवर्णनाप्रमाणेंच स्त्रीरूपवर्णनही साधेंच पण मोहक झालें आहे:–गौरीचें यौवनारंभींचें स्वरूपवर्णन पहा:–५ प्र. ५६ ते ६१. वयाचें दार तेरावें उघडे रम्य गौरिच्या। तारुण्याची कळी रम्य लागलीसे फुलावया ॥ ५।७६. आलिंगी गोड अंगासी कोंवळ्या परिपक्वता। रंग चांफेकळी शोभे, शोभली वन-देवता ॥५७॥ लाली तेजाळ ओठांची लाजवी पारिजातका। लोचनीं तेज चंद्राचें रम्याननीं खुले सुधा ॥५८॥ सौंदर्याचें असें सार स्वर्ग जन्मे पदो-पदीं। ईशाची पावना रम्भा ज्योत शोभे जगामधीं ॥६१॥

स्वभाववर्णन:— ह्या लहानशा कथानकांत नानासमाई, सांबमाई, केशवजानकी, केशवाचीं आईबापें मालती व अंबिरा अशीं एकंदर दहा

पात्रें आहेत. त्यांपैकीं रमाईच्या मृत्युवार्तेनेंच काव्यास आरंभ झाला आहे. आपलें निरतिशय अपत्यप्रेम प्रगट करून नानाही कालवश झाला आहे. निरपेक्ष प्रेम करणारी सावमाईची जोडी म्हणजे नानारमाईची कांहीं विशेष कारणाशिवाय काढलेली दुसरी आवृत्ति होय. केशवाच्या आईबापांचें अस्तित्व केवळ नामनिर्देशापुरतेंच भासतें. गांवगोदी अंबिरेचें पात्र म्हणजे तिला लाविलेल्या विशेषणाप्रमाणेंच धरून बांधून कथानकास चिकटविलेलें. कढत्या भावना एकदम उच्च बिंदूस पोंचविण्यापुरतें आयत्यावेळीं हाता-ळलेलें तें एक कोलीत! याहून तिचें महत्त्व नाहीं. उलट तिच्या ह्या आकस्मिक प्रवेशामुळे संविधानकास अस्वाभाविकता आली आहे. खरीं आकर्षक पात्रें म्हणजे केशव व जानकी आणि अंशतः उपनायिकेच्या जागीं योजिलेली मालती ही होय.

बालविधवा मालती पुण्यातल्या श्रीमंताची मुलगी. तिला कर्व्यांचा अनाथबालिकाश्रम किंवा देवधरांचें सेवासदन कसें माहीत नाहीं, वाड्यांत केशव एकटाच तरुण भाडोत्री होता कीं काय, ह्या खेडवळाशीं तिचें तारा-मैत्रक केव्हा कसें जुळतें, पुण्याच्या कडक थंडींत केशवाच्या खोलीचें दार उघडें कसे राहातें; मालती त्याच्या खोलींत एकदम येऊन निजण्याचें धाडस कसें करते, घरांतल्या मंडळीची (कोणी असल्यास) ती कशी नजर चुकविते, खोलींत तिला गाढ झोप कशी लागते, दिवा जरी मंद जळत होता तरी केशवास खोलींत निजलेलें माणूस कसें दिसत नाहीं, पतिव्रता प्रियपत्नीच्या गोड स्वप्नसमागमानंतर लगेच केशव बाल-विधवेच्या बाहुपशात कसा जाऊन पडतो, विचारी व सदुपदेश करणारा केशव मालतीच्या लोकविलक्षण प्रेमतत्त्वज्ञानास कसा भाळतो, ती म्हणत्ये त्याप्रमाणें तिचें प्रेम शुद्ध कसें व त्याच्या तिकिटावर तिला नंदनवनाचा दरवाजा कोण उघडणार; बरें, स्वर्गांत नंदनवनांत गेल्यावर केशवाला ती आपल्या अंगावरची धूळ झाडण्यास कां सांगते, आधीं तेथें धूळ कोठून आली; वगैरे प्रश्नांचें काहूर वाचकाच्या मनात उभें राहतें, म्हणून तिच्या व केशवाच्या पात्रांत अस्वाभाविकता दिसूं लागते. मालतीचें प्रेमतत्त्वज्ञान थोडक्यांत असें आहे. ती म्हणते:— विश्व प्रेमाचें भुकेलें आहे. मला त्याचा कणही कधीं लाभला नाहीं. तो मला तूं दे. 'जगाला

मिऊन तूं माझें पवित्र प्रेम कां दूषितोस ! तें अंतरीचे सुगधानें भरलेलें आहे. मी प्रेमयचना करणारी भिकारीण आहें. तुझ्याशिवाय दाता नाहीं. सर्व जग भिकारी आहे. माझ्या हृदयेश्वरा, मी तुझी रात्रदिवस पूजा करीत! आहें. तूं माझी हेळसांड कां करतोस ! जगानें अक्षता टाकल्यावरच का जोडपें बनतें ! शुद्ध प्रीति त्याविरहितच अधिक शोभते. मजवर विश्वास बसत नसेल तर आतां मला विष दे. ही पहा सुरी आहेच ! माझें कांहीं पुण्य असेल तर मी देवाकडे जाईन आणि तुझ्या पायाची धूळ याचीन. तूंही नंदनवनांतील विलासांत मोहून जाशील. तेव्हां या दीन मालतीला स्मरशील ना ! तेथें जगाचे कुजके बंध आडवे येणार नाहींत. मग तेथें तरी माझे अंगावरची धूळ पुसशील ना ! मी मेल्यावर जग मला जारिणी-पापिणी असें म्हणेल, पण मी अमृत पीत असतां त्याची कींव करीन. मीं घोर अन्याय केला आहे, माझी कींव कर आणि आपल्या हास्यानें मला शुद्ध कर. असें म्हणून तिनें डोळे झांकले व केशवही मन्मथविद्ध होत्साता मद दीप झांकता झाला !

हें तत्त्वज्ञान प्रचलित नीतीस धरून तर नाहींच. पण शीलभ्रष्ट केशवा-सही तें डांचतें. त्यामुळें हें नवमत आहे असेंही म्हणतां येत नाहीं. मग त्याचा एवढा पाल्हाळ व पुरस्कार व्यर्थ कशाला हवा होता ? असो.

केशव हा धैर्यवान्, मेधावी, कुलींनामाजि मोहरा, तेजस्वी, विद्वान व तरुण, असा पहिल्या प्रथमच आपल्या दृष्टीस पडतो. सांवानें त्यास वरार्थ पसंत केलं आणि जुन्या पद्धतीनें त्याचें लग्न झालें. नंतर एकदम त्यास उषः-कालीं प्रियाराधन करतांना पाहून तो एक अत्यंत रसिक व प्रेमी पति आहे अशी आपली समजूत होते. मायभू गांजली आहे. मी पुण्यास पोटाची खळगी भरण्यास जात नसून स्वातंत्र्यदेवळाची एक पायरी चढण्यास जातों आहें असें त्याचें भाषण ऐकून सावरकरासारखा तो एक मोठा स्वातंत्र्य-वीर होणार अशी आपल्यास मोठी आशा उत्पन्न होते. गृहकलहांकडे लक्ष देऊ नये, कर्तव्य करीत रहावें, आत्महत्येनें पिशाच्चयोनि मिळते वगैरे जो उपदेश त्यानें आपल्या पत्नीस केला आहे त्यावरून तो मोठा विचारी, कर्तव्यनिष्ठ व आशाधारक आहे असें वाटतें. परंतु वर वर्णिलेल्या मालतीच्या प्रसंगांत मात्र तो एकदम विचारमूढ होऊन विषयलोलुपतेस बळी पडतो हें

पाहून आपण आश्चर्यमूढ होतों व तो आपल्या मनांतून सपशेल उतरतो. पश्चात्तापानें जरी तो शुद्ध झाल्यासारखा वाटतो आणि मानीव भ्रष्टतेबद्दल पत्नीस क्षमादान करण्याचीही तो आपल्या मनाची उदारता दाखवितो तरी त्यास आपली पहिली उदात्तता पुनः स्थापित करता येत नाहीं. आणि मायभूच्या उद्धाराच्या व स्वातंत्र्यदेऊळ गांठण्याच्या त्याच्या गप्पा केवळ बढाईखोरपणाच्याच वाटतात! ह्या कर्तव्यशून्य व शीलभ्रष्ट नायकाबद्दल कोणास आदर वाटेल! किंवा त्याच्या कोणात्या गुणांचें कौतुक करावें?

गौरीचें–जानकीचें पात्र असेंच अगदीं चमत्कारिक झालें आहे. नानांवर व सांबमाईवर निरतिशय प्रेम करणारी मुग्धमधुर बालिका, चंदिमा व कपिला यांवर सहोदरस्नेह करणारी अपर शकुंतला आणि निसर्गाच्या मांडीवर खेळणारी खेळकर अशी गौरी आपणास नयनानंददायिनी वाटते. तिच्या मनोहर बाललीला पहाण्यात गुंगलेला गभस्ति सुद्धां आपल्या मार्गावर पदोपदीं अडखळतो तर तिचे जात्यावरील गाणें, 'उभे किरण भानूचे कुडासी गान ऐकण्या ॥' त्यास पुढें पाऊलच टाकूं देत नाहीं! माईच्या शिक्षेंत ती सुगृहिणीपदार्ह झालेली आहे व ती रूपवतीही आहे. त्यामुळें आपलें व आपल्या आप्तांचें जीवन अमृतमय करण्यास ती सर्वतोपरी समर्थ आहे. अशी कन्यका सुकवितेप्रमाणें कोणाचें चेतोहरण करणार नाहीं? उलट तिच्याविषयीं 'न जाने भोक्तारं कमिह समुपस्थास्यति विधिः ॥ असेंच म्हणावेंसें वाटतें. आणि तुल्यगुण केशवासारख्याशीं तिचा लग्नयोग घडवून सांबाबरोबर ब्रह्मदेवही स्वकर्तव्यातून उत्तीर्ण झाला असें आपणांस वाटतें आणि अशी वधू भूलोकांतच केशवाला 'देईल नंदनविलास विलासिनी ही' अशा आशाआकांक्षा आपल्या मनांत उद्भूत होतात. पण आपणांस काय दिसतें? सर्वच विपरीत! तिच्याकडून केशवाला कधीं गोड शब्द किंवा मधुर हास्य मिळत नाहीं. ती सदा क्रुद्ध सदा रुष्ट, सदा वक्र व सदा रडतांनाच दिसते. उलट केशवलाच तिची मनधरणी, समजूत, आर्जव, अनुनय करतां करता पुरेसें होतें. सासूसासऱ्यां-

---

१. विद्यालयीं शिकेना मी। खळगी ही भरावया। स्वातंत्र्य देउळीं जाया पायरी एक व्हावया ॥ ६-१३ ॥

चीही ती नीट वागत नाहीं. केशवालाच तिला 'शुश्रूषस्व गुरून्' इत्यादि उपदेशपाठ द्यावा लागतो. ती हट्टी कुद्या मनाची व यत्किंचित् कारणावरून आंतल्या आंत जळणारी अशी दिसते, प्रभ्यावरही तिचें तितकेंसें प्रेम दिसत नाहीं. ती चिडखोर व आततायी बनून आत्महत्येसही प्रवृत्त होते. तिचें घरांत भांडण, अंबिरेमारख्या गांवगोदीशीं बाहेरही भांडण अशी ती भांडखोर बनते. विषण्ण व उद्विग्न पतीस समाधान देण्यास ती असमर्थ होते. आणि शीलभ्रष्टतेचा खोटा आळ आला म्हणून शेवटीं एकदम आत्महत्या करून ती आपली कष्टमय जीवितयात्रा संपविते. तेव्हां गौरी व जानकी ह्या एकच कीं भिन्न अशी वाचकास शंका येऊन तो कवीप्रमाणेंच 'उषेपासून तेजाळ झरे विक्राळ काळिमा! ७।१३ असें म्हणत आश्चर्यचकित व विरस होऊन बसतो! एकंदरींत नाना व सांब ह्यांचें स्वभावरेखन जरी ठीक झालें असलें तरी तीं गौण पात्रें असल्यामुळें व मुख्य पात्राचें स्वभाववर्णन असें तऱ्हेवाईक व अस्वाभाविक झालें असल्यामुळें वाचकाची ह्या बाबतींत निराशाच होते आणि अपर विधात्याचें निर्माणकौशल्य येथें कांहींच दिसत नाहीं असें म्हणत तो हिरमुष्टी होतो.

काव्यासंबंधीं अग्निपुराणांत 'रस एवात्र जीवितम्' असें म्हटलें आहे तर विश्वनाथानें त्याच्यापुढें जाऊन 'रसात्मकं वाक्यं काव्यम्" असें प्रतिपादिलें आहे. या काव्यात 'एको रसः करुण एव निमित्तभेदाद्भिन्नः पृथक्पृथगिवाश्रयते विवर्तान ॥३.४७ उ. च.॥ ह्या सुप्रसिद्ध श्लोकाचें प्रत्यंतर कवीस दाखवयाचें आहे असें वाटतें. आदिकवीचे काव्यास आरंभ जसा 'शोकः श्लोकत्वमागतः' शोकानें झाला आहे तसाच येथेंही नानाच्या गेहनीबद्दलच्या शोकानें झाला आहे. त्यांतच तीन मुलांच्या मृत्यूच्या मागील आठवणींची भर पडून 'सारखा वृद्ध तो रडे' अशी त्याची स्थिति झाली आहे. दुसऱ्या व तिसऱ्या प्रसंगांत नाना बाहेरगावी जातांना व परत आल्यावर आपल्याला वात्सल्यमिश्रित दुःख दिसतें चवथ्यांत तर नानाचा मृत्यु वर्णिला असल्यामुळें तोही मागल्या दोहांसारख्याच झाला आहे. पांचव्याच्या आरंभीं सांबाच्या केदारवनांत गौरी चोरून रडतच आहे. पुढें गौरीच्या बाललीला, तिचीं मधुर गीतें, लहानसहान गृहकृत्यें, व चंदिमाकपिलांवरील तिचें अकृत्रिम प्रेम वगैरे गोष्टींच आल्हाददायक

चांदणें पडतें न पडतें तोंच चंदिकेच्या आकस्मिक मृत्यूनें तें नष्ट होतें. ह्या दुःखाचा विसर पडून सांबमाईस ती आपल्या धार्मिक प्रवृत्तींनीं जों मोहून टाकते तोंच "महती कन्यका मूळ काळजी" त्यास व्यापून टाकते व तो अश्रुसिंचन करतो. पुनः त्यास गौरीच्या लग्नाचा थोडा आनंद होतो, तर लगेच तिला सासरीं पाठविण्याचें दुःख होतें. ह्याप्रमाणें ह्या प्रसंगांत सुखदुःखांचा पाठशिवीचा खेळ सतत चाललेला आपणांस दिसतो. सहाव्या-सातव्यांतील शृंगारांत रुसव्याचे अश्रु, भावी विरहाचें दुःख व आत्महत्येचे विचार ह्यांचीच जाणीव अधिक होते. आठव्यांतील चोरट्या संभोग-शृंगारांतही रडारड, मूर्च्छा हे प्रकार आहेतच ! नवव्या-दहाव्यांत तर शोक-रस अधिक वाढत जाऊन नायिकेच्या आत्महत्येंत कथानकाचा शेवट झाला आहे. अशा रीतीनें हें काव्य शोकमय झालें आहे. त्यांत बापाचे अश्रु, मुलीचे अश्रु, पत्नीचे अश्रु, पतीचे अश्रु, कुलटेचे अश्रु, शीलभ्रष्टाचे अश्रु—सर्वत्र अश्रुच अश्रु आहेत. त्यांत विनोदाला स्थान नाहीं. त्यांतील पात्रें स्वतःच रडतात व एकमेकांस रडवतात हें खरें, पण वाचकास किंवा श्रोत्यास तन्मय करून सहानुभूतीनें त्यांचे डोळे नुसते ओले करण्याचेंही सामर्थ्य त्यांच्यांत प्रतीत होत नाहीं ! केशव—मालती—प्रसंग तर ढोंगी-पणाचा वाटतो. एकंदरींत पाहतां ह्या काव्यांतील करुणरसाचा परिपाक कांहीं स्थळीं बरा झाला आहे असें म्हणण्यास जरी हरकत नाहीं तरी पावसाची निरर्थक संतत धार उद्वेगजनकच !

परंतु ह्या काव्याचें खरें सौंदर्य त्यांतील विविध कल्पनाविलासांत आहे. ठराविक व जीर्ण संकेतापलीकडे विहार करून कवीची प्रतिभा प्रतिक्षणीं नवता दर्शविते. त्यामुळें काव्यांतील साध्याच पण अभिनव उपमा, उत्प्रेक्षा आपल्या ताजेपणानें वाचकास स्तिमित करून आनंदवितात. ह्या अभिनवतेची चारुता काव्यभर पसरलेल्या कुशल वक्रोक्तीनें अधिकच मनोभिराम झाली आहे. स्वभावोक्ति त्यात क्वचितच आढळते. वक्रोक्ति म्हणजे विदग्ध लोकांची बोलण्याची पद्धति. विदग्ध लोकच अप्रत्यक्ष किंवा परोक्ष पद्धतीनें बोलूं शकतात. शब्द, पदें, वाक्यें व प्रकरणें ह्या सर्वांत ती आढळते. हिनें अर्थ शोभून दिसतो; नव्हे हिच्याशिवाय अलं-कारच होऊं शकत नाहीं. ही मजेदार वक्रोक्ति—अथवा भामह म्हणतो

त्याप्रमाणें अतिशयोक्ति- ह्या काव्यांत सर्वत्र भरलेली आहे. पाहा -आरंभींच नानाची बायको मेली असें सरळ न सांगतां कवि म्हणतो.

(१) नानाच्या दुष्ट दैवानें, फिरोनी वांकडें जरा। मृत्युचा मारिला बाण नानाच्या गेहिनी हृदीं ॥१.१॥

(२) काळयाभोर घनांच्या त्या पखाली थोर सोडुनी। कैवारी देव दीनांचा भूमीपात्र भरी क्षणीं ॥२२.२॥

(३) मध्याह्नीं अंबरीं चेंडू खालीं पडेल जाणुनी। मेघाचें लाविलें जाळें जगन्नाथें दिशान्तरा ॥२.२७॥

(४) आंतल्या अंतराचीं तीं दारें लोचन आंतलीं। घेई लावूनिया निद्रा; सुधाधारा जगातली ॥३.७॥

(५) पळे काळोख गांठोडीं बांधुनी चांदण्याचिया ॥६.२५॥

(६) शकला ना विकामू त्या असाही बोध अंतरा। चुंबनानें परी एक्या पेरिला स्वर्ग भोंवतीं ॥६.४३॥

(७) आनंदी हेंच माहेर, काळशत्रु खराखुरा। चुंबना वाचुनी विश्व देह प्राणाविना जसा ॥६.४५॥

(८) मिळाला साव तो तूज पुण्य तूझें खरें बये!। नाहीं तरी तुला भीक वाढता ना कुणी जगीं ॥९.९॥

(९) मुलें होती तुम्हां ताई, कंथ राहोनही दुरी!। भागीरथी सदा शुद्ध! आंत साठे किती तरी ॥९.१०॥

अशा अपूर्व व सुंदर कल्पनांची यादी पुष्कळ लावविता येईल. मधून मधून येणाऱ्या समर्पक वाक्प्रचारांनीं त्या मोठ्या अर्थपूर्ण व सूचक झाल्या आहेत. ह्यावरून कवीनें मनांत आणिलें असतें तर त्यास शुद्धता व शब्दसौष्ठव हीं साधलीं नसतीं असें नाहीं. पण आपल्या कविता-कन्यकेचे विलासविभ्रम पाहून तिला कोणाची दृष्ट पडेल कीं काय या शंकेनें तिला मळवट भरावयाचा व जाडाभरडा सुतडाच नेसवावयाचा, असा संकल्प ज्या कवींनीं केलेला आहे त्या संप्रदायातलाच हा कवि

दिसतो असें म्हणणें भाग पडतें. पुनः उपमादि अलंकारात ऊठबस केलेला "उपेचा" उपयोग बापूंच्या खाणावळींतल्या टराविक चटण्या-कोशिंबिरी-प्रमाणें अरोचक वाटतो. असो. कवीनें कला, तंत्र व भाषाशुद्धि ह्यांकडे योग्य लक्ष दिल्यास तो जातिवंत कवि ह्या पदवीस खास पात्र होईल.

## प्रिया-प्रबोधन.

उषेचा घेउनी लाल बुरखा पाहि साजणी। तातडीनें निघे जाया देशांतरास यामिनी ॥६ १॥ चपला रात नागीण पडोनी चाहुला गमे। शिरते घाइ-घाईनें कुंकवाशा जलामधिं ॥२॥ निवळे गाढ अंधार शाति साठे दिशां-तरीं। विश्वांतरीं बघे काते स्फुरू चैतन्य लागलें ॥३॥ सोडुनी देई झोंपेसी व्यथिता विश्वमोहिनी। नयनाची तुझ्या देवी मिळेना गोडि जाणुनी ॥४॥ मंजु टाहो सये ऐकें मोर माळावरी करी। चालला गोल हा सारा किल्-किलाटे निनादुनी ॥५॥ खेळती शीत वायूशां कुरळे केश मोकळे। मंदावलें तुझें कुंकू भालप्रानावरी सये ॥६॥ कोमेजलीं फुलें सारीं सेजेचीं गजरा तसा। पजरीं भजना राघू ऐके बानामधें करी ॥७॥ उघडीं पावना नेत्रा फाकूं दे तेज या दिशीं। प्रेम डोही करू द्या हो स्नान दिनास सत्वरी ॥८॥ मजु ओठावरी मंजु नकारा नाचू दे तरी। प्रेमामृता चढे ज्यानें गोडी जीवा! अती अती ॥९॥ नयनें झाकल्या थोडें वाकडें गोड पाहुनी। स्वामिनी जीविताचे ह्या अजुनी सरशी दुरी ॥१०॥ ठेवि माडीवरी काते मस्तका करुनी दया। चाखू देई भिकारीसी नंदनातील माधुरी ॥११॥ वल्लभे पाहि पाहि हें तिमिराचें फुटे फळ। विश्व सारें कसें येई बाहिरीं पाहि साजणी ॥१२॥ माळमार्गावरी तेवीं खारीमाजी अतां सये। हंब हंब असा शब्द जाई मंजूळ कोंडुनी ॥१३॥ ऊठ कोठोनी ही झोंप आली ऐशी! हं की हिसी। थोडकी राहिली वेळ कर्णामृतासि पाजवी ॥१४॥

## मनीं आराम तर सृष्टींत राम.

पापी मीच मळें माझ्या देवता माझि भ्रष्टली। भरोनी आणिले डोळे करींचें शस्त्र फेंकुनी ॥९.३३ उठे बैसे फिरे चिंती तेंचि रहाटगाडगें। पडेना चैन तात्काळ पडे बाहेर केशव ॥३४ कठोरता उन्हामाजीं मन्द वाहे समीरण पानझडीमुळें गेल्या छाया तरूस सोडुन ॥ ३५ माळाच्या

पायथीं दाट आंबराई फुलावली। पळसीं रक्तिमा सांठे माथ्यावरी उषेपरी ॥ गळत्या मोहरीं तेवीं घोंसलेल्या फुलावरी। चालल्या गुंजनें गेल्या दिशा साऱ्या निनादुनी। राईची शीतलाई ती मधुगंधांत माखली। रमवूं ना शके त्यातें स्वर्गपृथ्वी सुमीलन ॥ ३८ प्रेम जातां विरोनिया बाकूस हें बने जग। झांकळे भोवतीं वाटे जीवा श्मशान दारूण ॥ ३९ जानकी ते वने तेवीं तिऱ्हाईत प्रभाकरा। ढेंकूळ तें जलामाजीं लागलेंसें विरावया ॥ ४० संशयाचें असें विश्व उगवे भानु ना जियें। वाटसरूस अंधार जियें हो वाट दाखवी ॥ ४१



# प्रकरण २० वें.

## के. रा. बिदरकर ऊर्फ कवि मुकुंद.

(ज. १९०२)

प्रेमाखातर माया बोले। 'प्रीत न खरी ती माना भाळे,। प्रेमधाम अमर होय॥
रुसणें ना फुगणें ॥४४॥ प्रेमांजलि ।

मुकुंद कवीचा जन्म हैदराबाद येथें राजा चंदूलालजींच्या बेल्यांत शके १८२४ मध्यें नाथषष्ठीस झाला. यांचें शिक्षण विवेकवर्धिनी पाठशाळा, सिटीकॉलेज व उस्मानिया यु. कॉलेज या संस्थांतून झालें. उस्मानिया कॉलेजातून मराठी हा ऐच्छिक विषय घेऊन हे बी. ए. झाले (१९२६।२७). तेव्हांपासून ते सिटी हायस्कूलमध्यें शिक्षक म्हणून नोकरी करीत आहेत. मध्यंतरीं खाजगी रीतीनें पुढील अभ्यास करून स.१९३७ मध्यें त्यांनीं नागपूर युनिव्हर्सिटीची मराठी एम. ए. ची डिग्री मिळविली. ह्यांस गडकरी वाङ्मयाच्या अभ्यासानें काव्यस्फूर्ति झाली. व राजहंसादि मासिकांतून त्यांच्या स्फुट कविता व गद्य लेखही प्रसिद्ध होत असत. त्यातच त्यांचीं तीन शोकगीतें आलीं आहेत.

सन. १९३२ मध्यें वाङ्मयचर्चामंडळातर्फे त्यांचें "प्रेमांजलि" हें छोटेंसें काव्य प्रकाशित केलें गेलें. हें खंडकाव्य असून ह्याचा विषय 'पत्नीविरह' हा आहे. अर्थात् प्रेमळ पतीला आपल्या प्रिय पत्नीच्या मृत्यूनें वाटणारें दुःख ह्यांत दिग्दर्शित केलें आहे. हें काव्य जातिछंदांतलें असून 'असावरी' रागांत तें गावयाचें आहे. या विलापिकेचीं एकंदर ९० कडवीं असून तीं सामान्यतः सात ओळींचीं आहेत. पण क्वचित् पांच ते दहा अशा कमी जास्ती ओळीही कांहीं कडव्यांत आढळतात. सरासरीनें ह्याच्या ६०० ओळी होतील असें वाटतें. ह्या ९० शोकगीतांत एका विरहाशिवाय साधारण सूत्र नाहीं. तीं अगदीं एकमेकांपासून पृथक् अशीं आहेत. कवीची पत्नी राधा ही चांगल्या श्रीमंताची मुलगी होती. तिला माला,

माणिक व मुरली अशीं तीन अपत्यें असल्याचें आपणांस ५५ व्या गीतांत समजतें पत्नी गृहकलह शमवून व मला योग्य उपदेश देऊन संसारशकट हांकीत असे व ती द्रौपदीसारखी पतिव्रता होती असेंही आपणांस कवीनें सांगितलें आहे (४८). पण पुढें दुर्दैवानें तिला क्षय-रोग झाला व त्यातच तिची इहलोकची यात्रा संपली. कवीचा जीव चिरविरहानें व्यथित होऊन त्याचा सारा विवेक चिंतेंत बुडाला व तो भ्रमिष्ट झाला. अशा स्थितींत आपल्या मनास कांहीं हलकें वाटावें म्हणून त्यानें हीं शोकगीतें पूर्वगोष्टींची आठवण करीत करीत गायिलीं आहेत.

अशा मनःस्थितींत कोणीही कवि झाला तरी भाषा व व्याकरण ह्यांच्या शुद्धीकडे त्याचें दुर्लक्ष होणें स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणें विचारांत असंबद्धता व गूढता राहणें हेंही साहजिकच आहे. ही कवीची भूमिका मान्य केल्यास अशा प्रकारच्या दोषांकडे ढळत्या नजरेनें पाहावें असें वाचकांस वाटलें तर त्यांत नवल नाहीं.

हीं शोकगीतें चिरविरहानंतर स्फुरलीं असल्यामुळें त्यांत जोरदार शोका-वेग किंवा अंतःकरण पिळवटून बाहेर पडणारे दुःखाचे उद्वेग पाहावयास मिळत नाहींत. तर हा गाढोद्वेग ओसरून गेल्यावर कवीस चैन पडत नाहीं; त्याचें चित्त कोठें रमत नाहीं; अशा समयीं त्यास आपल्या प्रियेच्या सहवासांत पूर्वी भोगिलेल्या विविध सुखांची स्मृति होते व तें सुख आता कायमचें गेलें ह्या भावनेनें जे विरहतरंग त्याच्या मानससरोवरांत उद्भूत होतात, त्यांचें शब्द चित्र ह्या ठिकाणीं आपणांस पाहावयास सांपडतें. अर्थात् ह्या ठिकाणीं भामिनीविलासांतील शोकरस पाहावयास मिळणार नाहीं किंवा "पुटपाकप्रतीकाशो रामस्य करुणो रसः" ह्याची ही प्रतीति येणार नाहीं. एवढेंच नव्हे तर बाष्पांजलि, बापाचे अश्रु, शोकावर्त, किंवा पाध्यांचा पत्नीविरह ह्यांतील गाढतेचीही येथें अपेक्षा करणें वाजवी होणार नाहीं. अशा पूर्वतयारीनें हें काव्य वाचूं लागल्यावर पुढील उल्लेख व अभिनव कल्पना मोठ्या हृद्य वाटल्यावांचून राहणार नाहींतः—

*अज इंदुमतिवियोगांत इंदुप्राण पुष्पभयानें गेला(६); नलिनी निज-कांताला मोदें कवटाळून ठेवते पण 'आज तीच लुप्त हाय। प्राणसखी*

वनिता ॥१७॥ रंभा स्वर्लोकाला भुलवते, पण तुला तिचा वासही सहन होणार नाहीं. कारण तूं पतिव्रता तर ती वारयोषिता आहे. शिवाय 'स्वर्ग-पुण्य क्षीण होय। कैंवि रुचे तुजला ? ॥२४॥ त्याचप्रमाणें पुढील–दुहिता जाई श्वशुरगृहाला। सोनकुली ती रडली बाला। येउनि तूं शांत तीस। करणें हो आतां ॥४३॥ ही कल्पना मोठी गोड आहे. ह्याहूनही 'चुंबनि तूं पाहुण्यास। बाळातें येई ॥ ही आधिक मधुर आहे. पुढें (५२) मध्यें कवि म्हणतो–सागर खवळे मौक्तिक जाता। जीवित तैसें तूंही लपतां ! माव जाय, श्रेय हाय ! । कोठें तें मिळणें ॥ पुढील अभिनव कल्पना पाहा:—

गतजन्माचें सूत घेउनी। प्राक्तन कशिदा काढी बाई। चित्र जिवाचें उमटे त्यानीं। संतोषित ती माया होउनी। कौतुक करिते संसारांतरिं। जिवाशिवाची जोडी गुंफुनि। चित्र जाय, चित्त हाय। तन्मणि तूं त्याची ॥६१॥ टाहो फोडुनि तुज आळविलें। हृदयशिलेचें पाणी केलें। झरे उसळले नयनीं ओले। अश्रुबिंदु ते सारे गळले। रक्त आटलें देह कष्टले। प्रेमागारांतर आशा घोळे। पिळुन काढि कोण तीस। शोषुनि रस सारे ॥६७॥ अशीं अनेक स्थळें मोठीं रम्य आहेत. पण त्यांबरोबरच ४।५।९।१५।१६।१९।२५।२६।२८ ह्यांसारखीं पुष्कळ गूढ स्थळेंही आढळतात. कर्ता, कर्म व क्रियापद ह्यांच्या जुळणीकडे लक्ष न दिल्यानें व काहीं कल्पना पूर्णपणे प्रकट न झाल्यामुळें व कांहींशा असंबद्धतेमुळें ही गूढता वा दुर्बोधता उद्भवली आहे असें दिसतें. पुढें कांहीं उदाहरणें दिलीं आहेत:—

नीलोत्पल बहु शुभ्र म्हणोनि। मणिकारानें दिलें पारखुनि। काक दुष्ट ये, अवचित येउनि। झांप घालुनि नियति नेउनि। टाकुनि दिधलें भक्ष्य-स्थानीं। महाभुजंगें कंठीं घालुनि। स्वाह करित राहि काय। कळत सखे नोहे ! ॥५॥ येथें नीलोत्पल शुभ्र कसें ? मणिकारानें (रत्नपारख्यानें) हें पारखून दिले आहे. तेव्हां तें रत्नजडित असावें काय ? अशा नीलोत्पलावर काक झांप कशाला व कां टाकतो ? पुनः भक्ष्यस्थानीं तो तें का टाकतो ? तेथें महाभुजंगानें तें कंठीं घातलें म्हणजे काय ? महाभुजंग नीलोत्पलें किंवा रत्नें गळ्यांत घालतात किंवा त्यांचा ते स्वाहा करतात अशी प्रसिद्धि नाहीं.॥ वेड चंद्रमा लावि धरेला। तन्मणि द्रवला आर्द्रित झाला। मोहवश

तिज होउनि ठेला ॥ हृदय पाझरे मोल प्रीतिला । प्रेमनिर्झरीं शब्द नादला । अस्फुट कांहीं बोलुनि गेला ॥ प्राशुनि तो जीव शांत । होउनियां राहे ॥१५॥ जललहरी फुलफुलुनी नटली । लकेर भारी घे मृदु पाउलिं । तरंग रागें वलय उभारी । नाद परिघ घे वाढ फुलारी । चंचल तारा त्यांत रमोनी । अस्फुट राहे बोल बोलुनी ॥ हृदय परि आज शून्य । गूढ कळेना हें ॥२५॥ अशा स्थळीं कवीबरोबर वाचकानेंही 'गूढ कळेना हें' असें म्हणत स्वस्थ बसावें हें बरें !

गडकऱ्यांच्या भाषाशैलीचें अनुकरण पुढीलप्रमाणें कवीनें केलेलें आढळतें. (१) अधर झेलुनि; (८) दया गुंफणें; (१०) हास्य फुलविलें; (२५) जललहरी फुलफुलुनि नटली; (५२) अश्रु प्रेमें विणितां; (७०) डोळे हांसती माया पाहुनी; (७४) भ्रमा भुलवितो; (७७) झुळझुळ बोलुनि रम्य झोपला; (८२) देई मातें प्राण विणोनी इ. ह्या योगानें अर्थव्यक्तीस अड-थळाच येतो; आणि पुढील असंबद्ध शब्दयोजनेनें तर ह्या गोष्टींत भर पडते.—(२) जलद पटाला वायु शृंगारून गेला; वियतपटाला शोभत (शोभवीत) राही तारावाला, तदपरि तूं रमुनि आज सखे येई ॥११॥ महानर्कें पीळ घातला (तो कसा ?) (१५) शब्द नादला बोलुनि गेला (स्वयमेवच ?); (४१) मोद तोषला ? (४२) वनमाली तीतें असह्य ? (५०) पुपोष होउनि रमणि बाला (?) प्रसवत होती भाग्यत्वाला; (५५) बड-बड कांहीं 'मा·णिक' बोला । बोलत सखये देह ठेविला; गृह उसंत (?) गृहिणी तूं जाता ॥५५॥

(६०) हलतिल पानें तनु छतिकेवरि । फुलतिल अश्रु माया-जाळीं ? ॥
नक्त त्रियामा जागत गेली ! ? ॥ बसुनि शुश्रुषा देवी केली ॥
निष्फल सेवा कुंठित झाली । दुःखां गिळतां त्रस्त तापली ॥ (?)
आज शांत ! सत्य काय । रजनि गे आली ! ॥
(७०) हर्षित हो व्याघ्र येत । छाया वरि घाली ? ॥
(८४) घोर ताप जींव साहि । प्रेमभरें बाळे ! (पत्नीस हाका मारण्याची नथी पद्धत ?).

त्याचप्रमाणें पुढील व्याकरणदोषांमुळें काव्यशोभेला कमीपणा आला आहे:—(२) तदपरि ७; अग्निधुमानें; चारुमती; कुरंगिणी (गी.); ११

आरक्तानें; २६ विद्युततेजें विभ्रम झाला । तारामंडळ भ्रमत भागला ! ॥ ३० स्तब्ध उभेलें वृक्षराजिनें ३१ भुवनि (अवनी ?) ४२ बिजलें तिजला गिळली (लें.) ५३ कमल गोविला ?; ६१ जलद गिव्हरीं; ६८ पंचभुतानीं माझी राणी । स्वर्गपथें आजि काय । घेउनि कीं गेली ! ॥ (प्रयोग ?). ७६ हृदय प्रीतिचें मउ मेणाहि (मेणाहुनी); ७७ जलदा सृष्टिला ५४ हीम. इ.

असो. एकंदरींत हा होतकरू कवि सूक्ष्म निरीक्षणानें व सतत अभ्यासानें चांगला लौकिक मिळवील अशी त्याजबद्दल आशा बाळगण्यास जागा आहे असें वाटतें.

उतारे.

७९

शांत समिर ये मंद वाहुनि
झेलत संदेशातें राणी ।
तरंग त्याचे कविगीतांहुनि ।
प्रसन्न राधे खचित ऐकुनि ।
परिमळ सारा स्वर्गा सोडुनि ।
मेघद्विजाचे पंख लावुनि ।
भूवरती येत काय । कळत सखे नोहे ! ॥

५७

रोदन होतां अखिल जगाला ।
तव स्नेहाचा पाझर फुटला ।
प्रेमांजलि त्या ढाळिति तुजला
त्या सुमनांचा हा अलबेला, ॥ (?).
देउनि तुज धन्य होय । जीव खरा माझा.

# प्रकरण २१ वें.

## पुरुषोत्तम शेषराव जवळगेकर.

### (जन्म अजमासें सन १९०६).

जवळगेकरांचें घराणें मूळचें निलंग तालुक्यांतील (जि. बिदर) जवळग्याचें राहणारें. सुमारें ३०।३२ वर्षांपासून शेषराव नानासाहेब हे जोगाईचें अंबें (मोमिनाबाद) येथें राहण्यास आले आहेत. नानासाहेबांनीं संस्कृत फारशी ह्या भाषांचें चांगलें अध्ययन केलें आहे. त्यामुळें तेथील विद्वानात ह्यांची गणना होते. ह्यांचें वाचन, आज वयास ७०।७२ वर्षे झालीं असूनही अझून अखंड चालू आहे. विद्याव्यासंग, सौजन्य व धर्मनीतिपरायणता ह्या गुणांमुळें अंब्यास हें घराणें सन्मान्य समजलें जातें.

पुरुषोत्तमपंत हे नानासाहेबाचे तृतीय चिरंजीव असून आज ते बत्तिशीच्या सुमाराचे आहेत. ह्यांचें प्राथमिक शिक्षण वडिलाचेच नजरे-खालीं मोमिनाबाद येथेंच झालें. त्यामुळें त्यांचे अंगीं बरेच पैत्रिक गुण आले आहेत. दुय्यम शिक्षणासाठीं त्यांस औरंगाबाद येथें जावें लागलें. तेथें ते मॅट्रिक झाले. परंतु घरगुती अडचणींमुळें पुढील अभ्यासक्रमाकडे वळणें अशक्य झालें म्हणून त्यास शाळाखात्यांत नोकरी धरावी लागली. सध्यां ते बीड जिल्ह्यांत अष्टी तालुक्यांत शिक्षकाचें काम करीत असतात. लहान-पणापासूनच ईश्वरभक्तिपर लहानसान कविता करण्याचा त्यांस नाद होता. औरंगाबादेस शिकत असतांना त्यांनीं मराठी काव्याचा व साहित्याचा चांगला अभ्यास केला. पुढें काव्यरचनेस ह्याचा त्यांस फार उपयोगी झाला. ह्यांचा स्वभाव मोठा नम्र, मनमिळाऊ व विनोदी आहे. त्यामुळें ह्यांचें मित्रमंडळही बरेंच विस्तृत आहे. त्यास ते नेहमीं आपल्या सहज कोट्यांनीं व सात्त्विक विनोदानें हासवित असतात. त्यांची नम्रता त्यांच्या हृद्गतांत पुढील शब्दांत व्यक्त झाली आहे. "अनेक कवींनीं किंवा विद्वानांनीं आपल्या कल्पनासृष्टींत काव्यदेवीस यथेच्छ विहार करण्याकरितां मोठे

मोठे प्रासाद बांधिले असतील पण आम्हीही यथानुशक्ति तिच्या विलासाकरिता एक झोपडीच बांधीत आहोत. ती उपेक्षा करणार नाहीं अशी खात्रीची आशा आहे." तर त्यांचें मित्रप्रेम, त्याचे एक सहाध्यापक रंगनाथ श्रीनिवास कुलकर्णी, बी. एस. सी., यांनीं ह्या पुस्तकास जोडलेल्या प्रस्तावनेवरून दिसत आहे. काव्यलतेचें हें प्रथम पुष्प कवीनें पितृचरणीं अर्पिलें असल्यावरून त्याची पितृभक्तिही दिसून येते.

कवि गीतेचें अध्ययन करीत असतांना 'गीतारहस्या'चा उपयोग सतत करीत होते असें ते सागतात. त्यावरून त्याच्या 'आर्यागीते'वर त्या ग्रंथाची छाप पूर्णपणें पडणे साहजिकच आहे. सर्व गीता सहा सहा अध्यायांच्या तीन विभागात प्रसिद्ध करण्याचा ग्रंथकाराचा हेतु होता; परंतु त्यांपैकीं हा पहिलाच भाग प्रसिद्ध झाला असून दुसरे दोन अजून अप्रकाशितच राहिले आहेत. 'आर्यागीते'शिवाय कवीनें बराच स्फुट काव्यसंग्रह तयार केला आहे. त्यांत कांहीं आंग्लकवींच्या कविताचे अनुवाद मोठे चांगले साधले आहेत. पण द्रव्याभावी ह्या सर्व संग्रहास अप्रकाशित अशा अज्ञातवासात खितपत पडावें लागलें आहे. त्यांस सूर्यदर्शनाचा योग केव्हां घडतो कोणास ठाऊक ! असो. आता प्रस्तुत भागाकडे वळूं.

प्रस्तावनेंतील पहिलें अवतरण गीतारहस्यांत व आर्यागीतेंत तुकारामाचेंच आहे. त्यात शब्दभिन्नता जरी दिसली तरी अर्थैक्य पूर्ण आहे. अध्यायाचें नामकरणही उभयत्र एकच आहे. पहिल्या षट्काची गीताश्लोकांची संख्या २८० आहे तर मराठी अनुवादात आर्यांची संख्या ३२१ आहे. म्हणजे अनुवादातील संख्या शेंकडा १४ नीं जास्त आहे. आणि ही कांहीं फारशी आहे असें नाहीं. अनुवादात प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभीं वाचकांस समजण्यासाठीं थोडक्यात विषयावतार केला असल्यामुळें नवीन अभ्यासकास मोठी सोय झाली आहे. हा अनुवाद पद्यास अनुकूल तेवढाच फेरफार करून बहुतेक शब्दशः गीतारहस्यांतील अर्थास धरून केला आहे. तेव्हां अर्थासंबंधीं अधिक चर्चा करण्याचें कारण नाहीं. वृत्त-

१ गीतारहस्यांतील 'कश्मल' (शब्दाचा २-२) 'काळेंबेरें' असा अर्थ येथेही घेतला आहे. पण तो चिंत्य आहे. सरस्वती कोश वगैरेंत 'गलितोत्साह' असा अर्थ दिला आहे तो बरा वाटतो. काळेंबेरें, कुकल्पना, कुशंका हे अर्थ तितके योग्य वाटत नाहींत.

सुखार्थ पुष्कळ ठिकाणीं मूळांतील कठीण संस्कृत शब्द तसेच ठेविले आहेत. उ. युयुधान, कश्मल, गोमुख, पणव, आनक, गुडाकेश वगैरे. अशा ठिकाणीं निदान पाददटीपेंत त्यांचे अर्थ दिले असते तर केवळ मराठी वाचकांस अडखळण्याचा प्रसंग आला नसता. कवीनें क्वचित्स्थानीं स्वतः-चे दृष्टान्त व उपमा हीं दिलेलीं आहेत. तीं सर्वच योग्य आहेत असें नाहीं. उ. तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥ ह्याचें रूपांतर असें आहेः— हरवी तमासि भानू जेवीं बुद्धिस तसेंच तें हरितें ॥ ७९ ॥ (द्व्यर्थी) द्व्यर्थी; अधिन (आधीन); समधि (समाधि); महदुःख; बहुर्षे (बहु वर्षें). महाभया (पासुनि) रक्षी, [२.४६]; पवनात्मज ज्या (ज्याचिया) ध्वजीं [१.१९]; कोण असा कीं या जगिं मूळ न घेतां फलास करणार (२.८) कामक्रोधही मोठा अधाशिअरि असति (३.४४) अशीं व्याकरण-दुष्ट रूपें व चमत्कारिक वाक्प्रयोग क्वचित् आढळतात तीं सोडून दिलीं तर एकंदर आर्या सुबोध, सोप्या व प्रसादयुक्त झाल्या आहेत. त्याचप्रमाणें दुसऱ्या अध्यायांत तीन चार वेळ आलेला शब्द 'स्थितप्रज्ञ' वाचतांना थोडीशी अडचण उत्पन्न करितो तर 'पांडव दळ हो उभें व्यूह रचुन' (१.२); 'महारथी जो तसा चेकितान' (१.४); 'जेवि शुक्राचे सुखवि जना युग्म' (१.१२) अशा स्थळीं एखादी मात्रा कमी वाटते तर कोठें 'गो गज चांडाल, श्वानांच्या ठायीं समान हो शीघ्र (५.२१) यतिभंग आढ-ळतो. पण अशीं स्थळें फार विरळ असल्यामुळें तीं 'लक्ष्म लक्ष्मीं तनोति'॥ अशींच समजण्यास हरकत नाहीं. उलट फारसें उच्च शिक्षण न मिळालेल्या एका शाळामास्तराची ही प्रथम कृति आहे ही गोष्ट ध्यानीं आणल्यास कवीबद्दल आधिकाधिक कौतुकच वाटेल. त्यांतील काहीं आर्या इतक्या सुबोध, सुंदर, सफाईदार झाल्या आहेत कीं त्या वाचकाच्या तोंडीं सहज बसतील. नमुन्यासाठीं कांहीं दिल्या आहेत.

स्वजनासि मारुनी शिव, होईल असें मला न हें गमतें ॥
कृष्णा नच विजयेच्छा! राज्य नकोतें! सुखें तशिच मातें ॥ १.२९॥
शिष्य असें मी तुमचा, शरणागत त्या मला करा बोध ॥
सावध अन्य दिसेना, मच्छोकाप्रति करील जें रोध ॥ २.१० ॥
स्वधर्मविहीत वागुनि मरणहि येतां असेचि शिव त्यांत ।

परधर्म भयंकर परि, विषमिश्रण हो मधूर पेयांत ॥ ३.४२ ॥
ज्ञानासम बा जगिं या अन्य नसे कीं पवित्र हें खचित ।
कालें करून झाला योग जया सिद्ध तो करी प्राप्त ॥४.४५ ॥
युक्त असे जो त्यानें 'कांही करितों न मी' असें ध्यानीं ।
ठेवावें वर्तावें तत्त्व असें कीं धरूनियां स्वमनीं ॥ ५.११ ॥
श्रीकृष्ण वदति तेव्हां 'चंचल मन हें खरेंच संशय न ।
परि अभ्यासें यासी वैराग्यें सुकर ठेवणें अधिन ॥ ६.४१ ॥

कवीनें यांस जरी आर्या म्हटलें आहे तरी वृत्तनियमाप्रमाणें त्या 'आर्यागीति' आहेत. कारण येथें पहिल्या तिसऱ्या चरणांत बारा बारा मात्रा असून, तिसऱ्यांत व चवथ्यांत अठरा अठरा आहेत.

एकंदरींत पहातां ग्रंथकार म्हणतो त्याप्रमाणें हीं जरी शबरीचीं बोरें असलीं तरी तीं फारशीं दोषक्षत नसून शुद्ध व मधुर आहेत; किंवा ह्या जरी विदुराच्या कण्या असल्या तरी ज्याप्रमाणें "तो नित्य तृप्त भगवान् विदुर-गृहीं भोजनांत दे मिटक्या ॥' त्याप्रमाणें अतृप्त वाचक कवीस म्हण आहेत कीं ॥ 'लौकर आणा आणिक' वदति असें वाजवीत बहु चुटक्या ॥ असें कवीस आम्ही आश्वासन देतों.

---

# प्रकरण २२ वें.

## नरहर शेषराव पोहनेरकर. [जन्म स. १९०७]

### ( कवि किशोर )

श्रीक्षेत्र परळी वैजनाथ येथें नरहरपंताचा जन्म सन १९०७ मध्यें (भाद्रपद व. ११ शके १८२९) झाला. प्राचीन काळीं ह्याच्या पूर्वजाचें वास्तव्य मुक्काम पोहनेर येथें होतें. त्यावरून घराण्यास पोहनेरकर हें नांव पडलें. पण अलीकडे चार पाच पिढ्याचें राहण्याचें ठिकाण परळी हेंच झालें आहे. प्राथमिक शिक्षण परळी व अंबेजोगाई येथें पूर्ण करून ते हैदराबाद येथील विवेकवर्धिनी पाठशाळेंत मॅट्रिकपर्यंत शिकले. म्हणूनच तेथील हेडमास्तर वासुदेवराव हर्डीकर यास आपल्या बागशाहीचीं फुलें त्यानीं समर्पण केलीं आहेत. लेखनवाचनाचा नाद वाढत चालल्यामुळें परीक्षेसाठीं लागणारा सुव्यवस्थित अभ्यास त्यास होईना. म्हणून परीक्षेचाही नाद सोडन देणें त्यास भाग पडलें. विद्यार्थिदशेतच १९२६ चे सुमारास त्यांनीं 'प्रोफेसर' ह्या नावाचें हस्तलिखित मासिक काढून त्याचें तीन वर्षेपर्यंत संपादन केलें. त्यात विद्यार्थ्यांचे आपापल्या प्रोफेसराबद्दल मोठे चुरचुरीत लेख येत असत असें म्हणतात. नंतर त्यांनीं निरनिराळ्या उद्योगधंद्यांचा थोडथोडा अनुभव घेऊन शेवटीं शिक्षणकार्य हें आपल्या जीविताचें ध्येय ठरविलें आहे. त्याप्रमाणें बिदर जिल्ह्यात पायगा जहागिरींतील नारायणखेड ह्या तालुक्यात तेथील जमेदाराच्या साह्यानें "अनंत विद्यालय-शातिसदन" ह्या नावाची एक शिक्षणसंस्था त्यानीं काढली असून तेथेंच ते आज सात वर्षं काम करीत आहेत.

प्रथम काव्यवाचनाची आवड उत्पन्न झाली, पुढें काव्य करावेंसें वा ू लागलें व क्रमाक्रमानें कविताही बऱ्या करितां येऊं लागल्या. अमुकच एका प्रसंगानें व अमुकच एका कवीपासून स्फूर्ति मिळाली असें त्यांच्या

संबंधीं निश्चयानें सांगतां येत नाहीं. मात्र प्रणयकवितापेक्षां राष्ट्रीय कवितांकडे त्याचें मन अधिक ओढ घेऊं लागलें. त्यामुळं जुन्या पोवाड्यांचा अभ्यास, नव्याची रचना व पोवाड्याचें सार्वजनिक गायन हा कार्यक्रम सध्या त्यानीं चालू ठेविला आहे. पोवाड्याचें बरेंच मोठं वाङ्मय त्यानीं निर्माण केलं आहे. त्याची संख्या अजमासे ३५।४० आहे. पण कवि म्हणतो "आर्थिक अडचणींच्या दडपणाखालीं प्रसिद्धीची संधि मिळत नाहीं." अप्रसिद्ध वाङ्मयासंबंधीं हेच उद्गार जिकडेतिकडे ऐकूं येतात. ह्यावरून इकडे कवींची किंवा काव्याची उणीव नसून प्रकाशकाची उणीव आहे हें वारंवार निदर्शनास आणावें लागत आहे. झडावंदन, राष्ट्रीय सतवंदन, वीरवर जानू भिंताड्या, बापूची काकी, कुंजपुऱ्याचा दसरा, मुरारबाजी, अटकेचा भगवा झेंडा वगैरे राष्ट्रीय; तसेंच आमचें शिक्षण, आमचा शेतकरी, संतवदन, श्रीएकनाथ, परमेश्वराचें पाप वगैरे सामाजिक, आर्थिक व धार्मिक विषयही त्यात आहेत. ह्याचें गद्य लिखाणही पुष्कळ आहे. निझामविजय, नागरिक, राजहंस, विहंगमाला, चित्रमयजगत्, शाळापत्रक, रत्नाकर वगैरे वर्तमानपत्रांतून व मासिकांतून त्याचे सुमारे ४०।५० लेख प्रसिद्ध झाले आहेत. हे निबंध, संशोधनें, गोष्टी, कविता, चर्चा, विनोद अशा स्वरूपाचे आहेत. 'साधकाचा साधनयोग,' 'आचार्य श्रीकृष्णाचा योग,' व "प्रासंगिक निबंध" ह्यांचीं हस्तलिखितें प्रकाशनाची वाट पाहात आहेत. ह्यावरून ह्याचें "बागशाही" हेंच चिमुकलें पुस्तक जरी आज वाचकांपुढें दिसत असलं तरी ह्याचा गद्यपद्यलेखनव्यवसाय किती दांडगा आहे व त्याच्या लेखाचें स्वरूप कसें राष्ट्रीय व धार्मिक आहे हें ह्यावरून समजेल.

आता आपण त्याच्या 'बागशाहींत' थोडासा फेरफटका करू या. कवि किशोर (पोहनेरकर) ह्याची 'बागशाही' स. १९३१ मध्यें येथील दक्षिण-साहित्यसंघातर्फे रा. बिंदू वकील यानीं प्रकाशित केली आहे. ह्या लहानशा बागशाहींत चार प्रमुख ताटवे असून सुमारें २५ लहान मोठीं रोपें लावलेलीं दिसतात. प्रस्तावनेंत कवि म्हणतो 'वाचका! या वन्य कुंजाचा तिरस्कार करूं नकोस! कौतुकानें त्याच्याकडे पाहा आणि समाधानाचा एकच कां होईना श्वास सोड. तेवढ्यातच हा गरीब माळी या त्याच्या

श्रमाचें सार्थक झालें असें मानील.' या २५ लतावेलींच्या कुंजांत घटकाभर फिरून आलेला प्रवासी विगतश्रम होऊन ताजातवाना झाल्यावर ह्या बालवयाच्या किशोर माळयाचें आनंदानें कौतुक करण्यास खास विसरणार नाहीं असें वाटतें. ह्या कवितांवर रचनाकाल दिला आहे त्यावरून दोन १९२७।२९ सालच्या, ४।५ सन १९३१ च्या व बाकीच्या १९३० सालच्या आहेत असें दिसतें. मराठवाड्याची मूळ भूमिका संतवाङ्मयाची असल्या-मुळें कवि कितीही आधुनिक असला तरी त्याच्या काव्यांत जुन्या वळणाची छटा हटकून दिसावयाचीच असा जवळ जवळ नियमच दिसतो. दे. ल. महाजन ह्यांच्या कवितेनें कवितेच्या नवयुगाचा पुरस्कार करण्यास थोडासा प्रारंभ केल्याचें आढळतें, तर पद्माकरांच्या कवितेनें प्रागतिक मतांचा उच्चार बऱ्याच धिटाईनें केलेला आढळतो, आणि किशोर वयाचा किशोर कवि तर त्यांच्याही पुढें जाऊन स्वदेश, स्वधर्म व स्वराष्ट्र ह्यांच्या विषयींचें आपलें प्रेम अगदीं खड्या सुरांत व निर्भिडतेने गातो. असें आहे तरी हा लहानगा माळी आपला जातभाई सांवत्या माळी ह्याच्या वळणावरच गेल्याशिवाय राहात नाहीं. 'शारदावंदनां'त स्फूर्तीचे पाट फोडून काव्यनदी वेगें वहावयास लाव। अशी तो शारदा आईची प्रार्थना करतो व नंतर शंकराचार्यांच्या 'परापूजे'ची मराठी माळ तो ब्रह्मार्पण करितो. आणि सांवत्याचा समकालीन जो चोखा त्याच्या महारीकडून 'अजि एका दशिचं सोडाया पारणें । झडकरी मुकुंदा घेई तूं धावणें ॥ असें मुकुंदास भोजनाचें आमंत्रण देववतो. हें सर्वच गीत अत्यंत प्रेमळ, साधें व नितान्तमधुर झालें आहे. थोडा नमुना पहाः—

ह्या कण्या रांधल्या मडक्यामाजीं तशा । घुगऱ्याही केल्या आज इथें मधुरशा ॥ भाकरी भाजुनी पान पहा मांडिलें । मारितां हाक तुज हृदय भडाडुनि आलें ॥ गंहिवरतो देवा ! कंठ दाटतो तसा । ना धीरहि होई ये म्हणण्या राजसा ॥इ.॥ परि तुजविण मजला घास न गिळवे हरी ॥ म्हणूनियां दयाळा लवकरि या श्रीहरी ॥ पारणें सोडण्या यावें मा श्रीपती । प्रेमाचे करुनी घेइ गोड घांस हे । भावाचे करुनि घेइं गोड घांस हे । भक्तिचे उपेक्षुं नका, हरी ! घांस हे । अश्रूच ठेविले पायधुण्या तुज हरी ।

---

१ हा एका फारशी कवितेचा अनुवाद आहे.

ही गरीब महारिण पडते पायांवरी ॥ आणि शेवटीं श्री. टोगारांच्या गीतांजलीच्या कांहीं पद्यांच्या भाषांतरानें कवीनें 'हें जीवित मी अर्पिन त्याच्या (देवाच्या) पायीं । सार्थता प्रीतिची होई ॥ असें म्हणत आत्मार्पणभक्तीनें हा पहिला ताटवा सजविला आहे. हें भाषान्तर चांगलेंसें उतरलेलें नाहीं.

दुसरा ताटवा:— यात निसर्गवर्णनें आहेत. तीं सुंदर आहेत. त्यातील कल्पनाविलास रम्य आहे. पण त्याच्या चित्रणास पौराणिक कथांची व अध्यात्माची पार्श्वभूमि घेतल्याशिवाय कवीचें भागत नाहीं. 'फुलाच्या विनवणी'त 'निर्माल्यहि होइन ईशा' । तव पदीं । अशीच शेवटची विनवणी आहे. 'गुलाबाचा रंग गुलाबी का झाला' ॥ हे सागण्यास विश्वाचा पालनवाला लक्ष्मीसह विश्वदेवाच्या उपवनात आला आहे. 'उपवन' शोभेचें वर्णन, आकाश भूवरी आले । रत्नासह तुटुनी पडलें । खालतीं । तारका प्रफुल्लित झाल्या । वायूशीं खेळत बसल्या । फुगडी ॥ अशा थाटांत बरेंच निर्मेळ व मोहक झालें आहे. 'चादण्यात' व 'प्रभात' ह्या दोन गीतात सुंदर कल्पना आहेत. पण कृष्ण यशोदेच्या संवादावरच त्याची उभारणी झाली आहे. पहिल्यात 'चादण्या कुठुनी आल्या । कुणीं कधीं कशा बनवील्या । आई गे !॥ असें कृष्ण यशोदेस विचारतो तर स्वर्गातील वेलींची शातीची हीं फुलें बालरवीनें परमेशाच्या पजेच्या वेळीं उधळलीं आहेत हें तिचें उत्तर! दुसऱ्यात पुनः कृष्ण विचारतो "तारका रात्रीं चमकत होत्या त्या आता कोठें गेल्या ? बालरवि त्यांचा पिता येण्यापूर्वीच रजनीमातेनें त्याना लांब खेळाला धाडलें आहे हे तिचें उत्तर आहे. ह्यात फारसा वेदान्त नसल्यामुळें हें बरें झालें आहे.

तिसरा ताटवा:— यात 'कशाला घेशि समशेर', 'हिंदमातेची संक्रांत', 'शाहीरवंदन-महाराष्ट्रगीत', 'महाराष्ट्रवंदन' व 'अश्रुमोचन' ह्या पाच कवितांचा समावेश ह्या गटात करिता येईल. पहिल्या कवितेंत २० व्या शतकांतला बालवीर आईजवळ खेळण्यास समशेर मागत आहे. पण बोबडें बोलणाऱ्या या बालवीराची गोरक्षणार्थ केलेली समशेरीची मागणी अगदीं अस्वाभाविक व पोकळ बढाईची वाटते. 'हिंदमातेची सक्रांत' ह्या दुसऱ्या कवितेंत पुनः सर्वेश्वर, इद्र, कुबेर, पार्वती, लक्ष्मी व इतर देव ह्यांच्या गडबडींत हिंदमातेनें स्वपुत्रांस मारलेली हाक लुप्त झाल्यासारखी

भासते. शिवाय वृत्तदोष, यतिभंगदोष, व्याकरणदोष, समासदोष, वाक्प्रचारदोष वगैरे सर्व दोषांची सक्रांत ह्याच कवितेवर पडल्यामुळें ती अगदींच नीरस झाली आहे. ह्या ठिकाणीं अक्षरगणवृत्तांचा अवलंब कवीस बराच भोंवलेला दिसतो. पण ही कविता दोषाकरत्वामुळें जर विरमनो त्पादक वाटते तर पुढली दोषाकरवत् आल्हाददायक वाटते. एवढेंच नव्हे तर ती विलक्षण स्फूर्तिदायकही झाली आहे. डफाच्या थापेबरोबर भावनाचा कल्लोळ उठवून भापंच्या नडफेत हें गीत शेवटपर्यंत नाचत जात आहे असें वाटतें. केशवसुताच्या किंवा विनायकाच्या राष्ट्रीय कवितेंत हें सहज बसेल असें म्हटल्यास अतिशयोक्तीचा दोष त्यास घडणार नाही. 'महाराष्ट्रवंदन' हें गीतही स्वदेशाच्या गाढ प्रेमरसामुळें दुथडी भरून वाहणाऱ्या नदाप्रमाणें भासते. माझ्या रामायणांतील 'महाराष्ट्र भूपाळी', कोल्हटकरांचें 'महाराष्ट्रगीत', किंवा विनायकाची 'महाराष्ट्रलक्ष्मी' ह्याच्या जोडीचें तें आहे. हीं दोन्हीं गीतें समग्र मुळांतूनच वाचकांनीं वाचावीं व तीं कंठस्थ करून नित्य गावीं अशी त्यांची योग्यता आहे. नमुन्यासाठीं केवळ एक एक कडवें पुढें दिलें आहे:—

शाहीरवंदन—महाराष्ट्रगीत. कडवें १ लें स. १९२९.

राष्ट्रशाहिरा! ऊठ अतां तू सावर डफ डिमडी। थाप डफाची पुन्हा घुमवि तूं साऱ्या भीमथडीं। तुणतुण्याच्या तारेनें त्या हृदयें थरथरू दे। वीरवराच्या वंद्य वंदिचें आज फिरुनि तुटू दे। परसत्ताराक्षसीस धडकी भीतीची भरु दे। महाराष्ट्राच्या नसनसांतुनि चैतन्य स्फुरूं दे। तीं डोलिव दक्कन शिवशाहिची। नाचुं दे स्वारिं या फिरुनी सह्याद्रिची। गा, निर्भय गाणीं रम्य स्वातंत्र्याचीं। वीर शिवाजी धीर गाजि ते जन्मा येऊं दे। युवकांतुनि आजच्या धनाजी तानाजी निघ दे।

महाराष्ट्रवंदन- शेवटचें कडवें स. १९२९

कुठवर गावें तुझ्या गुणांला वाचा मदवती। निर्जिवशी लेखणी बिचारी तगते कुठवर ती। प्रतिभा देहा स्फूर्तीचे ते लावुनियां पंख। काव्यनभामधिं विहार करण्या सजलां निःशंक। देहभान तें जात चाललें रूपीं समरसलों। परि महाराष्ट्रा! वंदन करण्या पुन्हा दास झालों। ती एकरूपता नको मला मुक्तीची। वाणीस जाच ना भीति कुणा सत्तेची।

प्रेमानें गाईन गाणीं तव कीर्तेची । जन्मवरी हा एक छंद दे त्वद्गुण गाण्याचा । पुनर्जन्मिही तोच राहुं दे हेतु शाहिराचा ॥

शेवटल्या म्हणजे चवथ्या ताटव्यांत प्रेमाचे फुलबाग फुलले आहेत. ह्यांत प्रीतीचें गुज ०स, प्रेम दे न विषया थारा, प्रेमाचा पाठ, चिरवियोगी हृदय ( फारशी कवितेचें रूपांतर ), जीवितसार्थक, प्रेमाच्या परमेश्वरा, प्रीति अंतरल्यावर, प्रेम व प्रीतीचा गुलाब अशा दहा कवितांचा समावेश करितां येतो. कवितांच्या नांवावरूनच कवीचें प्रेम उदात्त, सात्त्विक व अवैषयिक स्वरूपाचें आहे अशी कल्पना साहजिक होते. आणि त्यांच्या वाचनानें ती दृढही होते. पण हा प्रेमवीर एकांड्या शिलेदारासारखा आहे. आपल्या प्रेमाच्या एकतारीवर तो एकच एक सूर काढतो, एवढेंच नव्हे तर त्याचें प्रेमगाणेंही एकाच ठशात त्याच त्याच शब्दांत येतें. त्याच्यांत वैचित्र्य नाही, विविधता नाहीं व निरनिराळे रंगही नाहींत. त्यामुळें तें लौकरच कंटाळवाणें होतें. गडकरीयशवंतांच्या अनुकरणाचा नाद ह्यास बाधलेला दिसतो. पुढील पालुपदासारख्या झालेल्या कांहीं ओळी पाहून ह्या विधानाची सत्यता पटेल.

(१) प्रेमाचे मोल कसें होई ?...प्रेमरूप होउनीया जावे...(प्रीतीचें गुज). (२) मीपणास वृत्ति मुकुनी प्रेमांतच रंगुनि गेली ।...प्रेम दे न विषया थारा ॥ (३) प्राण देउनी प्रेम करावें । प्रेम करोनी प्रेमचि व्हावें । प्रेमानंदीं गात रहावें ।...प्रेमाचा पाठ. (४) प्रेमातचि रंगुनि गेलें । प्रेमानें प्रेमचि झालें हृदय हें ॥ चिरवियोगी हृदय । (५) जीवाचें सार्थक व्हावें । प्रेमकरुनि प्रेमचि व्हावें प्राणाचें देउनि मोल । प्रीतिचा तराजू तोल ॥२॥ प्रीतीच्यासाठीं मरतो । मरुनियां अमर जो होतो । तो खरा ॥ (६) प्रेमांत मरुनी जाऊं । प्रेम राहू होवोनी ॥ [प्रेमाच्या परमेश्वरा] (७) जरी प्रीतीविना राहूं, जगोनी कायसें चीज ॥ [प्रीति अंतरल्यावर]. (८) प्रेमाच्यासाठीं मरणें । तें मरणें कैसें होई । ना कळे । प्रेमास्तव जगतीं जगणें । प्रेमाविण जगणें, मरणें ॥ हें खरें ॥ [प्रेम]. ह्या कवीच्या भाषेवर गडकऱ्यांच्या भाषेची किती ठळक छाप पडलेली आहे हें पुढील उदाहरणांवरून सहज व्यक्त होईल:—

(१) प्रेमानें प्रेमचि झालें. पा. २२ (२) प्रीतीची पाखर फुलली (पा.

२२). प्रेमाच्या परमेशानें. (३) प्रीतीचें लेणें ल्याली; पा. ३१. (४) प्रेम-हास्य हांसत बसली; पा. ३० (५) प्रेमास्तव मरणें मरून पा. ३१. (६) आनंद अश्रु फुलवी दवबिंदुमाला. पा. २६।७. (७) प्रीतीच्या फुलवेलीला । अश्रूंचीं सुंदर फुललीं । तीं फुलें ॥ पा.४९॥ (८) प्रीतीचा फुलला-झेला । साजिरा । पा.५० ॥

एकंदरींत ह्या किशोराची ही लहानशी 'बागशाही' लहान लहान लता-वेलींनीं सुशोभित व पुष्पांनीं सुगंधित झालेली पाहून ह्या होतकरू बाल-माळी सततोद्योग व दृढव्यासंग ह्यांच्या योगें लौकरच आपल्या वनाचें उपवन खास करील अशी आशा बाळगण्यास जागा आहे; एवढेंच नव्हे तर कोणी प्रकाशकानें त्याची उल्लेखिलेली अप्रसिद्ध लेखसंपदा प्रकाशित केल्यास त्या आशा आजही त्यानें सफळ करून दाखविल्या आहेत अशी खात्री होईल.

---

# प्रकरण २३ वें.

## नांदेडचें कवित्रिकूट. अर्थात्

### पार्थिव-कृष्णाकुमार-कांत

(१९०८, १९०८, १९१३)

गोदावरीच्या तीरीं नंदिग्रामात निवास करणारें हें कवित्रिकूट बरेंच प्रसिद्ध आहे. पण कूटस्थ आत्म्याप्रमाणें तें सदा अव्यक्त किंवा प्रच्छन्नच राहूं इच्छीत असल्यामुळें ह्या कवींची चरित्रविषयक माहिती मिळविणें म्हणजे एक मोठा कूटप्रश्न होऊन बसला आहे. अर्थात् 'आप्तवाक्य प्रमाणं' या वचनाप्रमाणें जेवढी माहिती मिळाली तेवढी येथें दिलीं आहे.

नांदेड येथील सर्व सामाजिक व राष्ट्रीय चळवळींचे हे कवि उत्पादक व चालक होत. पण त्याच्या जहाल वृत्तीमुळें त्यांना त्यांच्या 'वि. वि. मंडळाचें' रूपांतर केवळ वाङ्मयप्रकाशक 'शारदाश्रमा'त करणे भाग पडलें असें त्यांच्या प्रस्तावनेवरून दिसतें. ह्या दिशेनें आश्रमाची कामगिरी बरीच झाली आहे व अजूनही होत आहे ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. 'पहाटतारा', महाजनाची कविता, गीताजलि, मातृहृदय, फटत्-कार हिरकणी वगैरे लहान मोठ्या ग्रंथाचें प्रकाशन आजपर्यंत त्याचेकडून झालेलें आहे.

हे तिन्ही कवि समविचाराचे व समवयस्क असून पंचविशी तिशीच्या सुमाराचे आहेत. पार्थिव (हरिभाऊ काशीनाथ कुळकर्णी, जन्म १९०८) हे जरी मूळचे विजापूरचे रहाणारे असले तरी ते लहानपणापासून नांदेडासच आहेत व तेथेंच त्यांचा विद्याभ्यास झाला. 'पहाटतारा' व 'फटत्कार' ह्या दोन्ही संग्रहांत त्यांच्या कविता आहेत. हे 'कवि' म्हणून जितके प्रसिद्ध आहेत त्यापेक्षां गद्यलेखक म्हणून अधिक प्रसिद्ध आहेत. लघुकथा, विनोदी लेख व नाटकें ह्या प्रकारचेंच लिखाण त्यांचें विशेष आहे. त्यांनीं एक

हिंदी नाटकही लिहिलें आहे. त्यांच्या स्फुट गोष्टी व विनोदी लेख हें वाङ्मय मंदारमाला व विहंगमाला यांतून प्रसिद्ध झालें आहे.

श्रीनिवास केशव गोळेगावकर **कृष्णकुमार** (१९०८) हे मूळचे गोळेगांव (नांदेड) येथील रहाणारे. पण यांचेंही प्राथमिक व हायस्कूलचें शिक्षण नांदेडासच झालें. त्यांनीं म्याट्रिकपरीक्षेपर्यंत अध्ययन केलें आहे. देविदासराव महाजनाच्या सहवासात त्यास काव्यवाचनाची व काव्य करण्याची गोडी लागली. शाळेंत असतांनाच ते कविता करूं लागले होते. पुढें नांदेड येथील मंदारमालेच्या संपादकाचें काम त्यांनीं कांहीं दिवस केलें. आपला शिक्षणक्रमाचा व्यवसाय करून वाङ्मयसेवा करण्याचा त्यांनीं क्रम चालू ठेविला होता हें त्यास भूषणावह आहे. त्यानंतर कांहीं दिवस त्यांनीं शिक्षकाची नोकरी केली. ती सुटल्यापासून ते हैदराबाद येथेंच रहात असतात असें समजतें. त्याचीं कांहीं खंडकाव्यें लिहून तयार झालीं आहेत. पण त्यांच्या प्रसिद्धीचा योग येईल तेव्हां खरें. मधून मधून ते गद्यलेखही लिहित असतात.

कांत:—यांचें नांव वामनराव रामचंद्र कांत असें आहे. त्यांचें शिक्षण नांदेडासच झालें वाचनाचा नाद त्यांना लहानपणापासूनच आहे, व त्यांनींही विद्यार्थिदशेपासूनच कविता करण्यास सुरवात केली आहे. शारदाश्रमातर्फे निघणाऱ्या विहंगमालेचे हे एक भटारीचे संपादक होते. त्यांच्या स्फुट कविता विहंगमाला, मंदारमाला व इतर नियतकालिकें यांतून प्रसिद्ध होत असत व सांप्रत ज्योत्स्नेसारख्या पुणेमुंबईकडील मासिकांतही त्यास स्थान मिळूं लागलें आहे. यांचीं 'लज्जित मंजीर' व 'साजवार्ता' हीं दोन अप्रकाशित खंडकाव्यें आहेत. हे हल्लीं हिमायतसागर (हैदराबाद) येथें शेतकी खात्यांत नोकर आहेत. 'लज्जित मंजीर' हें एक अत्यंत रोमहर्षण व हृदयद्रावक काव्य आहे. सुडास उद्युक्त झालेल्या विशालदेवाचा पश्चात्ताप दैव–दानवी–वृत्तींचें तुमुलयुद्ध–यामिनीचा पतिप्रीत्यर्थ आत्मत्याग वगैरे प्रसंग मोठे गंभीर व परिणामकारक झाले आहेत. यांत कल्पनांचा विलास, भावनांचा उद्रेक व पात्रांचा मनोविकास ह्या तिन्ही गुणांचा सुंदर मिलाफ झाला आहे. तें लौकरच प्रसिद्ध होऊन वाचकांची उत्कंठा तृप्त करील अशीं आशा आहे.

'पंहाटतारा' व 'फटत्कार' ह्या दोन्ही संग्रहांतील प्रत्येकाच्या कवितांचें विवेचन यथाक्रम पुढें केलें आहे.

'पंहाटतारा' या संग्रहाच्या प्रस्तावनेंतील पुढील उद्गार ध्यानात ठेवण्यासारखे आहेत:—'मोगलाईतील हा 'घनतमींचा' शुक्रदेव— पहांट तारा— झोंपलेल्याना आल्हादवूं शकला नाहीं तरी, त्याच्याच पोटीं उदयास येणारी उषा आपल्याबरोबर सर्व जीवमात्रांना जागृत करीत, हेंच तें गोदावरीकाठचें वैराण झालेलं पण आता पुनरुज्जीवित होत असलेलं, ज्ञानेश्वरकालीन साहित्योद्यान म्हणून एक दिवस जगाला दाखवीत हंसत उभी टाकेल. पण तो दिवस फार लांब आहे. त्यासाठीं 'सर्वगुणाः काचनमाश्रयतें' अशा प्रकारचें अर्थबल हवें आहे. रसिकां-कडून एवढीच अपेक्षा आहे....'

**पार्थिव:—** या संग्रहात पार्थिवाच्या ११ कविता आहेत. त्यात करुणा-ही एकच कविता सुमारें तीन साडेतीन पानाची असून बाकीच्या चुटके वजा आहेत. ईशचिंतन, निर्धार व धन्य तूं ह्या ईश्वरपर आहेत. पहिलींत अभंग छंदांत नाममहात्म्य सांगून कर्वानें 'नामासाठीं मरणें नामासाठीं तरणें । नामासाठीं जिणें देवा ! तुझ्या ॥ नाव का टाकीन ? नाव का सोडीन ? गेला जरी प्राण कुडीतून' असा आपला नामावरील दृढ विश्वास व्यक्त केला आहे. दुसऱ्या 'निर्धार' या कवितेंत भावनाबळाच्या जोरावर ईश्वराचा साक्षात्कार अनुभविण्याचा निर्धार त्यानें केला आहे. ही कविता अगदीं दुर्बोध झाली आहे. तिसरींत प्रभु येशूख्रिस्तानें आत्मबलिदानानें दया, क्षमा, शांति याचा संदेश देऊन जगास माणुसकी कशी शिकविली हें सांगितलें आहे. दुसऱ्या तीन—म्हणजे 'निरोप', 'अश्रु' व 'हृदयास'— ह्या कविता प्रेमाच्या निरनिराळ्या स्वरूपावर आहेत. आपल्या प्रियकराचें प्रेम केवळ वैषयिक आहे, त्यास वैवाहिक बंधन नको असें समजतांच एका तरुणीनें त्यास कायमचा 'निरोप' दिल्याचें मोठ्या जोरदार भाषेंत या कवितेंत वर्णिलेलें आहे. ह्या अंजनीगीतात त्या तरुणीच्या रागाचा पारा जसजसा वर वर चढत जात आहे तसतशी शब्दयोजना कशी कठोर व बोंचक होत गेली आहे हें पहाण्याची मोटी मौज आहे. उ.(१) होणें नाहीं लाभ आजला । जाच गडे इथुनी ॥ (२) गोड बोलजी [illegible]. ।

पुरुषांचा हा असाच धंदा । कळलें कामांधा ! ॥ (३) घेऊन बसलें कां गंगाळ । बुडांत दिसला सारा गाळ । पुरा पुरा कळला ॥ (४) प्रेमाचा कां चोळामोळा । करिशी निष्ठूरा ॥ (५) नकाच थांबू प्रियकर रमणा । सोडणार मी नाहीं बाणा (व्रत) । जीव जरी गेला ॥ (६) संसाराविण प्रीत अभद्रा । वीष रत्नचषकीं ॥ आणि शेवटीं निक्षून निरोप देतांना म्हणते:— काया केवळ असे खापरी । दीप तेवतो शांत अंतरीं । विना पाडिल्या उघड्या दारीं । कर काळें मेल्या ! ॥ ह्यांतील नीतिध्येयाबद्दल कोणाचें दुमत होईल असें वाटत नाहीं. 'अश्रु' ह्या कवितेंत सहानुभूतीचें महत्त्व वर्णिलें आहे. पण एकंदर शब्दयोजना समर्पक न झाल्यामुळें अर्थ-व्यक्ति नीट होत नाहीं. तिसऱ्या कवितेंत जगांतील प्रेम स्वार्थी आहे, निरपेक्ष नाहीं, हें सांगितलें आहे (निरपेक्ष मनानें कुणी न देती दान).

'प्रभात', 'करुणा', तो दिवस' आणि 'टाका निराशा झणीं' ह्या कवितां-तून कवीचें स्वदेशप्रेम, पारतंत्र्य व राक्षसी रूढि ह्यांबद्दलचा तिटकारा हीं दिसून येतात. प्रभातवाऱ्याच्या झुळकीनें सर्वांस देशसेवेस जागृत करावें, पुष्पांनीं देश आनंदी करण्यास शिकवावें आणि पक्षांनीं आपल्या गानानें देशोद्धारार्थ देवास आळवावें वगैरे कल्पना 'प्रभात'मध्यें आल्या आहेत. 'करुणा' ह्यांतील कथानक शिवकालीन असून 'कर्तव्य आणि प्रेम' ह्यांचा झगडा मोठ्या कुशलतेनें व परिणामकारक रीतीनें वर्णिला आहे. नायिका 'करुणा' हिला वनश्रीनें कर्तव्याची दिशा दाखविली आहे. शेवटल्या काहीं ओळी पुढें दिल्या आहेत:—

करुणरसाची गंगा भरली करुणेच्या नयनात । स्वातंत्र्याचें स्फूर्तीचें मग गीत नाचलें त्यांत । फत्तर फुलले हंसली धरणी हंसलें सर्वही रान । स्वातंत्र्याचें गीत घुमवुनी झाली करुणा धन्य ! ॥ हात कपाळावरी लाविला दास्यपंकिच्या कविनें । कसें चेपितों स्वराज्य आम्ही वरचेवर स्वार्थानें ।

'तो दिवस' ह्या कवितेंत स्वदेशासाठीं धारातीर्थी पडलेल्या वीरांचें वर्णन व रणांगणाचा देखावा वर्णिला आहे. यात करुणमिश्रित वीररस बरा साधला आहे. पण संदर्भाभावीं नुसतें मोघम वर्णन तुटक व अपुरें वाटतें.

शेवटल्या कवितेंत तीन शा. विक्रीडितांत ऐक्याचें संपादन, राक्षसी

रूढींचा नाश व स्वातंत्र्याची प्राप्ति ह्यांचें महत्त्व गायिलें आहे. या कवितां-वर केशवसुतांच्या विचारांची दाट छाया पडलेली दिसते.

'मागणी' ह्या कवितेंत 'पुस्तकयांचेचा' कटु अनुभव कवीनें वर्णिला आहे आणि तो–'कुसुमाहुनही कोमल वाटो झेलाया वाग्बाण' असें देवाजवळ मागणें मागत आहे. येथील उपरोध मोठा तीक्ष्ण झाला आहे.

फटात्कारांत पार्थिवांच्या १२ कविता आहेत. त्यांत रहा माझ्या सोबतीस, कटोराभर व जुगार यामागच्या ईश्वरपर आहेत. ह्यात कवीला काय म्हणावयाचें तें स्पष्टपणें समजणें कठीण आहे. अर्धे विचार मनात तर अर्धे शब्दांत असें त्याचें झालेलें दिसतें. त्यातच रूपकें योजलेलीं असल्यामुळे ही अडचण अधिकच दुणावली आहे. पराभूत वीर, दीपास, बंदिवान, व चाकरी ह्यात स्वदेशप्रेम व पारतंत्र्यद्वेष हे विषय, मधून मधून आलेल्या उल्लेखांवरून, आले आहेत असें वाटतें. परंतु त्याचें विवेचन कोठें अन्योक्तीनें व कोठें उपरोधानें केलें असल्यामुळे वाचकास कवीचें हृद्गत तर कळत नाहींच परंतु साधा अर्थ समजणेंही दुरापास्त होतें. उ. गवत वाळलेले सळसळत करितें उपहास । स्वतंत्र व्हावयाचा गडाच्या दगडांना ध्यास ! ।। स्थंडिल अरिंथचें रचोनी माझ्या बलिदान। उभाची मी द्याया वेचुनी अढळ सुळीं मान । पाहिन मी माझ्या गडावर फडफडता झेंडा ! तोंवरती वाहो सुडाचा हाडांतून ओढा ! (पराभूत वीर)

कवीच्या दोन्ही संग्रहातील कवितांत ही दुर्बोधता–किंवा गूढता म्हणा पाहिजे तर—आणि निराशेचे उद्गारही सर्वत्र आढळतात. 'विसर्जनात' कवि म्हणतो—मी कां वाढलों, मजलाच कंटाळा आला, गमे कापून द्यावा गळा. विश्वांतला आनंद गेला. जीव कां न गेला. कटोराभर, मान व हृदय, फुलास, व परतून जा ह्या कवितांत सर्वत्र गूढता व निराशेचें वातावरण हीं पसरलेलीं दिसतात. थडगें व मरण ह्याचेच उल्लेख जागोजाग आहेत.

भाषा व व्याकरण ह्यांच्या शुद्धीकडेही कवीनें लक्ष दिलेलें दिसत नाहीं. उ. पंहाटतारा:–– हरणीबद्दल हरिण; अश्रु-अंजली; अग्नीचा कुंड पाघरवून बद्दल पांघरून; कामिनि जनीं; लोचनें; विजेच्या चिळकांड्या उडतात; अश्रुंची मौक्तिकमाला फुलली; वारा तुडविणें; डंका फडकविणें इ.

फटत्कारः— मालवत्या तेजोधारा; जळत्या नजरें बघ; खोदूनी जुलमा; पिळल्या या उरें रगीं (पा. ३९); असूं असूंनी आऊरलें हंसं (पा.३०) हाडांतून सुढाचा ओढा वाहतो (पा.३०) मोडझोड; इ. इ. ह्यामुळें काव्यवाचनापासून होणारा आनंद वाचकास मिळत नाहीं.

पण फटत्कारातील कवीचे कल्लोळ ह्यास अपवाद आहेत. पापी कोण, वाळूचे कण, वृक्ष व ओढा, एक वृत्ति, पातकाचे थर वगैरे स्फुट विषयावर कवीनें एकेक शा. विक्रीडितांत जे विचार मांडले आहेत ते शुद्ध, सुबोध व प्रसन्न झाले असून अनुभवानें ठांसून भरलेले आहेत.

पातकाचे थरः —जे जे दोष मला दुज्यांत दिसले ते वाढवीले अती
नाहीं निर्मल कोणिही मजविणें गर्वांधता ही किती
पाप्याना उपहासिता हलविलें ऐटींत मी हें शिर
तों माझ्याच शिरावरून ढळले हे पातकाचे थर ॥

कमलासः— आहेसी कमला सरांत म्हणुनी भानू तुझा मित्र हा
सांग जीवन लोटुनी धरिशि का त्याच्या कराची स्पृहा ?॥
नाहीं मित्र जरी तुला खुलवितो गोजारुनी रश्मिनीं।
पाण्याबाहिर येउनी लव पहा, टाकील तो जाळुनी ॥

कृष्णाकुमार ह्यांचे पहाटतान्यात ११ व फटत्कारात १५ मिळून एकंदर २६ चुटके आहेत. पहाटतान्यात पहिली 'ईशपृच्छा' ही जुन्या अभंग वृत्तीमुळे व पौराणिक उल्लेखामुळें जुन्या तऱ्हेची भासते. पण 'हातीं नीतिदंड धरिता कठीण। देवा लोटांगण घेशील तूं !॥ ही कृष्णाईच्या बाळाची देवास वठणीवर आणण्याची दटावणी अपूर्व वाटते खरी ! वियोगी, सौंदर्यदर्शन चंद्र का सुकला, व अपूर्णांक ह्या चार कविता प्रियाविरहाच्या आहेत तर गाऱ्हाणें व प्रबोधन ह्या दोन पुत्रप्रेमावर आणि गेला रावा उडून ही पुत्रविरहावर आहे. ह्यावरून कवीची वृत्ति विरहाकडेच अधिक वळलेली दिसते. 'स्वातंत्र्य नसेल तर', 'जयोऽस्तु ते' ह्या शेवटल्या दोन स्वातंत्र्यावर आहेत. सामान्यतः ह्या कवीच्या कविता मागल्या कवितांहून जरी अधिक सुबोध झाल्या आहेत तरी कांहीं ठिकाणीं दुर्बोधता व भाषाशुद्धीकडे दुर्लक्ष हे दोष उभयत्र आहेतच. वियोगी ही कविता पृथ्वी वृत्तांत असून तिजवर मोरोपंतांच्या केकावलीची छाया पडलेली दिसते

तरी पण ९ व्या कवितेंत अर्थव्यक्ति नीट झालेली नसून, कुसुमचित्त (चित्तं) तुझेनिविण, जयेनिविण, तंवरि (तोंवरी) अशीं रूपें आढळतात. सौंदर्यदर्शनातील कांहीं कल्पना चांगल्या आहेत तर कांहीं असंभाव्य आहेत. उ. चंद्रवदना ह्यांत कवि म्हणतो तसें पुरुषाचें (चंद्राचें) उपमान नसून वदनाचें आहे. आणि आल्हादकत्व ह्या साधारणधर्मामुळें तें योजिलेलें आहे. पण पुढें कवि म्हणतो सूर्य तुझ्या तेजाकडे पाहून आपल्यासारखें त्यांत उदयास्ताचें न्यूनत्व नाहीं म्हणून (प्रियेच्या) खंतीनें बाष्पबिंदु ढाळतो 'प्रतापाचा जो न मावळेचि भानु' हें नळाचें पराक्रमवर्णन उचित आहे. पण सूर्यासारखी किंवा त्याहूनही अधिक अशी ही तेजस्विनी प्रिया लाभलेला प्रियकर मोठाच दैववान असला पाहिजे! पुनः तो केवळ शारीरिक सौंदर्यानेंच संतुष्ट होणारा असणारोपीही दिसतो. मूर्तिमान् सुरूपता: अंत येशी (ताहाशीं, वगळी हे शब्द अधिक रूढ आहेत) ह्या अशा प्रयोगानें गाल्गोटही ह्या कवितेला लागलें आहे. चंद्र का सकला कवितेंत पतिपत्नींची एकजीवावस्था वर्णिलेली असल्याचें कवीनेंच पुरवणींत सांगितलें असल्यामुळें तींतील थोडेसें हृद्गत समजतें, नाहीं तर तें गूढच राहिलें असतें. ह्या ठिकाणीं ही, 'सुखाय, शिवाय' अशी अकारण प्रयोजक रूपयोजना व प्रावृषकाळ (प्रावृट्काल); मी कसा (कसें) बोलूं, अर्वाचिमताची वृष्टि वगैरे अरूढ प्रयोग आढळतात. अपूर्णांक नावाप्रमाणें अपूर्णच ठेविला आहे असें वाटतें. गाऱ्हाणें व प्रबोध ह्यांतील वत्सलरस चांगला साधला असून सुबोधही झाला आहे. "राघा गेला उडून" ह्या कवितेंतील करुणरसही बरा आहे. पण तो फारसा गाढ वाटत नाहीं. स्वातंत्र्यावरील दोन्ही कवितांचीं वृत्तें म्हणजे- साकी व धुमाळी, हीं वीररसपरिपोषास फारशीं अनुकूल आहेत असें वाटत नाहीं. पण 'स्वातंत्र्य नसेल तर' ह्या कवितेंत पारतंत्र्याची निर्भर्त्सना बरीच जोरदार झाली आहे. उ. पराधीनता महानरक हा जिथें साचला गेला। सुगंधवायु त्या प्रांतासी शक्य काय तरि बोला ?।। परक्यापुढतीं वांकवाकुनी प्रेतकळा ती आली। त्या देहावर साज घालुनी शोभा कां रे चढली ?।। स्वातंत्र्याचा दीप उजळला नाहीं तोंवरि येथें। बरी सुखाची जरी मिळाली काळझोंप जीवातें ।। ह्यांत ही 'सांग नासिका' (नासिके); धनुधारिणी (धनुर) अशीं अशुद्ध-

रूपें व "पवतांली डुले" असे चमत्कारिक वाक्प्रचार आढळतात.

फटत्कारांतील कवितांत प्रेमावर ४, स्वदेश स्वातंत्र्यावर ४, सामाजिक व अर्थिक ४, मरणावर ३ अशा १५ कविता ह्या कवीच्या नांवावर आहेत.

'छायें'त प्रियेच्या प्रेमाचा प्रथम अनादर करणारा प्रेमी माणूस मागून कसा पश्चात्ताप करीत बसतो हें चित्रित केलें आहे.

नवप्रणयाच्या उद्भवाचें प्रथम ज्ञान नसल्यामुळें प्रणयी पुरुष आपल्या प्रियेच्या नयनांतील आपल्याच प्रतिमेशीं कसा मत्सर करतो ह्याचें वर्णन "कोण सुधा ने घट भरभरुनी" ह्या कवितेंत हृदयंगम व गोड झालें आहे. स्वप्रचंचलेंतील नाजूक प्रणय तर ह्याहूनही अधिक खुमासदार झाला असून नायकाप्रमाणें वाचकासही "मधुधुंदींतच मज गुंगविलें । कोण गड्े तूं मिटशी डोळे ॥" असें म्हणावयास लावतो आणि त्याच्याचप्रमाणें अखेरीस त्यासही स्वप्नभंगाचा विषाद वाटतो, तर "साउलींत आज तुझ्या होरपळे" ह्या विरहाग्नींत होरपळणाऱ्या प्रेमी जीवाबद्दल वाचकास कींव वाटते.

हीं सर्वच प्रेमगीतें अत्यंत उदात्त व मोठीं आकर्षक झालीं आहेत.

शांतिदूत, हुतात्मा व फितुरी ह्या कवितात परदास्याची चीड, भारत-बांधवांना जागृतीची हाक, व देशद्रोही फितुरास धोक्याची सूचना ह्यागोष्टी कवीनें मोठ्या परिणामकारक रीतीनें वर्णिलेल्या आढळतात. तो फितुरांस म्हणतो:— "वाचा फितुरी नव्हे फुकाची सजिवपणीं मृत्यु सलें । रिपुंनीं कंठनाल तव चिरिलें ॥ "फूल आणि वारा" ह्या कवितेंत कवीचें आपल्या जन्मभूमीवरील उत्कट प्रेम प्रकट झालें आहे. मरणावरील दोन्ही कवितांतील त्याचे निर्भयतेचे विचार मोठे मननीय आहेत. 'त्याला अग्रें जग मेलेलें' या कवितेंतील दारिद्र्याचें शब्दचित्र फार भेसूर झालें आहे; तर 'शेतकरी' मधील भांडवलशाहीची स्वार्थांधता भयंकर बोचक उपरोधानें तिरस्करणीय केली आहे. पैठणचे चमत्कार कसले बघत बसलां ? हरिजन अर्ध्या पोटीं आहेत, स्पृश्यास्पृश्य काय घेऊन बसलां ? त्यांच्याकडे कांहीं बघा, तुमचें जिणें प्रेतासारखें झालें आहे ह्याचा विचार करा, असा स्वबांधवांस कालोचित उपदेश कवीनें अर्जीत केला आहे.

पण 'कन्यादान' ही कविता जशी लांबीनें मोठी आहे तशीच गुणांनी-ही मोठी आहे.

बालविवाहांत मुलीस अज्ञानामुळें कसा सुखाभास वाटतो व इतरेजनांस आपापल्यापरी कशी मौज वाटते ह्याचें सुंदर वर्णन पहिल्या भागांत आलें आहे. पुढें तारुण्यांत तें पहिलें स्वप्नसुख जाऊन स्त्रीदास्याचा कटु अनुभव येऊं लागतो. तेव्हा तिला स्वत्वाची जाणीव होऊन ती दुसऱ्यांत म्हणते—चूल मूल म्हणजे स्त्रियाची जीवितसंपूर्ति ! ॥ पातिव्रत्याची कवे ! या खुशाल गा किर्ति ॥ तिसऱ्यांत निर्भीड होऊन आपली सौभाग्यभूषा म्हणजे पारतंत्र्याची परमावधि व स्त्रीत्वाची विटंबना कशी आहे हें सांगून ती म्हणते 'सावधान' आतां जाहलें उलगडला अर्थ ॥ ना तरि मी तेव्हांच यातला पुसतें परमार्थ ॥ व पुढें वैवाहिक जीवन असह्य होऊन ती आत्महत्या करण्यास तयार होते असें शेवटीं सांगितलें आहे. शेवटल्या ओळींतील मातेस बोललेले उपरोधिक बोल इतके भयंकर, तीक्ष्ण व विषमय झाले आहेत कीं मुलीची आत्महत्या सिद्धीस जाण्यापूर्वीच ते ऐकिणारी आई तिच्यासमोर गतप्राण होऊन पडली असावी अशी भीति वाचकास वाटल्यावाचून राहात नाहीं. बालविवाहाची चाल दुष्ट आहे ह्यात संशय नाहीं. पण येथील चित्रण निष्कारण जहाल व अतिरंजित झालें आहे. शिवाय निरपवाद व निर्दोष असें वैवाहिक ध्येयही कवीनें वाचकापुढें मांडिलेलें नाहीं. त्यामुळें 'अस्थाने आवेश:' असें म्हणावेंसे वाटतें.

सामान्यत: सांगावयाचें तर पंहाटताऱ्यातील कवितापेक्षा ह्या कविता बऱ्याच गुणांनीं मंडित झाल्या असून पूर्वोक्त दोषाचें मानही ह्यांत अगदीं कमी झालें आहे व सतत कवीनें अभ्यास आणि अवलोकन हीं चालू ठेविल्यास तो एक नामांकित कवि होईल असें वाटतें. नमुन्याकरितां कांहीं उतारे पुढें दिले आहेत.

फटत्कार–कन्यादान ४ था भाग. जाति इंदुकला. मायबाप वदले 'कोहळें दिधलें सुनवून...।' तेव्हाच न होमीं टाकिलें कां तुकडे चिरून ?। अनायासं होतें कुळांच्या देवाला हवन !। कशास तरि वायां एवढा खटाटोप–यत्न !। धजला न च हवना, धजे जो दानाला हात !। वेडी तूं आई, चुकविली स्वर्गाची वाट ! कशाला ग रडशी, लाविलें जंव कुंकू मजला । नच ठावें तुज शोणितीं कर माझ्या भिजला । सोडाया पाणी जाहलें नसेल घाईत, । दान तरी आई एवढें जाइल ना फुकट !। दान

सांग न्हाया म्हणुन हा आड जवळ केला । विनविन देवाला घ्यायला दानाच्या सुफला ! ॥

फितुरी- (चाल- निरोप द्यावा आतां).

कसें न काहीं कळलें रिपुंनीं कंठनाल तव चिरलें ! ।
त्याच आपल्या रुधीरें भरले पीशि घटघट प्याले ।
अंत्यविधीस्तव वस्त्र आणिलें मजेंत तें पांघरलें । चाल०(रिपुनीं इ.)
रचिल्या सरणीं शेज समजुनी अंग कसें टाकिगलें ।
बावा फितुरी नव्हे फुकाची सजिवपणीं मृत्यु सलें ॥ चाल०॥

साउलींत आज तुझ्या होरपळें (जाति-अवनी)

साउलींत आज तुझ्या होरपळें, नावळें ! । बनुनि हंस मानसात विहरलों किति सुखांत । करपतान पंख हाय प्राण पोळले ! । टाळविलें सुखनिधान नयनदिप्ति आजला न । धडकवीत होम तीच हृदयकुंड पेटलें ! । गंधवाहि श्वास मंद करित तई प्रणयधुंद । प्रणय कालचेच घोर गमति वात सूटले ! । वाल्हविन्या संगतीत मधुर निद्रा ये स्मृतींत । तडफडून तोंच जीव शांतिगीत भंगलें ! । चंद्र हा न हें गिधाड ! मत्तनुची धरूनि चाड । पसरुनि निज चादणें न पंख, त्याउ पातलें ! ॥

फूल आणि वारा (जाति-भूपति)

मी प्रसून[1] फुलला आजच उद्यानांत । रे पवन, असा का तुंवा मांडिला घात ! । तूं सुवास नेशी टाव देशोदेशीं । परि एक विनंती माझी चरणापाशीं ! । पावलों जेथल्या भूमीवर मी जनन, । निर्गंध नको तें करूंस माझें स्थान ! ॥

## कांत

चेतोहरा सुकविता भविता कथं नः ॥ जगन्नाथ ॥

पंहाटतार्‍यांत कांतांच्या एकंदर बारा कविता आहेत. त्यांपैकीं निसर्गावर चार; प्रेमावर चार; स्वदेश व स्वातंत्र्य यांवर तीन; आणि स्त्रीपुरुषांच्या लैंगिक नीतीवर एक असें त्यांचें ठोकळ वर्गीकरण करिता येईल. पंहाटतार्‍याचा उदय होण्यापूर्वी ज्या निरनिराळ्या कवितातारका वाङ्मया-

१ (प्रसून= फूल. नपुंसकलिंगी आहे.)

काशांत प्रकाशल्या होत्या त्यांचा उल्लेख कवीनें आरंभींच मोठ्या कुशल उपरोधानें केला आहे. पद्माकरार्चीं सहस्रदळकमळें अद्यापि पूर्ण विकसलीं नाहींत; (विलासांची हें विशेषनाम नाहीं) कवितेच्या श्रीरंगाची ललकारी अजून स्पष्ट ऐकूं येत नाहीं; नादापूरकरांचा 'वाग्विलास' तर अजून मुग्धच आहे; गाडगिळांचीं 'माझी फुलें' अहंभावनेनें लपेटलीं आहेत.; रविकिरणांचा कुंजविहारही तितकासा मनोज्ञ नाहीं; म्हणून अशा समर्थां

पहाटतारा डुलत फुलत ये विरल कृष्ण घन तमांत ग ।
सूर्यदूत पाहून हांसते रात कौतुकें मनांत ग ॥

ह्यांत ध्वनित होणारा आत्मविश्वास जरी आत्मप्रशंसेच्या दर्पानें दरवळत असला तरी कांताच्या कविता वाचून तो कुशाच्या दर्पाप्रमाणें (कौमारकेऽपि गिरिवद्गुरुता दधानो वीरो रसः किमयमेत्युत दर्प एव ॥ उत्तर. ६.१९॥ ) क्षम्य ठरेल असें वाटतें.

उच्च प्रतिभा, सुंदर कल्पनाविलास, सुललित पदपंक्ति आणि प्रसन्न व रमणीय अर्थव्यक्ति हे गुण कांताच्या कवितेंत सर्वत्र चमकतात. आणि असें गोड काव्य खडीसाखरेहूनही गोड अशा गळ्यानें कांत गाऊं लागले कीं, त्यांनीं नटवर्य मास्टर दीनानाथासंबंधानें जें म्हटलें आहे तें त्यांच्याविषयींही अक्षरशः खरें आहे असें वाटतें:— "तुझ्या कंपा-कल्पांपी स्फुरे जो एक झंकार ॥ तयानें तंतुवाद्याचा गळे सारा अहंकार । लकेरी सोडिता एक फुले नाट्यातुनी रंग ॥ क्षणीं बेहोश कीं होती जनाचे चित्तसारंग ॥

गोदागीतांत कवीनें आपलें तिजवरील निस्सीम प्रेम, तिचें पावनत्व व रम्यत्व वर्णून 'मरताही मज निजपदरें झाक तूं दयाळे !, अशी तिची प्रार्थना केली आहे. "वाई कलिकेंतील" निसर्गाचें प्रणयचित्र अत्यंत भावमधुर झालें आहे. कवि म्हणतो:– ये भ्रमर जिवाचा, कालिका हांसली । चुंबिलें तयें प्रेमें ती लाजली । आसवें दोन प्रेमाचीं झिरपलीं । हास्यांत तिच्या ब्रह्मांडें घवळुनि गेलीं ! । अश्रूंत सृष्टिचीं अनंत काव्यें भरलीं ॥ 'शारदी सृष्टि' ह्या कवितेंत अभिनव कल्पनांची पखरण पसरलेली दिसते. संध्यागिरीवर 'फुगडी फू' खेळणाऱ्या ताराराणीच्या डोक्यांतील चंद्रकलेचा गजरा ओघळला तेव्हां दिशांनीं तीं फुलें टिपून घेऊन

'आपल्या वेणींत घातलीं; कांहीं वायूनें उडालीं तीं मेघांवर इतस्ततः विखुरलीं हें वर्णन व चांदण्यांत प्रशान्त वाहणाऱ्या गोदेचें वर्णन, रात्रीचें शांत गंभीर वर्णन व तिच्या काठच्या खेडेगांवचें वर्णन हीं फार मनोहर झालीं आहेत. त्याचप्रमाणें खोडकर मुलासारख्या खोड्या करणाऱ्या हूड पवनाचें वर्णन मोठें चटकदार झालें आहे. कवि सांगतोः– 'घे सृष्टि। निजांकावरति । चुंबि प्रेमांत । झुळझुळ हासतो हूड पवन झोंपेंत ॥

"दृष्ट कुणाची झाली ?" ह्या कवितेंतील 'राजा माझा कणकण करितो। झोंप तयाची अडली ग'. पुत्रप्रेम 'तर आइ ग !' 'तोडूं नको लेंकरूं'-ह्यातील मातृप्रेम व गीतमोहनांतील मित्रप्रेम हीं अत्यंत विशुद्ध रीतीनें वर्णि-लेलीं आहेत. 'माळ गुंफिल्यावर' ह्यातील प्रियकराचें अवधीरित प्रेम रेशमासारख्या मृदुल भावनांनीं व्यक्त केलेलें आहे. तो म्हणतोः— 'जाऊं दे, होय सुखी या जगांत तूं तरी। मृदुल रेशमीच दोर । सावध परि पिळदार । कोमल कर तव चिरेल जपुन तोड सुंदरी ॥.

आपल्या काव्याचें प्रयोजन काय हें कवीनें प्रथमच "माझें गाणें" ह्या कवितेंत अगदीं स्पष्टपणें सांगितलें आहे. तो म्हणतो— माझ्या नसनसांतून स्फूर्ति उसळत आहे. मी जगाला जागें करीन व पंगूकडूनही गिरी लंघवीन. माझ्या मुखावर देशाच्या स्वातंत्र्याचें, पूर्वविभवाचें गान नाचत आहे. त्यानें मेलेल्यांनाही जिवंत करीन. त्यांच्या रोमरोमांत देशभक्तीची लाट उसळेल, व देशार्थ ते रणांगणांत प्राण देतील. मग मी माझ्या देशाचा उज्ज्वल इति-हास गाईन.—त्यांत शृंगार कुठें नाचेल। कारुण्य कुठें रडवील। अन् वीरश्री स्फुरवील।—अशीं गाणीं गायालाच। मज जगतीं जगणें मरणें॥ ह्यावरून-कवीचा देशाभिमान किती जाज्वल्य आहे हें व्यक्त होत आहे. 'अंगाई गीता'त एक वीरतनया व वीरपत्नी असून आपणांस वीरमतेचाही मान मिळावा म्हणून आपल्या बालकास वीरश्रीचें गाणें गात आहे. दसऱ्या-विषयीं कवि म्हणतो "दास्यीं दसरा म्हणजे आम्हां सुतकांत सण करणें".

"वंचिता" ह्या कवितेंत महाजनांच्या 'मातृहृदयां'तील वंचित विधवेच्या उद्गारांचा प्रतिध्वनि आढळतो. स्त्रियांच्या व पुरुषांच्या नैतिक अधः-पाताकडे समाजाची बघण्याची दृष्टि किती पक्षपाताची व अन्यायाची आहे हें कवीनें तींत दाखविलें आहे. ती म्हणतेः—'पाऊल पडे जरि चुकुन।

ओढवे आमुचें मरण । परि पुरुष सर्वही करून । लोकांत मिरवती शुद्ध मूर्ति नीतीच्या । पापिणी आम्ही जन्माच्या ! ॥ हें म्हणणें अक्षरशः खरें आहे. म्हणूनच समाजानें पापी पुरुषासही किंचित् अधिक—निदान समान तरी—शासन केलें पाहिजे असेंच कोणीही म्हणेल.

एकंदरींत कांतांच्या ह्या कविता सरस झाल्या आहेत. तरी पण त्यांस दृष्ट लागेल म्हणूनच कीं काय त्यानें, पुष्प-झेले; यशधैर्य; सौरभ हास्य; सृष्टिफुलोरा; चांदणीमाया असे समास क्वचित् उपयोजिलेले आढळतात.

पूर्वगामी कवींस अनुलक्षून काढलेल्या 'पहांटतार्‍यां'तील उद्गारांनीं म्हणा अगर इतर कांहीं कारणांनीं म्हणा कवीवर बरीच कडक टीका झाली असावी असें वाटतें. त्यायोगें त्रस्त होऊन या कविविहंगानें आपल्या पंखाचा जो फडफडाट केला तोच ''फटत्कार' या साभिप्राय व सार्थ नामानें व्यक्त झाला आहे कीं काय अशी शंका येते. प्रस्तावनेंतील पुढील ओळींनीं ''फडफडाट पंखाचे होती । अंगीं तेजोलहरी भिनती । निखार्‍यांत मम पंख करपती । तरिही फुलवितों गान ॥ तिला बळकटी येते आणि 'सूं सूं सुटुं दे बाण पारध्या' हें फटत्करांतलें पहिलेंच रूपक पाहून वाचकाची त्याबद्दल खात्री होते. हें गीत उत्कट भावना, अन्यायाची चीड, आत्मार्पणाची तयारी व आत्मविश्वास ह्यांनीं इतकें परिणामकारक झालें आहे कीं तें कवि म्हणतो त्याप्रमाणें 'येउन रुतला बाण स्वातीं । धुळींत पडता पडतां अंतीं । एक तान फेकीन तुला ती खचित करिल बेभान पारध्या, सूं सूं सटुं दे बाण ! ॥ पारध्याबरोबर टीकाकारालाही खास बेभान करील असें वाटतें. ह्या ठिकाणीं टिळकांच्या 'पहा उघडिलें हृदयाला । त्यांत सुखें घाला भाला' इ. कवितेची व यशवंतांच्या 'पांखरा नको करूं संकोच पांखरा नको करूं संकोच । पिकलें फळ हें तुझियासाठीं खुशल आपली चोंच ॥' या कवितेची आठवण होते. ह्या गीताबरोबरच नववर्षास, ज्योत, वैखरीस व जलतरंग ह्या स्फुट विषयांवरील कवितांचा उल्लेख करितां येईल. वर्षारंभीं मानवाच्या जुन्या निराशा जाऊन त्यांच्या जागीं नव्या आशा कशा प्रारंभीं प्रारंभीं फुलतात व पुढें त्याही कालक्रमानें कशा कोमेजतात हें सांगितलें आहे. 'ज्योतींत' 'मिळविलेंस अंतीं काय ! । काजळीच भोंवताली ठेविली भरूनी ! ॥' असें स्वार्थीवृत्तीचें अन्योक्तीनें वर्णन

केलें आहे. त्याचप्रमाणें 'जाळोनी इतरांस तूंहि जळशी ज्वाला मुखीं लावुनी' अशी 'वैखरीस' सावधगिरीची सूचना दिली आहे. आणि 'जल-तरंगांच्या' रूपकानें दुसऱ्याच्या जिवावर चैन करणारांवर कोरडे ओढले आहेत. जन्मठेप, पराभूत वीर, गुन्हेगार, मजूर, व भारताचे दधीचि हें कवितापंचक राष्ट्रीय व सामाजिक विषयांवर आहे. पहिल्या कवितेंतील जन्मठेपीवर जाणाऱ्या कैद्याचें गाढ स्वदेशप्रेम वाचकाचें हृदय कसें हालवून सोडतें. पाहाः—मातृभूमिची मुठभर माती । मरतां पदरीं द्या बांधोनी ! । आई नमितों श्यामल चरणीं ! । चितेंतुनी मम राखेमधुनी । माझियाच जातीचा कोणी । निपजुनि स्वातंत्र्याच्या यज्ञीं । आहुति देइल तो फिरफिरुनी ! ॥ आई नमितों श्यामल चरणीं ॥ 'पराभूत झालों म्हणुनि कां उरलों नच वीर' हें गीत उत्कट वीरश्रीनें भरलेलें आहे. अन्न-त्यागानें मृत्युमुखीं शिरणाऱ्या देशभक्तांना 'भारताचे दधीचि' म्हणून संबोधून 'तुमच्या मरणानें मढींही जिवंत होतील' । अमर-मृत ऋषींनो । वंदितों जागविला देश । शक्ति तया द्यावी सहाया । तुमचे ते क्लेश ॥ अशी गौरवपूर्वक मागणी मागितली आहे. मागल्या संग्रहांतील कवितां-प्रमाणें यांतही कवीची स्वातंत्र्यप्रीति व देशाभिमान हीं उज्ज्वलतेनें प्रकट झालीं आहेत. ह्यांत केशवसुतांच्या विचारांची छाप दिसत आहे खरी पण त्यांच्या शब्दांचा आवेश व भावनांची तडफ हे गुण तितके प्रतीत होत नाहींत असें म्हणावें लागतें.

स्वदेशासाठीं जसें कवीचें हृदय तळमळतांना दिसतें तसेंच सामाजिक व आर्थिक विषमतेबद्दलही तें हळहळतें. चोरास चोरीची प्रवृत्ति आर्थिक विषमतेनेंच होते. अन्यमार्ग बंद झाल्यामुळें पोराबाळांच्या उपाशी पोटांत कसाबसा गोळा टाकण्यासच हें कर्म करणें त्यास भाग पडतें. तो म्हणतो 'गुन्हेगार जगिं कुणीं निर्मिला ? । प्रमाद पहिला जयें न क्षमिला । शिक्षेसाठीं तुरुंग सृजिला । माणुसकी आमची हिरावुनी ! । या सजा आणखी वाढवुनी ! ॥ आज हे विचार समाजांतील एका वर्गात उद्भूत झालेले दिसतात.

१ विठ्ठलनगरांत चोऱ्या करतांना आढळलेल्या खिसेकापूंना पोलिसांच्या ताब्यांत देण्यांत आल्यामुळें तेथें जमलेल्या सोशालिस्ट कम्युनिस्टांना संताप

या विषयाची चर्चा करण्याचें स्थळ जरी हें नसलें तरी समाजानें बेकारांची उपेक्षा इतउत्तर करणें कधींही हितावह होणार नाहीं. 'मजूर' ह्या कवितेंत भांडवलशाहीच्या बेगुमान चैनीचा निषेध तीव्र उपरोधानें केला आहे. 'ते म्हणती "या श्येनांनों ! या सारे करूनी पाळे (समुदाय) घ्या अपुले भारंभार तनु लचके तोडून सगळें !" ॥.

पण कांतांच्या कवितेचें खरें कमनीयत्व त्यांच्या प्रेमगीतांतच दिसतें. कोमल व मधुर भावना, गोड व अन्वर्थक शब्दांनीं व्यक्त करण्यातच त्यांचा हातखंडा आहे, आणि ह्याचें प्रत्यंतर राहिलेल्या त्यांच्या प्रेमपंचकांत भरपूर आढळतें. 'हरपलेलें प्रेम' शोधणाऱ्या प्रेमी पुरुषाच्या हृदयाची हुरहुर, त्याची विमनस्कता व विरहोत्कंठित स्थिति ही 'मम हृदया तूं ओ दिली कुणा ?' ह्या कवितेंत अत्यंत हळुवार हातानें कवीनें चित्रिली आहे. तर ह्याच्या उलट एका प्रणयिनी स्त्रीच्या अशाच अवस्थेचें वर्णन 'घट भरुनि निघालिस लगबगिनीं' ह्या गीतांत गायिलें आहे. "येशि तूंच, कां नित पाण्यासी ? । काय कमी घरिं पडल्या दासी ! । अशी कशी संभ्रमीं परतशी ? । तो रिताच घट शिरिं बघ रमणी ! । घट भरुनि निघालिस लगबगिनीं ॥" ह्या प्रश्नाच्या जाणिवीनें होणारी प्रियेची 'व्रीडाविलक्ष' मुद्रा कोणत्या प्रियकरास मोहणार नाहीं ? ऐकांतिक व निरपेक्ष प्रेमाचे प्याले फेसांनीं कसे फसफसून उसळत आहे हें मधुराणींत आपणांस दिसतें. ह्यावर केशवसुतांच्या 'कांठोकांठ भरूं द्या पेला । फेस भराभर उसळूं द्या ॥' ह्या कवितेची छाया पडलेली दिसते. 'भर प्रेमा–भरिशी–भरूं दे चषक विषानें ॥ टाकितों पिउन, हासून, आण, तृप्तीनें ! ॥ परि नको निराशा प्रीतीची मज दावूं । प्रिय हास्या, हृदयीं सुरीं नको रे होऊं ! ॥' ही प्रियकराची शेवटची करुण प्रार्थना ऐकून कोणत्या मानिनी प्रमदेचें हृदय नवनीतमृदु होऊन विरघळणार नाहीं ? 'पदरंजन' म्हणजे केवळ रसिकरंजन झालें असून 'ये पूर्ण कराया चित्र गडे' ह्या कवितेनें हें नितान्त

---

आला असून, चोऱ्या करणें हें अनीतिमान कृत्य होत नसून तें आर्थिक विषमता नष्ट करण्याचें एक 'आयडिऑलॉजिकल' साधन आहे असें जाहीर करण्यासाठीं ते रॅली भरविणार आहेत."—विविधवृत्त २०-२-३८].

मधुर प्रेमचित्र खरें पूर्ण झाल्यासारखें वाटतें. उदात्तता व सात्त्विकता हें कांतांच्या प्रेमगीतांचें वैशिष्ट्य असल्यामुळें त्यांत सर्वत्र पवित्र वातावरण पसरलेलें दिसतें. शृंगारवर्णनांस उत्तानता वा अश्लीलता ह्या दोषांचा संपर्क कोठेंही लागूं न दिल्यामुळें तीं शिष्टमान्य होण्यासारखीं आहेत. आणि यांतच अभिनव कल्पना व पदलालित्य ह्यांची भर पडल्यामुळें हा रसपरिपाक गुलकंदासारखा अत्यंत मधुर व स्वादिष्ट झाला आहे. पहाः— सहज मृदुल तव पाउल पडतें। तरुण हृदय त्या तिथें चिरडतें। रक्त तेंच तव पदीं लागतें!। ही कशास मेंदी मग वरुनी! ॥ रंगवूं नको निजपद रमणी ॥ आरक्तच तव गुलाब तळवे। रंग तयांना कशास व्हावे?। रंग उषेमधिं काय भरावे। ये सुवर्ण उधळित जी गगनीं!। रंगवूं नको इ. ॥ त्याचप्रमाणे पुढीलः— कलावंत तो चित्रकार तो। झरा जळीं तव चित्र काढितो। चित्रकार अम्हि वृथा म्हणवितों। नवरंग खुले परि भाव दडे!। ये पूर्ण कराया चित्र गडे ॥. इ.

एकंदरींत ह्या दोन्ही चिमुकल्या संग्रहात कांताची कविता शुक्राच्या चांदणीसारखी कांतीनें चमकत असून ती चेतोहर व आल्हाददायक झाली आहे खास. ती सुबोध व प्रसादयुक्तही आहे. आणि मधून मधून जरी जगवारा, नभचुंबित, जीवनतळ, असंतोषआंच अशा अशुद्ध समासांचें गालबोट तिला लागलें असलें तरी ॥ मलिनमपि हिमांशो र्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ॥ या न्यायानें ती मनोज्ञच वाटते. पण अशा होतकरू, अभिजात व जन्मजात कवीचें काव्यामृत केवळ बिंदुवत्, सूक्ष्म व अल्प असावें ह्याबद्दल मोठा खेद वाटतो! त्याचीं बरींच काव्यें अजून अप्रसिद्ध आहेत असे ऐकितों. तीं लौकरच प्रकाशित करून तो आधुनिक कविमालिकेंतील आपल्या हक्काचें उच्चस्थान पटकावील अशी आम्ही आशा करतों. तूर्त ॥ मनो मे संमोह-स्थिरमपि हरत्येष बलवान् अयोधातुं यद्वत्परिलघुरयस्कान्त शकलः (उ. रा. ४.२१) ह्या कवीसंबंधीं आम्हांस एवढेंच म्हणावेंसें वाटतें.

### ज्योत.

जागते कशास ज्योत देउळीं अजूनी। बडवतांच पवन कां न जातसे विझुनी। दीर्घ रजनि ही सरली। दीपकांति ओसरली। तेवतांच कां न तमें

टाकिली गिळूनी !। ज्या स्नेहावर जगली– । ज्योत ती झरी अटली वात जळे स्नेह सर्व दग्ध तो करूनी ! जळुनि जीवनांत हाय !। मिळविलेंस अंतिं काय ?। काजळीच भोंवताली ठेविली भरूनी !॥

## ये पूर्ण कराया चित्र गडे । जाति प्रणयप्रभा

ये पूर्ण कराया चित्र गडे । ममहृदय-चित्र अपुरेंच पडे ! स्तब्ध करी निस्तब्ध कुंचला । रंग रंगदार्णांत संचला । चित्रकल्पना चित्तचंचला । जडरंगाना या नच आतुडे ! ये पूर्ण कराया चित्र गडे ॥१॥ ओढ्या-मधुनी कळशी भरुनी । घेतांना शिरिं अंग तोलुनी । मीनाक्षी, जळिं टकमक नयनीं । ते मीन पाहती तुझ्याकडे !। ये पूर्ण० ॥२॥ सांजरंगिं जळ निळें तळपतें । रूप तुझें त्यामधें झळकतें । लाट निजसुरी मृदु पुट-पुटते । जणुं ओढ्याला तव स्वप्न पडे !। ये पूर्ण० ॥३॥ कलावंत तो चित्रकार तो । झरा जळीं तव चित्र काढितो । चित्रकार आम्हि वृथा-म्हणवितों॥ नवरंग खुले परि भाव दडे !। ये पूर्ण० ॥४॥ भाव लोचनीं भिरभिरणारे । हृदयीं पदरीं फडफडणारे ॥ श्वासामधुनी थरथरणारे । सुमरंगिं गंधसम करि उघडे ! ॥ ये पूर्ण० ॥५॥

## वैखरीस.

आवेशें वदत्येस काय, कळतें कांहीं तुला वैखरी ?
शब्दांची तुज धुंदि बुद्धि–चपले, उन्मत्त कैशी करी ?
ओकावें विष कां ? फणांतिल मणी लाभे जरी सर्पिणी
जाळोनी इतरांस तूंहि जळशी ज्वालामुखी लावुनीं ॥

# प्रकरण २४ वें.

## दोन परंपरा.

### (१) श्रीमाणिकप्रभुसांप्रदाय.

"श्रीमाणिकप्रभुमहाराज" (स. १८१७-१८७५)

मौजे हरकुड, ता. कल्याणी, येथें एका सुखवस्तु ब्राह्मणाचें घराणें होतें. त्याचा व्यवसाय सराफीचा असे. भाऊबंदकीचा उपसर्ग कुटुंबास लागू नये म्हणून केशवराव नाईकांनी सर्व मिळकत ज्येष्ठ बंधूस अर्पण करून आपला स्वतंत्र उद्योग धंदा आरंभिला; व सुखासमाधानानें आपली प्रपंच-यात्रा केली. याचे चिरंजीव मनोहर ह्यांनीं आपला वडिलोपार्जित धंदा संभाळून चांगला नांवलौकिक मिळविला व त्यांनीं आपली इहलोकची यात्रा शके १७५९ च्या सुमारास संपविली. ह्यांच्या तीन मुलांपैकीं मधले चिरंजीव माणिकप्रभु महाराज होत. ह्यांचा जन्म शके १७३९ त झाला. मनोहरपंतांच्या मृत्यूनंतर देवी बयाबाईना आपल्या कच्च्याबच्च्यांसह माहेरीं जावें लागलें. श्रीप्रभूंचें शिक्षण कल्याणीस मामाकडे १३।१४ व्या वर्षापर्यंत त्या कालाप्रमाणें झाले. पुढें मामानीं त्यास एक लहानशी नोकरी दिली होती पण ती त्यांस न आवडल्यामुळे त्यांनीं सोडून दिली. त्यानंतर ते कल्याणीपासून ५।६ मैलांवर असलेल्या 'अमृतकुंड' नांवाच्या निसर्गरमणीय ठिकाणीं जाऊन राहिले. पुढें सुमारें १२ वर्षेपर्यंत त्यांनीं अनेक तीर्थक्षेत्रीं प्रवास केला. मग शके १७७० च्या सुमारास त्यांनीं हुमनाबादेजवळ (पूर्वीची जयसिंगपेठ) माणिकनगराची प्रथम वसाहत केली; व येथून 'सकलमत स्थापित' सांप्रदायिक तत्त्वाचा उत्कर्ष सुरू झाला. प्रवृत्तिनिवृत्ति हे दोन्ही मार्ग विरोधी नसून दोन्ही पूर्णपणें साधतां येतात असा उपदेश ते करीत असत. त्याचें सार "श्रुतिधर्म रक्षुनि सकल मतांतें वंदा। सर्वांतरिं आत्मा, नको कुणाची निंदा ॥" हें होतें. त्यांचा दानधर्माचा

तडाखा फार मोठा असे. हिंदूंच्या सणांत हिंदूंस, संक्रातीस जंगमांस व मोहरमांत मुसलमानांस ते सढळ हातानें द्रव्य देत असत. आपल्या अलौकिक सामर्थ्यानें ते मुसलमान समाजासही प्रिय झाले होते. त्यांना गायनाचा फार नाद असे. उर्दू, हिंदी, मराठी व कानडी यांत यांनीं अनेक पदें रचलीं आहेत. वेदांतावर एक दोन लहान ग्रंथ, व हनुमंतजन्म, मल्हारीमहात्म्य, संगमेश्वरमहात्म्य अशी ओंवीबद्ध रचनाही त्यांनीं केली आहे. त्यांची दिनचर्या लोकविलक्षण होती. त्यांनीं दत्ताची गादी स्थापन केली. त्यानीं इष्टसिद्धयर्थ कोठेंच तपश्चर्या केली नाहीं. त्यांचें अलौकिकत्व जन्मसिद्ध होतें. म्हणून त्यांस 'चतुर्थ दत्तावतार' म्हणत असत. त्यांच्या 'सकलमत' संप्रदायांत उपासना, साधनसंपत्ति वगैरेंचा आग्रह नाहीं. सर्वानुस्यूत प्रभूचें विभुत्व कसेंही पटलें म्हणजे झालें. ह्यांच्या सांप्रदायिकांची संख्या एक लाखावर भरेल. त्यांत हिंदु, मुसलमान, शीख, लिंगाइत आहेत. सर्व धर्म मोक्षप्राप्ति करून देण्यास समर्थ आहेत. कोणाचीही उपासना केली तरी ईश्वरालाच पोंहचते ही ह्या सांप्रदायाची मुख्य शिकवण असल्यामुळें धर्माधर्मांतील तंटेबखेडे कधीं झाले नाहींत. शके १७८७ त मार्ग. शु। ११ स याचें निर्याण झालें. कनिष्ठ बंधु नरसिंहमहाराज यांनीं 'ज्ञानशिखा' व 'अनिर्वाच्य' असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. पण ते मिळाले नाहींत. श्रीप्रभूनंतर मनोहरमहाराज गादीवर आले.

श्रीमाणिकप्रभुमहाराजांच्या ग्रंथांपैकीं 'सात वारांचें भजन' म्हणून एक सुमारें ७५ पानांचा लहानसा ग्रंथ रा. शं. के. दीक्षितांनीं प्रकाशित केला आहे. प्रस्तावनेंत ते म्हणतात 'येथील संप्रदाय उपासनायुक्त ज्ञान हा आहे, ह्यांत गणपति, राम, व्यंकटेश, हनुमंत, घृतमारीची, खंडेराय, सांब, पांडुरंग, दत्तात्रेय वगैरेंच्या आरत्या आहेत. पुढें सातावारांचें भजन आहे. त्यांत त्या त्या देवाचें भजन, पदें, अष्टकें व शेजारत्या अशी रचना केली आहे. शेवटीं मनोहर महाराजकृत गुरुसंप्रदाय दिला आहे. वारांच अनुक्रम गुरुवारपासून केला असून दत्तात्रेय, व्यंकटेश, मारुति, खंडेराय सांब, भवानी व पंढरीराय विठोबा अशा देवतांचें भजन केलें आहे नमुन्याकरितां पुढें एक पद दिलें आहेः—

पद. राग—काफी. ताल—दीप दी.

सखा दीनवत्सल पंढरिराय ॥ तो हा विटेवरि जोडुनि पाय ॥ सखा० ध्रु.
सुदामाचे मूठभर पोहे ॥ आवडीनें मटमट खाय ॥ सखा० ॥
दुर्योधनाचा नावडे मेवा ॥ विदुरगृहाप्रति जाय ॥ सखा०॥
माणिकप्रभू भावाचा भुकेला ॥ आणिक नलगे काय ॥ सखा०॥

पद्यमाला (भाग २ रा):– श्री माणिकप्रभुकृत हा एक लहानसा संग्रह संस्थानचे कारभारी रा. दीक्षित यांनीं प्रकाशित केला आहे. परंतु त्यांत माणिकप्रभूंचीं, मार्तंड व नरसिंह प्रभूंचींही पदें घातलीं आहेत. तीं वरील-प्रमाणेंच असून त्यांत हिंदी व उर्दू हीं पदें समाविष्ट केलीं आहेत. उर्दू पदाचा पुढें थोडा नमुना दिला आहे.

गज्जल–मस्ताना.

वाहद जात पाक है अल्ला । हरशय जुल्वे नूर हुवल्ला ।
बोलो लाईलाहईल्लिल्ला ॥ खूद आषक खूद माषुक इष्क दि
हर शक्ल बनाजी मस्ताना ॥१॥ दरया इष्क जोष लहराया ॥
आषक मस्त अनलहक् गाया ॥ हुबाब दर्या हिमे (हूमे) समाया ॥
आजाद खुदा आबाद किया मैखाना । मसजिदो दैर ् खाना ॥२॥ इ.इ.

## श्री मनोहर माणिक प्रभु.

हे अवघे सात वर्षांचे असतांना गादीवर आले व १९ व्या वर्षींच शके १७९९ मध्यें समाधिस्थ झाले. ह्या काळांत त्यांनीं संस्थानचें सर्व काम मोठ्या सुयंत्रिततेनें केलें. ते योगाभ्यासाचे चहाते होते. आपण अविवाहित राहून त्यांनीं आपल्या कनिष्ठ बंधूंचें म्हणजे खंडेरावांचें लग्न शके १७९५ मध्यें बापाचार्यांच्या मुलीशीं केलें व पुढें श. १७९९ मध्यें आश्विन कृ. ७ मीस त्यांस उपदेश व प्रसाद देऊन देहविसर्जन केलें.

## श्री मार्तंड माणिक प्रभु.

ह्यांचा जन्म शनिवार मार्गशीर्ष कृ. १२ शके १७८३ रोजीं झाला. वयाच्या १६ व्या वर्षींच संस्थानची सर्व जबाबदारी ह्यांवर पडली तरी

न डगमगतां त्यांनीं स्वकर्तृत्वानें संस्थान नांवारूपास आणिलें. स्वतंत्रता व पूर्णता हे गुण त्यांच्यांत प्रामुख्यानें होते. बालपणीं ते फार हूड होते व पोहणें, मर्दानी खेळ व निशाणबाजी ह्यांची त्यांस फार आवड होती. मराठी, संस्कृत, उर्दू व फारशी या भाषांचें अध्ययन त्यांनीं केलें होतें. अध्यात्म आणि गायन हे त्यांचे आवडते विषय होते व त्यांतल्या त्यांत गायनाचे ते पूर्ण मर्मज्ञ होते. त्यांची ज्ञानलालसा फार तीव्र असल्यामुळें त्यांनीं पौर्वात्य व पाश्चात्य तत्त्वज्ञानांचा लक्षपूर्वक अभ्यास केला होता. 'ज्ञानमार्तंड' हें त्यांच्या अविरत व्यासंगाचें पक्व फळ होय. त्यांत महाराजांच्या स्वतंत्र बाण्याची व स्वानुभवाची चमक सर्वत्र आढळते. ह्या ग्रंथाची काशीस्थ पंडितांनीं प्रशंसा केली असून दक्षिणेकडील पंडितांनीं तर त्यांस 'अभिनव शंकराचार्य' ही पदवी समर्पण केली आहे. त्यांनीं कांहीं पदेंही केलीं आहेत, व तीं ओजस्वी व रसाळ आहेत. प्रत्येक पदांत वेदांतांतील एखादा सिद्धांत सांगण्याचा उपक्रम केलेला दिसतो. 'जागा जागा पंडित जागा। वेदशास्त्रें देतील दगा ॥' अशा सारखे खोंचदार इषारे ही त्यांत मधून मधून आढळतात. मंत्रशास्त्रावर त्यांचा विश्वास होता व त्याचाही चांगला अभ्यास त्यांनीं केला होता. महाराज हे कर्म, भक्ति, ज्ञान व वैराग्य ह्यांची मूर्ति होते. त्यांचा स्वभाव प्रेमळ होता. ते पराकाष्ठेचे त्यागी व भोगी होते. त्यांनीं लाखों रुपये मिळविले व लाखों रुपये दानधर्मांत खर्चले. महाराजांनीं मुसलमान समाज आणि मुसलमान अधिकारी वर्ग प्रेमानें आकर्षिला होता. त्यांच्या 'ज्ञानमार्तंडा'ची रूपरेखा पुढें दिली आहे. त्यांनीं रुवार फाल्गुन कृष्ण ४ शके १८५७ रोजीं समाधि घेतली.

## श्री माणिक प्रभुसंप्रदाय

हें छोटेंसें पत्रक श्रीसद्गुरु मार्तंड माणिक प्रभु ह्यांनीं केलें आहे. (१) संप्रदायाचें नांवः—सकलमती सांप्रदाय असें ह्यास म्हणतात. कारण ह्यांत सकल सांप्रदायांची एकवाक्यता केली आहे. ह्यांत कोणताही संप्रदाय विरोधी मानला न जातां सर्वांतून सारग्रहण केलें जातें हा ह्याचा

विशेष आहे. (२) उपास्यदैवतः—आध्यात्मिक स्वरूपांत परब्रह्म; आधिदैविक स्वरूपांत दत्ताचा चतुर्थ अवतार श्री माणिक प्रभु–व आधिभौतिक रूपांत—मोगलाईतील कल्याण प्रांतीचे कुलकर्णी मनोहर नाईक यांचे चिरंजीव लाडनशा--माणिक प्रभु (आईचें नांव बयादेवी होतें) (३) त्रिविधोपासनाः—१ आत्मा स्वतंत्र आहे. २ मधुमती (चालक शक्ति) सह श्री दत्तात्रेयाचें ध्यान करणें. हा संप्रदाय अद्वैती आहे. ३ जयंत्युत्सवांत भाग घेणें. (४) अभ्यासः— ज्ञानविचारणा करणें. कामक्रोधादिकांचा सर्वथा त्याग होणें अशक्य आहे. (५) ध्येयः— चार मुक्तींचें महत्त्व त्यांत नसून सहज मुक्तीच श्रेष्ठ मानिली आहे. स्वर्ग व सिद्धि हें साध्य न मानतां आपण त्रिकालीं अखंड आनंदरूप आहों असें मानणें हीच मुक्ति होय व हेंच ध्येय होय. (६) सां. वैशिष्ट्यः— ईश्वरानुग्रहादेव पुंसामद्वैतवासना (अवधूत गीता.) साधनसंपत्तीची प्रौढी यांत नाहीं. तिची वाट पाहण्याचें कारण नाहीं. सारांश, सांप्रदायिकांनीं आपण चैतन्याचे उपासक आहोंत असें समजावें. नामरूपाचा अभिमान न बाळगतां सर्व देवदेवतांत चैतन्य एकच आहे हें लक्षांत ठेवावें. अर्थात् कोणत्याही संप्रदायाशीं विरोध करण्याचें कारणच उरत नाहीं. इच्छेनुसार सर्व भोग भोगून आत्मरूपानें निर्लेप असावें. सर्व विषय सत्ताविलसित आहेत, आणि आत्म्यावांचून कोणी भोक्ता नाहीं हें समजून अखंडानंदांत असावें. आणि पुढील पद्याचा जप करावाः—श्री माणिक जय माणिक । हर माणिक हरि माणिक । चिन्माणिक सन्माणिक । जय जय हो सकलमता विजय हो ॥

—शुभं भवतु—

## श्री शंकर माणिक प्रभुमहाराज

श्री. शंकररावांचा जन्म शके १८१७ सालीं श्रीक्षेत्र माणिकनगर येथें झाला. केशवराव व मुक्ताबाई हीं त्यांची मातापितरें होत. लहानपणींच पितृविहीन झाल्यामुळें त्यांचें संगोपन व शिक्षण त्यांचे मातुल श्री. मार्तंड माणिक प्रभु महाराज यांचे देखरेखीखालीं झालें. मराठी, संस्कृत, इंग्रजी व उर्दू या भाषांचा अभ्यास चांगला करून त्यांनीं वकिलीची (प्लुडीयल)

परीक्षाही दिली. परंतु वकिली करण्याचें त्यांनीं कधींच मनांत आणिलें नाहीं. वेदान्ताकडे त्यांची मुळापासूनच प्रवृत्ति असल्यामुळें त्या विषयाचें त्यांनीं शास्त्रोक्त व सांगोपांग अध्ययन केलें आहे. तत्त्वज्ञानमंदिरांतील त्यांचे लेख त्यांच्या गाढ विद्वत्तेची, सुबोध लेखनशैलीची, व कुशल विषयोपन्यासाची साक्ष देतात. पुढें कांहीं लेखांचा सारांश दिला आहे त्यावरूनही त्यांच्या ह्या गुणांची ओळख सहज पटण्यासारखी आहे. मराठींतील अभिजात वाङ्मयाशींही त्यांचा दृढ परिचय आहे. उपनिषदादि महान् वेदान्तग्रंथांची उपस्थिति उत्कृष्ट असल्यामुळें त्यांच्या लेखास पांडित्याचें तेज आलें आहे. हे नुसते गद्य लेखक नसून कविही आहेत. ह्यांच्या काव्यात प्रसाद व प्रतिभाविलास हे गुण ठळकपणें आढळतात. अंगीं उत्कृष्ट वक्तृत्व असल्यामुळें यांचीं भाषणें फार चित्ताकर्षक होतात.

माणिकनगर संस्थानाचा कारभार हे बरेच दिवस पाहात असत. त्यांवरून त्यांच्या अंगची कर्तबगारी आणि व्यवहारदक्षता लोकांच्या निदर्शनास आली आहे. श्री मार्तंड माणिकप्रभु शके १८५७ मध्यें स्वरूपीं लीन झाल्यामुळें संस्थानची गादीही त्यांच्याकडेच आली आहे. व तिला ते सर्वप्रकारें योग्यच आहेत. ह्या गादीवर बसलेल्या आतांपर्यंतच्या विभूतींकडून बहुमोलाची वाङ्मयसेवा घडली तशीच ह्यांच्याकडूनही होईल अशी अपेक्षा करणें वावगें होणार नाहीं.

श्री माणिक प्रभु संप्रदायाचे आजपर्यंत पुढील ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. (१) श्रीज्ञानमार्तंड, (२) श्री माणिक प्रभु चरित्र, (३) पद्यमाला, (४) साता वारांचें भजन, (५) नित्यकर्मावलि, (६) ज्ञानशिखा, (७) माणिकप्रभाकर व (८) पंचरत्नगीता. अप्रकाशित पद्यवाङ्मयही पुष्कळ अ . परंतु तें पहाण्यास मिळालें नाहीं. सामान्यतः अशा वाङ्मयाचें महत्त्व संप्रदायदृष्ट्याच अधिक असणार. श्री माणिक प्रभु चरित्र हा पांचशें साडेपांचशें पानांचा प्रचंड ग्रंथ रा. गणेश रघुनाथ कुलकर्णी यांनीं लिहिला आहे. त्याची भाषा शुद्ध, सुबोध व ओघवती असून त्यांत ऐतिहासिक माहिती मोठ्या परिश्रमानें संकलित केली आहे. त्याचप्रमाणें विषयाची मांडणी उठावदार झाली असल्यामुळें तो चित्ताकर्षक व वाचनीय झाला आहे. ह्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग

केलेले आहेत. पहिल्यांत उपोद्घात, पूर्वेतिहास व जन्म, बाललीला, व पर्यटन अशीं चार प्रकरणें आहेत. ह्यांतील मणिचूलपर्वत व कल्याण हे भाग ऐतिहासिक माहितीमुळें फार महत्त्वाचे वाटतात. दुसऱ्यांत माणिकनगर, प्रभुदरबार, विभवविस्तार, चमत्कारकथा, उत्सव, शिष्यवृंद, निर्याण, श्री मनोहर माणिक प्रभु व मार्तंड माणिक प्रभु अशीं ९ प्रकरणें आहेत. माणिकनगराच्या स्थापनेच्या वृत्तांतील ऐतिहासिक माहिती सुसंगतवार दिलेली आहे, तर प्रभुदरबारचें वर्णन दरबारी थाटाचें व मनोहर झालें आहे. माणिकनगरच्या दरबारची शिस्त तात्या महाराजांनीं राजकीय थाटाची कशी लावून दिली व तींत आध्यात्मिक श्रेयाचीही योग्य तजवीज कशी केली हें वाचण्यासारखें आहे. रोज हजारों मनुष्यांस भोजन व लाखों रुपयांची खैरात हीं कशीं चालत ह्याचा विचार केला कीं वाचक आश्चर्यचकित होऊन जातो. ॥ कोठून द्रव्य येतें । माहीत न होय कोणतें । गादीवर बसतां त्वरितें । मुष्टी भरभरूनी देताती ॥१॥ परी असंख्य धर्म करितां । कमी न पडे तत्वता । महाराज बैसतां उठतां । गादी शोधून पहाताती ॥ ३ ॥ इ. बिदरचे यवन, फकीर, ऐबुद्दीने उस्ताद, मोहरम व ग्यारवी वगैरे प्रकरणें अत्यंत महत्त्वाचीं आहेत. कारण त्यांत प्रभूंनीं त्या समाजावरही आपली छाप कशी पाडली व हिंदु मुसलमानांत सख्य कसें घडवून आणलें, व त्यांनीं "पीरान् पीर दस्त गीर" आणि "दुनियामें एक परभू सच है; बांकी सब झूट है।" असा त्यांचा गौरव कसा केला हें उत्तम रीतीनें पाहावयास मिळतें. ह्या उदारमतवादी सकलमतसंप्रदायाचें सामाजिक दृष्ट्या जें महत्त्व आहे तें ह्यांतच आहे असें आम्हांस वाटतें. प्रभुसमाधीचें वर्णन मोठें धीरगंभीर आणि करुणरसपूर्ण असें झालें आहे. सारांश ह्या पुस्तकाच्या वाचनानें ह्या सकलमतसंप्रदायानें केलेली सामाजिक व धार्मिक कामगिरी वाचकाच्या मनावर पूर्णपणें बिंबल्याशिवाय राहात नाहीं.

# (२) जैनमत सांप्रदाय

## श्री. गोपाल बाळाजी बीडकर.

प्रथम बीडकरांनीं 'श्री देशभूषण मुनीश्वराची' पूजा हिंदींत रचली होती तिचा हा मराठी अनुवाद आहे. हिंदी व मराठी पूजा एकत्रच छापल्या असून शेवटीं आचार्यांचा संस्कृत शांतिपाठही जोडलेला आहे. पंडित जिनदास पार्श्वनाथ फडकुले ह्यांनीं त्यास प्रस्तावना लिहिली आहे. परंतु ह्या अनुवादाची प्रेरणा जीवराज गौतमचंद दोशी यांजकडून झाली. श्रीकुंथलगिरी हें एकच सिद्धक्षेत्र महाराष्ट्रांत असून त्या ठिकाणीं श्रीकुलभूषण देशभूषण हे दोघे बंधु मुनिव्रत धारण करून घोर तपश्चर्येच्या बलानें कर्मसमूहाला दग्ध करून मुक्त झाले आहेत. प्रतिवर्षी ह्या क्षेत्रीं हजारों यात्रेकरू दर्शनपूजनासाठीं येतात त्यांस पूजनपद्यावली फार उपयोगी पडेल. पद्यावलीची भाषा साधी व सोपी असून तिच्यांत प्रसादगुण चांगला उतरला आहे. कवीचें हें भक्तिपूर्ण कवन वाचकासही भक्तिप्रवण बनवितें. आणि भक्ति हेंच जैन लोकांत भुक्तिमुक्तीचें श्रेष्ठ साधन गणलें जातें. बीडकराचें शिक्षण तेथील ब्रह्मचर्याश्रमांतच झालें असल्यामुळें व पुष्कळशीं पद्यें तेथील मुनिद्वयावरच रचलीं असल्यामुळें पुस्तकाचें नामाभिधान 'कुलभूषण-काव्य सुमन' असें त्यानीं ठेविलें आहे हें युक्तच आहे. अलीकडे जैनसमाजांत गायनाची आवड उत्पन्न होऊं लागली असल्यामुळें नाटक सिनेमांत लोकप्रिय झालेल्या चाली घरोघर मुलांमुलींच्या तोंडीं बसतात; परंतु त्या प्रेमविषयक गाण्यांचा कोंवळ्या मनावर अनिष्ट परिणाम होतो. तो टाळतां यावा म्हणून त्याच लोकप्रिय चालींचा ह्या धार्मिक पदांकडे उपयोग केला आहे.

ह्या पुस्तकांत पूजन, पद्यावलि व विनंतिसंग्रह असे तीन विषय एकत्र केले आहेत. पूजेंत ॐ ऱ्हीं बीजमंत्रापूर्वक स्थापना केली आहे तींत स्वागत, पाद्य, चंदन, अक्षता, पुष्प, नैवेद्य, दीप, धूप, फल, व शेवटीं अर्घ्य हे विधि सांगितले आहेत. स्वागत 'कवित्तछंदात' असून पुढील विधि अष्टकांत रचले आहेत. त्यानंतर जयमाला ह्या दोहा व पद्धरी छंदांत मुनिद्वयाची स्तुति केली आहे. तींत पहिल्यानें त्यांचा थोडा पूर्वेतिहास

दिला आहे. ते विमलवती येथील क्षेमंकर नृपाचे मुलगे होते. पूर्वश्रमांत तारुण्यमदानें तरुणींसाठीं त्यांनीं घनघोर युद्ध केलें. परंतु 'निज भगिनी तरुणि ही ! समजतांच। शिवली हृदया आंच॥ त्यामुळें पूर्ण वैराग्य उत्पन्न होऊन सर्व विषय दुःखद आहेत अशी त्यांची खात्री झाली व लग्न न करितां वनांत जाऊन त्यांनीं दुर्धर तपश्चर्या केली. त्या ठिकाणीं गतजन्मवैरी कोणी राक्षस येऊन त्यांना फार छळता झाला. परंतु 'हा कर्मखेळ' असें समजून त्यांनीं आपली स्थिति यत्किंचित्‌ही विचलित होऊं दिली नाहीं आणि सिद्धावस्था प्राप्त करून घेतली. कवीनें हें प्रकरण "घत्ता" नामक छंदांत पुढीलप्रमाणें संपविलें आहे.

घत्ता

भो ! अघहारक ! सत्सुखकारक ! कर्मनिवारक मुनिवरजी ! शुभचरण कमलिं या विमल भक्तिनें प्रणाम अमुचा घ्याजी अजी॥

पद्यावली

पद्यावलींत ३० पद्यांत ९ हिंदी व २१ मराठी आहेत. दिव्यमहेंद्रपदांना, दे हाता शरणागता, नरवर कृष्णासमान, उगिच कां काता, लपविला लाल, या नव नवल इत्यादि लोकप्रिय संगीत चालींनीं ही पद्यावली फार आकर्षक झाली आहे. हिंदीप्रमाणें मराठींतही एक कव्वाली घातली आहे. तीः— शांतिसागर ! भो ! मुने ! मी वंदितों भावें तुला॥ वंदितों भावें तुला मज तूंच सद्गुरु भेटला॥धृ०॥ पदांत चरित्रकथा व स्तुति दोन्ही आलीं आहेत. पुढें एक दोन नमुन्यासाठीं दिलीं आहेत.

पद ७ वें. (चाल—नरवर कृष्णासमान.)

मुनिवर! दयानिधान! धांवा॥ धृ०॥
हत मन्मथ कुलभूषण! देवा!।
स्मरशर जिवास कितितरि देती॥
प्रतिदिनी दुःख महान्॥ १॥

पद १९ वें (चाल—उगीच कां कांता)

प्रथम वंदूं या सन्मती। देई शांति ॥ धृ० ॥ मंगलदा मूर्ती सुगुणी ॥ मूर्तिमंत शांती नयनीं। खेळते जिच्या दिनराजनीं ॥ नेत्र दिपवि सुंदर कांती ॥ १ ॥

पद ३० वें (चाल— या नव नवल ०)

हे जिन ! सतत सुखशांतता ॥ जगतीं वास करो ! वर होउनि नत तुज। मागतसे भगवंता ! ॥ धृ० ॥

जनसंसारीं संकटसमयीं। होती त्रस्त सदाही। त्राता अन्य दिसे नच कोंणी। मातें तुजविण नाथा ! ॥१॥

विनंति-संग्रहात प्रभूकडे फिर्याद, प्रभूच्या दरबारांत, प्रभू पुढें जबाब, गुरुगुणगान, बाहुबलीस्तवन, भोजनसमयींची प्रार्थना, आत्मचिंतन, प्रभु-सेवासमयीं, शांतिसागरस्तवन, (२); व 'जयतु जिनदर्शनं' अशीं छोटीं छोटीं अकरा प्रकरणें आहेत.

पहिल्यांत बारा पद्ये असून कर्मशत्रु छळीत आहेत त्यापासून रक्षण करण्यास विनंति केली आहे. दुसऱ्यात ४ पद्यात 'तुझी दृढ भक्ति दे' अशी मागणी केली आहे. तिसऱ्यांत जबाबांतील करुण कहाणीनें जिनेश्वरास दया येते. निरनिराळ्या योनींतील दुःखें भोगिलीं, नरतनु मिळाली तेथील सुखाने दुःखें अनुभवलीं, स्वर्गसुखें पण लाभलीं—यापरी फिरे पुनः पुनः संसारीं। झडकरी मला तूं तारीं ॥ अशी प्रार्थना ह्यांत केलेली आहे. चवथ्यांतील गुरुगुणगायनाचें सार "पातक अशिव हरो ! राहो ! ती यतिमूर्ती मम हृदयीं" ह्यांत आलें आहे. पुढें आत्मचिंतनात सामान्य नीति सांगून शेवटीं मोहापासुन दूर; परस्पर प्रेमें वागो नर भुवनीं वगैरे उपदेश आहे! नंतर शांतिसागरस्तवनांत तूं धर्माचा कैवारि जगा उद्धारिं धर्मे धीमंता, अन्याशा ना बालसुता ॥ अशी प्रार्थना आढळते. 'जयतु जिनशासनं जयतु जिनदर्शनं" ह्या हिंदी पदानें 'विनंतिप्रकरण संपविलें आहे.

भोजनसमयप्रार्थना दिंडी

शांति नाथा जिन ! शांति करी चित्तीं। विषयराक्षस पळवूनि पुरी कांती।

उषःकालच्या क्रिया उरकुनियां । करुनि जिनदर्शन घेउं भोजना या ।
साम्यभावें उल्हासयुक्त पूर्ति । करूं उदराची यतिसमान चित्तीं ।
धर्मवृक्षा अंकुर फुटूनि त्यातें । फळें येउत झणीं ! ही विनंति तूतें ॥

(२) श्रीपरमपूज्य आचार्य शांतिसागरमहाराज यांचा पोवाडा:—

हा पोवाडाही वरील बीडकर यांनी रचून प्रकाशिला आहे. ह्यास फडकुले ह्यांनीं लहानशी प्रस्तावना लिहिली आहे. तीवरून 'बालसुत' जसे भक्तिमान कवि आहेत तसेच श्रीशांतिसागरमहाराज हे जंगमतीर्थ व जंगमप्रतिमा होऊन गेले हें समजतें. सदरहू पोवाड्यांत आचार्यांच्या जन्मापासून तो शिखरजीकडे जाईपर्यंतची हकीकत दिली आहे. हें पुस्तक कर्त्यानें धर्मवीर रावजी सखाराम दोशी यांस आर्याष्टकानें समर्पण ॥ त्या रावजी-करीं मी विनयें हें सुमन अर्पी त्या मोदें । स्वीकार, हुंगण्या दे रसिकां, खुलवी सदा तदा मोदें ॥ असें केलें आहे.

कवीनें प्रथमतः शांतिसागरस्तवन करून पोवाड्यास आरंभ केला आहे. पोवाड्याची चाल 'धन्य शिवाजी तो रणगाजी' अशी असून पोवाडा एकंदर १८ पानांचा आहे. श्रीशांतिसागरांच्या चरित्राची रूपरेखा पुढें दिली आहे: दक्षिणदेशांत भोजगावात भीमगौड पाटील व सत्यवती ह्याच्या उदरीं ह्यांचा जन्म शके १७९४ ज्येष्ठ कृष्ण षष्टीस झाला. वयाच्या ९ व्या वर्षी पांच वर्षांच्या मुलीशीं त्याचें लग्न झालें. परंतु ती सहा महिन्यांतच कालवश झाली. तरी दुसरें लग्न न करता आजन्म ब्रह्मचारी राहण्याची त्यानें शपथ घेतली. शेतींत नांगरता, खुरपता जीवांचा घात होतो म्हणून ती त्यानें सोडून दिली व वडिलांच्या आग्रहास्तव कापडाचें दुकान घातलें. पण त्यांतही त्याचें चित्त रमेना. जिनशास्त्रांचा त्यानें पूर्ण अभ्यास केला. त्याला संसार क्षणभंगुर व मोहमय वाटूं लागला आणि जन्माचें सार्थक करावें म्हणून त्यानें 'मुनिदीक्षा' घेण्याचें ठरविलें. परंतु आईबापांच्या आग्रहास्तव तो बेत त्यानें कांहीं दिवस रहित केला. पुढें तो तीर्थराज सम्मेदाचलावर दर्शनास गेला. तेथील पार्श्वजिनाच्या टोंकावर 'यावज्जीव तैल घृत खाणार नाहीं असें व्रत त्यानें घेतलें. यात्रेहून घरीं

१ (सन १९३१. किं. ८=).

मुनिव्रत धारण केलें. नंतर आदिसागर नामक नग्नमुनींजवळ 'ऐल्लक दीक्षा' घेतली, आणि शके १८४१ त ज्येष्ठ शु. १३ स 'नग्नमुनिदीक्षा' त्यानें धारण केली व त्या वेळीं 'शांतिसागर' हें नांवही घेतलें. अशा रीतीनें आपल्या कुळाचें व नरजन्माचें सार्थ केलें. पुढें नग्नावस्थेंत जेव्हां तो भिक्षेस हिंडू लागला तेव्हा कांहीं ब्राह्मणांनीं आपल्या गल्लींतून जाण्यास त्यास मनाई केली. ती त्यानें निमूटपणें मानली, पण त्यांस जेव्हां त्याची खरी योग्यता समजली तेव्हां ते त्यास शरण गेले. पुढें तो तीर्थयात्रा करीत अनेक जैनस्थळीं गेला. पांच सहांशें वर्षांत इतका थोर मुनि कोणी झाला नाही. एकदा शांतिसागर समाधींत असता शके १८४५ श्रावण कृ. १४ स कोण्णूरच्या गुंफेंत भयंकर सर्पानें त्यांचें शरीर वेष्टिलें व कांहीं वेळानें त्यास कसली इजा न करितां तो निघून गेला हें पाहून लोकांस आश्चर्य वाटलें. अनेक लोकास त्यांनीं दीक्षा दिली. पुढें मोगलाईंत कुंथलगिरि तीर्थास ते गेले. तेव्हां त्यांनीं पुष्कळ धर्मप्रसार केला आणि मग ते घांसी-लाल शेटजींबरोबर संमेदाचलावर चतुर्विध संघ बरोबर घेऊन गेले, त्यामुळें त्याची सर्वत्र कीर्ति झाली. ते आता

'पुनश्च येवो मुनिपदयुग या झणिं दक्षिण देशीं !' ॥

बालसुता या शांति–मुनीचे गुण गा प्रतिदिवशीं'

इकडे येवोत अशी प्रार्थना करून कवीनें पोवाडा संपविला आहे. पोवा-ड्याची भाषा सुबोध व शुद्ध आहे. परकीय शब्दाचा उपयोग फार क्वचितच आढळतो हा पोवाडा चरित्रपर व गुणवर्णनपर असल्यामुळें त्यात कल्पनेच्या भराऱ्यांस व प्रतिभेच्या विलासास फारसा अवसर नाहीं हें खरें. पण वर्णन मोठें सरळ व धावतें झालें असून मधून मधून झळकणाऱ्या सुभाषितांनीं त्यास मोठी चतुरस्रता आली आहे अशीं कांहीं सुभाषितें पुढें दिलीं आहेत.

(१) मति बालांची कोमल तरुसम बालपणीं असते । या अवधींतचि सहज जशी वळवावी ती वळते (पा.२).

(२) क्षणभंगुर संसार सार नच त्यामाजीं कांहीं । मोहबळें परि प्राणी त्यां तचि गुरफटुनी जाई ॥ (पा.३)

(३) तृण नसे तिथें दावाग्नी पडला तो विझुनी जाई ।

जो क्षमावंत बहु शांत स्वयमेव शरण खळ जाई ॥ (पा.११).

(४) तेजहीन निर्धन कुणी निंदावें रीतच ही
शांतिसागर मुनिचा प्रेमें पोवाडा गाई (पा.४३)

(५) हिरा खरा घालितां ऐरणीं फुटणार न कधिही ! (१६पा.) ॥

हल्लीं चालू असलेलीं धार्मिक भांडणें व पुढाऱ्यांचा दांभिकपणा पुढील उताऱ्यांत चांगला प्रतिबिंबित झालेला दिसेल:—

मतभेदानें दुही माजली परस्परांमाजीं ।
भांडण करिती, परधर्मी जन बघुनी हसती जी ॥
जन बरे, न शिकलेले ते वागती एक तंत्रानें ।
परि बनले स्वेच्छाचारी असती जे पूर्ण शहाणे ॥
पुढारि जो तो बनला भरवी सभा बडी तींत ।
मोठे मोठे करिती बडबड पंडित; ती फुकट ।
ठराव करिती पास; दप्तरीं धूळ खात पडती ॥
धर्माची होईल अशानें कधि का सदुन्नति ?॥

# प्रकरण २५ वें.

## दुर्गादयाळ व होतकरू कवि.

### कवि दुर्गादयाळ ( स .१९०१ )

कवि दुर्गादयाळ चंडीप्रसाद दीक्षित यांचा जन्म सन १९०१ च्या आगष्ट महिन्याच्या १६ व्या तारखेला उस्मानाबाद जिल्ह्यातील परंडा गांवीं झाला. दीक्षितांचें घराणें मूळचें उत्तर हिंदुस्थानांतलें. तेथून कवीचे आजोबा दुर्गाप्रसाद हे स.१८५७ नतर प्रथम पुण्यात आले. त्याचे एक नातलग लक्ष्मणप्रसाद ह्यांच्या आग्रहावरून ते परंड्यास येऊन राहिले. कवीचे वडील चडीप्रसाद हे वकीली करीत असत. त्यांस सार्वजनिक कार्याची व विद्यार्थी वर्गास मदत करण्याची फार आवड असे. दुर्गादयाळाचें प्राथमिक शिक्षण संपल्यावर ते दुय्यम शिक्षगासाठीं पुण्यास गेले. लहानपणापासून ते फार अशक्त होते, परंतु पुढें त्यानीं उत्तम व्यायाम करून आपली शरीरप्रकृति चांगली सुधारली. ते व्यायाम मासिकात लेख लिहीत असत. काहीं आकस्मिक अडचणीमुळें म्याट्रिक न होतांच त्यास पुणें सोडावें लागलें. घरची स्थिति बरी असल्यामुळें ते आपला वेळ वाचन व लेखन ह्यात घालवूं लागले. परंतु पुढें त्याचें लक्ष प्रपंचातून उडालें व त्यानीं सुमारें १०|१२ वर्षें, अज्ञातवास व एकांतवास स्वीकारला. ह्या कालावधींत त्यानीं हिंदी मराठी काव्याचीं बाडेंच्या बाडें लिहिलीं. काहीं निबंध व सामाजिक कादंबऱ्याही त्यांनीं लिहिल्या. परंतु ते स्वभावतःच प्रसिद्धिप्रिय नसल्यामुळें ह्या लिखाणास प्रसिद्धि मिळाली नाहीं तरी पण त्याचे मित्र रा. गोपीनाथराव मोडक वकील ह्यांनीं कवि तिवारी ह्यांचे मध्यस्थीनें त्यांच्या कांहीं कविता 'काव्यरत्नावलींत' प्रसिद्ध करविल्या. अर्थात् त्या कवितांवर कवि तिवारी ह्यांचा अभिप्राय उत्तम पडला होता. इकडे दुर्गाप्रसाद याचे बंधु पं. नंदकिशोर ह्यांनीं जनतेच्या व सरकारच्या आदरास सारखीच पात्र झालेली अशी एक 'नवजवान संघ' ह्या नांवाची संस्था हिंदुमुसलमानांच्या ऐक्यसंवर्धनार्थ काढली. आणि कवि दीक्षित ह्यांच्या कवितांचा संग्रह 'चारुचयन' ह्या

अभिनव नामाभिधानानें ह्याच संस्थेच्या तर्फे शके १८६० च्या विजयादशमीस प्रसिद्ध केला गेला. ह्या संग्रहांत दुर्गादयाळाच्या कांहीं कविता प्रतिबंधामुळें छापतां आल्या नाहींत, म्हणून प्रकाशकानें खेद प्रदर्शित केला आहे.

दीक्षिताचें घराणें मूळपासून मोठें बाणेदार व स्वातंत्र्यप्रिय. हे आनुवंशिक गुण दुर्गाप्रसाद याच्यात प्रामुख्यानें दिसतात, व त्याचें ठळक प्रतिबिंब त्यांच्या काव्यांतही पडलेलें दिसतें. हा काव्यसंग्रह इकडील सर्व काव्याहून नामाभिधानानें जसा अपूर्व व भिन्न तसाच तो काव्यविषयदृष्ट्या ही अपूर्व व भिन्न आहे. ह्यात सुमारें ५५ कवितांचें चयन (संग्रह) ७५ पानात केलें आहे. विबुधप्रिया द्रुतविलंबित, शुद्धकामदा, पंचचामर, मंदारमाला, चारुचामर, तोटक, शा. विक्रीडित, वसंततिलका, अनुष्टुप्, आर्या, अभंग, जातिरसना, उद्धव, वगैरे विविध वृत्ताचा उपयोग ह्यात मोठ्या सफाईनें व निर्दोष रीतीनें केलेला आढळतो. सदोषसमास, अप्रयुक्तरूपें, अपसंधि वगैरे सामान्यें करून आढळणारे इकडील भाषादोष ह्यात फार क्वचित् आढळतात. ते वगळल्यास भाषा सर्वत्र शुद्ध, साधी पण जोरदार आहे. देशाच्या दुःस्थितीबद्दलची तळमळ व परदास्याची जळजळ स्पष्टपणें व्यक्त करण्याचें सामर्थ्य त्याच्या उत्कट भावनेंत व अचूक शब्दयोजनेंत आहे. देशप्रेम व देशस्वातंत्र्य इतक्या स्पष्टपणें खड्या सुरात गाणारा शाहीर, निदान इकडे तरी हा पहिलाच. आणि हेंच ह्यांचं मोठें वैशिष्ट्य होय. त्याचप्रमाणें । साधुनी क्षण हाणिती घण तप्त पाहुनि लोह ते ॥ टाव पत्ता ही न लागे कीं हरी हा अंतरीं रे ॥ घोटिते ही लाळ जिव्हा आग लागे अंतरा ग ! ॥ दहाचा पोर्शिंदा फिरे दारोदारीं ॥ चष्मा काळा नेत्रां असतां । दिसतें काळें जसें ॥ जर लाविता तेल सुवासिक केसातें स्त्रीनें । डोळ्यामध्यें तेल घालुनी तिला लगे जपणें ॥ दगड घेतला पायीं अपुल्या पाडुन त्वां मूर्खा । सूर्यावरतीं मूर्ख थुंकतो तोंड भरे त्याचें ॥ हांमें आणखी जगतीं होतें वच हे सूज्ञांचे ॥ ते 'मी मी' म्हणणार टार सगळे केलें तुझें मोहरें ॥ समरपटु असो वा वेदशास्त्रीं प्रवीण । अधन जर असे तो कोण देईल मान ! ॥ इ. इ. अशा प्रसंगोचित अनेक म्हणी, वाक्प्रचार व सुंदर सुभाषितें याची पेरणी इतस्ततः केलेली असल्यामुळें कवीचं भाषाप्रभुत्वही व्यक्त होत आहे, आणि

हें चिमुकलें चयन सुंदर कोंदणांतील सुंदर रत्नांप्रमाणें चमकत आहे. आतां आपण त्यातील विषयाकडे वळू.

ह्या ५५ कवितांपैकीं सुमारें १५ ईशस्तवनपर आहेत हा ह्या संतभूमीचा गुण. पण ह्यांतही कवीनें आपलें पृथक्त्व व वैशिष्ट्य राखलें आहे. कारण त्याच्या देवदेवतांत रणचंडिकेस प्रमुख स्थान आहे. आणि तिच्याजवळ वरयाचना कमची ? तर । जळतेम हृदयीं मम हिंदभू । व्यथित पीडित चिंतित जन्मभू । विजयधाम दयामय शंकरी । भरतभूमि विमोचन तूं करीं ॥ (द्रु. विल) ॥ अबालवृद्ध भारतीय त्रस्त त्रस्त जाहले । तयां स्वतंत्रता स्वराज्य–दान देई मगले । (पंचचामर). त्याचप्रमाणें ईशप्राप्तीच्या साधनांपैकीं गुरु, नामस्मरण, वगैरेसंबंधींचे विचार त्यानें सडेतोडपणानें मांडले आहेत. गुरुसंबंधीं तो देवाला विचारतो : 'वकील पाहिजे काय ?' ॥ 'गुरू कर' म्हणे बरें पण गुरू कसा शोधणें ? ॥ वकासम गुरु किती फिरती ते तया ना उणं ॥ तयांतून बरा असे गुरु असें कसें जाणणें ॥ वकील वद पाहिजे जरि विभो ।तुला भटणं ? ॥ 'माझें तुझें वाकडें' ह्या कवितेंत तो म्हणतो :—देवाचा दरबार तेथ नसते देवाण घेवाण ही ॥ झालेली समजूत पूर्ण चुकली आलं प्रचीतीसही ॥ ज्यातें निर्गुण निराकर म्हणती त्या भक्त तो आवडे ॥ निर्लेप सदया स्तवास्तवच ना माझें तुझें वाकडें ? ॥

५–६ कविता किरकोळ विषयावर आहेत. 'व्यजोक्तीं'तल्या गुंजेवरील आर्या त्यांतील उपरोधानें मोठ्या ठकसेबाज झाल्या आहेत. पहा:–'तूं कःपदार्थ असता तुलना कनकासवें जरी होते ॥ देईल काय कोणी मोल सुवर्णासमान वद तूतें ? ॥ आले विचार बरवे वाईट त्याचे लिखाण 'दिनचर्या' अशी व्याख्या देणारी 'दिनचर्या ॥ जीवनाची उषा आशा । शांतिसुधा प्रदायिनी ॥ असें सांगणारी 'आशा', त्याणि 'उद्यम', 'पाढा', 'संक्रमण' व 'गाय' ह्या कविता आपापल्यापरी वाचनीय झाल्या आहेत.

'गडकरी काय म्हणतात' हींत स्त्रियाच्या आधुनिक वेषभूषेवर कवीनें कडक टीका केली आहे तर 'क्रांतीं'त ॥ धर्मकर्माहुनी रूढि बलशालिनी ॥ जाइ गृह सोडुनी क्रांति बघती क्षणीं ॥ क्रांतीपुढें जुनाट रूढी आपोआप विलयास जातात असें प्रतिपादिलें आहे आणि 'मज्जाव कुणाला' ह्या कवितेंत अस्पृश्य हिंदूंनाच मंदिरप्रवेशाचा मज्जाव पण 'येशूच्या तनया ।

भय धरुं नको दुर्वाण लावूं नको ।। देवाच्या प्रतिमे समीप अगदीं जा बूट काढूं नको ।। असें म्हणणाऱ्या पंचाचा कडक उपहास केला आहे.

'सारें फोल', 'दे माय धरणी ठाय'; 'गारोड्यास' प्रेमाकरितां' 'खंडिता' व 'भास' वगैरे ६–७ कविता प्रेमावर आहेत कवितेला प्रेम व वनितेला कुंकुम, हीं त्यांच्या सौभाग्याचीं लेणीं. तेव्हां कवितेंत प्रेमास स्थान असलें पाहिजे. तसें तें येथेंही आहे. ।। वाटे अधरामृतपानाविण जगतीं सारें फोल मला । मजवरतीं तूं प्रेम करीं अन् शिकव मला ती प्रेमकला ।। असें प्रियकर पहिलींत म्हणतो तर ।। कानोसा मीं घेतला। मला वाटलें जिवलग आला । दार मोकळे केलें त्याला । पण हें काय ! पण तीहि विझोनी गेली । दे ग माय बालिकेस धरणी ठाय । असें विरहिणी दुसरींत म्हणत्ये. 'प्रेमाकरितां' ह्या कवितेंत खऱ्या प्रेमांत सत्कार असे त्यागाचा ।। सत्कार आत्मयज्ञाचा ।। असें प्रेमाचें उदात्त ध्येय वर्णिलेलें आहे. 'खडिता' व 'भास' ह्या दोहोंत विरहिणीच्या उत्कट प्रेमभावना फारच हळुवार हातानें रंगविलेल्या असल्यामुळे अत्यंत मधुर झाल्या आहेत. मात्र दिलेल्या वर्णनावरून कवितेला 'खंडितापेक्षां' 'विप्रलब्धा' हें नामाभिधान दिलें असतें तर तें अधिक शास्त्रोक्त झालें असतें.

असो. एकंदरींत ह्या पार्श्ववर्ती पुष्पानीं मध्यस्थित पुष्पांस वैचित्र्य व रम्यत्व देऊन सर्व पुष्पगुच्छ मोठा मनोहर बनविला आहे.

आता कवीच्या राष्ट्रीय कवितांकडे वळूं. ह्या अजमासें सव्वीस असून त्यात स्वातंत्र्यकल्पनाच केंद्रीभूत झालेली आहे. प्रथमतः ज्या एका महत्त्वाच्या गोष्टीचा खुलासा करणें अवश्य वाटतें, ती ही कीं, ह्या कवितांचा संबंध हैदराबाद संस्थानाशीं अथवा तेथें प्रस्तुत चाललेल्या सत्याग्रहाशीं अर्थाअर्थी-मुळींच नसून गांधींनीं स. १९३०–३१ मध्यें ब्रिटिश हद्दींत केलेल्या सत्याग्रहाशीं आहे. हें कवीनें आपल्या 'सुचिन्हें' ह्या कवितेवर जुलई १९३० असा कालनिर्देश करून व 'विनंति' ह्या कवितेंतील 'सुपूज्य गांधी अम्हांस सांगे । अहिंदु हिंदू समग्र जागा ।।' गांधींच्या ह्या स्पष्ट उल्लेखानें निःसंदिग्ध

१ 'पार्श्वमेति प्रियो यस्या अन्यसंभोगचिन्हितः' ह्या लक्षणापेक्षां 'प्रियः कृत्वापि
२ संकेतं यस्या नायाति संनिधिम्' हें लक्षण येथें अधिक जुळतें.

केलें आहे. त्याचप्रमाणें कवि स्वातंत्र्य मागत आहे तें भागानगरासाठीं नसून अखिल भारतासाठीं आहे. हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे. तसेंच ह्यांतील लढाईची भाषा ही खऱ्या लढाईची नसून सत्याग्रहाच्या लढाईची म्हणजे अहिंसात्मक व आत्मक्लेशात्मक आहे, हेंही विसरतां कामा नये. देशस्थिति व देशोद्धार ह्यांसंबंधींचे कवीचे विचार थोडक्यांत असे आहेत:— (वैचित्र्य) संपत्तीच्या विषम वांटणीमुळें ॥ वैभवशाली एक असे तर। दुजास खाया अन्न नसे॥१८॥ रोगजर्जर परम दुर्बल। दीनवाणी बापुडे॥ काय खावें ! काय प्यावें ? घोर चिंता त्यां पडे ॥ स्वत्व गेलें त्या सर्व गेले विभव विक्रम महा ॥ पूर्वजांनो संततीची दुर्दशा ही या पाहा ॥पा. ३०॥ लोकाची अशी केविलवाणी स्थिति झाली आहे. सरकारी अधिकारी स्वार्थांध होऊन गरीब प्रजेशीं बेगुमानपणें कसे वागतात ह्याचें हुबेहुब 'चित्र मला काय त्याचे' ह्या कवितेंत काढलेलें दिसतें.॥ असंख्यात आहेत देशांत दीन। कुणी अर्धपोटी कुणी वस्त्रहीन॥ असें असतां अधिकारी म्हणतो॥ मिळे दीड हज्जार माझा पगार। जगाच्या कृपेनें तयानाच 'चोर'। म्हणाया तुम्हा काय वाटे न लाज। बंधू द्या कसें प्राप्त होतें स्वराज्य॥ अशा स्थितींत 'कामनें'त कवि सांगतो:॥ जाहला परकी पदाहत देश भारतवर्ष हा। पूज्य पूर्वज धीरता गंभीरता आतां कुठें ?॥...... ॥ सर्व गेलें जाऊं दे तूं धीर हा सोडूं नको। मोह मद या षड्विकारें दीन तूं होऊं नको॥ स्वातंत्र्यफल हें सुधोपम चाखण्याची कामना॥ रे ! तरी तूं सोड आळस द्वेष मत्सर वासना॥ रणधीर वीर बाणा भीतो न तो कुणाला। सेना किती असेना घाला खुशाल घाला असें 'रणशिंग' फुकून॥ स्वदेशभक्ता सहाय्य व्हावें। समर्पुनीयां स्वकीय प्राणा॥ अशी 'विनंती' करतो. कवीच्या विनंतीस जनतेनें मान दिल्यामुळें पुढील 'सुचिन्हें' दिसू लागतात:— ॥ स्वार्थावरी लाथ देशार्थ मारी। कुणी शीर कापून घेतो हतीं॥ राष्ट्रीय झेंडा उभारी तयातें॥ कुणी रक्षण्या मार खाती अती॥ वस्त्रें विदेशी मुर्दे जाळताती॥ कुणी मोडती कायदा तापदा। खादीविना अन्य वस्त्रें न ध्यावीं। असा यत्न कोणी करी लाभदा॥... सत्याग्रहाची लढाई लढाया। हजारों स्वयंसेवके सेविका। जाती तयां दंडण्या दुष्ट धावे। फिरंगी न पाहे मुलें नायका॥ सत्याग्रही वीर उत्साहमूर्ति। असे

प्राण-सम्राट गांधी जरी । कारागृहीं थोर नेले पुढारी । निराशा न कोणास वाटे तरी ॥...स्वातंत्र्य सूर्योदयाचीं सुचिन्हें । दिसूं लागलीं हर्ष होतो मना ॥ इ. 'परतंत्रता', 'केवढे हें आश्चर्य', 'खरा मार्ग कोणता' 'झुंझारबाणा' वगैरे कवितांतून असेच विचार कवीनें प्रकट केले आहेत. 'पावसप्रतीक्षा' व 'पावस स्वागत' ह्या दोन कवितांत रूपकानें व 'अन्योक्ति' ह्या मेघान्योक्तीनें कवीनें अन्यायानें राज्य करणारांस अशी सूचना दिली आहे कीं अनंत कोटी ब्रह्मांडाचा नायक तो देव । बघुनी तर ही राज्यपद्धती दंडिल स्वयमेव । 'कांहीं तरी' ह्या कवितेंत पत्नी आपल्या पतीस सांगते:–वीरा धैर्य धरा प्रियेस विसरा कापा अरीच्या शिरा । स्वातंत्र्योत्सुक राष्ट्र वाट बघतें आतां करावी त्वरा ॥ सरतेशेवटीं 'वंदना' ह्या कवितेंत 'प्रतापवीर पूजिते । शिवाजिभूपवंदिते ॥ स्वनाम धन्य देवते । प्रणाम घे स्वतंत्रते । असें म्हणून कवीनें ह्या विषयाची रजा घेतली आहे.

एकंदरींत ह्या कवीनें ईशप्रार्थना, सामान्यविषय, सामाजिक व आर्थिक स्थिति, उच्च-सात्विक प्रेम आणि राष्ट्र स्वातंत्र्य इत्यादि विषयांवर आपले विचार उत्कट भावनांच्या द्वारा व्यक्त करून राष्ट्रकविमालिकेंत आपणांस उच्चस्थान प्राप्त करून घेतलें आहे. तेव्हां त्याचें हें 'वाङ्चयन' सर्वांस रम्य व अवघ्राणार्ह असेंच वाटेल. मात्र त्यानें लढाईतील–शब्दांची केलेली योजना अस्थानीं वाटते.

## मराठवाडा

मर्द मराठास्थान, माझा मराठवाडा जाण ॥ माझा मराठवाडा जाण ॥ श्रमहारिणी ही सीना, पूर्णा, गोदावरी महान । प्राणहिता अन प्रवरा गाती प्रेमें सद्यशगान । विठ्ठलमंदर, जानोजी ते विस्मृतस्वप्नसमान । तो हा मराठवाडा जाण॥समर्थ, शिवबा, प्रताप झाले; देइ देइ अवधान। माझा मराठवाडा जाण ॥ जपबल, तपबल, बाहू धनबल, पंचमबल विज्ञान । सर्वबलें बलवान होउनी करी देशकल्याण ॥ माझा मराठवाडा जाण ॥ मानधना ! तुज कसा साहवे पदोपदीं अवमान कशास मेल्यापरी जिणें हें करी आत्मबलिदान ॥ माझा मराठवाडा जाण ॥ "भार शिरावरि दूर किती तरि ध्येय निवासस्थान" ॥ कां करिशी श्रम वाटचालिचे ठावें जों न ठिकाण ॥ माझा मराठवाडा जाण.

**दि ना. पळशीकरांचा तिळगूळ.** (विजयाद. श. १८६० है. द.) हें एक लहानसें २६ चुटक्यांचें चोपडें आहे. 'तिळगूळानें' आरंभ होऊन त्याचा 'और लजतीनें' शेवट झाला आहे. तिळगुळाची और लज्जत पहाः— असला 'तिळगुळ' नको मला तो । परत करुनि तिज वोले । गालावरला 'तीळ' आणि दे । गुळासारखें 'चुंबन' झालें ।

शितावरून भाताची परीक्षा करतात. तशीच ह्या तिळावरून सगळ्या तिळगुळाची कल्पना वाचकांस करिता येईल. आणखी पाहिजे तर पुढील अभिप्राय पहाः—'चटोर व उच्छंखल कल्पना आणि गलथान रचना. काव्य नव्हे'. वि. वृत्त. १५।१।३९

## कृष्णंभट नरहर पुजारी.

वेदसंपन्न कृष्णंभट पुजारी हे रामभट गुरुभट पुजारी यांचे नातू. रामभटजींनीं शके १८४८ त 'श्री क्षेत्र गाणगापूरवर्णन' ह्या नावाचें एक पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. पण त्याची भाषा कानडी असल्यामुळें मराठी भाषेच्या दृष्टीनें त्यात बरेच दोष राहिले. त्यानंतर दुसरे एक पुजारी विठ्ठलशास्त्री यानीं एक 'गाणगापूर साक्षात्कार' या नांवाचें पुस्तक छापून काढलें. परंतु त्यांत पहिल्या पुस्तकापेक्षा कांहीं विशेष माहिती दिलेली नाहीं. वे. कृष्णभट हे गाणगापूर येथें एक "श्रीदत्त प्राथमिक शाळा" चालवीत असतात. त्यानीं आपल्या आजोबाचें पुस्तक सुधारून व त्यांत सर्व प्रकारची माहिती संकलित करून 'श्रीक्षेत्र गाणगापूर वर्णन' हें पुस्तक स. १९३० मध्यें छापून प्रकाशित केलें आहे. त्यात नित्यनैमित्तिक कार्यक्रमाचें क्रमशः सांगोपांग वर्णन केलें आहे. त्याचप्रमाणें तेथें चालू असलेल्या आरत्या, अष्टकें, पदें व भजनें इत्यदिकांची माहितीही यथास्थित दिली आहे. त्यामुळें यात्रेकरूंस हें पुस्तक अत्यंत उपयोगी झालें आहे. ह्यास पुण्याचे श्री. गंगाधरराव नारायणराव मुजुमदार, पहिल्या प्रतीचे सरदार ह्यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. त्यांत मठातील श्री दत्त, संगमावरील श्री दत्ताचें देऊळ, भीमा अमरजा संगम, श्रीमन्नरसिंहसरस्वती स्वामी महाराज श्रीगुरुदत्त महापूजा श्री क्षेत्र गाणगापूर, ह्यांची सुबक छायाचित्रें घातलीं असल्यामुळें क्षेत्राचा पूर्ण परिचय होण्यास मोठें साधन झालें आहे.

हें पुस्तक सुमारें १०।९२ पानांचें असून त्याचा पहिला भाग गद्याचा व दुसरा पद्यांचा आहे. पहिल्या विभागांत क्षेत्रास येण्याचा मार्ग, तेथें करण्या-सारख्या गोष्टी, क्षेत्र, मठ व संगम यांचीं वर्णनें, उत्सव वर्णनें, गुरुचरित्र, व महाराजांच्या शिष्यांची माहिती एवढ्या गोष्टी आल्या आहेत. हें क्षेत्र निजामच्या राज्यांत पायगा इलाख्यात आहे. याचा गुलबर्गा जिल्ह्यात समावेश होतो. श्रीपाद श्रीवल्लभ श्रीनृरसिंहसरस्वती शकें १३८० च्या सुमारास होऊन गेले. गाणगापूर क्षेत्राचा उल्लेख कोणत्याही पुराणांत नाहीं. मात्र श्रीगुरुचरित्र ग्रंथाच्या ४९ व्या अध्यायांत त्याचें वर्णन दिलेंलें आहे. श्रीपाद श्रीवल्लभ हा श्रीदत्तचा दुसरा अवतार मानतात. श्रीपाद श्रीवल्ल-भांच्या अशीर्वादानें माधवनामक ब्राह्मणाचे पोटीं हे जन्मले. पुढें त्यांनीं काशीस कृष्णसरस्वती यांपासून संन्यासदीक्षा घेतली. व गाणगापुरीं बहुत वर्षें राहून श्रीशैल येथें पाताळगंगेंत त्यांनीं जलसमाधि घेतली. हा काल वर दिल्याप्रमाणें शके१३८० हा होय. या क्षेत्रीं भिक्षेचें महत्त्व फार आहे. अनेक भक्त निरनिराळ्या हेतूस्तव मधुकरीवर निर्वाह करून सेवा करीत असतात. व अनेकाचे हेतु सफळ झाले असल्याचें पुस्तकांत नांवनिशी देऊन सांगितलें आहे. पुस्तकाची भाषा शुद्ध असून त्याची मांडणी मोठी व्यस्थित झाली आहे.

दुसऱ्या भागांत अनेक प्रसंगीं म्हणण्याच्या पुष्कळ आरत्या व पदें दिलीं आहेत. कांहीं आरत्यांचीं देवनागरी लिपींत कानडी भाषांतरेंही दिलीं आहेत. आरत्या व पदें फार गोड झालीं आहेत. भाविकांनीं तीं मुळांतूनच पहावीं. पुढें एक दिली आहे.

## उत्तरारती

ओवाळूं आरती सद्गुरुनाथा। माझ्या श्रीगुरुनाथा। सद्भावानंदें चरणीं ठेवीन माथा ॥ धृ.० ॥ सगुण ही आरती निर्गुणी ओवाळूं। कल्पनेचा धूप घालोनि दीप उजळूं ॥१॥ अव्यक्ताचा मूळपुरुष। ओवाळुनि सांडूं। आशा तृष्णा कल्पनेचा सांडुनि कुरवंडु ॥२॥ सद्गुरुचें पूजन केलें षोडशो-पचारें। रामानंद जीवनमुक्त झाला संसारीं ॥३॥

## होतकरू कवि.

ज्याचा काव्यव्यासंग आज कित्येक वर्षे चालू आहे व ज्यांची कविता इकडील व तिकडील मान्य अशा नियतकालिकांतून आज कित्येक वर्षें प्रसिद्ध होत आहे, परंतु केवळ द्रव्याभावीं पुस्तकरूपानें ज्यांस आपलें काव्य लोकांपुढें मांडता आलें नाहीं, अशा होतकरू व हौशी कवींची संख्या मराठवाड्यात विपुल आहे. त्यांत उत्तम मध्यम व कनिष्ठ असे सर्व प्रकार आहेत. त्यांपैकीं कांहींची संक्षिप्त माहिती ह्या प्रकरणात देण्याचें योजिलें आहे.

बापूजी रामचंद्र पेंठे (स. १८७४) हैद्राबादकर; हे वयोवृद्ध गृहस्थ हंगामी कवि असून ते मेळ्याचीं पदें, लग्नमुंजीचीं मंगळाष्टकें, अभिनंदनपर पद्यें वगैरे स्फुट कविता बरेच दिवस करीत असतात. त्यांनीं आपला काव्यसंग्रह जरी अजून संकलित करून छापला नसला तरी पुढील थोडेशा वानगी वरून त्यांच्या कवितेची लज्जत कळेल. ज्ञानप्रकाशात व इतर वर्तमानपत्रात विजातीय वधूवराचे फोटो देऊन त्यांचें नेहमीं अभिनंदन करण्यांत येतें, अशा अभिनंदनीय विवाहसमयीं उपयोगीं पडणारीं मंगलाष्टकें त्यांनीं केली आहेत. त्यातील मासला:– ॥ शूद्राची नवरी परंतु वर हा तूं शुद्ध चित् पावन ॥ जोडा गार हिऱ्या समान तुमचा ठेवावया नाम न ॥ तूतें हो प्रिय ताकभात वधुला मानेल मांसाशन ॥ झालें हें अभिनंदनीय जगिं या कुर्यात् सदा मंगलम् ॥१॥ धोब्याची मुलगी सुशिक्षित जगीं तूं हा कऱ्हाडा वर ॥ जोडा सुंदर हा असा न गवसे या भूप्रदेशावर ॥ आतां स्वच्छ तुझे सदैव कपडे ठेवील कार्भारिण ॥ वाशिंग कंपनिचा न खर्च तुजला कुर्यात् सदा मंगलम् ॥२॥ ब्रम्ह क्षत्रि वरी सुविप्र तनया चांभार कुंभार ही ॥ व्याही होति सुतार तेलि अमुच्या देशीं न राहे वुही ॥ आलें हें उदया खरोखर तुझें सद्भाग्य भूदेवते ॥ आतां सद्विज कन्यका हरिजनीं देतील तें मंगलम् ॥३॥

श्रीसंत कवि विनायक बोवा टोपरे (वेरूळकर) यांचा जन्म शके सन १८८३ मध्यें वेरूळ गांवीं झाला. यांचे वडील रामचंद्रराव टोपरे हे उज्जयिनींत वकिली करीत असत. त्यामुळें त्यांचें प्राथमिक शिक्षण तिकडेच झालें. लहानपणीं त्यांची वृत्ति फार खोडकर होती पुढें इंग्रजी शिक्षण ३

इयत्तांपर्यंत औरंगाबाद येथें झाल्यावर त्यांनीं शाळा सोडली. हे मल्हार स्वामी यांच्या वंशांतील ७ वे पुरुष होत. वयाच्या १५ व्या वर्षापासूनच यांस काव्यस्फूर्ति झाली. हे वैराग्यशील, ब्रम्हचारी व शीघ्रकवि आहेत. शिल्पकलेंत हे मोठे कुशल असून शंखजिऱ्याच्या सुंदर मूर्ति झटपट करून दाखवितात. ह्यांचा काव्यसंभार फार मोठा आहे, परंतु तो बहुतेक अप्रकाशित आहे भक्ति व समाज हे त्याचे आवडते विषय होत. कांहीं पद्यें पूर्वी संदेश मधून येत असत. त्यांचीं मतें सनातनी असून सुधारकांवर त्यात जळजळीत टीका केलेली आहे. याचे ग्रंथः– (१) वृत्त कुसुमावली. शेवटीं प्रत्येक वृत्ताचें नाव यांत गुंफलें आहे. (२) अध्यात्मक परिभाषा–श्लोकबद्ध (३) स्वैर कविप्रबोधिनी ८०।८१ आर्यांत ह्यात आधुनिक कवींवर टीका केली आहे.(४)शंकराचार्यकृत वेदात केसरीवर समश्लोकी शिखरिणी वृत्तांत केली आहे. (५) ब्रह्मसरोवर अथवा वेरूळ महात्म्य ३० अध्यायाचा ओवीबद्ध ग्रंथ (६) समाज कलंक. (७) स्तोत्रे, पद्यें संस्कृत, हिंदी, मराठी इ.

ह्याची काव्यनिर्मिति अझून अखंड चालू असून ते आपल्या सदाचरणानें व परोपकारवृत्तीनें सर्वांस वंद्य व प्रिय झाले आहेत. अशा थोर विभूति विरळा !

ह्याची कविता सामान्यतः मोरोपंती थाटाची,सालंकारा,सुवर्णा, ओघवती अशी असते. कांहीं अरुणोदयमाला श. १८४६।४७ च्या अंकात प्रसिद्ध झाली आहे.श्रीघृष्णेश्वर अष्टकम् छापलें आहे.आकारहीनोऽपि निजप्रियाय। भक्ताय साक्षात् ननु धारकोसि। घृष्णेश साक्षी जगता त्वमेकः। संरक्षको लक्षनिवायकस्य. रामदासीः– २१ श्लोकाचें छापील प्रकरण आहे. ह्यांत खरा रामदासी कोण ह्याचें स्पष्टीकरण केलें आहे. स्वांगे झिजे परहितास्तव जो अडेना। कर्ता परंतु कवणासही सापडेना। भूमंडलीं सकल मानिति लोक ज्यासी। तो शोभला परम निर्मळ रामदासी ॥८॥

(३) शंकाराचार्यकृत वेदांतकेसरी–समश्लोकीचा नमुना.

संस्कृत –– प्राकृत

तिष्ठन् गेहे गृहेशोऽप्यतिथिरिव निजं धाम गतुं चिकीर्षुः ॥
(जाऊं पाहे स्वगावीं अतिथि उतरला गर्व ना लोभ ज्यासी)
गेहस्थं दुःख सौख्यं न भजति सहसा निर्ममत्वाभिमानः ॥

(राहे तैसा गृहस्थ स्वसदनिं सुख वा दुःख भोगीं उदास)
आयात्रा यास्यतींद जलदपटलवत् धातृयास्यत्यवश्यं (?)
(अभ्रें येणार येती अपरिमित नभीं लोपती कीं स्वभावें)
देहाद्यं सर्वमेव प्रविशति विषयो यश्च तिष्ठत्ययत्नः ॥
(तैसा देहादि सर्वा समजुनि विपयीं धन्य निर्यत्न राहे)

(४) घृष्णेश्वर स्तोत्रः–निरोष्ठः–
सदासंगासक्त त्रिजगजटरीं चिंतिल कसा ॥
जगन्नाथा जाळी सतत सकलाशा अनलमा ॥
सदा ध्याती गाती हरि हर धनेशादिक असें ॥
न देशी घृष्णेशा ! सदयहृदया दर्शन कसें ? ॥

(५) वृत्तकुसुमावलीः– उदेली मनोर्मी बळें आवरावी ।
क्षमाशांति दृष्टप्रसंगीं वरावी ॥
घडे कर्म एसें दुजा मानवा न ।
भुजगप्रयाता धरी धैर्यवान ॥

(६) स्फुट आर्याः–हरिनामामृतवल्ली सस्रुति गदहारिणीच मानवती ॥
मानवती सकालासी अनुपानें परि न घेचि मानव ती ॥
सुरसरिताधिक पावन साधूची दे विराम रसना ही ।
सुरस रिता धिक् तीचा अन्य रसा सेवि रामरस नाहीं ॥

(७) कवि हृद्गतः–अक्षर तरु सालंकृत काव्यारामींच जो शुक विहरतो।
राधाकृष्ण न वदनीं काय अशा वायसा सुकवि हरतो ॥
हरिहरभजनीं विन्मुख कविवर्या कोण पंडिता वानी ।
पूजिन सतत संतचि नालकृत जरिहि खंडिता वाणी ॥
सरिता तरण्यासाठीं संचित्रित पाथिका नको नवका ।
पाहिल सारग्राहक काव्यालंकार साधु मानव का ॥ ३

(८) करुणाषट्पदीः—
विभो ! त्वत् सखेदास खेदाश्रयासी । न ते राहती वाहती संशयासी ।
कधीं स्वर्तरू वाळला काय नाकीं । महाधेनुचा बाळ आबाळला कीं॥१
परिमला दिसतसे विपरीतसे जल रुसे जलजापउरी तसे ॥
न तरि दास उदास तुझा कसा । भुलुनिया भ्रमता भुवि चाकसा ॥२

(९) देवाशीं प्रेमकलह:—
हे ! जगदीशा वरीं तुज शबरीचीं दशनभंगितें हि फळें ॥
विदुरगृहिं वळला तूं बळ लागे मजकडे बघायाला ॥
हरी तव धन्य पराक्रम ! मारिसि बा ! घाव अधिंच घायाळा ॥

———

राघवेंद्रराव बापूराव लातूरकर (स. १८९२) हे हैद्राबाद येथें वकिली करीत असतात. पद्यापेक्षा गद्याकडेच ह्यांचा ओढा विशेष असल्यामुळें त्यांची चरित्रविषयक माहिती गद्य विभागात देण्याचें योजिलें आहे. सन १९२१ पासून गणेशोत्सवाचें काम ह्यांनीं सुमारें १२ वर्षे पर्यंत मोठ्या कळकळीनें केलें. त्या कालांत त्यांनीं मेळ्याकरितां पदें पोवाडे व पद्यमय संवाद रचले. ह्यांची संख्या २००।२५० पर्यंत भरेल. त्याचा 'भगवा झेंडा' हा पोवाडा फारच जोरदार झाला असून त्यातील ॥ महाराष्ट्र नव्हे हिंदूंचा । अथवा तो महमदीयांचा । तो असे सर्व धर्मांचा । जो भजेल त्यातें त्याचा ॥ ह्या ओळी चिरस्मरणीय झाल्या आहेत. राधाकांत ह्या टोपणनांवानें मासिकांतून त्याच्या कविता येतात.

———

श्रीधर कृष्ण देव. ह्यांचा जन्म स. १९०० मध्यें औरंगाबाद येथें झाला. हे म्याट्रिक परीक्षेत पहिले आले होते. बी. ए. होऊन ह्यांनीं शिक्षकाची नोकरी धरली व सध्या उस्मानाबाद हायस्कूलमध्यें शिक्षकाचें काम करीत असतात. ह्यांस काव्यस्फूर्ति महाजनांपासून मिळाली; व त्यांच्याप्रमाणें उत्तम कीर्तनही ते करितात. मुंबई गोग्रास मासिकांत गोमातेविषयीं त्यांच्या कविता येतात. औरंगाबाद येथील अरुणोदय मालेंत 'लतिकेस' 'मेघास' वगैरे प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या कविता बऱ्यापैकीं आहेत. विहंगमाला नांदेड ह्यांत स्वर्ग, चंद्रास व राजहंसांत 'गरीब गुराखी' आणि अख्यानरतमालेंत 'जरासंध आख्यान' या त्यांच्या कविता प्रकाशित झाल्या आहेत. त्यांचें 'देवकन्या' नांवाचें एक लघुकाव्यही लिहून तयार आहे. पण छापण्यास पैसा नसल्यामुळें तें तसेंच पडून राहिलें आहे. सामान्यतः यांची कविता शुद्ध व सोपी असून ती व्यवहारिक दृष्टांतांनीं आकर्षक वाटते.

———

व्ही. जी कर्वे, बी. ए. वय अदमासें ३९. हे औरंगाबाद येथील हायस्कुलांत शिक्षक आहेत. हे गद्यपद्यलेखक आहेत. "कृष्णदास" ह्या टोपणनांवाखालीं ते लिहित असतात. १ सरिता २ राधाविलास ३ कंसवध (कृष्णजन्म) अशीं तीन अप्रकाशित खंडकाव्यें त्यांचीं आहेत. स्फुट पदें कविता वगैरेही बरीच कविता त्यांनीं लिहिली आहे. परमार्थाची आवड व संसाराविषयीं अलिप्तता ह्या त्याच्या वृत्तीची छाप कवितेवर पडलेली दिसते.

---

राजेश्वर यादवराव मुळावेकर. (स. १९०५). (यादवसुत ) ता.व जि. नांदेड मधील हदगाव याठिकाणीं याचा जन्म वैशाख कृ. ६ षष्ठी शके १८२७ रोजीं झाला. म्याट्रिक पर्यंत शिक्षण झाल्यावर त्यांनीं शाळा-मास्तर ह्या नात्यानें नोकरी केली. नव्याजुन्या कवींचें उत्कृष्ट अध्ययन यांनीं केलें आहे. त्यांस वयाच्या १६ व्या वर्षापासून कविता करण्याचा नाद लागला. श्री देवीदासराव महजनाचे मार्गदर्शकत्वाखालीं त्यानीं काव्य-लेखनाचा बराच अभ्यास केला. 'मदीय कवितारसा कुशल जो गुरू लाधला' असा त्याचा त्यानीं उल्लेख केला आहे. त्यांची कविता जुन्या वळणाची असून विषय ऐतिहासिक आहेत. उ. शनवारवाडा, पर्वती, भगवाझेंडा, इ. त्यांची "शनवारवाडा" ही कविता फार लोकप्रिय असून उत्कृष्ट गणली जाते. सन. १९२१ चे संमेलनाध्यक्ष श्री. कृ. कोल्हटकर यांनीं त्यांस 'बाल कवि' अशी पदवी दिली होती. कीर्तन मासिक, धर्मजा-गृति, काव्यरत्नावली, ज्ञानप्रकाश गोग्रास, मंदारमाला विहंगमाला, महाराष्ट्र-शारदा, काव्यकौमुदी, कविसंमेलन, ह्यातून त्यांच्या बऱ्याच कविता प्रकाशित झाल्या आहेत. ह्या कवीस सांप्रत शारीरिक स्वस्थ्य नसल्यामुळें त्याचें मन अध्यात्मांत रंगलें आहे. एक प्रतिभावान होतकरू कवि म्हणून ह्यांस इकडील कविवृंदात मान्यता आहे.

---

गंगाधर विद्याधर भिडे. (स.१९०६) बी. ए. यांनीं 'वागीश्वरी विलाप' या नांवाचें ४६ अभंगात्मक एक उपरोधिक काव्य हैद्राबाद येथें भरलेल्या निझामप्रांतीय मराठी साहित्य संमेलनास अनुलक्षून प्रसिद्ध केलें आहे. मूळच्या लक्ष्मीदासांनीं "अपुलाची भाव। वाढावा ही हाव ॥ म्हणोनी

हा डाव ॥ रचिला त्यांनीं" सरस्वतीभक्तीचें दंभ माजविलें आहे असा त्यांत कार्यकारी मंडळाचा उपहास केला आहे. तो चुरचुरीत आहे. पण त्यांत कला नाहीं व काव्य तर नाहींच नाहीं.

---

**बापूराव गणपत हरसूलकर** (स. १९०७) ह्यांचें शिक्षण औरंगाबाद येथें इंटर पर्यंत झालें. नंतर आजारामुळें पुढील शिक्षण थांबलें. ह्यानीं शिक्षण खात्यांत नोकरी धरली आहे. कवि नादापूरकर ह्याच्या मार्गदर्शकत्वाखालीं ह्यानीं कविता लिहिण्याचा अभ्यास केला. प्रकाशनाचें साधन नसल्यामुळें ह्यांची बरीच कविता अप्रकाशित राहिली आहे. हे एक जोरदार शाहीर असून ते पोवाड्यांत वीररसाचा उठाव फार बहारीचा करितात. राजहंसातली 'अंगाई' कविता बऱ्यापैकीं आहे. अरुणोदय माला, विहंगमाला, काव्यरत्नावली, वगैरेंतून ह्याची पुष्कळ कविता प्रसिद्ध झाली आहे.

---

**म. ना. पोळ** (स.१९०७) ह्यांचा जन्म खानदेशामध्यें झाला. शिक्षण पुण्यास झालें. नोकरी हैद्राबाद येथें करीत असतात. ज्ञानप्रकाश, यशवंत किर्लोस्कर, राजहंस, पारिजात, वगैरेंत ह्यांच्या कविता प्रसिद्ध होत असतात. हे एक हौशी कवि आहेत.

---

**वासुदेव लक्ष्मण टेंभुर्णीकर** हे जाफराबाद जहागिरींतील राहणारे. ह्यांचे वय सुमारें ३० आहे. हे मूळचे भिक्षुक असून हल्लीं कस्टम खात्यांत नोकरी करीत असतात. ह्यांस विनायकबोवा टोपरे ह्यापासून स्फूर्ति मिळाली. ह्यांची सर्व कविता भक्तिपर आहे. ह्याचा "काव्यगुच्छ" प्रसिद्ध झाला आहे. असें म्हणतात परंतु तो उपलब्ध झाला नाहीं.

---

**भ. रा. कुळकर्णी** ऊर्फ 'फुलारी'. ह्यांचा जन्म पौष शु. ६ स शके १८३५ म्हणजे स. १९१३ मध्यें झाला. शिक्षण हा. लि. स. परीक्षेपर्यंत झालें असून ते हल्लीं परभणी येथें पी. डब्ल्यू. डी. ऑफीसात नोकरी करीत असतात. राजहंस, विहंगमाला, विहंग ह्यांतून त्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. 'लागेल डोळा कसा' 'पांखरा,' व 'ध्यास' इ. कविता चांगल्यापैकीं आहेत. हे चांगले प्रतिभावान होतकरू कवि आहेत.

---

## लक्ष्मीकांत घनश्याम आडे (स. १९१५ जन्म.)

ह्या होतकरू बालकवीचा जन्म नांदेड शहरीं शके १८३७ त झाला. लहानपणीं रामायण, महाभारत व भागवत इत्यादि पुराणग्रंथांतील सुरस व अद्भुतरम्य गोष्टी ऐकण्याचा त्याला फार नाद असे. ह्या ग्रंथाच्या नित्य श्रवणपठनानें त्यास लहानपणींच कविता करण्याची स्फूर्ति झाली. व आपल्या वयाच्या १२।१३ व्या वर्षापासूनच तो ईशस्तवनपर, अभंग व कविता करूं लागला. हल्लीं हे हैद्राबाद येथें ऊस्मानिया कॉलेजांत इंटरमीजिएट वर्गांत शिकत असून तेथील 'मराठी मंडळाचे' एक आवडते कवि आहेत. मंडळाच्या कोणत्याही छोट्यामोठ्या समारंभाचा आरंभ आडे यांच्या काव्यगायनानेंच होत असतो. पण ते स्वतः फारच भिडस्त असल्यामुळें त्या दुसऱ्याकडून गाइल्या जातात. त्यांच्या कविता वेळोवेळीं अनेक मासिकांतून प्रसिद्ध होत असतात. त्यांच्या चिमुकल्या काव्यसंग्रहाचें प्रकाशन झाल्यास त्यांस भागानगरींतील चांगल्या कवींत स्थान मिळण्याचें भाग्य खास लाभेल असें वाटतें. त्यांच्या प्रकाशित अप्रकाशित कवितांपैकीं काहींचें दिग्दर्शन पुढें केलें आहे:—बडोदे येथील व्यायामंदिराच्या आक्टोबर १९३३ च्या अंकांत 'व्यायाम हेंच सर्व साधन' ह्या मथळ्याखालीं एक कविता आली आहे. 'शरीरमाद्यं खलु धर्म (सर्व) साधनम्' ह्या सुप्रसिद्ध वचनाचें हें उत्कृष्ट असें रूपांतर म्हणावयास हरकत नाहीं. निर्व्यसनी होऊन शरीर दृढ केलें असतां सर्व पुरुषार्थ साधतां येतात हे अगदीं साध्या भाषेंत सांगितलें आहे. आणि शेवटीं ॥ स्वातंत्र्याच्या शिखरि पोंचण्या इच्छा जर तुमची ॥ व्यायामाची कास बंधुनो धरा तुम्ही साची ॥ असा उपदेश केला आहे तो ठीकच आहे. पण ह्या कवितेस 'चंद्रकांत राजाची' चाल तितकशी खुलत नाहीं. खानापूर येथील लोकमित्राच्या डिसेंबरच्या (१९३३) अंकांत "विठ्ठलभाई पटेल यांच्या समाधीवर फुलें" म्हणून एक कविता प्रसिद्ध झाली आहे. कवीनेंच तिचा शेवट 'घेऊनी करिं ही त्रयोदश फुलें निर्गंधि वा साजरीं । तूझ्या वाहतसे समाधिवरतीं स्वीकार यांचा करीं ॥ असा केला असल्यामुळें त्या फुलांचें रूपगंधसौंदर्य परीक्षण्याचें कारण नाहीं. सन १९३४ च्या राजहंसाच्या (हैद्राबाद द.) जोड अंकांतील 'राजहंसास' ही कविता केशवसुताची आठवण करून

देते. तिचा आरंभ असा आहे:-नव्या मनूंतिल नव्या दमाच्या शूरसख्या राजसा। ऊठ रे निजसी अजुनी कसा ह्यातील पहिला चरण जरी राजहंसासंबंधीं कोणास सार्थ वाटला तरी दुसऱ्या चरणातील सत्योक्तीबद्दल व तींतील योग्य उपदेशाबद्दल कवीची कोणीही तारीफच करील. 'पावसाळ्याच्या आरंभीं' ही कविता आनदाच्या आगष्ट १९३४ अंकात प्रसिद्ध झाली असून तिला बक्षीस मिळालें होतें. ह्या कवितेंत शब्दसौंदर्याबरोबर नाद-माधुर्यही चागलें साधलें असल्यामुळें निसर्गाचें शब्दचित्र नितांतरमणीय झालें आहे. 'हें असें कां' व 'आम्ही कोण' ह्या दोन कवितास नादेडे येथील चढाओढींत पहिलें बक्षिस मिळालें आहे. पहिलीत गगनविहार करण्याऱ्या चंडोलाशीं समरस होऊन त्याच्या आनदाचा व स्वातंत्र्याचा आस्वाद कवि घेतो न घेतो तोंच कवीवर शारीरिक व मानसिक दुःखाचा अचानक घाला पडतो व तो त्यास विचारतो 'हें असें का?' बरें व्हावें वद पाखरा !॥ का तुलाच गवसे स्वातंत्र्यामृत झरा ॥ का दुर्दैवी मज इशें निर्मिलें पुरा ॥ तूं मी दोघे एका प्रभूचीं आवडतीं लेकरें ॥ मग का ऐसें अंतर बरें ?॥ ह्याला उत्तर काय देणार? एकाच शब्दात 'नियतिः' (केन लभ्यते?) दुसरी केशवसुताच्या तन्नामक प्रसिद्ध कवितेचें विडंबन आहे. 'तोतरा' जिकडे-जिकडे तोंड उघडतो तेथें तेथें तो बिचारा हास्यास्पद होतो म्हणून शेवटीं तो प्रार्थितो कीं:—

आम्हाला वगळा—सदैव प्रभुचे आभार मी मानिन ॥

आम्हाला वगळा—जगास नच मी ढुंकुनही पाहिन ॥ आणि हें अगदीं खरेंच नाही का? 'वरयाचना' उदासीन, हृदयाचें रक्त, जशास तसें, बालका, माते, नूतन आशा, गूढ भास वगैरे अनेक कविता फार चागल्या झाल्या आहेत. परंतु त्यास सूर्यदर्शन होईल तेव्हा खरें. शेवटल्या 'मीलन' या कवितेंतील थोडासा उतारा देऊन ह्या बालकवीची रजा घेऊं.

## मीलन (साकी)

किती रम्यता किती दिव्यता किती मधुर हें दृश्य ॥
युवा धरी हनुवटी लाजली रमणी बोले "इश्य" ॥ १ ॥
"काय गडे हें ऐसें ! आपण कोठें याचें कांहीं ।
भान कसें प्रियकरा मुळींही तुम्हास रहात नाहीं ॥ २ ॥

पहाल वळुनि जरा मभोंर्ती तरि येईल दिसून ॥
थट्टेनें हासती मर्वही आपणास पाहून ॥३॥
गुलाब फुलले गालीं मिश्रण मधुर त्यात रोषाचें ॥
भाव उमटले हृदि रागाचे तसेच अनुरागाचे ॥४॥
नजर लाजरी वळली वरती पुन: अधोमुख झाली ॥
पदर सरसावुनी निघाली सत्वर जाण्या खालीं ॥५॥
तोंच वल्लभ मृदुल कुसुमसा रमणीहस्त धरून ॥
पुन्हा एकदा दिले कपोलीं गुलाब ते फुलवून ॥६॥
*प्रेमरज्जुनें हृतपुष्पांना असें गुंफिलें जेथें ॥
काय असे भय उगीच तेथें लौकिक व्यवहाराचें ॥७॥

---

**श्रीधर रा. कुळकर्णी** (वय २२):— हे औरंगाबाद येथील इंटरमीजिएट कॉलेजातून इंटरची परीक्षा उत्तीर्ण होऊन उस्मानिया कॉलेजात बी. ए. च्या वर्गात दाखल झाले (स. १९३५–३६). त्या परीक्षेत मराठीची शिष्यवृत्ति त्यास मिळाली होती. बी. ए. च्या वर्गात असताना ते आपल्या कुशाग्र बुद्धीनें, तत्परतेनें व विनयशीलतेनें सर्व प्राध्यापकांचे आवडते झाले. मराठी मंडळाच्या वादविवादात, हस्तलिखित मासिकात, व संमेलन नाटकात त्यांनी प्रमुख भाग घेऊन आपले अंगचा अष्टपैलूपणा सर्वांच्या प्रत्ययास आणला. निबंधलेखनाच्या चढाओढीत त्यांनी प्रोव्हाईस चान्सेलरचें बक्षिस मिळविले व (स. १९३७–३८) बी. ए. मध्यें सर्व मुलात ते पहिले आले; आणि त्यांनी कानडी तेलगू व संस्कृत हे विषय घेणाऱ्या सर्व मुलात उच्चांक मिळविल्यामुळें त्यास एम्. ए. च्या अध्ययनाकरिता शिष्यवृत्तिही मिळाली. ते सध्या नागपूर येथें मराठी विषय घेऊन एम. ए. चा अभ्यास करीत आहेत. हस्तलिखित मासिकात ते कविता व लेख लिहीत असत. त्यांनीं जानपद भाषेचा अभ्यास मोठ्या मार्मिकतेनें केला आहे. त्यांनीं 'शहर'' 'सुख' 'सुशिक्षित' आणि 'डफ' यांसारखीं बरींच जानपदगीतें रचलीं आहेत. त्यापैकीं 'शहर,' हें गीत नमुन्यासाठीं पुढें दिलें आहे:—

---

* प्रेमरज्जुनें जिथें जाहलें गुंफन हृत्पुष्पांचे [सुचवलेला पाठ] ॥ अत्र सहृदया: प्रमाणम् ॥

## शहर (चाल लावणीची)

१. ऐक चातुरा तुला सागतों शहराची मौज
जन्मा यावं शहार बघावं होतंय् रे चीज
किती किती रे सांगू तुजला गमतीची मौज ॥ ऐक०
२. अंग्रेजानं रेळ काढली गावाला जावं
उलिशा पैक्यामदी समदी दुनिया देखावं
पैका देऊन जीजी जीचं पडतय् रे काज ॥ ऐक०
३. पैका द्यावा तिखट घ्याव नगरीचं अपुल्या
गर्दीमंदी घुसून पुडती जावं दाराला
खेकसतो बुवा पडला नाहीं मना उमज ॥ऐक०
४. इकडून तिकडून तिखट घेनल गाडी तो आली
उभी राहती खिणभर मनुनी घाई हो झाली
ज्या ज्या डब्यानजीक जाव फडफडतो ग्वाल्हीं ॥ ऐक०
५. जागा असली मधी बसाव नसना पायावरी
तोंड असोनि कुनी कुनाला बोलेना हो परी
म्हार बामण दडपुन बसतेन मग शेजारी ॥ ऐक०
६. भाट टोकिती बाता अपुल्या दिम्माखाच्या जरी
भले एकिती बुरे एकती कागुद वाचवी कुनी
त्याह्यला वाटनं लेहणार आपण पाहतेत मशीवानी ॥ ऐक०
७. ठेसन आल नागू मंगं घराम मी गेलो
मोठ्या मोठ्या माड्या नमुनी थक्कच लई झालो
कशास पुसतो सख्या चातुरा बावरून गेलो ॥ऐ०
८. डबड्यावानी मोठ्ठं दिसतंय मनूतेत मोटार
आगीन गाडी परता याचा दिसतोय लइ जोर
पॉं पॉं करीत वाऱ्यावानी पळतय् खचीर ॥ ऐक०
९. लुळे पांगळे पैकेवाले केले रे ईनं
जोरच नाहीं खुटानभर पार्थि चालल मनून
वाटंवरती टक्कर खाऊन जातोय जीवान ॥ ऐक०
१०. मंतेत सायकल दोपायाची गाडी रे गाडी

गोरगरीब घेऊन फिरती मारीत रे उडी
शिरा ठेसिती करिती हाडं समदी खुळखुळीं ॥ ऐक०
११. एम् फॅम् बोलतेत तोंडानं अन् चालत जातेन
हळू हळू जगूं मुळीव घ्यावलेन तसेच येतेत
वारक्या काठ्या घेउन लक्ष्म्या संग जातेन ॥ ऐक०
१२. अडमुठ भेटला कुणी टफलल हलकट मतेत.
दगा केला कुनी तरी कोरटात जातेन.
बदला घ्यायला एकाच्या पर जोर न अंगांन ॥ ऐक०
१३. भारींच धट रे बायका ममद्या खुमाम कां नाही
हात धरीती दुसऱ्याचा अन् नवरा किं रे पाही
अपल्यामारख्या येवाली वा काबिल असली बाई ॥ ऐक०
१४. लिवले सारे करून बसले मानुसकी नाहीं
दोपारीचा पाव्हना गेला भाकर मनेन नाहीं
तोऱ्यामंदी अवघा इथला मानुस रे गही ॥ ऐक०
१५. शहार चांगल मंतेत लोकं लईच वाईट
दावतेन समदे आपली आपलीच आळणी आईट
गडो बायका समजन नाहिन पाहिल्या विन नीट ॥

—०—

भालचंद्र शंकर जोशी (कहाळेकर) हे मोठे बुद्धिमान व तडफदार विद्यार्थी वरील कुळकर्णींप्रमाणेंच स. १९३५-३६ सालीं उस्मानिया कालेजात बी.ए. चे वर्गांत दाखल झाले. मोठे आस्थेवाईक व कर्तृत्ववान विद्यार्थी म्हणून त्यांची लौकरच प्रसिद्धि झाली. वर्गांत शंका विचारण्यात त्याची जशी निर्भयता तशीच मार्मिकताही दिसून येत असे. मराठी मंडळाचे चिटणीस ह्या नात्यानें त्यांनीं फारच उत्कृष्ट कामगिरी केली. स. १९३७ मध्ये सुप्रसिद्ध लघुकथालेखक ॲ. खडेराव दौंडकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं त्याच्या प्रयत्नानें यशस्वी झालेलें मराठी मंडळाचें अपूर्व संमेलन, उस्मानिया विद्यापीठाच्या इतिहासात चिरस्मरणीय होऊन राहील. हे जसे कार्यकुशल आहेत तसेच विनोदी लेखक व कविही आहेत. त्यांचे लेख व कविता मंडळाच्या हस्तलिखित मासिकांत येत असत. ते

बी. ए. त दुसऱ्या वर्गात उत्तीर्ण होऊन हल्लीं एल.एल्.बी. चा अभ्यास करीत असतात. पुढें त्यांच्या दोन विडंबनात्मक कविता दिल्या आहेत.

## केवढें हें औदार्य (!)

(खि. लो. वा. रेव्हरंड ना. वा. टिळक यास "कवि तुम्ही, भिकारी मी हो तुमच्या दारीं।")

क्षणोक्षणिं थबे, उठे परि वळे, पथा आक्रमी ।
चुके पथहि, झापडी भ्निमितदृष्टिला येउनी ॥
किती घळघळा गळे सतत नीर नेत्रातुनी ।
तसाच परि तो घरा परत ये कचेरींतुनी ॥१
म्हणे निज शिशुप्रती "अधिक बोलवेना मला ।
तुम्हास अजि अंतकासम निरोप मी आणिला ।
करा मन कठोर नी श्रवण तो तुम्ही एकदा ॥
करो जनन या पुढें प्रभु—पिता तुम्हाला सदा ॥२
अहा! कितिक लेख मी लिहुनि तुष्ट केले जना ।
कृतघ्न मज काढतील न च ही मनीं कल्पना ॥
'तुम्हास्तव करीन मी अमुक' ह्या विचारान्तरीं ।
क्षणैक थमलो न तो 'हुकुम' देति माझ्या करीं ॥३
लिहून 'नकला' बहू खरडण्यात गेलें वय ।
म्हणून मज काढिलें! किति दया! कमा हा नय! ॥
वरिष्ठ बहु उच्च हा मज गमे खरा जाहला ।
अकारणच नौकरीवरूनि काढुनी दुर्बला ॥४
अशक्य गुलणें जगा, विमरणें प्रिया, लेकरा ।
म्हणूनच कसा तरी परत पातलों मी घरीं ॥
न आस लवही असे मज मिळेल कीं नौकरी ।
चला मजबरोबरी मिळविण्यास माधूकरी ॥५"
असें वदुनि फाडुनी उपरण्यास झोळी करी ।
फिरे मग घरोघरीं मिळविण्यास तो भाकरी ॥
कुटुंबसुखमग्न तें जनजलींच कीं उत्पल ।
नरें अहह! नाशिलें खचित धन्य! सत्ताबल ॥६

मार्गावरी बसुनिया पसरोनि हात ।
केलें अधोवदन आणिक अश्रुपात ।
"द्या धर्म हो!" वदुनिया कर जोडियेले ॥
दे त्या कुणीं न कवडी श्रम व्यर्थ गेले ॥७॥

**कवि आणि संपादक :—** (कवि यशवन्ताची नम्रपणें क्षमा याचून)

कवि:—

"बहु मानस माझी द्यावी । मासिकात अपुल्या कविता ॥
परि विचार येउनि कांहीं । वाटलें कसेसे चित्ता ॥
कविता मम त्यासच द्यावी । देइल जो मोबदल्यास ॥
कवितांच्या योगे व्हावें । द्रव्यार्जन ही मनिं आस ॥
लिहितसों ॥
असू द्या माफि ॥
करा दिल् साफि ॥
मिळावा लाभ । मजवरी असूं द्या लोभ" ॥

संपादक—

"ठेविता न पोटीं किन्तु । लिहिलेंत बहू आवडलें ॥
दर अमुचे माहित सर्वा । कांहींच नाहिं लपलेलें ॥
मोबदला कसला म्हणता । देतो हे आहे फार ॥
कविताना जागा देतां । जाहिरात सारून दूर ॥
दररोज ॥
बाड येतात ॥
परत जातात ॥
तीच गति तुमची" ।

× × ×

स्थिति वर्णू काय कवीची ॥

**बालशाहीर विष्णु गणेश कौजलगी:** (जन्म स. १९१७) — हे उस्मानिया विद्यापीठांत स. ३५।३६ सालात इंटरचे वर्गात अभ्यास करीत असत. यशवंत, गिरीश व मायदेव ह्यापासून काव्यस्फूर्ति झाल्याचें हे

सांगतात. कोल्हापूर, हैदराबाद, सिकंदराबाद इत्यादि ठिकाणीं ह्यांचीं काव्य-गायनें झालीं आहेत. ह्यांच्या कविता 'विहंगामांतून' येत असतात. इंदूरच्या मराठी साहित्यसंमेलनप्रसंगीं, सन १९३५ मध्यें पुणें येथील शारदामंडळाचे आर. बी. समुद्र ह्यांनीं गाजराच्या पुंग्या प्रसिद्ध केल्या होत्या. त्यात ह्यांचा एकंदर कवींत ११ वा व हैदराबादेंत पहिला नंबर लावला होता. स. १९३६ सालच्या गणेशचतुर्थीनिमित्त ह्यानीं एक 'विद्यार्थ्यांचा पोवाडा' छापवून प्रसिद्ध केला. हा सातपानी असून ह्यातील ४ चौकांत त्यानीं विद्यार्थ्यांस आपलें कल्याण साधण्याचा मार्ग दाखविला आहे. प्रसिद्ध कवितात 'कावळोपंत' व 'मला काय वाटतें' ह्या दोन सरस असून 'जीवनसंगीत' ह्या नावानें ते आपला कवितासंग्रह लौकरच प्रसिद्ध करणार आहेत.

—०—

दत्तात्रेय प. गुरु नरसीकर, बी.ए., उस्मानिया. हा नरसीबामणीचा राहणारा. बी. ए. झाल्यानंतर हा "रिसर्चस्कॉलर" म्हणून अभ्यास करीत असतां अकालीं मृत्युमुखीं पडला. ह्यानें "देवगड अथवा दौलताबाद" ह्या नांवाचें एक ऐतिहासिक सुंदर व ओजस्वी खंडकाव्य रचलें आहे. मासिकातूनही ह्याच्या कविता येत असत.

डॉ. शंकरलाल जानकीलाल पुरवार. हे औरंगाबादचे राहणारे हे जातीनें वैश्य असून व ह्याची मातृभाषा हिंदी असून त्यांचें मराठीवर अतोनात प्रेम आहे. हे फुलांमुलांचे कवि म्हणून प्रसिद्ध आहेत. अरुणोदय मालेचे हे सहसंपादक असता त्या मासिकात ते कविता लिहूं लागले. मुंबईस गेल्यावर मनोरंजन, व्यायाम, चित्रमयजगत् ह्यांमधून त्यांच्या कविता येऊं लागल्या. 'सौंदर्यसुरा' व "मायापाश" अशीं दोन नाटकेंहीं त्यानीं लिहिलीं असून त्यांचे प्रयोगही ते आपल्या मंडळांत करवितात. मागें महाजनाच्या कविसंमेलनांत ह्याचा उल्लेख आलाच आहे.

सौ. लक्ष्मीबाई लेले ह्या मंगलाष्टकें वगैरे प्रासंगिक कविता करीत असतात.

पूर्णानंद शिवराम यांचा "भगवद्गीताचंद्रिका" ह्या नांवाचा ग्रंथ हणमंत शिवराम मंकाल ह्यांनीं शके १८४६ त गुलबर्ग्याजवळील चिट

गोप्या येथें प्रकाशित केला आहे असें प्रो. पोतदार ह्यांचेकडून समजलें. परंतु तो उपलब्ध झाला नाहीं.

भाऊसाहेब भट्टराज महानुभाव महंत ह्यांचा वेदांत व व्यवहार ह्यांवरील 'सुबोध सिंधु' नांवाचा ग्रंथ नागपुरास प्रसिद्ध झाला आहे. चालू वाङ्मयाचा नमुना व समाजावर टीका करणारा म्हणून ह्याचें महत्त्व आहे. काव्यांत मराठे व मराठीचा अभिमान व्यक्त केलेला अढळतो. हे महानुभाव नादेडचे आहेत असें म्हणतात. ग्रंथ पाहण्यास मिळाला नाहीं.

ह्याशिवाय रेणुकादासराव देशपांडे वकील ह्याच्या भूपाळ्या, शंकरराव पोफळे ह्यांचा "पत्नीविरह", शं. वा. जोशी ह्यांची स्फुट कविता, आणि गोविंद लक्ष्मण भावठाणकर, त्रिंबकराव परळीकर, पा. अं. कानवले, कल्लूकर, धोकटे, घाणेकर, माढेकर (वकील), श्रीधर कुलकर्णी, मूरूमकर (बी. ए. रिस्का), दा. ब. चिंचोळीकर, डा, भाले, के. य. पतकी, सदाशिव (उस्मानाबाद), कवि कृष्ण, कृष्णाकुमार (से. मा. पगडी), राधेय, राष्ट्रगीत गाणारे ग. ना. अंबेकर, कृष्णाकांत वगैरे अनेक होतकरू कवींचा उल्लेख करण्यासारखा असून मराठवाड्यातील कवितेचा भावी काल मोठा आशाजनक आहे असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं. मात्र त्याच्या उत्कर्षाचे मार्गांत प्रकाशकाचा व योग्य प्रोत्साहनाचा अभाव ह्या मोठ्याच अडचणी आहेत. त्या दूर करण्याचे प्रयत्न भावी पीढीनें करून केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

# प्रकरण २६ वें.

## समालोचन

प्रस्तुत ग्रंथाचीं २६ प्रकरणें असून त्याचा अनुक्रम सामान्यतः कवीच्या जन्मकालानुसार लाविलेला आहे. प्रथमचे कांहीं कवि दीर्घायु होऊन गेल्यामुळें हा काल बरोबर एक शतकाचा म्हणजे स. १८३८ ते स. १९३८ पर्यंतचा झाला आहे. हा काल दिसण्यांत जरी दीर्घ वाटत असला तरी स. १९०० च्या पूर्वीचे एक दोन ग्रंथ व नंतरच्या दशकांतले दोनचार ग्रंथ वगळले, तर बाकीची ग्रंथनिष्पत्ति अलीकडील २०।२५ वर्षांतलीच आहे असें दिसेल. किरकोळ कवींसह एकंदर कवींची संख्या ४०।४५ असून त्यांच्या लहान मोठया सुमारें ७५ ग्रंथाचें विवेचन त्यांच्या इतिवृत्तांसह येथें केलें आहे. अमुद्रित व अप्रकाशित ग्रंथाची संख्या ह्याच्या कितीतरी पटीनें मोठी आहे. प्रत्येक कवीचें किती तरी लिखाण प्रकाशकाचे व द्रव्याचे अभावीं धूळखात पडलें आहे. बळवंतरावजी पाटील ह्याचें "प्रेमरामायण" ग्रंथसंख्या २५००० व 'मधुरभारत' ग्रंथसंख्या एकलक्ष ह्या दोन हस्तलिखितारून ह्या विधानाची साक्ष सहज पटण्यासारखी आहे. तेव्हा ग्रंथनिर्मितींत संख्यामानानें तरी मराठवाडा मागे पडला आहे असें कोणास सहसा म्हणता येणार नाही. चाफेकर, लेले, पंगू, खापर्डे यांच्या सारख्या प्राध्यापकांनीं, साहित्यसम्राट केळकर ह. प. पांगारकर, वाग्वीर सावरकर, रंगाचार्य रड्डीशास्त्री, विष्णुशास्त्री बापट, वेदांत वागीश श्रोत्रीय, ह्यासारख्या रसिक साहित्यिकांनीं, व अनंततनय, चंद्रशेखर, ह्याच्यासारख्या कवींनीं, तसेंच सर्व पीठाच्या आचार्यांनीं आणि, मौलवी मजहर आलीम साहेब सफीर व मौलवी हाजी काजी तामीजोद्दीन ह्यांच्यासारख्या पर धर्मीयांनीं आणि केसरी, मुमुक्षु, रामदास रामदासी, व्यंकटेश समाचार, हिंदुपंच व भारतधर्म ह्यांसारख्या वर्तमानपत्रांनीं ज्या वाङ्मयांतील कांहीं ग्रंथाची प्रशस्ति केली आहे तें वाङ्मय गुणानें उणें आहे असेंही म्हणता येणार नाहीं. तेव्हा तें उपेक्षणीय तर नाहींच पण

त्यांतील अनेक वैशिष्ट्यामुळें तें अभ्यसनीयही आहे हें पुढील विवेचनावरून आढळेल.

महाराष्ट्रांत १९ व्या शतकाच्या प्रारंभींच ब्रिटिश अंमल सुरू झाला. पाश्चात्त्य विद्याचा अभ्यास होऊं लागला. आङ्गल वाङ्मयाचें वैभव पाहून विद्वानांचे डोळे दिपले. वर्तमानपत्रें, मासिकें व व्याख्यानें ह्यांनीं जनतेंत नवी दृष्टि आली. नवी वाङ्मयसृष्टि निर्माण झाली. तिनें नवी तुष्टि होऊं लागली. तरी पण जुनी परंपरा चालूच होती. दाजीबा जोशीराव, परशुराम ढवळे, पूर्णदास विठोबा अण्णा, मटंगे बापूसाहेब कुरुंदवाडकर यानीं जशी तिकडे तशी हंसराज, रामकृष्ण व विश्वनाथ वगैरेंनीं इकडे ती जिवंत ठेवली होती. त्यामुळें मराठी कवितेची स्रोतस्विनी पृथक् व समांतर अशा दोन स्रोतांनीं स्रवूं लागली. पहिलें जुनें वळण व दुसरें नवें वळण होय. जुन्या परंपरेचा नव्हे मराठी भाषेचाच उगम मराठवाड्यातलाच असल्यामुळें त्या बाबतींत इकडे उसनवारीचें काम पडलें नाहीं. दुसऱ्यासंबंधीं मात्र तसें म्हणता येत नाहीं. तिकडेही तें पाश्चात्य वाङ्मयाच्या अनुरागानेंच उद्भवलें, तर इकडे तें तेथील कवींच्या अनुकरणानें उदयास आलें. महाराष्ट्र कवींस, वर्डस्वर्थ, बायरन, शेले, कीट्स् व टेनिसन ह्यांच्या काव्यापासून स्फूर्ति मिळाली तर इकडे केशवसुत, विनायक टिळक, गडकरी व बालकवि, ह्यांपासून स्फूर्ति मिळाली. असो. आतां आपण या द्विविध प्रवाहाचें पृथक्पणें थोडेसें निरीक्षण करू.

**जुनें वळणः—** जुनी कविता तिकडच्याप्रमाणें इकडेही पारमार्थिक किंवा अध्यात्मिक, पंडिती, व शाहिरी अशा त्रिविध स्वरूपांत वावरत आहे एवढेंच नव्हे तर ती अधिक जोमदार, अधिक ठसकेदार, व अभिनव प्रकारची आहे. प्रथमतःच 'सुंदरविलास दीपकेनें' एका उत्कृष्ट हिंदी ग्रंथाच्या अनुवादानें आध्यात्मिक ग्रंथात एक अभिनव भर घातल्याचें आढळेल. इतर ग्रंथ नेहमीप्रमाणें गीता भागवत, भारत, विष्णुसहस्रनाम, क्षेत्रमहात्म्य, या विषयावर असून त्याबरोबरच जरी स्तोत्रें, पदें व भजनें ह्यांचा भरणा असला तरी त्यांत एका स्त्रीशिष्यीणीनें लिहिलेंलें आपल्या स्त्रीगुरूचें "निजानंद चरित्र" सर्व मराठी वाङ्मयात अपूर्व ठरेल. महिपतीचा नवावतार घेऊन नांदेडांत अवतरलेले संत दास गणू ह्यांनीं आपल्या

शिवाय संतचरित्रांनीं महिपतीचें कार्य अद्ययावत् करून टाकलें आहे. व त्यास ब्रह्मानंदस्वामींच्या "लघुभक्त विजयाची" जोड मिळाल्यामुळें मराठवाङ्मयापुरतें तरी ह्या संतचरित्रांस पूर्णत्व लाभले आहे. पण ह्या ग्रंथांचें महत्त्व ह्या विषयाचें पूर्णत्व करण्यात नसून, त्याच्या नवपद्धतींत आहे. कारण ह्यांतील माहिती सागोसांगीची नसून प्रयत्नपूर्वक मिळावलेली व पारखून उपयोजिलेली आहे. चमत्कारवर्णनात मुद्धां अंधविश्वासास फारशी जागा न देतां "लघुभक्त विजया" सारख्या ग्रंथात त्याची सोपपत्तिक चिकित्सा करण्याचा प्रयत्नही केलेला आढळतो. संतकवि एक डोळे व बधिर. परमार्थाशिवाय त्यांस दुसरा विषय दिसत नाहीं. व भोंवतालचा जीवनकलह त्यांच्या कानावर कधीं जात नाहीं. बाह्य जगात कितीही उलथापालथी होवोत तरी ह्यांचा समाधिभंग कधीं व्हावयाचा नाहीं. म्हणूनच ह्यांच्या वाङ्मयाची जीवनाशीं अगदीं फारखत झालेली आढळते. अशा प्रकारचे जे ठराविक आक्षेप जुन्या वळणाच्या वाङ्मयावर नेहमीं घेतले जातात त्यांस दास गणू व इतर संत याच्या वाङ्मयात थारा मिळणार नाहीं, हा त्याचा एक मोठा विशेष होय. एवढेंच नव्हे तर आधुनिक राष्ट्रीय वाङ्मयाचें गुणवैशिष्ट्य त्यांत आपणांस आढळतें. निझामउल्मुल्क बहीरीच्या, पेशव्यांच्या—विशेषतः दुसऱ्या बाजीरावांच्या कुटिलपणाच्या—व द्रोणाचार्यासारख्या परशुरामभाऊच्या मार्मिक ऐतिहासिक गोष्टींनीं त्याचे ग्रंथ मोठे मनोरंजक झाले आहेत, तर सांप्रतचे राजेरजवाडे व राजनीति, सावकार व शेतकरी, देशाचें दारिद्र्य, व जातिभेद, लोकस्थिति, शिक्षण वगैरे सर्व प्रचलित प्रश्नाचा समाचार आपल्यापरी त्यानें घेतला आहे. एकंदरींत पूर्ववैभवाचा अभिमान, स्वातंत्र्यप्रीति, स्वदेशप्रीति, स्वभाषाप्रेम व उन्नतीच्या उपायाचें दर्शन ह्या गोष्टींचा आढळ त्यात होत असल्यामुळें जुन्यावळणांत किती इष्ट असें परिवर्तन घडलें आहे व दोन समातर वाहाणारे जुनेनवे कविता—प्रवाह हळू हळू कसे एकरूप होत आहेत, हें ह्यांच्या काव्यावरून समजण्यासारखें आहे.

महाराष्ट्र—वाङ्मयांत कधीं न सांपडणारा परंतु इकडील वाङ्मयांत आढळणारा दुसरा विशेष गुण म्हटला म्हणजे राजनिष्ठेचा पुरस्कार हा होय. ह्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे कीं महाराष्ट्र वाङ्मय राजद्रोही

आहे. तर मराठवाड्यांतील राजा–प्रजासंबंध अधिक निकटचे असल्यामुळें राजनिष्ठेचे उल्लेख येथें सहाजिकपणें पुष्कळ सांपडतात.

ह्याच्याहीपेक्षां मोठा विशेष म्हणजे जात्यैक्याचा होय. हिंदुमुसलमानांचें ऐक्य झाल्याशिवाय देशास स्वातंत्र्य मिळावयाचें नाहीं हें मत उभय-पक्षातील विचारवंतांस पूर्णपणें पटलेलें आहे. आणि म्हणूनच कॉंग्रेस व तदितर सूज्ञ मुत्सद्दी सर्व हिंदुस्थानभर तें ऐक्य घडवून आणण्याचे भगीरथ प्रयत्न करीत आहेत. पण हें कार्य मराठवाड्यातील संतवाङ्मयानें सुमारें २५।३० वर्षांपूर्वीच घडवून आणलें होतें. साईबाबा, नानावली, बालकृष्णबोवा, शेख महमद, नरसिंगजी, वगैरे उभय जातींतील संताच्या उदात्त कृत्यांनीं व चरित्रानी तें साधण्यास किती तरी मदत केली आहे हें आढळून येईल. "सकलमती सांप्रदाया"ची स्थापना करून श्री माणिक प्रभु सांप्रदायानें तर ह्या बाबतींत कमालीचें यश संपादन केलें आहे. जैन-पद्य वाङ्मयाची भर तर अगदीं नवीन वाटेल.

चांगदेव पासष्टी' व 'अमृतानुभव' ह्या आज दुर्बोध झालेल्या मराठी ग्रंथावर सुबोध मजकुराचें लेणें चढवून दासगणूनें, व 'हरिविजयाचें अभंगात रूपांतर करून हिंगणेकरांनीं ह्या पुरातन ग्रंथाची लोकप्रियता कायम राखण्याचा नवीन उपक्रम सुरू केला आहे. ह्या प्रकारच्या वाङ्-मयाचें धुरीणत्व व श्रेयत्व सर्वमहाराष्ट्रात आज संत दासगणूकडेच जातें.

जुन्या वळणाचा जो दुसरा भाग "पंडिती कविता" त्याकडे आतां आपण वळू. ह्यांत ज्योतिर्विभूषण भगवंतराव तोंडेवाले, काव्यकौस्तुभ यशवन्तराव कोरेकल व काव्यालंकारभूषण विष्णुपंत कन्नडकर ह्या तिघांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. अद्भुत कल्पना, सूक्ष्म बुद्धिवैभव, गाढ-विद्वत्ता व श्लेषप्रियता ह्या गुणांनी ह्या कवींचीं काव्यें सर्व महाराष्ट्राच्या पंडिती काव्यात उच्चस्थान पटकावतील. कोरेकलाच्या "महामंत्र आर्या" व कन्नडकराचा "हंस सत्कार" हीं लघुकाव्यें अनुक्रमें मंत्रयुक्त चित्र-काव्यांत व श्लिष्ट रूपकात्मक काव्यांत खात्रीनें चमत्कृतिजनक मानलीं जातील. शिवाय (कोरेकल) वृत्तसम्राटांचा, समग्र संस्कृतवृत्तांचें मराठी-करण करणारा" "द्वितीयोद्भव" डॉ. पटवर्धनाच्या छंदोरचनेपर्यंत तरी अद्वितीय होता.

तिसरा भाग शाहिरी काव्याचा म्हणजे लावण्या पोवाड्यांचा. ही रचना जरी फारशी झाली नसली तरी जी थोडीबहुत झाली आहे ती अगदीं अव्वल दर्जाची आहे. विष्णुदास माहुरकराचा "आत्मचरित्रपर पोवाडा" अनुपमेय आहे, तर त्यांची "निरभ्रशुभ्र नक्षत्रतुल्य ही ललना कोणाची" ही लावणी सर्व मराठी वाङ्मयाकाशात शुक्राच्या चादणीसारखी सदा चमकत व आल्हाद देत निःसंशय राहील. तिच्या विषयीं "ज्या उपजताच गेल्या काशीविश्वेश्वरा नमायाला" असे जसें पंताच्या आर्याविषयीं म्हटलें आहे तसेच ॥ ज्या धुंडाळुनि नेल्या अमेरिकेप्रति सदा जपायाला । ह्यापैकीं ही एक आहे असे साभिमानाने सागत येईल.

एकंदरींत उपरिनिर्दिष्टवैशिष्ट्यामुळे व मराठवाड्यातील जीवनाच्या प्रतिबिंबाचा आदर्श म्हणून जुन्या वळणाचें हें त्रिविध काव्य, सर्व मराठी वाङ्मयाचा एक प्रपूरक भाग ह्या दृष्टीनें अवश्य अभ्यसनीय आहे ह्याची खात्री पटेल.

## संधिकालचे कवि

जुन्या नव्या वळणाचें पृथक्पण स्पष्टपणें दिसू लागे तों त्या दोहोंस सांधणारा दुवा म्हणजेच हें संधिकालाचें वाङ्मय होय. ह्यांचें वळण जुनेंच असतें पण विचार नवीन असतात. हें काव्य बहुधा वस्तुविषयक असून त्यात कवि स्वतःच्या भावना परपरेनें व्यक्त करतात. मोगरे, दत्त, लोंढे, लेंभे हे जसे तिकडे संधिकालचे कवि झाले तसे पद्माकर, महाजन व श्रीकृष्ण गाडगीळ हे इकडचे संधिकालचे कवि होत. ह्याच्या कवितेत नव्याजुन्याचें सुंदर मिश्रण झालेले आढळतें. संत कवि दासगणू हे नादेड येथें जाऊन राहिल्यापासून तें एक वाङ्मयसेवेचें मुख्य केंद्र बनलें आहे. ते स्वतः केंद्रस्थानीं असून त्याच्यापासून एक परंपरा चालू झाली आहे. महाजनत्याना गुरुस्थानीं मानितात तर महाजनानाही गुरु मानणारे दत्त किकरां सारखे आधुनिक कविही आहेत. ह्याच्या कवितेंत मोरोपती व केशवसुती युगाचा आणि रविकिरणमंडळाचा मिश्र प्रभाव इतस्ततः दिसतो व ईश्वरनिष्ठा, स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा ह्यांविषयीं आवड, नीतिबोधाकडे प्रवृत्ति, आणि सात्त्विक प्रेम ह्या गोष्टी त्यांच्या कवितेंत ठळकपणें दिसतात-नीटनेटकेपणा, शुद्धता, समर्पक शब्दयोजना व कर्णमधुर यमकानुप्रास, हें ह्या कवींचें,

विशेषतः महाजनांचे वैशिष्ट्य म्हणून सांगतां येईल. महाजनांची कविताही इतरांच्या कवितेपेक्षा गुणानें व संख्येनें अधिक श्रेष्ठ व विविध असल्यामुळे ह्या भागाचें अग्रेसरत्व त्यांच्याकडेच निर्विवाद जातें.

## आधुनिक–कवि. नवें वळण.

आधुनिक कविपंचकाच्या काव्याभ्यासापासून इकडील आधुनिक कविपंचकास म्हणजे नादापूरकर-मनाठकर ह्या जोडीस व कांतादित्रिकुटास स्फूर्ति झाल्याचें दिसतें. साधी भाषा व उत्कट भावना हें ह्यांचें वैशिष्ट्य आहे. नादापूरकरांचें निरागस निसर्गप्रेम, मनाठकरांचा सुंदर कल्पनाविलास आणि कांताच्या प्रतिभेच्या उच्च भराऱ्या ह्या गोष्टी त्यांस आधुनिक मराठी कवींत चांगलें स्थान मिळवून देतील. ह्या सर्वांत कांत श्रेष्ठ ठरतो पण त्याची कविता अगदीं थोडी व स्फुट आहे. "जानकी काव्या" खेरीज दुसरें खंडकाव्यही अंगुलीनिर्देशार्थ नाहीं. प्रत्येकानें अनेक खंडकाव्यें लिहिलीं आहेत खरीं, परंतु तीं द्रव्याभावीं अप्रकाशित ! होतकरू कवि तर उदंड आहेत ! उस्मानिया युनिव्हर्सिटीची स्थापना झाल्यापासून तेथें बी.ए. पर्यंत मराठीस स्थान मिळालें असल्यामुळे नवतरुणांस तिचें अध्ययन व्यवस्थितरीतीनें करण्याची सोय झाली आहे. त्यामुळे यशवंत गिरीश, माधवज्युलियन व अत्रे ह्यांच्या काव्यापासूनही त्यांस काव्य करण्याची स्फूर्ति होत आहे. आजपर्यंत जे शेंपन्नास विद्यार्थी मराठी घेऊन पदवीधर झाले आहेत त्यांच्यात रा. एकनाथ धोकटे, घाणेकर, माढेकर, बिदरकर, नादापूरकर, मनाठकर, नर्सीकर, कुळकर्णी, कहाळेकर, मुरूमकर वगैरे पांच पंचवीस पदवीधरांस काव्य स्फूर्ति झाली आहे.परंतु आजकाल मराठी कवितेस कोठेंच उत्तेजन नसल्यामुळे व त्याचा अभाव येथेंही भासत असल्यामुळे "जीर्णमंगे सुभाषितम्" असें म्हणण्याची वेळ आली आहे. तरी पण भाविकाळ चांगला आशाजनक आहे. कारण त्यांचा उत्साह व आत्मविश्वास इतका दांडगा आहे कीं अनुकूल काल येताच ते नावारूपास आल्याशिवाय राहाणार नाहींत. आणि ह्याची साक्ष मागें दिलेल्या यशवंताच्याच्या कवितांचें विडंबन किती सरस झालें आहे त्यावरून सहज पटण्यासारखी आहे.

सरते शेवटीं काहीं ठळक दोषांचेंही दिग्दर्शन करणें क्रमप्राप्त आहे, सर्वसामान्य दोष म्हटले म्हणजे उर्दू शब्दांचा अवास्तव उपयोग व वृत्त-

भाषा आणि व्याकरण ह्यांच्या नियमांकडे अक्षम्य दुर्लक्ष हे होत. नांदापूरकर, महाजन, गाडगीळ व कांत ह्यांसारखे कांहीं अपवाद ह्यास आहेत, नाहींत असें नाहीं. पण विद्वानानीं व पंडितांनींसुद्धां अशा नियमांचें उल्लंघन करावें हें पाहून मोठा खेद होतो. आणि होतकरू कवींचें लक्ष ह्या गोष्टीकडे वेधावें म्हणूनच बहुतेकांचे दोष बऱ्याचशा विस्तृततेनें मागें दाखविले आहेत. दुसरी गोष्ट अशी कीं इकडील आधुनिक कविता अत्यंत अल्प आहे. अप्रकाशित जरी पुष्कळ असली तरी ती प्रकाशित करून तिचें राशीभवन केल्याशिवाय ती डोळ्यात कशी भरावी? व तिचें महत्त्व इतरांस कसें पटावें ? तेव्हां हा उपक्रम आधीं सुरू केला पाहिजे. आणखी असें कीं सामान्यतः ह्या कवींच्या विचारविकारांचें प्रदर्शन थोडेसें उथळ व अस्फुट व केवळ अनुकरणात्मक भासतें. म्हणूनच यांच्या काव्याचा जीवनाशीं दृढ संबंध दिसत नाहीं. सामाजिक, आर्थिक, व राजकीय विषयांची चर्चा येथें केलेली आढळते, पण ती केवळ वरवरची व एक प्रथा म्हणून केलेली आणि प्रतिध्वनिरूप वाटते. पण ह्यास पुष्कळ अंशीं परिस्थिति ही कारणीभूत आहे, हें विसरून चालावयाचें नाहीं. लोकशाहीच्या उदयाबरोबर लेखन-भाषण-स्वातंत्र्य जसजसें वृद्धिंगत होत जाईल, तसे तसे हे सांप्रतचे मूक वा अर्धमूक कवि धीट व वाचाल होऊन कोणत्याही स्वातंत्र्यशाहिरास हार जाणार नाहींत हे खास. आणि मग ते मराठवाड्याचें गतवैभव पुनः उज्वलित करतील ह्यात संशय नाहीं. असा सोन्याचा दिवस लौकरच येवो ! इत्यलम् ॥

विवेचन मदीय हें तुज रुचो रसज्ञा ! बरें ॥
नसे जरि विभूषिलें विधिसुतावरें हें खरें. ॥
वनीं प्रथम जो करी पथ तया मिळे धन्यता ॥
पुरेल तितुकीहि बा ! जरि मिळेल या मान्यता ॥